# दिन-विशेष

[ भारतीय इतिहासाचें तिथिवार दर्शन ]

प्रह्लाद नरहर जोशी, एम्. ए.

वर्षप्रतिपदा शाके १८७२
१९ मार्च सन १९५०

एकमेव विक्रेते
व्हीनस बुक स्टॉल
आप्पा बळवंत चौक : पुणें २

प्रकाशक :
**प्र. न. जोशी**, एम्. ए.,
४३७ नारायण पेठ,
त्र्यंबक-निवास, पुणें २.

किंमत सहा रुपये फक्त

**प्रथमावृत्ति १९५०**



मुखपृष्ठावरील चित्र श्री. दीनानाथ दलाल यांचें

मुद्रक :
**श्रीपाद रघुनाथ राजगुरु**,
राजगुरु प्रेस,
४०५ नारायण, पुणें २.

# पुरस्कार

रा. प्र. न. जोशी, खरशीकर यांनीं "दिनविशेष" हा ग्रंथ रचून एका नवीन प्रकारच्या ऐतिहासिक लेखनाचा मराठी वाङ्मयांत उपक्रम केला आहे. त्याबद्दल मी त्यांचें अंतःकरणपूर्वक अभिनंदन करतों.

**पुरस्कर्ते**



**माननीय लों० बापूजी अणे**
**बिहारचे राज्याधिपति**

आपणाकडे जुन्या पद्धतीनें राहणाऱ्या घरंदाज व सुसंस्कृत वर्गांत सकाळीं उठल्यावर मुखमार्जन वगैरे आटोपून प्रातःस्मरण म्हणून कांहीं मंत्र, स्तोत्र, भूपाळ्या वगैरे म्हणण्याचा बहुशः परिपाठ होता. त्याचप्रमाणें पंचांग पाहून त्या दिवशीं तिथि कोणती व त्या तिथीला काय विशेष धार्मिक, पौराणिक अथवा सामाजिक घटना घडली व त्यानिमित्त आपलें वैयक्तिक अथवा सामुदायिक कर्तव्य काय हें समजून घेण्यांत येत असे. पुष्कळ मोठमोठ्या समृद्ध व सदाचारसंपन्न घरांतून प्रत्येक दिवशीं घरच्या उपाध्यायाकडून अथवा गांवच्या जोशाकडून त्यांना ती माहिती नियमितपणें मिळत असे. आताशा सर्वच जुन्या संस्था व संस्कार अजीचात नष्ट झाले नसले तरी संपुष्टांत येत चालले आहेत यांत संशय नाहीं. तिथीची विचारपूस सुशिक्षित मनुष्य सहसा करीत नाहीं. तो तारखेनें महिन्याचे दिवस मोजतो. आज कोणती तिथि आहे असा प्रश्न केल्यास हजारांत एक पदवीधर विद्यार्थी बरोबर उत्तर देऊं शकेल. जरी वैदिक किंवा हिंदु पंचांगांतील बारा महिन्यांचीं नांवें सर्वांनाच माहिती असलीं तरी चालू महिन्याचें

नांव काय असा प्रश्न विचारल्यास पुष्कळांस त्याचें उत्तर एकदम बिनचूक देणें कठिण जाईल असें मला वाटतें. ही आमची जुनी कालगणना अजून घरांतील स्त्रियांनीं व्रतवैकल्यास फांटा न दिल्यामुळें कशीबशी तग धरून राहिली आहे. एकंदरींत ही स्थिति शोचनीय आहे.

अशा परिस्थितींत "दिनविशेष" ग्रंथांत ऐतिहासिक वृत्त देतांना भारतीय पंचांगांतील कालगणनाक्रमाचें अनुकरण करण्यांत आले याबद्दल श्री. जोशी यांचें जेवढें कौतुक करावें तेवढें थोडेंच आहे. अशा ग्रंथाचा उपयोग हिंदु महिना व तिथि यांचें ज्ञान करून घेतल्याशिवाय करतां येत नाहीं. पूर्वपरंपरा जेथे कायम आहे तेथें स्नानाचा संकल्प करतांना देशकालसंकीर्तन करावें लागत असल्यामुळें वरील प्रकारची अज्ञानजन्य अडचण उत्पन्न होऊं शकत नाहीं. माझी हिंदुमात्रास व भारतवासीयास आग्रहाची सूचना आहे कीं, त्यांनीं ही भारतीय कालगणना-पद्धति कायम ठेवण्याचा आग्रहपूर्वक प्रयत्न केला पाहिजे.

भारताच्या पूर्व व प्रचलित इतिहासांतील प्रमुख घटना व व्यक्ति यांचा विद्यार्थ्यांस व जिज्ञासूंस स्थूल परिचय करून देण्यास दिनविशेष ग्रंथाचा पुष्कळ उपयोग होईल. या ग्रंथांतील गोष्टी नियमितपणें लहान मुलांच्या कानावर पडत गेल्यास स्वदेशाच्या भूत व वर्तमान इतिहासाविषयीं त्यांचे ठिकाणीं प्रेम उत्पन्न होईल. व त्या विषयाचा अभ्यास त्यांना पुढें कंटाळवाणा न होतां उलट अधिक उत्साहप्रद होईल.

असा ग्रंथ रचतांना ग्रंथकर्त्याची दृष्टि प्रादेशिक व सांप्रदायिक नसावी. ती राष्ट्रीय असावी. मी महाराष्ट्रीय आहे किंवा हिंदु आहें यापेक्षां मी भारतवासी आहें या कल्पनेचा योग्य परिपोष होईल हा हेतु समोर ठेवून असे ग्रंथ निर्माण केले पाहिजेत.

त्याचप्रमाणें जे हिंदु आहेत त्यांनाच स्वतंत्र भारतावर प्रेम करण्याची दीक्षा द्यावयाची नाहीं तर जे हिंदु नाहींत, पण भारतनिवासी व भारतनागरिक आहेत त्यांचें भारतावरील प्रेम व निष्ठा दृढ होणें ही गोष्ट स्वतंत्र भारताच्या अभ्युदयास अत्यंत आवश्यक आहे. किंबहुना या दुसऱ्या गोष्टीचा प्रयत्न पहिल्या गोष्टीपेक्षांहि अधिक आवश्यक आहे असें मला पूर्ण विचारान्तीं वाटूं लागले आहे. म्हणून प्रत्येक ग्रंथकर्त्यानें राष्ट्राभिमान जागृत करीत असतांना वरील तत्त्वासंबंधानें जागरूक असण्याची फार जरूर आहे. ग्रंथकर्ते हे राष्ट्राचे

शिक्षक आहेत. विद्यार्थ्यांकरितां लिहिल्या जाणाऱ्या क्रमिक शालेय पुस्तकाच्या लेखनापेक्षांहि इतर ग्रंथलेखनप्रसंगीं प्रादेशिकता व सांप्रदायिकता निर्माण न करण्याची व राष्ट्रीयतेची भावना जागृत करण्याची दक्षता ठेवणें अधिक आवश्यक आहे. शालेय पुस्तकांतील एकांगी लेखानें जर कांहीं दुष्परिणाम होण्याचा संभव असला तर तो दुरुस्त करण्याची शिक्षकांस संधि असते. पण इतर ग्रंथाचें वाचन करणाऱ्याच्या मनावर ग्रंथांतील लिखाणानें होणारे संस्कार अपवादरहित राहत असल्यामुळें बराच काल टिकतात. ज्यांच्या निकालावर अपील नाहीं अशा न्यायाधीशाला आपला निर्णय देते वेळीं जी दक्षता व जें दूरदर्शित्व ठेवणें आवश्यक असते तीच दक्षता व दूरदर्शित्व ग्रंथलेखकानेंहि ठेवणें अवश्य आहे.

प्रस्तुत ग्रंथाच्या वाचनाने वाचकवर्गांत राष्ट्रीयतेच्या भावनेची जागृति होईल व त्याच्या स्वतंत्र भारतनिष्ठेस ज्ञानाचे योग्य अधिष्ठान प्राप्त होईल अशी मला प्रबळ आशा आहे. या ग्रंथांतून प्रत्येक दिवशीं त्या दिवशींच्या तिथीचे पान काढून त्यांतील ऐतिहासिक वृत्तांत वाचणे हें एक आपल्या ऐतिहासिक पितरांचे तर्पण आहे. असलें तर्पण ज्या राष्ट्रांतील लोक सद्भावनेनें व कर्तव्य-बुद्धीने करतात त्यांच्यावर ऐतिहासिक पूर्वज अथवा पितर प्रसन्न होतात. त्यांना वर्चस्, ओजस् व तेजस् देऊन प्रजा, पशु व धनधान्य यांनीं समृद्ध करतात आणि सर्वत्र विजयी होण्याची प्रभावी शक्ति त्यांच्यांत उत्पन्न करतात. ही ऐतिहासिक पुरुषांच्या तर्पणाची फलश्रुति आहे. जे कोणी उघड्या डोळ्यांनीं जगाचा इतिहास वाचतात त्यांना ही फलश्रुति अर्थवादात्मक नसून अनुभव-सिद्ध आहे हें सहज दिसून येईल.

शेवटीं मी श्री. जोशी यांचें या ग्रंथरचनेबद्दल पुनश्च अभिनंदन करतों व त्यांच्या ग्रंथनिर्मितीचे क्षेत्र उत्तरोत्तर अधिक विस्तृत व व्यापक होत जाऊन थोड्याच अवधींत उच्च कोटींतील साहित्यसेवकाच्या यशाची प्राप्ति त्यांस होवो ही भगवंताजवळ प्रार्थना करून हा पुरस्कारलेख संपवितो.

पाटणा,
फाल्गुन व. ४, शके १८७१
ता. ७ मार्च १९५०.

**माधव श्रीहरि अणे**

# “ भारतीय महाकाव्यांतील वेंचक सुभाषितें ”

सामान्य माणसाच्या जीवनांत स्मरणशक्तीचें जें कार्य तेंच राष्ट्राच्या जीवनांत इतिहासाचें. कारण इतिहास म्हणजे तरी राष्ट्रीय जीवनाची स्मृतिच होय. स्मृतीसुद्धां याच्चयावत् गतगोष्टींची असत नाहीं. तिच्या बारीक चाळणींतून कांहीं विशेष महत्त्वाचेच कण शिल्लक उरतात व त्यांवरच तिचें चिंतन-मनन चालते. वाईट गोष्टींची पुनरावृत्ति टाळणें व चांगल्या गोष्टी आवर्जून करीत राहणे, आपलें बलाबल अजमावणें, गुणावगुण पारखणें, थोडक्यांत सांगावयाचें तर आत्मज्ञान करून घेणें हे इतिहासस्मरणाचे मुख्य प्रयोजन आहे.

आज स्वतंत्र भारताला असले पाठ हवे आहेत. पण प्रत्येकाला इतिहासाचा महोदधि घुसळावयास वेळ व सामर्थ्य आहे कोठें? शिवाय हें काम सामर्थ्य व सवड असणारालाहि रूक्ष व जिकीरीचेच वाटणार. अशा बहुसंख्य लोकांसाठीं आपला वेळ खर्चून आणि विषयाच्या रूक्षतेतच रस मानून माझे तरुण शिष्य-मित्र रा. प्र. न. जोशी यांनीं भारतीय दिनविशेषाचा हा गोड नवनीताचा मेला काढला आहे. येथें ऐतिहासिक सत्य पुराव्यानिशीं आहे, पण इतिहासाची रूक्षता नाहीं. यांत रामकृष्णांच्या काळापासून आजपावेतों घडलेल्या ठळक घटना आहेत, पण या दीर्घकालाची लांबण नाहीं कीं आनुपूर्वीची दगदग नाहीं. प्रत्येक पानावरचा प्रसंग सुटा, छोटा, स्वयंपूर्ण, बोधप्रद आणि काव्यमय आहे. म्हणून त्याला मी भारतीय ऐतिहासिक महाकाव्यांतलीं सुभाषिते म्हणतो अथवा ही भारतीय इतिहासाचीं सुट्या मण्यांची स्मरणी आहे किंवा भारतानें कृतीच्या टंकाने कालपत्रावर कोरून ठेवलेली त्याची ही दैनंदिनीच रा. जोशी यांनीं आम्हांस उपलब्ध करून दिली आहे. कारण दैनंदिनींत आढळणारा वेंचकपणा, जिव्हाळा आणि प्रांजलपणा त्यांत आहे. ती मराठी भाषेंत असली तरी अक्षरशः भारतीय आहे. रा. जोशांना दुवा देत देत या सुरस सुभाषितांचे गोड घुटके घेणें, या स्मरणीचे मणि चिंतनपूर्वक ओढणें आणि या दैनंदिनीच्या मननानें आपला भूतापेक्षां भविष्य अधिक उज्ज्वल करण्याची आकांक्षा धरणें येवढेंच आम्हां वाचकांचें काम आहे.

योगकुंज, चिमणबाग,
टिळक पथ, पुणें २

डॉ. के. ना. वाटवे,
एम्. ए., पीएच्. डी.

# प्रस्तावना

माझे तरुण मित्र श्री. प्रल्हाद नरहर जोशी यांच्या या प्रस्तुतच्या ग्रंथाला प्रस्तावना लिहितांना मला फार आनंद होत आहे. जोशी हे स. प. कॉलेजमध्यें माझे विद्यार्थी होते तेव्हांपासून मी त्यांच्या मनाचें चलनवलन पहात आहें.

परीक्षांत तर त्यांनीं उत्तम यश मिळविलेंच; पण इतर बाजूंनींहि मनाचा व रुचीचा पोष आपल्या भावी जीवनाला उपकारक असाच त्यांनीं बनविला आहे. ललित वाङ्मयाकडे त्यांचें मन मध्यंतरीं वळलेलें दिसलें, तेव्हां मला थोडा धाक वाटूं लागला होता. कारण ललित वाङ्मय लिहिण्याचा अधिकार इतक्या कोवळया वयांत कोणाला येतो असें मला वाटत नाहीं. सुदैव असें कीं, श्री. जोशी यांची सांस्कृतिक अभ्यासाची आवड आणि विद्येच्या व्यासंगाची उमेद बलवत्तर ठरली आणि तिला हें सुंदर फळ आलें. 'दिनविशेषा'ची कल्पना इंग्रजी वाङ्मयांत केव्हांच अमलांत आली आहे. आपल्याकडे ती आणण्याचा मान श्री. जोशी यांनीं मिळविला. सतत वर्षभरपर्यंत येथील 'भारत' पत्रांत ते 'दिन-विशेष' लिहीत होते. त्यांचेंच हें पुस्तक झालें आहे. हें पुस्तक नाहीं; हा एक ग्रंथ आहे; आणि याचें प्रत्येक पान वाचनीय झालें आहे. पण यासाठीं जोशी यांना केवढे कष्ट पडले आहेत, याची कल्पना मला बरोबर आहे. जोशी मला मधून मधून भेटत व आपल्या चाललेल्या कामाची कल्पना देत. मात्र या

**प्रस्तावनाकार**



प्रा. श्री. म. माटे

कामाचें सर्वच्या सर्व श्रेय त्यांचेच आहे. एकीकडे आपल्या नोकरीचा पेशा संभाळून जोशी यानीं सतत दोन वर्षे हा प्रदीर्घ व्यासंग अखंड चालू ठेवला. 'भारत' पत्राच्या संपादकांनीं ही कल्पना उचलून धरली; इतकेंच नव्हे तर मधेंच कोठे कंटाळून टाकून दिली नाहीं हें त्यांच्या सांस्कृतिक रसिकत्वाचेंच लक्षण समजलें पाहिजे. पण 'भारत' च्या वाचकांनीहि या कल्पनेचा पुरस्कार अनेकदां जोरानें केला आणि 'दिनविशेष' हें 'भारता'चें एक नित्याचे उत्तमांग बनलें. पण जोशी हेच खचले असते, याताथातीला कंटाळले असते किंवा निवड करण्याच्या कामीं त्यांनीं कुचराई केली असती तर हा सारा डाव वायां गेला असता. श्री. जोशी यांच्या चिकाटीने तो यशस्वी झाला आहे. या तरुण लेखकाचें मी मनापासून अभिनंदन करतो व तें अशासाठीं कीं, 'काय करावें, काय करावें' या मन्त्रजपांत ते चांचपडत राहिले नाहींत. शेकडों तरुण लोक असे आढळतील कीं, जे बुद्धीनें चलाख आहेत व ज्यांना कांहीं करून दाखविण्याची हास आहे. पण दुर्दैवाची गोष्ट ही कीं, त्यांना 'किं कर्म किमकर्मेति' हा प्रश्न भारीच जाचक ठरतो. आणि कांहींच निकाल न झाल्यानें ते नेहमींचा घाणा ओढूं लागतात. जोशी यांनीं या क्षुण्ण मार्गावरचें पाऊल बाहेर काढले व एवढा मोठा उद्योग हिमतीनें तडीस नेला. ही गोष्ट तरुण माणसांच्या ठिकाणीं अनुकरणाची हौस उत्पन्न करील व वृद्धांना आशा उत्पन्न करील. जोशी यांचा एवढा पवित्र उद्योग सुद्धां विद्येच्या, अथवा अविद्येच्या, असूयेने मारूं पहाणारे पाखंडी लोक आहेतच. मूल जन्माला येण्याच्या आधींच त्याच्या और्ध्वदेहिकाचे मंत्र म्हणून आपली वाणी शिणविणारे हे लोक 'कंस' संस्कृतीचेच म्हटले पाहिजेत. त्यांच्या या अशुभ वाणीला न जुमानतां हें बालक जन्माला येत आहे हे पाहून फार आनंद होतो.

श्री. जोशी यांनीं ही 'दिनविशेषा'ची कल्पना काढली खरी, पण तिचे कष्ट काय आहेत याची कल्पना त्यांना अगदीं आरंभीं आली असावी असें वाटत नाहीं. रोजच्या रोज त्या त्या दिवशींचें लोकांनीं ध्यानांत ठेवण्यासारखे कांहीं तरी घडलेले असलेंच पाहिजे हें जोशी यांचे गृहीत प्रमेय होते. असें सहज विचारतां येण्यासारखें आहे कीं, एखादें अलौकिक घटित दरदिवशीं घडलेंच असलें पाहिजे असें तुम्ही कशावरून गृहीत धरतां? जोशी यांनासुद्धा हा प्रश्न पुढे तरी पडलाच असला पाहिजे. पण भरतखंडाच्या इतिहासाचें आयुर्मान इतकें विशाल आहे कीं, आणि त्याच्या आधुनिक इतिहासाची नोंद इतकी तपशीलवार आहे कीं, अशा तऱ्हेचें ध्यानांत

ठेवण्यासारखें घटित दर तिथीच्या नांवानें सापडेंलच सांपडेल असा भरंवसा त्यांना वाटला असावा. पण हा नवाजुना इतिहास सारखा खेळत ठेवणें म्हणजे मोठया जिगजिगीचे काम होतें. त्यांतहि जागतिक दिनविशेष हा विषय त्यांनीं घेतला असता तर त्यांचे काम अर्थातच सोपें झालें असतें. कारण अशा तऱ्हेच्या दिनविशेषांची नोद तिकडील देशांनीं आधींच केलेली आहे. आणि दुसरे असे कीं, निरनिराळया अनेक ठिकाणीं एका एका शाखेंतील स्फुट घटितांची नोंद अनेक संस्थांनीं केलेली आहे. तेवढें वाङ्मय हाताशीं ठेवलें असतें म्हणजे झालें असतें. पण जोशी यांचा आग्रह जागतिक दिनविशेष हा नसून 'भारतीय दिनविशेष' हा आहे. अर्थातच त्यांच्या साहित्याचें क्षेत्र अतिशय संकुचित होऊन बसले. दुसरें असें कीं, त्यांनीं जर भारतीय शकावली करण्याचें काम हातीं घेतलें असतें तर तें यापेक्षां सोपें गेलें असतें. प्रत्येक शकात कांहीं ना कांहीं तरी ठळक गोष्ट घडलेली असतेच आणि त्या नोंदीचा आढळ हा तिथि-घटनेच्या आढळापेक्षां अर्थातच सोपा ठरला असता. परंतु जोशी यांनीं शकविशेप असा विषय न घेतां दिनाविशेष असा घेतला. आणि मग तिथिवार घटना हुडकून काढणें हें एक मोठेंच काम होऊन बसलें. पण आनंदाची गोष्ट ही कीं, जोशी या कामांतून शिरसलामत बाहेर पडले आहेत.

हा 'दिनविशेषा'चा ग्रंथ वाचला म्हणजे ध्यानांत येतें कीं, त्या त्या तिथीच्या विशेषाची नोंद तर व्हावयास हवी, पण सांपडलेला दिनाविशेष विशेष ध्यानांत ठेवण्यासारखा मात्र नाहीं असें श्री. जोशी यांना सुद्धां पटलें असावें. पण दिनाविशेषाची नोद ही भूमिका एकदां पत्करल्यानंतर, एरवीं ज्या घटितांना त्यांनींसुद्धां इतके महत्त्व दिलें नसतें तीं घटितें विशेष महत्त्वाचीं म्हणून त्यांना त्या त्या तिथींवर द्यावीं लागलीं आहेत. उदाहरणार्थ, कांहीं कांहीं घटितें पहा—चैत्र वद्य ११ ला 'विठोबाअण्णांचें निधन' अशी नोंद आहे. आतां विठोबाअण्णा दप्तरदार हे एक साधारण तऱ्हेचे भगवद्भक्त, हरदासांना उपयोगी पडणारें कवन लिहिणारे कवि, व समकालीन लोकांत प्रसिद्धि पावलेले शास्त्री असे गृहस्थ होते. या गुणांना कांहीं थोडेसें महत्त्व आहे. परंतु भारतीय दिनविशेषांत त्यांच्या निधनाला कांहीं महत्त्व नाहीं म्हणजे चैत्र वद्य ११ ही त्यांच्या नांवावर विकावी असें त्यांच्या चरित्रांत कांहींच नाहीं. चैत्र वद्य १२ या दिवशीं मोतिलाल नेहरू यांचा जन्म अशी नोंद आहे. मोतिलाल नेहरू

यांच्या मृत्यूला महत्त्व आहे. पण त्यांच्या जन्माला महत्त्व आहे असें इतिहास कधीं म्हणणार नाहीं. त्यांच्या देशभक्तीचा प्रकर्ष शेवटीं शेवटीं झाला आणि म्हणून त्यांच्या मृत्युतिथीला महत्त्व यावें हें बरोबर आहे. रामकृष्ण इत्यादि अवतारी पुरुषांच्या जन्मतिथि कां साजऱ्या होतात हें आपणां सर्वांना माहीत आहे! ज्येष्ठ वद्य ५ ला 'काळ कचेरीला पोलिसांचा गराडा' अशी नोंद श्री. जोशी यांना करावी लागली आहे. ही करतांना जोशी यांनासुद्धां मनांतून हंसूं आले असेल. पण एकदां 'दिनविशेष' ही कल्पना ठाम ठरल्यानंतर हातांशीं असलेल्या साहित्यांत त्यांतल्या त्यांत जी घटना बरी दिसली तीच त्यांना घालावी लागली. तुम्हीं सगळे साहित्य नीट शोधले नाहीं, अमुक तमुक थोर देशभक्ताचा मृत्यु याच दिवशीं झाला आहे, असें श्री. जोशी यांना कोणीं दाखवून दिले तर ते सुद्धां त्यांना पत्करावें लागेल. पण साहित्याच्या व साधनांच्या मर्यादेनें माणसाचे यश अंकित होऊन बसतें हेंच खरें. ज्येष्ठ वद्य १३ ला 'शिवभूषण' काव्याची समाप्ति झाली या नोंदीचे महत्त्व कोणाला पटेल किंवा न पटेल. एक महत्त्वाचा ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून मला तें काव्य फार महत्त्वाचे वाटतें आणि म्हणून ही नोंदहि मला बरी वाटते. पण येथे मतभेदाला जागा आहे, हे मी मान्य करतों. श्रावण शुद्ध ४ ला संभाजीनें पोर्तुगीजांचीं जहाजे पळविलीं ही नोंद इतिहाससंशोधकांनाच महत्त्वाची वाटण्यासारखी आहे. श्रावण शुद्ध ११ ला अरविंदबाबूंचा जन्मदिवस असला तरी त्यांच्या जन्मदिवसाला दिनविशेषाचें महत्त्व प्राप्त झालेलें आहे असें मला वाटत नाहीं. श्रावण वद्य ६ ला 'काकोरी कटांत आगगाडीची लूट' झालीहि असेल. पण या लुटीची नोंद दहशतवादाचा इतिहास केव्हां लिहिला गेला तर त्यांतच शोभण्यासारखी आहे. रमेशचंद्र दत्त कार्तिक वद्य ३, गंगाधरपंत नेवाळकर कार्तिक वद्य ५ आणि पांगारकर कार्तिक वद्य ६ या दिवशीं निधन पावले. हे तिघेहि गृहस्थ बरे संभावित लोक होते. पण या तिथि त्यांच्या नांवावर रुजू व्हाव्या एवढी त्यांची योग्यता आहे असे वाटत नाहीं. बंगालच्या प्रांतिक दिनविशेषांत रमेशचंद्रांच्या मृत्यूला महत्त्व आहे आणि महाराष्ट्राच्या प्रांतिक दिनविशेषांत पांगारकरांच्या निधनाला महत्त्व आहे. पण भारतीय दिनविशेषांत यांच्या निधनाची नोंद एवढ्याच कारणास्तव येऊं शकते कीं, त्या दिवशींचें अधिक चांगलें कांहीं घटित श्री. जोशी यांच्या हातीं

लागलें नाहीं! गंगाधरपंत नेवाळकर यांचा मृत्यु हा सर्वथा उपेक्षणीयच आहे. झांशीची राणी लक्ष्मीबाई ही स्त्री जातीचा एक अलंकार होऊन गेली. पण तेवढ्यामुळें गंगाधरपंत नेवाळकर, या तिच्या नवऱ्याच्या मृत्यूला दिनविशेषाचें भाग्य लाभेल असें वाटत नाहीं. अशीं आणखी कांहीं उदाहरणें देतां येण्यासारखीं आहेत. पण दिग्दर्शनासाठीं एवढींच पुरेशीं आहेत. श्री. जोशी यांच्या कामांतील अडचणी कोणच्या हें मी सांगत आहे.

ग्रंथ वाचून पाहिला म्हणजे मनावर आणखी एक गोष्ट ठसते ती ही कीं, येथें निधनांचीच नोंद जास्त आहे. त्या मानाने घटितांची नोंद कमी आहे. हाहि दोष ग्रंथकर्त्याकडे जात नाहीं. आमची इतिहासाची नोंदच मुळी इतकी अल्प आणि स्थूल असते! एखाद्या माणसाच्या हातून कांहीं घडत असतांना आपण कालाची नोंद आवर्जून करावी असे कोणाला फारसे वाटतच नसावे. तो माणूस एकदां मेला म्हणजे मग तेवढ्या दिवसाचें स्मरण मात्र ठेवण्याची तरतूद लोक करीत असावे असें दिसतें. त्यांतहि पुन्हा वर्षाची नोंद लोक जितकी करतात तितकी विशेष दिनाची करीत नाहींत. या अडचणी लक्षांत घेतां जोशी यांनीं ही निधनें तरी हस्तगत केलीं हे विशेषच आहे.

आणखी एक गोष्ट ग्रंथवाचनाने मनावर ठसते. आपल्या लोकांचें आधुनिक जीवित तरी बहुशाख नाहीं. थोडीबहुत सांस्कृतिक विद्या आणि थोडाबहुत रणांगणावरचा पराक्रम यांच्या पलीकडे आपले लोक गेलेले दिसत नाहींत. या मानाने पश्चिमेकडील लोकांचे आधुनिक जीवित कसें बहुशाख आहे आणि किती पल्लवित झाले आहे तें पहा. वस्तुजाताकडे आणि मानवी जीविताकडे पाश्चात्य लोक इंद्राप्रमाणे सहस्र नेत्रांनीं पहात असतात. अर्थातच त्यांचीं ज्ञानें आणि जीवितें सहस्रावधि घटितांनीं भरलीं आहेत. क्षणभर अशी कल्पना केली कीं, आपण युरोपियन दिनविशेष असा ग्रंथ लिहीत आहोंत तर अमक्यानें या दिवशीं अमुक तारा शोधून काढला, तमक्याने त्या दिवशीं किलिमांजारो या शिखरावर पाय ठेवला, अमुक दिवशीं राइट बंधूंनीं आपलें पहिलें विमान उडविले, तमुक दिवशीं पेट्रोलियम या खनिजाचा शोध लागला, छापखान्याची युक्ति कॅक्स्टन याने इंग्लंडांत अमुक दिवशीं आणली, गॅलिलिओनें अंतर्गोल आणि बहिर्गोल अशा कांचा शिशाच्या नळीच्या दोन तोंडांशीं बसवून अमुक दिवशीं

दुर्बिण तयार केली आणि चंद्रावरील डोंगरांचें दर्शन घेतलें—अशा एक ना दोन विविध तऱ्हेच्या सहस्र घटना आपल्याला सांपडल्या असत्या आणि एका एका दिवशीं दहा दहा, बारा बारा घटनांचा देखील उल्लेख करावा लागला असता. त्या मानाने आपलें जीवित संकुचित आहे आणि जेथें त्याचा विस्तार झाला आहे तेथे तें एकारल्यासारखे झालें आहे. याला श्री. जोशी यांचा अर्थातच कांहीं इलाज नाहीं! एकदा दिनविशेषाची कल्पना पत्करली हीच चूक झाली असें कोणाला म्हणावयाचें असलें तर त्यानें खुशाल म्हणावें. इंग्रजांच्या साहचर्यानें अशा केती तरी चुका आपण आतांपर्यंत केलेल्या आहेत.

महाराष्ट्र देशांतील बुद्धिमान् वाचकांचा वर्ग संख्येनें फार लहान आहे. परंतु इंग्रजांची संगति लाभल्यापासून केवळ अनुकरणाच्या इच्छेनेच का म्हणानात, पण आपल्या जीविताला त्याने अनेक शाखा उत्पन्न केल्या. अनेक प्रश्न उपस्थित केले आणि अनेक संस्था स्थापन केल्यां. परंतु या सगळ्या मुलखांत वावरणारीं माणसें तींच तींच आहेत आणि तीं अपुरीं आहेत असे आपल्याला दिसून येतें. शाखांचा संभार आपण उत्पन्न केला, पण त्याला फलभार उत्पन्न होण्यास वाचकांच्या रूपाने जितका जीवनरस पोसणें अवश्य असते तितका कधींहि पोंचत नाहीं. त्यामुळें आपले आधुनिक जीवित पूर्वीच्यापेक्षां जास्त बहुशाख बनलेलें असून सुद्धां त्याला असावी तितकी पालवी आणि टवटवी दिसून येत नाहीं. या इतक्या शाखा आपण उत्पन्न कशाला केल्या असा प्रश्न जे कोणी करतील तेच लोक जोशी यांनीं ही दिनविशेषाची कल्पना कशाला काढली असाहि करतील. कांहीं वर्षांपूर्वी लोकमान्य टिळकांचें एक स्मारक म्हणून कै. तात्यासाहेब केळकर यांच्या एका समितीनें माझ्याकडून 'महाराष्ट्र सांवत्सरिक' लिहविलें. सांवत्सरिकाची कल्पना निःसंशय चांगली होती. या कल्पनेचे स्वागत केवळ नावीन्याच्या हौसेमुळें सुशिक्षित वर्गाने सुद्धां एकदां केलें. पुढें दोन वर्षें हे 'सांवत्सरिक' मीं स्वतः काढलें. पण पुढें ही कल्पना वठून गेली. रा. जोशी यांच्या या कल्पनेचें सुद्धां काय होईल हें मला निश्चयाने सांगतां येत नाहीं. पण ती वठायाची असली तरी महाराष्ट्र भाषेत अशा तऱ्हेचा एक ग्रंथ त्यांनीं स्वतः एकट्याच्या हिंमतीवर प्रथम निर्माण केला ही गोष्ट शिल्लकच राहील.

या 'दिनविशेषा'चें मुख्य वैभव हें आहे कीं, यांच्या वाचनाने नवीन वाचक तरी खरोखरच पुष्कळ बहुश्रुत होतील. रा. जोशी यांनीं त्या त्या तिथीच्या

घटिताची केवळ भुंडी नोंद केलेली नाहीं. तसें केलें असते तर ती एक पंचांगवजा चोपडी झाली असती. त्यांनीं प्रत्येक घटिताची एकेक पान हकिकत दिलेली आहे. मग तें चरित्र असो, इतिहास असो किंवा दुसरी कोणचीहि घटना असो. ग्रंथाच्या पानांना कांहीं तरी मर्यादा ठेवावयास हवीच असते. प्रस्तुत ग्रंथाचीं पानें पांचशेपर्यंत गेलेलीं आहेत. हें लक्षांत घेतलें आणि वाचकवर्गाची पुस्तक घेण्याची शक्ति अजमावली म्हणजे, याहून जास्त पानें घालणें चुकीचेंच ठरलें असतें. अर्थातच वांटणी होतां होतां एका एका तिथीला एकेक पान द्यावें हेच धोरण त्यांनीं कायम केलें. पण पुष्कळ ठिकाणीं असें झालें आहे कीं, एका एका तिथीला संस्मरणीय अशीं तीन-तीन; चार-चार घटितें सुद्धां त्यांना द्यावीशीं वाटलीं. साहजिकच अशा प्रत्येक तिथीला तीन-तीन; चार-चार पानें खर्चीं पडलीं. या प्रत्येक पानांत त्या दिनविशेषाचें महत्त्व काय आहे हें सांगण्याचा प्रयत्न जोशी यांनीं कसोशीनें केला आहे आणि हा करतांना त्यांना किती तरी वाङ्मय वाचावें लागलें आहे. दिनविशेष हुडकून काढण्याचे जेवढे कष्ट त्यांना पडले त्याहूनहि, कदाचित् जास्त कष्ट त्या त्या विशेषाचा इतिहास मिळविणें आणि संकलित करणे या कामीं त्यांना करावे लागले आहेत. पण हे त्यांनीं केलें असल्यामुळें कोणाहि वाचकानें हा ग्रंथ कोठेंहि उघडला तरी तो त्याला मनोरंजक वाटेल आणि तो त्याच्या ज्ञानांत भरहि घालील. विद्यार्थ्यांना तर हा ग्रंथ म्हणजे विविध प्रकारच्या ऐतिहासिक माहितीची एक सोन्याची खाणच आहे. . . .

माहिती मिळवितांना आणि तिचे संकलन करतांना कांहीं दोष राहून जाणे हे स्वाभाविक होतें. माझें एक मित्र म्हणत होते त्याप्रमाणें सबंध एका वर्षाचे दिनविशेष आगाऊ करून ठेवून, त्यांची चालना करून, त्यांत कांहीं नवेंजुनें करून मग जोशी यांनीं दररोज एक या दराने 'भारत' पत्रांत त्यांना प्रसिद्धि दिली असती तर गुंजारवाला जास्त वेळ मिळाल्यामुळें या वाङ्मयांत सध्यां जे थोडेबहुत दोष दिसतात तेहि राहिले नसते. सर्व चरित्रांना एकरूपता आली असती, आणि चरित्रातील कोणत्या तपशिलाला किती महत्त्व द्यावयाचें याचा निकाल संथपणें करतां आला असता. राज्याभिषेकाच्या वेळीं शिवरायांनीं रामदासांचा सल्ला घेतला होता या आपल्या विधानाला जोशी यांना मग सबळ ऐतिहासिक पुरावा कदाचित् देतां आला

असता. मुंबईस टिळकांची प्रेतयात्रा निघाली तेव्हां खांदा कोणीं कोणीं दिला याचा तपशील सांगतांना त्यांत अलीबंधूंचीं नांवें द्यावयास हवीं होतीं असे माहित-गारांनीं त्यांना सांगितले असतें. शिवरामपंत परांजपे यांच्या चरित्रांत त्यांच्या शिष्यशाखेची आणि शिष्यवरांची नोद होणें अवश्य आहे असें जोशी यांना सुद्धां वेळ सांपडता तर सुचलें असते. शिवरायांनीं किल्ल्यांचीं नांवें नवीं ठेवलीं असा मोघम उल्लेख न करतां, राजांनीं दिलेल्या नव्या संस्कृत नांवांपैकीं कांहीं थोडींशीं मासल्यासाठीं येथें द्यावीं असे त्यांना आपोआपच वाटलें असते. लजपतराय यांची माहिती सांगतांना ते प्रथमतः आर्य समाजिस्ट असूनहि पुढें सनातनी हिंदूंचा पक्ष त्यांनीं एवढया आवेशानें कां उचलला याचें त्यांच्या चरित्रांत नोंदलेलें कारण येथे उद्‌धृत करावें असें जोशी यांना वाटलें असतें. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्याकडून ज्या लोकांनीं स्फूर्ति घेतली त्यांच्या यादींतून टिळक आणि आगरकर हीं होन मोत्यें गळालीं आहेत, याची चुटपुट त्यांना खचित लागली असती. मला ही यादी पुष्कळ वाढवितां येण्यासारखी आहे. पण जोशी यांचा दावा असा नाहीं कीं, झालेलें काम सर्वस्वीं निर्दोष आहे. कदाचित् या ग्रंथाची दुसरी आवृत्ति काढण्याचा योग आला तर किती तरी नव्या सुधारणा त्या आवृत्तींत होतील. जुन्या कमकुवत नोदी रद्द होतील आणि ज्यांना खरोखरीच 'दिनविशेष' हें नांव शोभेल त्या तेथे स्थानापन्न होतील. परंतु हे दोष जमेस धरून सुद्धां जोशी यांनीं केलेली ही एका एका पानाची रचना मनोरंजक तर आहेच आहे आणि नवीन वाचकांना निःसंशय बोधप्रदहि आहे.

श्री. जोशी यांनीं ही 'दिनविशेषां'ची निवड विशेष प्रकारच्या ममत्वाने केलेली आहे. महाराष्ट्रांत सध्यां मतामतांतराचा गलबला इतका आहे कीं, आदर आणि सहानुभूति यांच्यासुद्धां वांटण्या होऊन बसल्या आहेत. श्री. जोशी यांनीं ही वांटणीची बाधा स्वतःला होऊं दिली आहे असे मला वाटत नाहीं. परंतु त्यांचा ओढा हिंदु संस्कृतीकडे विशेषत्वेकरून आहे हें मात्र ठळकपणानें दिसून येते. आणि तो असला म्हणून बिघडलें काय? हिंदु संस्कृतीचे वाली कोणीं असूंच नये कीं काय? मनाची बैठक ही असल्यामुळे रामायण-महाभारत आणि इतर पुराण-साहित्य येथपासून त्यांनीं आपले दिनविशेष उचललेले आहेत. अर्थातच विद्यार्थ्यांना किती तरी नव्या गोष्टींची माहिती या 'विशेषां'च्या

वाचनानें होईल. आरंभींच्या परिच्छेदांत मीं म्हटलेंच आहे कीं, कोणी कोणी लोकांनीं जोशी यांच्या या प्रयत्नाला जन्माआधींच शाप देऊन ठेवलेला आहे. या शापाचें तरी कारण एवढेंच कीं, जोशी यांचा ओढा हिंदु संस्कृतीकडे आहे. या त्यांच्या अभिमानाची एक ढळढळीत खूण ही आहे कीं, त्यांना हे 'दिनविशेष' तिथीवार दिलेले आहेत. तारीखवार दिलेले नाहींत. तिथि, महिना, शक यांचें स्मरण ठेवणें इंग्रजी अमलांतल्या संवयीमुळें आपल्याला कठीण जाऊं लागलें आहे. पण इंग्रजी अमलाच्या मागोमाग त्यांची भाषा घालविणें, त्यांचे पुतळे पदभ्रष्ट करणें, त्यांच्या नांवांनीं ज्या स्थलविशेषांचा उल्लेख आतांपर्यंत झाला त्यांना नवीं नांवे देणे हें जर स्वाभिमानाचे लक्षण ठरतें तर कालगणनेच्या बाबतींत आपण पूर्वापार पद्धतीकडे कां वळूं नये, हा प्रश्न प्रत्येकानें आपल्या मनाशीं स्वतःला केला पाहिजे. या दृष्टीने पाहतां जोशी यांचे करणे अगदीं बरोबर आहे. पण अभिमान झाला तरी तो गैरसोईचा बनूं नये म्हणून प्रत्येक पानाच्या शेवटीं त्या त्या तिथीची येणारी तारीख दिली आहे. परंतु पुष्कळ लोकांचें एवढ्यावरहि भागण्यासारखें नाहीं. म्हणून जोशी यांनीं शेवटीं एका परिशिष्टामध्यें तारखांचा अनुक्रम देऊन ती ती तारीख कोणच्या पानावर सांपडेल तेहि सांगितलें आहे. ज्यांना तारखेप्रमाणे सगळें कळावयास हवे त्यांनीं परिशिष्ट पहावे आणि दिलेल्या पानावर जो कोणचा 'दिनविशेष' सांपडेल तो वाचावा.

श्री. जोशी यांनीं 'दिनविशेषां' तील हकिकत देतांना त्या त्या माणसा-संबंधानें किंवा प्रसंगासंबंधानें अवतरणें घेतलीं आहेत. कांहीं कांहीं ठिकाणीं ज्यांच्या लिखाणांतून हीं घेतलीं आहेत त्यांचीं नांवें दिलेली आढळतात. परंतु बहुतेक ठिकाणीं हे उतारे कोठले आहेत हे मुग्धांतच ठेवलें आहे. असे वाटतें कीं, त्या त्या मूळ लेखकांचीं नांवें दिलीं असतीं तर बरें झाले असतें.

या ग्रंथाचें स्वागत महाराष्ट्रीय जनता उल्साहानें करील असा विश्वास मला वाटतो. एका अगदीं तरुण गृहस्थाने एखादी नवी कल्पना बसवावी, तिच्या-साठीं जिवापाड श्रम करावे, अक्षरशः शेकडो ग्रंथांचें अवलोकन करावे, शेवटीं खर्चवेचाची सुद्धां जबाबदारी स्वतःच्या शिरावर घेऊन एवढा पांचशे पानांचा ग्रंथ प्रसिद्ध करावा ही गोष्ट महाराष्ट्र वाङ्मयांत आतांपर्यंत कितीदां घडली

आहे याचा शोध जिज्ञासूंनीं करावा. त्यांना अशीं कष्टाळू, स्वार्थत्यागी आणि हिंमतबाज माणसें फारशीं आढळणार नाहींत. मात्र जोशी यांना माझी अशी सूचना आहे कीं, हा ग्रंथ पुन्हा छापण्याचा योग येणार आहे असें गृहित धरूनच त्यांनीं त्याच्या सुधारणेला आतांपासूनच सुरवात करावी. या कामीं त्यांनीं कांहीं मुरब्बी इतिहाससंशोधकांची मैत्री संपादावी आणि जमल्यास थोडी कामाची वांटणीहि करावी. कोणाकडे चरित्रग्रंथाचें वाचन द्यावे, कोणाकडे पुराणांचे द्यावे, कोणाकडे निरनिराळ्या प्रांतांच्या इतिहासाचे द्यावें, प्राचीन शास्त्रांचा अभ्यास ज्यांनीं केला आहे त्यांच्याकडे ते वाचन सोपवावे. असें केल्याने प्रस्तुतच्या ग्रंथाला **भारतीय** दिनविशेष हें नांव यथार्थपणे लागू पडेल. सध्यांचे नांव म्हणजे भारतीय दिनविशेष हे महाराष्ट्रापुरते भारतीय विशेषांचें आहे. म्हणजे महाराष्ट्रांतील लोकांना जे कोणचे इतर भारतांतील दिनविशेष माहीत असावयास हवेत त्यांतले बरेचसे यांत सांपडतील. परंतु भारतीय दिनविशेष या नांवाकडे लक्ष देऊन इतर प्रांतांतील लोक जर आपापल्या इतिहासाच्या दृष्टीने याच्याकडे पाहूं लागतील तर अजून पुष्कळच नोंदी यांत व्हावयास हव्या असा त्यांचा अभिप्राय पडेल. यासाठीं भारतीय हे घवघवीत नांव या ग्रंथाला जर यथार्थत्वाने लागू करावयाचे असेल तर वर सांगितलेली कामाची वांटणी अवश्य आहे. सामुदायिक अभ्यासाची पद्धति ही नेहमींच उपकारक ठरते असें मला वाटते.

शेवटीं अशा तऱ्हेचा सुंदर ग्रंथ कोणाच्याहि साहाय्याची अपेक्षा न धरतां जोशी यांनीं निर्माण केला, आणि मराठी वाङ्मयांत एक नवी प्रथा पाडली यासाठीं मी त्यांचें मनापासून अभिनंदन करतों.

---

# आशीर्वाद आणि अभिनंदन

(१) डॉ. य. खु. देशपांडे, एम्. ए.; एल्एल्.; बी.; डी. लिट्.:—

प्रस्तुत पुस्तक श्री. प्रल्हाद नरहर जोशी, एम्. ए., खरशीकर या तरुण आणि विद्वान् अशा लेखकानें लिहिलें आहे. चैत्र शु।। प्रतिपदेपासून फाल्गुन वद्य अमावास्येपर्यंत प्रत्येक तिथीला भारताशीं आणि विशेषतः महाराष्ट्राशीं निगडित अशा महत्त्वाच्या आणि संस्मरणीय घटना घडल्या त्यांपैकीं निवडक एक, दोन अथवा तीन घटनांची नोंद सटीप अशी केलेली आहे. प्रत्येक घटनेला एक एक पृष्ठ दिले आहे. त्या हिशेबाने चैत्र शु।। प्रतिपदेपासून फाल्गुन व।। अमावास्येपर्यंत तीनशेसाठ तिथि येतात. त्या प्रत्येक तिथीला निदान एक तरी घटना नमूद केलेली आहे. कांहीं तिथींना एकापेक्षां जास्त घटना आल्यामुळें जवळजवळ पांचशें पृष्ठांचे हे पुस्तक झाले आहे.

या पुस्तकाकरितां सामाजिक, राजकीय, धार्मिक, पौराणिक, सांस्कृतिक इत्यादि सर्व क्षेत्रांतील भारतीय, विशेषतः महाराष्ट्रीय या नात्याने अभिमान वाटणाऱ्या अशा सर्व प्रकारच्या घटनांची लेखकानें निवड केली आहे. त्यामुळें बहुश्रुत नसलेल्या सामान्य वाचकाला आणि विशेषतः ज्ञानलोलुप अशा विद्यार्थ्यांना हें पुस्तक अत्यंत उपयोगी झालें आहे.

घटनांची निवड करतांना आणि तत्संबंधीं महत्त्वाची आणि उपयुक्त अशी माहिती देतांना लेखकाने बरेंच तारतम्य राखलें आहे. बरीचशी माहिती लेखकाने परिश्रमपूर्वक मिळविल्यामुळें महत्त्वांच्या घटनांचा हा एक अभ्यसनीय कोशच झाला आहे. व्यक्ति आणि संस्थांच्या नामांची सूची शेवटीं जोडल्यानें पुस्तकाची उपयुक्तता जास्तच वाढलेली आहे. यामुळें हे पुस्तक शाळा, कॉलेजें, ग्रंथालये या संस्थांमधून संग्राह्य तर झालेंच आहे, पण प्रत्येक महाराष्ट्राभिमानी गृहस्थानें तें आपल्या संग्रहीं ठेवावें इतके तें उपयुक्त झालें आहे.

थोर विभूतींचे स्मृति-दिन, जयंती आणि पुण्यतिथि म्हणून पाळण्याची अनेक शतकांपासून महाराष्ट्रांत प्रथा आहे. त्या प्रथेत वाढलेली महाराष्ट्रांतील जनता थोर व्यक्तींशीं आणि महत्त्वाच्या घटनांशीं संबद्ध असलेल्या या पुस्तकाचे सहर्ष स्वागत करील असा आम्हाला विश्वास वाटतो.

## (२) रियासतकार श्री. नानासाहेब सरदेसाई

" यात्येकतोऽस्तशिखरं पतिरोषधीनाम् आविष्कृतारुण पुरःसर एकतोऽर्कः
तेजोद्वयस्य युगपद्व्यसनो दयाभ्याम् लोको नियम्यत इवात्मदशान्तरेषु "
—कालिदास

'दिनविशेष' हा एक साहित्याचा नवीन प्रकार श्री. प्र. न. जोशी प्रसिद्ध करीत आहेत. दररोज कांहीं तरी विशिष्ट स्मरणीय घटना मनांत उभी राहावी हा या उद्योगाचा उद्देश इतिहासाला पोषक आहे. महाराष्ट्रांत ही कल्पना नवीन आहे. पाश्चात्य वृत्तपत्रे अशा राष्ट्रीय घटना वाचकांपुढे मांडीत असतात. ज्या तारखेचा अंक असेल त्याच तारखेच्या दिवशीं इतिहासांत घडलेली घटना दाखल करण्याची ही प्रथा कुतूहलोत्पादक असून त्यामुळें त्या घटनांचें ऐतिहासिक महत्त्व मनांत उभे राहतें. एकाच वेळीं या विस्तृत भूतलावर नानाविध घडामोडी सारख्या घडत असतात. एक प्राणी जन्मास येतो, तर एक मृत्युमुखीं पडतो; एकाला संग्रामांत विजयप्राप्ति होते, तर दुसऱ्याला अपयश सहन करावें लागते. गतकालीन इतिहास राष्ट्रास स्फूर्ति देत असतो; म्हणून स्फूर्तीचा हा झरा सदैव जिवंत ठेवण्याची ही क्लृप्ति मला प्रशंसनीय वाटते. इतिहास म्हणजे मानवी जीवनाचा वृत्तान्त. हे मानवी जीवन सदैव चालू असून हरघडी प्रत्येक प्राण्याला बरेवाईट प्रसंग अनुभवावे लागतात. हे प्रसंग समाजाच्या हिताहितास कारण झाले म्हणजे ते इतिहासजमा होतात. म्हणूनच शिरोभागीं दिलेलें कालिदासाचें वचन मानवी संसाराच्या अनुभवाला उत्कृष्ट लागू पडते.

भावी पिढी कर्तृत्ववान् निपजण्यासाठीं अशा प्रकारच्या ऐतिहासिक घडामोडींचे स्मरण ताजे ठेवण्यास ही 'दिनविशेपा' ची योजना माझ्या मते विशेष समर्पक आहे. तिजपासून मनुष्यास सतत कर्तव्य करीत राहण्याचा धडा मिळेल. विजयोत्साहानें हुरळून तो गाफील राहणार नाहीं; कीं विपत्तीनें त्रस्त होऊन निर्बल बनणार नाहीं. यशापयश आपल्या हातांत नाहीं. सतत कर्तव्याचा उद्योग करीत राहणे हेच उन्नतीचे मुख्य बीज आहे. हे तत्त्व मनांत ठसण्याचे एक मार्मिक साधन श्री. जोशी यांनीं निर्माण केले आहे. योजना मूर्तस्वरूपांत आणण्यांत श्री. जोशी यांनीं मोठे परिश्रम केले आहेत. अनेक ग्रंथसाधनांतून घटना निवडून त्यांची मिति नक्की ठरविणे हें काम सोपें नाहीं. परंतु श्री. जोशी यांनीं तें चिकाटीने तडीस नेले याबद्दल मी त्यांना सुयश चिंतितो.

## (३) महामहोपाध्याय द. वा. पोतदार :—

(१) श्रीमद्भगवद्गीतेत पुढील महान् सूत्र ग्रथित आहे.

स्मृतिभ्रंशात् बुद्धिनाशो ।
बुद्धिनाशात् प्रणश्यति ॥

स्मरण गेलें कीं मरण ओढवलेच समजावे. म्हणून पवित्र, आदरणीय, स्फूर्तिदायक, बोधप्रद, मार्गदर्शक गोष्टी, प्रसंग, व्यक्ति यांचे स्मरण सदा जागृत असावें.

(२) आमच्या पूर्वीच्या चालीरीतींत, पुण्यपावन तीर्थे, नद्या, पर्वत, देवता इत्यादींचें स्मरण करण्याचा प्रघात असे. शाब्दिक का होईना पण तेवढा संस्कार नियमाने घडत असे. 'गंगे च यमुने चैव' म्हणून आम्ही नर्मदा, सिंधु, कावेरीसह भारतीय नद्यांच्या स्मरणांत आमची एकता जागृत ठेवीत होतो इतकी ती भावना आमचे ठायीं सहज होती. कुलशैलादींचे स्मरण तसेच उपयुक्त. दिनशुद्धि पाहण्यासाठीं पंचांग पाहावें लागे त्यायोगे कालज्ञान निश्चित होई.

अशा आणि एवढ्या ज्ञानावर भागण्याचा काळ आतां उरला नाहीं. काळांत मोठेच परिवर्तन घडून चुकले आहे. तेव्हां नव्या काळाला अनुरूप व उपयुक्त अशी आपल्या जीवनाची मांडणी आपल्याला केलीच पाहिजे. तो आपला अधिकार आहे आणि ते आपले कर्तव्य आहे.

(३) नवे युग विवेकतेचे आहे. स्वमताचें महत्त्वहि वाढले आहे. अर्थात् नव्या युगांतील नवीन युगमान ध्यानांत घेऊन आपली स्मरणपीठिका आपण रचिली पाहिजे. पूर्वी स्मरणाच्या जोडीला एक 'तर्पण' विधिहि होता, अशा जुन्या परंपरा असतील त्यांतील ग्राह्य मर्म ओळखून त्यांना नवीन वळण दिले पाहिजे. हे करतांना वेळेबरोबर विधीची काटकसर करावी लागेल. तसेच तऱ्हाहि बदलावी लागेल. नवे ऋषिपणच गाजवावे लागेल. त्याला मागे सरण्याचे किंवा भिण्याचे कारण नाहीं. 'नैको मुनिर्यस्य वचः प्रमाणम्' हाहि इषारा विसरूं नये.

(४) पूर्वीच्या स्मरणावलींत देव व पितर यांचाच समावेश प्राधान्यानें आढळतो. आतां नवीन युगांत ऐतिहासिक थोर पुरुषांचा समावेश करावा लागेल. प्रसंगप्राप्त प्राचीन कोटींत कांटछाट करावी लागली तरी ती पत्करावी लागेल. भिन्न भिन्न कोटींचे मानहि बदलावे लागेल. अवश्य बदलावें.

(५) ऐतिहासिक थोर पुरुषांकडे मानवदृष्टीनेंच पाहावयाचें असतें. गुण-दोषयुक्त अशी ही कोटि आहे हें उघड आहे. गुण घ्यावे, दोष टाकावे, पण स्मरण राखावें. तारतम्य पाळले पाहिजे.

(६) कोणी तरी हे स्मरणकार्य सुलभ करून देईल तर तो त्याचा उपकारच मानावा लागेल. तेव्हां श्री. प्र. न. जोशी, खरशीकर यांनीं 'दिनविशेषां'चा जो ग्रंथ परिश्रमाने तयार केला आहे त्याचे सहर्ष स्वागत करणे अवश्य आहे. या ग्रंथांत श्री. जोशी यांनीं सर्व दिनविशेष शकमितीवार बसवून मांडले आहेत. त्यामुळें परकीय कालगणनेचा क्रम बोकांडीं बसला नाहीं याबद्दल श्री. जोशी हे विशेष अभिनंदनास पात्र आहेत. त्याचप्रमाणें रूढ आचारांना शरण जाऊन त्यांनीं ख्रिस्ती कालमान नोंदून दिलें आहे. यामुळें व्यावहारिक अडचण राहिली नाहीं.

(७) ऐतिहासिक-घटना प्रामाण्यावर आधारलेल्या असतात. कालचिकित्सेला गणिताचा एक आधार लागतो, पण त्यापूर्वी घटना घडल्याचा निश्चित पुरावा लागतो, येथे प्रमाणांचें बलाबल असेल तरच निर्णय बदलावा लागतो. श्री. जोशी यांच्या नोंदी तपासून पहाण्यास आवश्यक अवधि मला लाभला नाहीं. सावकाशीने तज्ज्ञांकडून तपासणी होईल व निर्णय ठरतील. त्यांचा ते स्वीकार करतील अशी आशा आहे.

(८) राजवाडे यांनीं म्हटल्याप्रमाणें इतिहास अगदीं शेवटच्या गत क्षणापर्यंत येऊन पोचतो, पण आपली दृष्टि इतक्या जवळची व्यक्ति किंवा घटना पाहतांना भावनेच्या भरामुळें स्थिरता पावत नाहीं. द्रष्टा आणि दृश्य यांत हिशेबी अंतर असल्याशिवाय यथार्थ दर्शन होत नाहीं. त्यामुळें अगदीं आधुनिक घटना किंवा विद्यमान व्यक्ति यांना ऐतिहासिक स्थैर्य लाभत नाहीं.

(९) श्री. जोशी यांनीं पौराणिक घटना आणि विद्यमान व्यक्ति यांचा समावेश या दिनविशेषांत केल्यानें एक प्रकारचा संकटदोष निर्माण झाला आहे. पण तो अल्प आहे. तसेंच श्री. जोशी यांनीं मराठींत ग्रंथ लिहिला आहे त्यामुळें त्यांना प्रिय व आदरणीय घटनांचा समावेश बाहुल्याने या ग्रंथांत त्यांनीं केलेला आहे असें दिसतें.

---

# माझें मनोगत:—

या वर्षप्रतिपदेच्या दिवशीं 'दिनविशेष' हें पुस्तक जिज्ञासू आणि रसिक वाचकाच्या हातांत देतांना मला अत्यंत हर्ष होत आहे. २४ मे १९४८ या दिवशीं पुणें येथे दैनिक 'भारत'चा पहिला अंक प्रसिद्ध झाला. त्यांतच त्या दिवशींचा पहिला 'दिनविशेष' वाचकांच्या नजरेस आला. त्या वेळीं त्याचें रूप ठरले नव्हते, स्थान निश्चित नव्हतें कीं लांबीरुंदीचे प्रमाणहि नक्की नव्हतें. इतकेंच काय, पण प्रत्येक दिवशीं 'दिनविशेष' सांपडतील कीं नाहीं याबद्दलहि मी अत्यंत साशंक होतों. दै. 'भारत'चे सहसंपादक श्री. वसंतराव गोखले यांचा आग्रह फारच पडला; आणि त्यांनींच वेळोवेळीं हें लिखाण न चुकतां लिहिण्यास उत्साहित केलें. आणि मीहि थोड्याच दिवसांत या अभिनव वस्तूंत रंगून गेलों. इतिहासाशीं माझा फारसा संबंध नव्हता, परंतु मी माझ्या कार्याचे निश्चित स्वरूप डोळ्यांसमोर ठेविलें आणि त्या दृष्टीनें वाचनास प्रारंभ केला. ज्या ज्या ठिकाणीं तारीख व मिति मिळेल त्या त्या ठिकाणाहून ती हस्तगत केली. तिची निश्चिति ठरविली. निरनिराळ्या देशांचे व लोकांचे इतिहास वाचून काढले, चरित्रें वाचलीं, शकावल्या पाहिल्या, ऐतिहासिक पत्रें शोधून पाहिलीं, आणि माझ्या कार्याची मर्यादा व रूपरेषा ठरवून घेतली. या कामांत कांहीं तांत्रिक अनुसंधान राखण्याच्या कामीं चि. अरुण साठे यानें बरीच मदत केली आहे.

दैनिकांत येणारा मजकूर सवड सांपडेल त्याप्रमाणें तारखेनें किंवा मितीनें येत होता. आपल्या पूर्वजांचे व त्यांच्या अचाट कर्तृत्वाचें पुण्यस्मरण वाचकांना दररोज होऊं लागल्यामुळें त्यांना ही कल्पना अतिशय आवडली. अनेक ओळखीच्या अनोळखीच्या मित्रांनीं या उपक्रमाचे साभिनंद कौतुक केलें आणि या मजकुराचें पुस्तक तयार करण्यासंबंधीं सूचना केल्या.

दैनिकांतील मजकूर पुस्तकांत द्यावयाचा म्हणजे काय अडचणी येतात याची कल्पना मला प्रथम नव्हती. परंतु त्या दृष्टीने कामाला सुरुवात केल्यानंतर मात्र मला त्यांतील यातायातीची चांगलीच कल्पना आली. जवळजवळ पाऊण पुस्तक पुन्हा लिहून काढावें लागलें! महत्त्वाच्या तारखा आणि मित्या नवीन शोधून मिळविल्या; त्यांची निश्चिति केली आणि त्या सर्वांना एकरूपता दिली. मुख्य गोष्ट म्हणजे सर्व इंग्रजी तारखांना मितींचें देशी स्वरूप देण्यांत आलें.

कांहींच्या सूचना होत्या कीं, पुस्तकाची रचना इंग्रजी तारखांप्रमाणे असावी. परंतु कांहीं विशिष्ट दृष्टीने तसे करणे मला गैरसोईचे वाटलें. राम, कृष्ण, ज्ञानदेव, शंकराचार्य, तुलसीदास, तुकाराम, शिवराय इत्यादि राष्ट्रपुरुषांच्या जीवितांतील घटना मितींतूनच देणे औचित्यास धरून वाटले, तरी पण इंग्रजी कालगणनेशीं आपला व्यावहारिक परिचय दाटपणे असल्यामुळे प्रत्येक ऐतिहासिक घटनेची इंग्रजी तारीख दिली आहे. आणि शेवटीं परिशिष्टांत इंग्रजी तारखांप्रमाणे सर्व ' दिनविशेष ' एकत्रित केले आहेत.

दोन वर्षें या कामांत मोठ्या आनंदाचीं गेलीं. अनेक ग्रंथांचे अवलोकन करण्याचें भाग्य लाभलें. काम फार त्रासाचे आणि बिकट स्वरूपाचें वाटलें तरी मधून मधून मनाला संतोष व तृप्ति देणाऱ्या किती तरी गोष्टी आढळून आल्या. ऐतिहासिक काळांतील कांहीं चमत्कारिक योगायोगांनीं तर मनास एक प्रकारचा अननुभूत असा हर्ष होत राहिला. १३ सप्टेंबर या दिवशीं भारत सरकारनें निजामच्या हद्दींत आपल्या फौजा घुसविल्या; याच दिवशीं सुमारें सव्वादोनशे वर्षांपूर्वीं पहिल्या बाजीरावाने निजामवर स्वारी केली होती! स्वा. वीर सावरकर यांची गांधी-खून खटल्यांतून १० फेब्रुवारी रोजी निष्कलंकपणें मुक्तता झाली. याच दिवशी कांहीं वर्षांपूर्वीं अंदमानांतून एका भयंकर आरोपांतून ते मुक्त झाले होते! माघ व. ९ रोजीं तानाजींने सिंहगड घेतला, त्याच माघ व. ९ रोजी पुढे सुमारें दीडशे वर्षांनी सिंहगड इंग्रजांकडे गेला! अकबर आणि स्वामी रामतीर्थ यांचे मृत्यु त्यांच्या वाढदिवसादिवशींच थोड्या फरकाने झाले आहेत. इत्यादि अनेक चमत्कृति अकल्पितपणें आढळल्यावर अर्थातच मन अधिक उल्हसित होत राहिले.

आतां येवढे सांगणे अत्यंत अवश्य आहे कीं, या पुस्तकांत माझे स्वतःचें असे कांहीं नाहीं. कांही दोष, काहीं कमतरता, असेल तर ती मात्र माझी. बाकी सारें श्रेय माझ्यासमोरची ग्रंथसामग्री निर्माण करणाऱ्या ग्रंथकर्त्यांकडे आहे. त्या सर्वांचा उल्लेख ' दिनविशेष 'च्या त्या त्या पृष्ठावर करण्याचें गैरसोईचे वाटले; म्हणून आधारग्रंथाच्या यादींत त्यांचा निर्देश केला आहे. त्यांतहि कांहीं नजरचुकीनें राहिलें असल्यास ते ते ग्रंथकार क्षमा करतील अशी आशा आहे. श्री. रियासतकार सरदेसाई यांच्या प्रचंड कार्यांचा मला फारच उपयोग झाला. त्याचप्रमाणें विद्यानिधि सिद्धेश्वरशास्त्री चित्राव यांच्या तीनहि चरित्रकोशांचा उपयोग

मीं भरपूर प्रमाणांत केला आहे. याखेरीज श्री. 'ऋग्वेदी' यांच्या 'आर्यांच्या सणांचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास' या पुस्तकाची बहुमोल मदत झाली आहे. भा. इ. सं. मंडळांतील श्री. शंकरराव जोशी यांनीं तयार केलेल्या शकावलींचा मला मोठाच आधार मिळाला होता. या ग्रंथकारांचा मी अत्यंत ऋणी आहे. रामायणांतील तिथि अब्दरामायणांतून व चरित्रकोशांतून निश्चित केल्या आहेत. श्री. ज. स. करंदीकर आणि प्रा. वि. ब. आठवले यांच्या साह्याने महाभारतांतील तिथि घेतल्या आहेत. इंग्रजी तारखांचे मितीमध्यें रूपांतर करतांना खरे, मोडक व पिले यांच्या जंत्रींचा उपयोग झाला आहे. शिवाय श्री. रघुनाथशास्त्री पटवर्धन, आणि श्री. दादासाहेब पटवर्धन, मिरजकर यांनीं मला गेल्या दीड-दोनशें वर्षांचीं पंचांगें पुरवून मदत केली. भारत इतिहास संशोधक मंडळ, केसरी–मराठा ग्रंथशाळा, आणि नू. म. वि. इंग्रजी शाळेचे ग्रंथालय या संस्थांनीं मी म्हणेन तेव्हां व म्हणेन तशी साधनसामग्री उपलब्ध करून दिली. विशेषतः भा. इ. सं. मंडळांतील श्री. शं. ना. जोशी व श्री. ग. ह. खरे यांनीं मला वेळोवेळीं अनेक प्रकारची मदत केली आहे. या सर्व सुहृदांच्या ऋणांत राहणेच मला आनंददायक वाटते. अनेक ग्रंथकारांच्या आधारें केलेलें हें संकलन सर्वस्वीं निर्दोष आहे, किंवा ते संपूर्ण आहे असा माझा आग्रह नाहीं.

बिहारचे राज्याधिपति माननीय लोकनायक बापूजी अणे यांच्यापुढे कार्याचा केवढा प्रचंड व्याप आहे; परंतु वेळांत वेळ काढून त्यांनी पुरस्कार लिहून दिला, त्यामुळें 'दिनविशेषा'ची प्रतिष्ठा खूपच वाढली आहे. श्री. अणे यांचा मी अत्यंत ऋणी आहें. प्रा. बापूसाहेब माटे यांच्यावर माझा एक प्रकारचा हक्कच आहे. कोणत्याहि गोष्टीकडे चिकित्सेने व रसिकतेने पाहण्यास मला त्यांनींच शिकविलें आहे. प्रा. माटे यांनीं विवेचक प्रस्तावना लिहून पुस्तकाला एक प्रकारची तात्त्विक भूमिका निर्माण करून दिली आहे. या दोन 'बापूं'नीं माझ्या या छोट्या प्रयत्नाची उंची खूपच मोठी केली आहे. त्याचप्रमाणें श्री. नानासाहेब सरदेसाई, म. म. दत्तो वामन पोतदार, डॉ. य. खु. देशपांडे, डॉ. के. ना. वाटवे, श्री. बा. ग. जगताप, सुलभाबाई पाणंदीकर, इत्यादि विद्वान् व अधिकारी व्यक्तींनीं मीं म्हटल्याबरोबर आपले अभिप्राय मला दिले याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. पुणे विद्यापीठाचे उपकुलगुरु डॉ. जयकर यांची प्रकृति ठीक नसल्यामुळें त्यांचा अभिप्राय वेळेवर हातीं आला नाहीं,

त्यामुळें थोडी कमतरता राहून गेली आहे. पुस्तकाच्या कामांत पहिल्यापासूनच आपुलकीनें लक्ष घालून मला वारंवार प्रोत्साहन देणारे श्री. भा. ल. ऊर्फ दादासाहेब लिखिते यांचा उल्लेख करणें मला अगत्याचें वाटते. त्यांची रसिकता, सौंदर्यदृष्टि आणि व्यासंगाची आवड यांचा मला अनेक वेळां उपयोग झाला आहे.

पुस्तकांत सर्व तऱ्हेची आकर्षकता यावी म्हणून राजगुरु प्रेसच्या चालकांनीं खूपच मेहनत घेतली. विशेषतः माझे मित्र श्री. चि. ग. वझे यांनीं मोठ्या आस्थेने या कामीं जातीनें लक्ष घालून छपाईचें काम शक्य तों निर्दोष करण्याचा प्रयत्न केला आहे. आंतील सर्व रेखाचित्रे श्री. दाणी यांनीं सुबक रीतीनें वेळेवर काढून दिलीं त्याबद्दल त्यांचे आभार मानणें इष्ट आहे. व्हीनस बुक स्टॉलचे मालक श्री. स. कृ. पाध्ये, आणि श्री. अ. ह. लिमये यांनीं विक्रीची सर्व जबाबदारी उचलून मला त्या दगदगींतून मुक्त केलें आहे. त्यांचेहि आभार मानणें आवश्यक आहे. दै. 'भारत'चे संपादक श्री. भा. गो. बापट यांनीं अतिशय सौजन्याने आणि ममतेनें सतत एक वर्षभर आपल्या दैनिकांत दिनविशेषास जागा देऊन त्याची प्रसिद्धि केली, याबद्दल त्यांचे आभार मानावेत तेवढे थोडे होतील. त्यांचे सहकारी श्री. वसंतराव गोखले यानीं तर माझ्या कामास वारंवार चालना देऊन आपलें मित्रकर्तव्य बजाविलें आहे. त्यांचे आभार मानणें औपचारिकपणाचें होईल.

शेवटीं एका गोष्टीचा उल्लेख करणे औचित्यास धरून होईलसे वाटतें. माझे वडील ती. नरहरशास्त्री खरशीकर यांच्या सांस्कृतिक आणि धार्मिक परंपरेंतच माझ्या वृत्तीचें पोषण अगदीं लहानपणापासून झालेलें आहे. माझ्या अंगीं असणाऱ्या थोड्याफार व्यासंगाचे उगमस्थान अर्थातच ते आहेत. अनेक सत्प्रवृत्तींचे बीजारोपण करून त्यांचा विकास त्यांनीं केला आणि त्यांच्याच आशीर्वादानें माझ्या हातून हें लहानसें कार्य तडीस गेलें आहे.

असो. 'दिनविशेष' हें नवीन पुस्तक महाराष्ट्रांतील गुणग्राही व जिज्ञासू वाचकांच्या स्वाधीन करून मी हे लांबलेलें मनोगत पुरे करीत आहें.

वर्षप्रतिपदा १८७२
४३७ नारायण पेठ,
त्र्यंबक-निवास, पुणें २.

प्रल्हाद नरहर जोशी




श्रीछत्रपति शिवाजी. प्रभु रामचंद्र. प. पू. डॉ. हेडगेवार. हुतात्मा भगतसिंग.
सेनापति तात्या टोपे. महात्मा गांधी. दामोदरपंत चापेकर. कविवर्य डॉ. टागोर.

## चैत्र शु. १ (१) शालिवाहन शकाचा आरंभ !

चैत्र शु. १ हा दिवस शालिवाहन शकाच्या सुरुवातीचा म्हणून भारतात महत्त्वाचा आहे. ज्योतिषशास्त्रांत याच शकाची विशेष महती आहे.

पुराणग्रंथांत ज्यांचें वर्णन आंध्रभृत्य म्हणून केलें आहे त्यांचाच उल्लेख शिलालेखांतून आंध्र राजघराण्यांतील राजे सातवाहन म्हणून केलेला असतो. या 'सातवाहना' चे अपभ्रष्ट रूप शालिवाहन. ख्रि. पू. २३० ते ख्रि. उ. २२७ शालिवाहन राजाचा काळ समजण्यांत येता. त्याचे वसतिस्थान गोदा व कृष्णा यांच्या मुखाजवळ होते. 'सातवाहन' या कुलनामाने विभूषित असलेल्या तीस राजांनी आंध्र देशांत राज्य करून इतरत्र राज्यविस्तार केला. त्यांपैकीं कोणत्या सातवाहनाने कोणत्या प्रसंगी शक सुरू केला याचा निर्णय लागत नाही. महाराष्ट्राच्या उपलब्ध इतिहासाच्या सुरुवातीस आद्य राजवंश म्हणून सातवाहनांचा उल्लेख सांपडतो. मद्रास इलाख्यांतील धरणीकोट (पूर्वी धनकटक) ही सातवाहनाची मूळ राजधानी असली तरी गौतमीपुत्र व पुलुमायी यांनी महाराष्ट्रांत आपलें राज्य स्थापून पैठण ही राजधानी निश्चित केली. त्या वेळीं 'शक' म्हणजे परकीय, सर्व देशभर धुमाकूळ घालीत होते. या वंशांतील राजांनीं 'शका' वर मिळविलेल्या एखाद्या विजयापासून शालिवाहन शक सुरू झाला असावा.

हिंदु संस्कृतींतील कित्येक पवित्र गोष्टी चैत्र शु. १ ला घडलेल्या आहेत म्हणून ह्राच शक रूढ झाला. या वेळीं वसत ऋतु सुरू होत असल्यामुळे कित्येक उत्सव या नूतन वर्षारंभीच्या दिवसापासून सुरू होतात. हिंदु लोक हा दिवस पुण्यकालाचा मानतात. याची गणना प्रसिद्ध अशा साडेतीन मुहूर्तांत केली आहे. या दिवशीं सर्व कुटुंबवत्सल लोक आपल्या घरासमोर गुढ्या-तोरणें उभारतात. मंगलस्नानादि विधि आटोपल्यावर कडुलिंबाचीं पाने मिऱ्यें, हिंग, लवण, जिरे व ओवा यांसह भक्षण करण्याचा प्रघात आहे. यायोगे आरोग्य, बल, बुद्धि व तेजस्विता यांची प्राप्ति होते असें आर्यवैद्यकाचे मत आहे. या दिवशींच्या मुहूर्तावर आरोग्यप्राप्ति-व्रत, विद्या-व्रत व तिलक-व्रत करण्याची चाल आहे.

— ३ मार्च ७८

**चैत्र शु. १** **( २ ) संघटनेचा आद्य प्रणेता !**

शके १८१२ च्या चैत्र शु. १ रोजीं नागपूर येथ एका गरीब भिक्षुकाच्या घरीं 'राष्ट्रीय स्वयंसेवक संघ' या विख्यात संघटनेचे जनक व संवर्धक डॉ. केशव बळीराम हेडगेवार यांचा जन्म झाला.

वेदाभ्यास आणि भिक्षुकवृत्ति या संपत्तीच्या आधारावर अत्यंत जुन्या व बाळबोध पद्धतीनें डॉक्टराचें घराणे नागपुरांत वर्तत होते. लहानपणापासूनच डॉक्टरांनीं मनाची बळकटी व चिकाटी हे गुण संपादित करून आपला विकास करून घेण्यास सुरुवात केली. नागपूर, यवतमाळ व पुणे येथें आरंभींचें शिक्षण संपल्यावर डॉक्टर कलकत्ता येथलि नॅशनल मेडिकल कॉलेजमधून एल्. एम्. ॲण्ड एस्. ची परीक्षा उत्तीर्ण झाले. परंतु वैद्यकीचा व्यवसाय न करतां देशाची नाडी तपासावी अशी या धनवंतऱ्याची प्रथमपासूनच इच्छा होती. त्याप्रमाणें सन १९२०-२१ सालीं असहकाराच्या चळवळींत भाग घेऊन डॉक्टरांनीं आपल्या सार्वजनिक कार्याला सुरुवात केली.

शके १८४७ च्या विजयादशमीला नागपूर येथील मोहित्यांच्या जुन्या वाड्यांत राष्ट्रीय स्वयंसेवक संघाच्या कार्याचा ओनामा झाला. थोड्याच काळांत या संस्थेचा विस्तार सबंध हिन्दुस्थानभर झाला ! भगवा ध्वज, लष्करी शिस्त, बौद्धिक वर्ग, या मार्गांनीं भारतांत जागृति करण्याचे कार्य संघाने एकनिष्ठेने आणि त्यागवृत्तीने केलें. डॉक्टरांनीं संघटनेचा महामंत्र भ्रांत बनलेल्या भारतीयांना दिला की, "संघटनाशास्त्रांत गर्वाला, फुशारकीला, जबरदस्तीला किंवा व्यक्तिगत महत्त्वाला जागाच असूं शकत नाहीं. संघटन हा शब्द असेंच ध्वनित करतो की, त्यांत व्यक्तिनिष्ठा राहूं शकत नाहीं. ...परंतु संघटणेला आदर्श व्यक्तिमत्त्वाची मात्र अत्यंत आवश्यकता आहे. तुमच्या गुणांना दुसरीकडे किंमत येईल, कीर्तीच्या रूपाने मोबदलाहि मिळेल, पण त्याच गुणांचे सार्थक संघटनेसाठीं तुमचें सर्वस्व खर्च केल्यानेंच होणार आहे." रा. स्व. संघाच्या रूपानें डॅाक्टर अजरामर झाले आहेत. त्यांच्या संदेशाने भारतांतील असंख्य तरुण मार्गप्रवृत्त झाले आहेत.

**— २१ मार्च १८९०**

## चैत्र शु. २ फिरंगणाकडे स्वारीस गेले!

१६५९ च्या चैत्र शु. २ रोजी चिमाजी आप्पा हे वसई-साष्टीच्या मोहिमेस निघाले.

हिंदुस्थानच्या पश्चिम किनाऱ्यावर इंग्रज, डच, पोर्तुगीझ आदि पाश्चात्य व्यापारी व्यापार करीत असत. त्यांमध्यें पोर्तुगीझांना धर्मप्रसाराचे वेड अतोनात होते. त्यामुळे हिंदु प्रजेस फारच त्रास होऊं लागला. – " जमीनदारांचीं वतने बुडविलीं, गांवचे गांव घेऊन बाटवले, किरिस्ताव केले. घरांत कोणी नसले तर पोरे नेऊन बाटवावी. देवधर्म बुडाला, प्रातांतील तीर्थक्षेत्रे लोपली. देवालयें फोडून साफ केलीं, ब्राह्मणांस मुलखांत फिरण्याची बंदी झाली. कोणी कांही व्रते, उद्यापनें, होम वगैरे आरंभिला कीं त्याचें घर वेढले. शेजारीपाजारी त्यांत पडले कीं त्यांसहि धरून न्यावे. " असा हा छळ शिवरायाच्या काळापासून होत होता. शेवटी वसईचे देशपांडे, देसाई, अंताजी रघुनाथ, गंगाजी नाईक वगैरे लोकांनीं आपले गाऱ्हाणे पेशव्यांच्या कानावर घातले. शेवटी पेशवे यांनीहि हे काम मनावर घेतले. चिमाजी आपांची या कामगिरीवर नेमणूक झाली. त्याप्रमाणे चिमाजी आपानी चिमणाजी भिवराव, रामचंद्र हरी व शंकराजी केशव या आपल्या सरदारांस – ' वसईस व साष्टीस पाठविले. व आपण स्वतः वर्षप्रतिपदेच्या दुसरे दिवशी, सुध २ मंगळवारी परस्थाने बागात गेले. तेथून गुरुवारी रात्री फिरंगणाकडे स्वारीस गेले. – ' साष्टी बेटातील ठाण्याचा कोट फिरंग्याने तीन वर्षांपूर्वी बांधण्यास सुरूवात केली होती. कोटाचे काम चालू असतांना हिंदु रयतेवर अत्यंत जुलूम झाला होता. चिमाजीचा रोख पहिल्याने याच बाजूस होता. चार दिवसांत तो ठाण्याजवळ येऊन पोचला. आणि त्याच रात्री त्यानीं साष्टी बेटांत प्रवेश केला. फिरंगी अधिकारी लुई बेतेलो गांगरून गेला. थोड्याशा प्रतिकारानंतर साष्टी बेट व ठाण्याचा कोट हीं दोन्ही ठिकाणे मराठ्यांना मिळालीं. आणि पुढल्या अद्वितीय लढ्यास हुरूप प्राप्त झाला. चिमाजी आपांच्या कर्तृत्वाने बहरून गेलेली वसईची ही मोहीम मराठ्यांच्या इतिहासांत अद्वितीय आहे.

— २२ मार्च १७३७

## चैत्र शु. ३ मत्स्य भगवानांचा जन्म !

चैत्र शु. ३ या दिवशीं मत्स्य भगवानांचा जन्म झाला. दशावतारांतील हा पहिला अवतार होय.

दुष्टांचा संहार आणि सज्जनांचें रक्षण करून धर्मसंस्थापनेसाठीं परमेश्वर अवतार घेत असतो असा भारतीयांचा विश्वास आहे. मत्स्यावतार हा दशावतारांतील पहिला अवतार आहे. पंचविसाव्या कल्पाशेवटीं ब्रह्मदेवाची रात्र सुरू झाली आणि सर्वत्र प्रलयकाल सुरू होऊन स्वर्ग, पृथ्वी, आदि सर्व लोक बुडून गेले. सर्वत्र अधर्माचरण माजून अंदाधुंदी सुरू झाली. ब्रह्मदेव निद्रिस्त असतांना त्याच्या मुखांतून जे वेद बाहेर पडले ते हयग्रीव नामक दैत्याने पळविले. त्या दैत्याचा संहार करण्यासाठीं भगवान् विष्णूंनीं मत्स्याचा अवतार घेतला.

या वेळीं सत्यव्रत नांवाचा पृथ्वीपति होता. हा तपस्वी राजा एकदां कृतमाला नदींत स्नान करून तर्पण करीत असतां त्याच्या ओंजळींत एक मत्स्य आला. राजा त्याला नदींत फेकणार तो तो मत्स्य म्हणाला, "राजा, माझे रक्षण कर." तेव्हां आपल्या कमंडलूंत त्यास घालून राजा घरी आला. पण घरी येतांच त्या मत्स्याचा देह वाढूं लागला. कमंडलूंत, विहिरींत, सरोवरांतहि तो मासा मावेनासा झाला. तेव्हां राजाने चकित होऊन विचारले, "मत्स्यरूपाने मला मोहित करणारा तूं कोण आहेस?" त्यावरून मत्स्य भगवान् प्रसन्न होऊन बोलले, "आजपासून सातवे दिवशी प्रलयकाल होईल त्या वेळी मी एक नौका पाठवीन. त्या वेळी तूं आणि सप्तर्षि त्या नौकेत बसा." मत्स्य अदृश्य झाला, आणि बरोबर सातवे दिवशीं समुद्र एकाएकी वाढून सर्व पृथ्वी पाण्यांत बुडून गेली. ठरल्याप्रमाणे सत्यव्रताला पाण्यांत एक नांव दिसली. तीवर तो सप्तर्षीसह चढला. त्या राजाने भगवान् मत्स्याची स्तुति केली. प्रलयकालाच्या शेवटीं मत्स्याने हयग्रीव दैत्याला मारले आणि त्यापासून वेद घेऊन ते ब्रह्मदेवाला देऊन टाकले. सत्यव्रत राजाला जे ज्ञान मत्स्य भगवानांनी दिले आहे तें मत्स्यपुराणांत सांपडते. हिंदु संस्कृतींतील मत्स्य-कूर्मादि अवतार उत्क्रांतिशास्त्राला धरून आहेत असें जाणत्यांचे मत आहे.



## चैत्र शु. ४ म्हणून बॉंबचे आवाज निघतात!

शके १८५३ च्या चैत्र शु. ४ रोजी सुप्रसिद्ध क्रांतिकारक भगतसिंग आणि त्यांचे सहकारी राजगुरु व सुखदेव यांना सायंकाळी साडेसात वाजतां लाहोरच्या तुरुंगांत फांशीं देण्यांत आले.

सायमन कमिशनचे सभासद असेंब्लींत बसले असतां भयाची सूचना म्हणून भगतसिंग व बटुकेशर दत्त या दोघांनीं असेंब्लीवर एक स्फोटक बॉंब टाकला. त्याबद्दल सन १९२९ च्या चार एप्रिलला त्यांना पकडण्यांत आले. पुढे लाला लजपतरायांच्या मृत्यूचा सूड म्हणून झालेल्या सॅंडर्सच्या खून-खटल्यांत भगतसिंग, राजगुरु व सुखदेव यांना गोवण्यांत आले. खटल्याचे वेळी भगतसिंगांनीं अत्यंत तेजस्वी अशी जबानी दिली. "करूं तो जुलूम प्रजा सोसते म्हणून कांहीं कर्झनछाप अधिकारी राष्ट्राचीं छकले करण्यासाठी पुढे धांवतात. तशा मदांध अधिकाऱ्यांच्या कानीं त्रस्त प्रजेच्या आर्त किंकाळ्या पोचूंच शकत नाहीत. अशा बेगुमान अधिकाऱ्यांचे कान खोलण्यासाठीं व डोळे उघडण्यासाठीं आम्हांला बॉंबचे आवाज काढावे लागतात."

७ ऑक्टोबर १९३० ला तिघांना फांशीची शिक्षा सागण्यांत आली. गांधी-आयर्विन करार व राष्ट्राची एकमुखी मागणी यांचा कांहीं एक उपयोग न होता या तिघांना २३ मार्च रोजीं फांशी देण्यांत येऊन त्यांची प्रेते आप्तांना न कळवितां नष्ट करून टाकण्यांत आलीं! या तीनहि हुतात्म्यांचे शौर्य व त्याग यांचें अभिनंदन साऱ्या देशाने कराचीच्या राष्ट्रसभेत केले.

"या तरुणांचे आपण धन्यवाद गातो याचें कारण अत्यंत निर्भयता व स्वार्थत्याग यांची परमावधि त्यांच्या ठिकाणीं झाली होती हे होय. ज्या वेळीं आपल्याशी समेटाची भाषा इंग्लंड बोलूं लागेल त्या वेळी त्यांचे-आमचे दरम्यान हुतात्मा भगतसिंग यांचे प्रेत असेल ही गोष्ट आपण यापुढे विसरता कामा नये. हिंदुस्थान स्वतंत्र होण्यापूर्वी किती भगतसिंगांचे बळी पडतील हे कोणीं सांगावें! परंतु आपण देशासाठी मर्दपणे व निर्भयवृत्तीने मरण्यास तयार राहिलें पाहिजे एवढाच धडा भगतसिंगांपासून आपण घ्यावयास पाहिजे." असे उद्गार पंडित जवाहरलाल नेहरू यांनीं काढले होते.

**—२३ मार्च १९३१**

## चैत्र शु. ५ (१) 'स्वराज्यसंकल्पक' शहाजी!

शके १५१६ च्या चैत्र शु. ५ रोजीं हिंदवी स्वराज्याचे संस्थापक श्रीशिव-छत्रपति शिवाजीमहाराज यांचे वडील शहाजी राजे यांचा जन्म झाला.

शहाजी राजांचा जन्म ज्या भोसले घराण्यांत झाला तें घराणें चितोड येथील सूर्यवंशीं शिसोदे रजपुतांपैकीं होय. चौदाव्या शतकांत इस्लामी लाटेच्या प्रभावास कंटाळून शिसोद्याचे राजकुमार सजनसिंह व क्षेमसिंह राजपुतान्यांतून दक्षिणेंत आले व त्यांच्यापासूनच पुढें घोरपडे व भोसले हीं घराणीं निर्माण झालीं. भोसले घराण्याचा कर्ता पुरुष बाबाजी भोसले, याचे मुलगे विठोजी व मालोजी मोठे कर्ते निघाले. यांपैकी मालोजीच्या बायकोचें नांव उमाब्वा असे असून ती फलटणच्या जगपाळ निंबाळकरांची बहीण होती. बरेच दिवस मूलबाळ होईना म्हणून तिने अहमदनगरच्या शहाशरीफ नांवाच्या मुसलमान साधूस नवस केल्यावर तिला चैत्र शु. ५ रोजी एक मुलगा झाला. त्याचें नांव पिराच्या नांवावरून शहाजी असे ठेवण्यांत आलें. हा शहाजी मोठा कर्तबगार निघाला. तंजावर प्रांतांत मराठ्यांचे राज्य पसरविण्याचे सर्व श्रेय याचें आहे. मोगल बादशाहाला नर्मदेच्या दक्षिणेस येऊं न देण्यासाठीं त्याने अतोनात प्रयत्न केले. त्यासाठी दक्षिणेतील मुसलमान सत्ताधीशांनाहि मदत केली. दोन लाख फौज घेऊन येणाऱ्या शहाजहानला तोंड देणारा एकहि सरदार शहाजीशिवाय दक्षिणेंत नव्हता. स्वतः हिंदु असल्यामुळे आदिलशाही व निजामशाही यांची चाकरी करणें गैर आहे याची जाणीव त्याला असली तरी प्राप्त परिस्थितींत अन्य मार्ग त्याचेजवळ नव्हता. त्याच्या मनांत दडून असणारें स्वप्न शिवरायांनीं साकार करून दाखविले. "शिवाजीला जन्म देऊन त्याचे ठिकाणी स्वातंत्र्याचें वारें उत्पन्न करण्याचें श्रेय शहाजीला अवश्य मिळते. या दृष्टीनें शिवाजीला जर 'राज्य–संस्थापक' म्हणायचें तर शहाजीला 'राज्य–संकल्पक' असें पद देण्यास हरकत नाहीं." शहाजी पूर्वसंस्कृतीचे, परंपरेचे आणि संस्कृत विद्येचे मोठे अभिमानी होते. ते विद्या-कलांचे भोक्ते असून गायनादि ललितकलांची त्यांना फार आवड होती.

१८ मार्च १५९४

**चैत्र शु. ५** **( २ ) वेदाभिमानी आर्यसमाज !**

शके १७९७ च्या चैत्र शु. ५ रोजी भारतांतील आक्रमक आणि निर्भय सुधारक, कुशल संघटक, महर्षि स्वामी दयानंद यांनीं आपल्या सुप्रसिद्ध अशा आर्यसमाजाची स्थापना केली.

एकोणिसाव्या शतकांत हिंदुस्थानांत धर्मसुधारणेच्या अनेक चळवळी झाल्या. ख्रिस्ती मिशनऱ्यांचें आक्रमण जारी असल्यामुळें व हिंदुधर्मांत अनेक विसंगति निर्माण झाल्यामुळें धर्मसुधारणा आवश्यक बनली होती. या जागृतीच्या काळांतील आर्यसमाजाचें महत्त्व विशेष प्रकारचें आहे. वेदप्रामाण्य हे मुख्य गमक या समाजाचें आहे. समाजघटना त्रैतवादी असून जवि, परमेश्वर व प्रकृति हे अनादि व अनंत आहेत असा यांचा विश्वास आहे. या धर्मपंथानें केलेलें सामाजिक कार्य मोठें आहे. जवळजवळ दोन हजारपर्यंत यांच्या शाखा असून त्यांच्यामार्फत कॉलेजे, हायस्कुलें, उपदेशकांची विद्यालयें, अनाथालयें, गुरुकुलें, विधवा-आश्रम, कन्याशाळा ... इत्यादि शैक्षणिक कामगिरी मोठीच झालेली आहे. हिंदुस्थानाबाहेर ब्रह्मदेश, सियाम, अनामा, हॉगकॉंग, पूर्व व दक्षिण आफ्रिका, मारिशस, ब्रिटिश व डच गियाना इत्यादि ठिकाणीं या समाजाची स्थापना होऊन कार्य चालू झालें. वैदिक धर्माचा प्रसार करण्यासाठीं व यथार्थ ज्ञान लोकांना यावें म्हणून स्वामी दयानंद यांनीं ' सत्यार्थ प्रकाश ' नांवाचा ग्रंथ लिहिला. त्यांचीं अनेक भाषांतून भाषांतरें झाली. दयानंदांचा प्रभाव आर्य-समाजावर अर्थातच मोठा आहे. 'The Cultural Heritage of India' नांवाच्या ग्रंथमालेंतील दुसऱ्या खंडांत या सामाजाविषयीं व दयानंदां-विषयीं पुढील मजकूर आहे. "The Arya Samaj is Dayanand writ large. It has in it saints, philosophers, organisers, scholers, thinkers, yeomen–all reflecting in their various prisms the light of that brlliant noonday sun of unquenchable, spiritual and moral refulgence. For he was a combination of all these characters in one.—"

— १० एप्रिल १८७५

## चैत्र शु. ६　　'साम्राज्य-संकल्पका'चें निधन!

शके १६४२ च्या चैत्र शु. ६ रोजीं हिंदुपदपादशाहीची स्थापना करून तिचा विस्तार करणारे, मराठे लोकांस नवीन उद्योगाचे पराक्रमक्षेत्र दाखवून देणारे, पहिले पेशवे बाळाजी विश्वनाथ भट यांचे निधन झाले.

बाळाजी विश्वनाथांचे मूळ देशमुख घराणे कोकणांतील श्रीवर्धनचे. पण तेथील हबशांच्या अमलास कंटाळून बाळाजी सन १६७९ मध्ये देशावर आले आणि त्यांनीं साताऱ्यास नोकरी धरली. तेथील त्यांची हुशारी पाहून सेनापति धनाजीनें त्यांस आपल्याजवळ घेतलें. पुढें वाढतां वाढतां ते पुणें प्रांताचे सुभेदार झाले. शाहू महाराजांना यांनीं कठीण प्रसंगीं मदत केल्यामुळे, आणि फौजेंतील त्यांच्या कर्तबगारीवरून शाहूनें त्यांस सेनाकर्ते असा किताब दिला. बाळाजींचे सर्वांत महत्त्वाचे कार्य म्हणजे त्यांनीं दिल्लीहून आणलेल्या चौथाई–सरदेशमुखीच्या सनदा हें होय. त्या वेळीं उत्तरेंत फर्रुखसियर बादशाहा व सय्यदबंधु यांचें भांडण सुरू होतें. तेव्हां बादशाहानें मराठ्यांची मदत मागितली. ती बाळाजीनें केली आणि त्याबद्दल जिंकलेल्या मुलुखांतून चौथाई, सरदेशमुखी वसूल करण्याचा हक्क मिळविला. यामुळे गृहकलहांत गुंग झालेले मराठे बाहेर लक्ष देऊं लागले. त्यांचें कार्यक्षेत्र वाढून दिल्लीच्या पातशाहीस मदत करणारी सत्ता दक्षिणेंत असल्याचें जाहीर झालें. बाळाजीची कामगिरी अनेकाविध आहे....

"— त्यानें घरोघर सेनानायक निर्माण केले. दिल्लीस जाऊन मराठ्यांचीं राज्यघटना सिद्ध केली. निर्धन महाराष्ट्रास सधन होण्याचा मार्ग दाखविला... वसुलाची व्यवस्था उत्तम ठेवली...आणि सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे त्यानें शाहू छत्रपतीच्या द्वारें हिंदुराष्ट्राचें संघटन केले.—"

मराठी राज्याच्या विस्तारासाठीं त्यांनीं जी दगदग घेतली आणि काळजी केली ती वृद्धावस्थेंत दुःसह होऊन सासवड येथे चैत्र शु. ६ ला बाळाजी एकाएकीं मृत्यु पावले. बाळाजी बुद्धिमान, उत्तम सेनापति, मुत्सद्दी व धोरणी होता.

—२ एप्रिल १७२०

## चैत्र शु. ७ "....येथेंच कांहींहि होवो!"

शके १७८० च्या चैत्र शु. ७ रोजी महापराक्रमी राणी लक्ष्मीबाई यांच्या झाशीस सर ह्यू रोझ याने वेढा दिला.

सत्तावनच्या स्वातंत्र्ययुद्धांत राणी लक्ष्मीबाईचे स्थान फारच मोठें आहे. इंग्रज लोकांनीं दिल्ली उध्वस्त केली होती; लखनौस त्यांना विजय मिळाला होता, त्यामुळें त्यांचा उद्दामपणा सहजच वाढला. त्याची दृष्टि झांशीवाल्या राणीकडे गेली. राज्याचा अपहार करणे, पैसा उकळणे, अत्याचार करणे येवढीच कार्ये इंग्रजी फौजेस होतीं लक्ष्मीबाईला जिवत पकडून आणण्याचा हुकूम लॉर्ड कॅनिंग यांनी हॅमिल्टन यास दिला. सर ह्यू रोझ मोठ्या फौजेनिशीं झांशीवर चालून येऊं लागला. बाणपूरच्या राजानें राणीला सूचना केली. "काल्पीस पेशव्यांच्या आश्रयास जा." त्यावर त्या बाणेदार आणि शूर स्त्रीने उत्तर केलें, "मी बायको माणूस, तशांत विधवा, पूर्व वयस्कर, मी सून कोणाची हाहि विचार मनांत आणला पाहिजे, या समयीं आपण येथून निघून त्या पुरुष मंडळींत शरणाप्रमाणे जाणें त्यापेक्षां येथेच कांहींहि होवो!" चैत्राच्या सुरुवातीला सर ह्यू रोझच्या छावण्या झांशीच्या आसपास पडल्या. इंग्रज सेनापतीचे पत्र आले की, दिवाणजी, लालूभाऊ बक्षी, मोरोपंत तांबे, वगैरे लोकांना घेऊन स्वतः बाईने भेटावयास यावें. बाईनीं जबाब दिला, "माझे येणे होणार नाहीं." त्यावर चैत्र शु. ७ रोजीं ह्यूनें झांशीस वेढा दिला. वेढ्याचे काम दहाबारा दिवस चाललें.— "त्यांत कमरेला पदर खोचून व हातांत तलवार घेऊन ही शूर स्त्री प्रत्येक तटावर व बुरुजावर जाऊन लढाईचे काम चालवीत होती.—" तात्या टोपे मदतीस आले, पण दुर्दैवाने त्यांना पराभूत व्हावें लागले. अठ्यायशीं प्रहर राणी सारखी हातांत खड्ग घेऊन लढत होती. तिच्या मुखावरील तेज थोडेहि कमी झालें नव्हतें. अकराव्या दिवशीं बाईस श्रमांमुळें झोप लागली. पुनः जागीं होऊन पहाते तो काय; शत्रु तटावरून चालत येत होता. भलाजीसिंग परदेशी फितूर झाल्यामुळें झांशी इंग्रजांचे ताब्यांत जात होती. पण ही रणरागिणी डगमगली नाहीं; हातांत तलवार घेऊन ती सैन्याच्या मध्यभागीं घुसली.—

—२१ मार्च १८५८

## चैत्र शु. ८ ( १ ) जिवावरचें बोटावर निभावलें !

शके १५८५ च्या चैत्र शु. ८ रोजीं शिवाजीच्या राहत्या वाड्यांत तळ देऊन गुरगुरणाऱ्या शाहिस्तेखानावर रात्री छापा घालून शिवरायांनीं त्याचा पराभव केला.

दक्षिण कोकण व पुणें–सातारा या प्रांतांतून शिवाजीला एकसारखा त्रास देण्याचे कार्य शाहिस्तेखान करीत होता. मोरे, अफझुलखान, सिद्दी जोहार, आदींचा पाडाव सहज झाला असला तरी आतांचा प्रसंग बांका होता. या समयीं शिवाजी पुण्यानजीकच सिंहागडावर होता. भीतीमुळें खानाने पुण्याचा बंदोबस्त पक्का ठेवला होता. शिवाजीनें प्रथम दोन ब्राह्मणाना शहरांत पाठविले आणि त्यांच्याकरवीं खानाच्या व्यवस्थेची माहिती मिळविली. आणि चैत्र शु. ८ रोजीं सायंकाळीं चारशे निवडक मावळे बरोबर घेऊन तो पुण्यास आला. बाबाजी बापूजी आणि चिमणाजी बापूजी या दोन सरदारांनीं पहारा बदलण्याचे निमित्त करून वाड्यांत प्रवेश केला. रमजानचा उपास रात्रीं सोडून मंडळी झोंपण्याच्या तयारींत होती. स्वयंपाकघराच्या बाजूस निवडक लोकांनिशीं चिमणाजी बापूजी आला, व मध्यरात्रीं लष्करी बाजा सुरू होतांच कुदळींनीं भितीस भोक पाडून ते सर्व आंत शिरले. कापडी पड्यांनीं बनविलेल्या खोल्यांचे पडदे तरवारीनें कापून लोक थेट खानाच्या खोलींत आले. जनानखान्यांतील स्त्रियांत एकच गोंधळ उडाला.

खानाचा मुलगा फत्तेखान मारला गेला. एका चाणाक्ष बाईने दिवे मालविले. तो फारच आरडाओरडा झाला. एवढ्यांत पुढच्या दरवाजाने बाबाजी बापूजीची टोळी आंत आली तेव्हां खान भाला घेऊन सज्ज होता; पण त्याचें कांही न चालून तो खिडकींतून निसटून जाऊं लागला; याच वेळीं शिवाजीने वार करून त्याच्या हाताचीं बोटें छाटून टाकलीं. खान आणि त्याचे लोक पळून गेल्यावर शिवाजीचें काम झाले ! या चकमकींत पहारेकऱ्यांपैकीं सहा इसम मृत्यु पावले. खानाचा मुलगा, सहा बायका व दासी मारल्या गेल्या. चार वर्षें आपला वाडा शाहिस्तेखान वापरतो आणि उपद्रव देतो म्हणून शिवाजीने असा सूड उगविला.

—५ एप्रिल १६६३

## चैत्र शु. ८ (२) मोंगलावर मात केली !

शके १६५९ च्या चैत्र शु. ८ रोजीं थोरल्या बाजीराव पेशव्यांनीं दिल्लीवर हल्ला करून मोगलांचा पराभव केला.

आजपर्यंत महंमूद गिझनी, अल्लाउद्दीन खिलजी, औरंगजेब आदींनीं आपल्या राक्षसी सामर्थ्यानें लाखों विस्कळित हिंदूंचा धुव्वा उढविला होता. आतां मराठ्यांच्या पराक्रमास भरतें येत होतें. बादशहा व उमराव सर्वच नामर्द बनून शिंदे, होळकर पवार, जाधव, कदम, बाजी भीमराव, इत्यादींचे बळ उसळ्या घेत होतें. गुजराथ, माळवा प्रांतांची कायमची सुभेदारी बाजीराव बादशाहाकडे ठासून मागत होता, आणि त्याला नकार आल्यामुळे बाजीराव उत्तरेच्या मोहिमेवर निघाला. शिदे–होळकर सर्वत्र दंगल उठवून मोगलांस दमास आणीतच होते. मल्हारराव होळकरानें जी गनिमी काव्याची लढाई दिली ती बादशहाचा सल्लागार सादतखान यास समजली नाहीं; तो आपला विजयच समजून बेफिकीर राहिला. आपण मरठ्यांचा संपूर्ण पराजय केला असें त्यानें बादशहास कळविलें ! तेव्हां आपण जिवंत आहोंत हे दर्शविण्यासाठी बाजीराव निकडीनें दिल्लीस येऊन ठेपला. शहरांत काळकादेवीची जत्रा चालू होती; त्यांतील कांहीं हत्ती व दुकानें मराठ्यांनीं लुटलीं. ही बातमी बादशहास समजतांच तो गोंधळून गेला. पळून जाण्यासाठीं त्यानें यमुनेत नावा सज्ज केल्या. पण याच वेळीं अमीरखान नांवाच्या माणसानें शहरांतील बारा हजार स्वार, वीस हजार पायदळ व तोफखाना यांसह बाजीरावावर हल्ला केला. भ्याल्यासारखें सोंग करून बाजीरावाने मोगलांस पूर्णपणें अंगावर घेतलें. एकदम चवताळून मराठ्यांनीं मोंगलांस तलवारीनें कापून काढलें. शहरवासी लोकांना वा बादशहास त्रास देण्याचा बाजीरावाचा मानस नव्हता. आपल्या विजयी झालेल्या अल्प फौजेनिशीं बाजीराव लोकांचीं मनें शांत करण्यासाठीं दिल्लीहून सात कोसांवरील सराई–आला बिर्दीखान–येथें जाऊन राहिला.

मराठे–मोंगलांचा हा झगडा इतिहासांत अपूर्व गणला गेला आहे. दोघांनींहि आपआपलें बल संपूर्णपणे उपयोगांत आणलेलें दिसून येतें.

— २८ मार्च १७३७

## चैत्र शु. ८ (३) 'राज्यद्रोह हाच माझा धर्म !'

शके १८५२ च्या चैत्र शु. ८ या दिवशीं प्रसिद्ध दांडी यात्रेनंतर महात्मा गांधींनीं मिठाचा सत्याग्रह सुरू केला.

हिंदुस्थानच्या किनाऱ्यावर अपरंपार मीठ तयार होते. परंतु या मिठावर सरकारला प्रचंड कर देणें जनतेला आवश्यक झाले होतें. जनतेचे वाली महात्मा गांधी यांना ही गोष्ट अन्यायाची वाटली. त्यांनीं त्याविरुद्ध लढा पुकारला. कोणालाहि पटतील अशा अकरा मागण्या महात्माजींनी व्हाइसरॉयकडे सादर केल्या. सरकारकडून धमकावणीचें उत्तर आले. गांधीजी त्याला डरणारे थोडेच होते! 'गुढगे टेकून भाकरी मागितली असतां धोंडा पदरांत पडला' असे उद्गार काढून गांधी पुढील तयारीस लागले. 'या चळवळीत यश मिळाले नाहीं तर पुनः साबरमतीच्या आश्रमांत पाऊल टाकणार नाहीं', 'माझ्या आयुष्यांतील हा स्वराज्याचा शेवटचा लढा आहे.' वगैरे प्रतिज्ञांनी त्यांनीं सर्वांचे लक्ष आपणांकडे ओढून घेतलें. 'अत्याचार वडले तरी हा लढा मी थांबविणार नाहीं', असें आश्वासन त्यांनीं लोकांना दिले. आणि 'हे धर्मयुद्ध आहे. आणि तें ईश्वराचे नांव घेऊन मी चालविणार आहें', अशी भूमिका घेऊन फाल्गुन शु. २ या दिवशीं ते साबरमती आश्रमांतून बाहेर पडले. 'दांडी' हें गुजराथमधील स्थान त्यांनीं सत्याग्रहाकरितां निवडिले होतें. गांधीजींच्या भालावर कुंकुमतिलक होता. गळ्यांत हातसुतांचे हार होते. सुवासिनींनीं ओवाळिल्यानंतर गांधीजींनीं 'दांडी यात्रे'स सुरुवात केली. 'राज्यद्रोह करणें हाच मुळीं माझा धर्म, तोच मी प्रजेला शिकवीत आहें', असें गांधीचे सांगणे होतें.

त्याप्रमाणें सर्व भारतांत या अद्वितीय लढ्याचे पडसाद उमटूं लागले. ठिकठिकाणीं गांधींचें स्वागत झालें. शेवटीं चैत्र शु. ८ या दिवशीं प्रभातकालीं गांधीजींनीं समुद्रकिनाऱ्यावरील मीठ उचलून कायद्याचा भंग केला. "एका महामंगल यज्ञाचा तो आरंभ होता. सर्व तीर्थांचा राजा असलेल्या सागराच्या तीरावर पारतंत्र्याचा अश्वमेध करणारें यज्ञकुंड महात्माजींनीं प्रज्वलित केलें."

—६ एप्रिल १९३०

## चैत्र शु. ९ श्रीरामचंद्रं शरणं प्रपद्ये !

चैत्र शु. ९ या दिवशीं सूर्य मध्यान्हीस आला असतां पुनर्वसु नक्षत्रावर पांच ग्रह उच्चस्थानीं असून कर्कलग्नीं गुरु व चंद्र असतांना कोसल देशाच्या अयोध्येचा राजा दशरथ यास कौसल्या राणीपासून, सर्व लोकांना नमस्कार करण्यास योग्य, असे श्रीरामचंद्र जन्मास आले.

कुरुवंशानें आर्यावर्तात वसाहत केल्यानंतर आर्यांची दुसरी एक लाट गंगा नदीच्या पलीकडे पूर्व भागांत पसरली. त्यांमधील कोसल कुलांत दशरथ राजा राज्य करीत होता. त्याच्या तीन राण्यांच्या पोटीं एकहि पुत्रसंतान नव्हतें, परंतु पुत्रकामेष्टि यज्ञ केल्यानंतर अग्निदेवाच्या कृपेनें कौसल्येस रामचंद्र, कैकेयीस भरत, सुमित्रेस लक्ष्मण व शत्रुघ्न अशीं एकेका दिवसानंतर मुलें झाली. त्यांपैकी रामचंद्र अत्यंत बुद्धिमान, तेजस्वी व बलवान् होता. त्यानें आपल्या जीवितांत जीं लोकोत्तर कृत्ये केलीं, त्यावरून भारतीयानीं त्याला अवतार कल्पिले आहे.

राम सत्यवचनी होता, पितृवचन पाळणारा होता, एकपत्नीव्रताने राहणारा होता, आदर्श राजा होता म्हणून भारतीयांचे त्याच्यावर प्रेम आहेच; परंतु त्याच्या एकाच कृत्यानें त्याची कीर्ति अजरामर झाली आहे आणि तें म्हणजे देवादिकांना छळणाऱ्या दुष्ट रावणाचा त्यानें केलेला नाश. जणुं रामाचा अवतारच त्यासाठीं होता. रावण म्हणजे, ‘ रावयति विद्रावयतीति रावण : । ’ प्रजाजनांना भिवविणारा तो रावण. यज्ञयागादिकांना व पुण्यकर्मांना विघ्न आणणारे, गोब्राह्मणांना पीडा देणारे, वेदवतीसारख्या साध्वीवर बलात्कार करणारे जे राक्षस त्या काळीं होते त्यांचा नायक म्हणजे रावणच. तेव्हां त्याचा वध करून रामानें अलौकिक सत्कृत्य केले. रावणराज्यामुळे सर्व पृथ्वी गांजून गेली होती. “ रावणाच्या जुलुमाच्या दुखण्याने ती कण्हूं लागली. ती गाईसारखी दीन झाली ; आणि क्षीरसागरांत गाढ झोंपणाऱ्या विष्णूला आपल्या विकल स्वरानें जागृत करून त्याच्याजवळ तिनें आपले दुःख निवेदन केलें. श्रीभगवान् विष्णूला दया येऊन त्यानें तिला आश्वासन दिले आणि दशरथाच्या पोटीं जे रामचंद्र जन्मास आले त्यांनीं तें आश्वासन पूर्ण केलें.”

● ● ●

## चैत्र शु. १० आदर्श बंधु भरत !

चैत्र शु. १० या दिवशी श्रीरामचंद्राचा एकनिष्ठ बंधु भरत याचा जन्म झाला.

दशरथाची पत्नी कैकेयी हिचा हा पुत्र . शत्रुघ्नासह हा आजोळी असतांना रामाला राज्याभिषेक करण्याचा बेत दशरथ राजानें केला. परंतु कैकेयीच्या विरोधामुळें तो बेत रद्द होऊन रामास चौदा वर्षें वनवासास जावें लागलें. त्यायोगे दशरथ मृत्यु पावला. ही सर्व बातमी भरतास समजतांच त्याने आपल्या आईची निर्भर्त्सना केली. आणि राज्याचा त्याग करून रामाचे दर्शन घेण्यासाठी अयोध्येहून तो निघाला. चित्रकूटावर रामाची गांठ पडल्यावर राज्यपद स्वीकारण्याची विनंति त्यानें रामास केली. पण ती गोष्ट अशक्य असल्याचें रामानें सांगितल्यावर भरताने निग्रहाने रामास सांगितले की, " मी तुझ्या पादुकांच्या नांवाने राज्य चालवीन, वनवासांत असणाऱ्या तुझ्याप्रमाणे जटावल्कले धारण करीन आणि फलमूलांशिवाय कांहीहि खाणार नाहीं. चौदा वर्षेपर्यंत तुझी वाट पहात गांवाच्या बाहेर राहीन आणि जर तूं आला नाहींस तर शेवटी अग्नींत प्रवेश करीन." या निग्रहाप्रमाणें भरत चौदा वर्षेपर्यंत अयोध्येबाहेर नंदिग्रामांत राहून रामाच्या नांवाने राज्यकारभार पाहात होता. कोणतेहि; राजोपचार त्यानें स्वीकारले नाहीत, छत्रचामरें, नजराणे, वगैरे सर्व पादुकांना दिले जात असत. शेवटी चौदा वर्षे संपल्यानंतर राम परत आल्याची बातमी या तपस्वी बंधूला हनुमानाकडून कळली, तेव्हां भरताला अत्यंत आनंद झाला. त्याने मारुतीला पुष्कळ बक्षिसे दिलीं. भरताने सर्व नगर उत्तम प्रकारें शृंगारून रामाचे स्वागत केलें. आणि आजपर्यंत ठेवीप्रमाणें असणारे राज्य रामाला.परत केलें.

अशा प्रकारें वडील बंधूवर अनन्यपूर्ण निष्ठा ठेवून तपस्वी वृत्तीनें राहण्यांत भरताची योग्यता समजून येते. सबंध आयुष्यांत त्याचेवर युद्धाचा प्रसंग एकदांच आला होता. रामाच्या आज्ञेवरून आपल्या दोन मुलांसह सिंधु नदीकांठीं असणाऱ्या गंधर्वांचें पारिपत्य भरतानें केलें, आणि तक्षशिला व पुष्कल अशा नगरांची स्थापना केली.



## चैत्र शु. ११ "लक्ष्मणासारखा बंधु नाहीं!"

चैत्र शु. ११ या दिवशी श्रीरामाचा एकनिष्ठ अनुगामी बंधु लक्ष्मण याचा जन्म झाला. दशरथास सुमित्रेपासून झालेला हा वडील मुलगा.

राम-लक्ष्मणांची प्रीति, बंधु-बंधूंमधील प्रेमाचे आदर्श स्वरूप म्हणून मानली गेली आहे. रामचंद्र वनवासाला निघाले तेव्हां ऐश्वर्याचा त्याग करून रामाबरोबर वनवासास जाण्यास सिद्ध होऊन लक्ष्मण बोलला– "मी धनुष्य सज्ज ठेवून व कुदळ-खोरीं बरोबर घेऊन तुम्हांला मार्ग दाखवण्यासाठीं तुमच्यापुढें राहीन. वनांतील कंदमुळें, फळे व तपस्व्यांना होमाकरितां लागणारे पदार्थ तुम्हांला नित्य आणून देत जाईन." रामाबद्दल त्याला जेवढा आदर होता तेवढीच निष्ठा सीतेबद्दलहि होती. या दोघांची सेवा करणें ही एकच गोष्ट त्याला माहीत होती. ऋष्यमूक पर्वतावर सीतेने टाकलेले दागिने वानरांनीं जपून ठेविले होते, ते त्यांनीं ओळखण्यासाठीं लक्ष्मणापुढें टाकले, तेव्हां तो म्हणाला, "मला कर्णभूषणें, बाहुभूषणे ओळखतां येत नाहींत. पण दररोज वंदन करतांना पाहिल्यामुळें पायांतील अलंकार तेवढे मी ओळखूं शकेन." श्रीरामचंद्रहि त्याची योग्यता जाणून होते. इंद्रजितास लक्ष्मणानेच मारले, पण तत्पूर्वी लक्ष्मण शरबद्ध झाला असतांना रामचंद्र म्हणाले, एक वेळ सीतेसारखी स्त्री मिळूं शकेल, पण लक्ष्मणासारखा बंधु मात्र मिळणें कठीण आहे. राम-रावण युद्धांत लक्ष्मणाने मोठा पराक्रम केला. अतिकाय, विरूपाक्ष, रावण, इत्यादींशीं त्याचें प्रत्यक्ष युद्ध झालें होतें. अशोकवनांत असणाऱ्या सीतेनें याचे वर्णन केलें आहे: "लक्ष्मण वृद्धांची सेवा करणारा असून समर्थ परंतु मितभाषी आहे. तो स्वभावानें सौम्य व आचरणानें पवित्र आहे. वेळोवेळीं रामालाहि सल्ला देण्याचे काम त्याने केले आहे." लक्ष्मणाच्या पत्नीचे नांव उर्मिला. ती सीरध्वज जनकाची मुलगी. सीतादेवी वनवासांत असली तरी आपल्या पतीबरोबर होती. उलट उर्मिला राजवाड्यांत 'एकाकी' होती. या 'उपेक्षित नायिके'चा गौरव बाबू मैथिलीशरण गुप्त आणि कविवर्य टागोर यांनीं केला आहे. उर्मिला चौदा वर्षें 'नववधू'च राहिली होती!





## चैत्र शु. १२ "आम्ही बुंदेलखंड सोडतों!"

शके १६५१ च्या चैत्र शु. १२ या दिवशीं थोरले बाजीराव पेशवे यांनी जैतपूर येथें महमदशहा बंगश याचा पराभव केला.

पहिल्या बाजीरावाने उत्तरेत मोठाले पराक्रम केले त्यांपैकीच हा एक आहे. सतराव्या शतकांत उत्तर हिंदुस्थानांत मराठे व रजपूत यांचें ऐक्य होऊन दिल्लीच्या बादशाहीस हादरे बसूं लागले. बुंदेलखंडाचा छत्रसाल राजा स्वतंत्रपणें वागूं लागला. बुंदेलेहि मराठ्यांना साह्य करूं लागले. रजपूत आणि बुंदेले यांच्या मदतीने मराठे दिल्लीहि काबीज करतील या भीतीने बादशहाने अलाहाबादचा सुभेदार महमदशहा बंगश या पराक्रमी पुरुषास मराठे—छत्रसाल व रजपूत यांचे पारिपत्य करण्यासाठीं हुकूम दिला. हा बंगश अफगाणिस्तानांतील बंगश खोऱ्यांतील. त्याचा बाप आईनखान औरंगजेबाच्या वेळीं हिंदुस्थानांत आला होता. आपल्या कर्तबगारीनें अहंमदशहाने नशीब काढलें. गंगेच्या कांठीं शम्साबाद परगण्यांत माऊ येथे राहून त्यानें चारपांच हजारांची फौज पदरी बाळगली होती. फर्रुखसियरच्या कारकीर्दीत यास मोठ्या जहागिरी मिळाल्या. छत्रसालाला जिंकण्याच्या भानगडींत त्याचा मुलगा मारला गेला. तेव्हां महमदशहा चवताळून बुंदेलखंडांत शिरला. मोठ्या निकराची लढाई होऊन छत्रसालचा पराभव झाला. गुप्त रीतीनें छत्रसालानें बाजीरावाची मदत मागितली.

"जो गति ग्राह गजेन्द्रकी सो गति जानहु आज।<br>बाजी जात बुन्देलकी राखी बाजी लाज"

ही त्याची विनवणी ऐकून बाजीरावाने ही कामगिरी अंगावर घेतली. आणि मोठ्या निकरानें बंगशशीं युद्ध करून त्यांत त्याचा पराभव केला. जैतपूरवर बंगशची अन्नान्नदशा झाली. त्यानें बाजीरावास करार लिहून दिला, "आम्ही बुंदेलखंड सोडून जातों. पुनः छत्रसालावर चढाई करणार नाही." पुढें दोनतीन वर्षांतच छत्रसालाचे निधन झालें. मरते समयीं बाजीरावास त्याने आपल्या राज्याचा तिसरा हिस्सा दिला.

महंमदशहाच्या या पराभवामुळें बाजीरावाचे नांव उत्तरेत गाजून राहिलें.

—३० मार्च १७२९

## चैत्र शु. १३ (१) तीर्थंकर महावीर यांचा जन्म !

शालिवाहनशकपूर्व ६७७ मध्यें चैत्र शु. १३ या दिवशीं जैनांचा चोविसावे तीर्थंकर महावीर यांचा जन्म झाला.

हल्लीं प्रचारांत असणाऱ्या जैन धर्माचे प्रचारक हे होत. यांच्यापूर्वी पार्श्वनाथ नांवाचे तेविसावे तीर्थंकर सुमारें २५० वर्षांपूर्वी होऊन गेले. महावीरांचे वडील सिद्धार्थ नांवाचे होते. ज्ञान नांवाच्या क्षत्रिय कुळांत यांचा जन्म झाल्यामुळें यांना ज्ञानपुत्र असेंहि म्हणतात. महावीर हे राजपुत्र असले तरी पहिल्यापासून विरक्त होते. एक तपभर प्रवास करून त्यांनीं इंद्रियदमन केले. कडक तपश्चर्या केल्यानंतर त्यांना केवलज्ञान प्राप्त झाले. त्यानंतर त्यांनी धर्मोपदेश करण्यांत व इतरांना तपश्चर्येचे नियम समजावून सांगण्यांत आपले आयुष्य घालविलें. मगध येथील बिंबिसार राजाने यांच्यापासूनच दीक्षा घेऊन जैन धर्माचा स्वीकार केला होता. या काळांतच वेदबाह्य अशा बुद्धधर्माचा उदय झाला होता. धर्माचरणास संन्यासदीक्षा आवश्यक आहे असें दोनहि पंथाचे मत होते. जैन धर्मपंथ आपल्या पंथाची व्याख्या अशी करतो — "राग, द्वेष, इत्यादि दोषांना ज्याने जिंकले, अथवा ज्ञानावरणीय, दर्शनावरणीय, मोहनीय, अंतराय, इत्यादि कर्मशत्रूंना ज्यांनी जिंकले; तो किंवा ते जिन गणधरादि त्यांच्यामध्ये जे श्रेष्ठ तीर्थंकर केवल ज्ञानी, त्यांस जिनेश्वर म्हणतात. त्यांना वीतराग, अर्हत, परमेष्ठी, सर्वज्ञ, शास्ता अशींहि नांवें आहेत. अर्थात् जिनाचे अनुयायी ते जैन होत." देवालये तीर्थस्थाने, देवता, पूजाविधि वगैरे गोष्टींत जैन धर्माचे साम्य हिंदु धर्माशीं दिसून येते. या पंथांत श्वेतांबरी व दिगंबरी असे दोन भेद आहेत. फरक तत्त्वज्ञानाचा नसून धर्माचरणाचा आहे. जैन तत्त्वज्ञानांत नऊ प्रमुख पदार्थ मानण्यांत आले आहेत: (१) जीव, (२) अजीव, (३) पुण्य, (४) पाप, (५) आश्रव, (६) संवर, (७) बंध, (८) निर्जर, (९) मोक्ष.

जैन हे पुरुषरूपी ईश्वर मानीत नाहींत. त्यांची जागा अनेक सिद्धस्थितीला पोचलेल्या आत्म्यांनीं घेतली आहे. परंतु, जैन मूर्तिपूजक असून त्यांच्यांत प्रार्थनाविधिहि आहे.

● ● ●

## चैत्र शु. १३ ( २ ) जालियनवाला बागेंतील कत्तल !

शके १८४१ च्या चैत्र शु. १३ रोजीं पंजाबांत अमृतसर येथें सुवर्णमंदिराशेजारीं जालियनवाला बागेंत जनरल डायर यानें हजारों निरपराधी आबालवृद्धांची कत्तल केली.

त्या वेळीं रौलट ॲक्टला विरोध करण्यासाठीं महात्मा गांधींची सत्याग्रह मोहीम जोरांत सुरू होती. आणि तिला विरोध करण्याचा अट्टाहास ब्रिटिश राजसत्ता बेफामपणें करीत होती. तीनचार दिवसांपूर्वीपासून अमृतसरच्या लोकांचे हाल सुरू झाले. जालियनवाला बागेंत सभा आहे, लाला कन्हय्यालाल हे अध्यक्षपद स्वीकारणार आहेत, असें जाहीर करण्यांत आलें. गुप्त पोलिसांशीं सख्य असणाऱ्या हंसराज नांवाच्या गृहस्थाने सभेची तयारी चालविली. सभेस हजारों लोक आले. वरून विमान घिरट्या घालूं लागतांच सभास्थान न सोडण्याबद्दल श्रोत्यांना सागून हंसराजाने गुप्त पोलिसांना खुणा केल्या. थोड्याच वेळांत लष्करी लोकांनीं बागेच्या तोंडाशीं वेढा दिला. गोळीबार सुरू होण्यापूर्वींच हंसराज प्लॅटफॉर्मवरून उतरला; आणि पसार झाला. इतर लोक घाबरून भिंतीवरून उड्या टाकीत पळूं लागणार इतक्यांत गोळीबार सुरू झाला. सभास्थानास एकच दार होतें आणि तेथे तर लष्करी मारा सुरू होता. असंख्य लोक जखमी झाले. या कत्तलींत सात महिन्यांपासून सत्तर वर्षांपर्यंतचीं सर्व वयाचीं माणसें होतीं. त्यांत साधु-बैरागी होते, स्त्रियाहि होत्या. या गोळीबारांत जितकीं अधिक माणसें बळी घेतां येतील तितकीं घेण्याचा निश्चय डायरचा होता. गोळीबारप्रसंगीं जमिनीवर लोळण घेऊन जीव वांचवण्याचा प्रयत्न माणसे करूं लागलीं तेव्हां खालीं बसून गोळ्या झाडण्याचा हुकूम सुटला! शेवटीं दारूगोळा संपला तेव्हा कत्तल थांबली. डायरची स्वारी निघून गेली.

बागेंत रात्रीं प्रेतांचा खच पडला होता. असंख्य जखमी झाले होते. त्यांची विल्हेवाट लावणे शक्य नव्हते. कारण रात्रीं ८ च्या नंतर घराबाहेर पडणारास गोळी घातली जाईल असा हुकूम होता. त्यामुळें केवळ पाणी वेळेवर मिळालें नाहीं, म्हणूनहि शेकडों लोकांचे प्राण गेले.

— १३ एप्रिल १९१९

## चैत्र शु. १४ (१) 'मला लोक काय म्हणतील?'

शके १४५० च्या चैत्र शु. १४ रोजीं फत्तेपूर-शिक्री येथे महापराक्रमी राणा संग आणि बाबर यांचे घनघोर युद्ध होऊन राणा संग याचा पराभव झाला.

या काळी रजपुतांपैकी एकटे मेवाडचेच राज्य बलाढ्य होते. चितोड-गडावर राणा संग नांवाचा पराक्रमी राजा राज्य करीत होता. दिल्लीच्या सुलतान इब्राहीम लोदीचा अनेकवार पराभव या राण्याने केलेला असल्यामुळे त्याचें वजन अतोनात वाढले होतें. बाबराला त्याचे भय फारच वाटे. त्याच्याशीं सलोखा करण्यास राणा तयार नव्हता. दोघांनीहि युद्धाची तयारी जोरांत केली. ग्वाल्हेर, अजमीर, शिक्री, रायसेन, काल्पी, इत्यादि ठिकाणचे राजे त्याला मदत करणार होते. एका पायाने पंगु, एका डोळयाने अंध, एका हातानें थोटा असा हा राणा संग्रामसिंह उर्फ संग पराक्रम करण्यास सिद्ध झाला. शिक्रीजवळ खानवा येथें दोनहि फौजा एकत्र येऊन युद्धास सुरुवात झाली. एकदोन हल्ल्यानंतरच बाबराचे सैन्य पळूं लागलें. आपल्या अधर्माचरणामुळे आपला पराभव होतो असें पाहून बाबरने ईश्वराची करुणा भाकून ऐषाराम सोडून दिला. मद्यपानास बंदी केली. आपल्या सैन्यास त्याने उत्तेजित केलें, "उठा बंधूंनो! अपयश पदरीं घेऊन जगण्यापेक्षां धर्मासाठीं आजच मरण्यास सिद्ध व्हा. देहांत प्राण असेपर्यंत लढूं पण हार जाणार नाही, अशी शपथ घ्या." या स्फूर्तिदायक उपदेशामुळें मुसलमान पुनः अवेशाने लढूं लागले. "तोफांचे गोळे सुटले, घोडे किंचाळूं लागले, प्रेतांचे ढीग पडले, रक्ताचे पाट वाहूं लागले, घनघोर संग्राम झाला." अशा वेळीं कोणी एक रजपूत बाबरास फितुर झाला. राणा संगास बऱ्याच जखमा झाल्या. त्याच्या सैनिकांनीं त्याला पहाडांत पळवून नेलें! रजपूत सैन्य निराशेनें रणांगणांतून माघारें फिरलें! पराजयाचे वृत्त ऐकून राण्यास मनस्वी वाईट वाटलें. "मी रणांगणावर मरण्याची इच्छा करीत असतांना मला गैरशुद्धींत असतांना येथे आणून मोठा घात केलात. मला लोक काय म्हणतील? 'पळपुटा' संग्राम म्हणून मुलें देखील मला हंसतील. चितोडच्या संरक्षणार्थ राणा मेला अशी कीर्ति माझी व्हावयास पाहिजे होती." असे उद्गार राण्याने काढले.

— १६ मार्च १५२८

## चैत्र शु. १४ (२) " .... नांवें सांगणार नाहीं! "

शके १७७९ च्या चैत्र शु. १४ रोजीं सत्तावनच्या स्वातंत्र्य-युद्धांतील पहिल्या चकमकींतील हुतात्मा मंगल पांडे हा फांसावर चढला!

सत्तावनच्या क्रांतियुद्धाला 'चरबी माखलेली काडतुसें' हें प्रासंगिक कारण घडलेलें दिसलें तरी 'स्वधर्म नि स्वराज्य यांच्या पवित्र हेतूनें प्रेरित होऊनच १८५७ चे वीरश्रेष्ठ लढले' असा निर्वाळा इंग्रज इतिहासकारहि देऊं लागले. चरबी माखलेल्या काडतुसांचा पहिला प्रयोग १९ व्या तुकडीवर होणार होता. काडतुसें घेण्यास नकार दिल्यावर त्यांच्यावर सक्ती करण्यांत आली आणि; शेवटीं या तुकडीला निःशस्त्र करण्याचे ठरले. ही मानखंडना शिपायांना सहन झाली नाहीं. मंगल पांडे नांवाचा ब्राह्मण क्षात्रवीर त्यांचा पुढारी बनला. " रणांगणावर अत्यंत धाडसी नि शूर, तर चारित्र्याने अत्यंत शुद्ध नि पापभीरु, अशा या स्वधर्मावर प्राणापलीकडेहि प्रेम करणाऱ्या तेजस्वी, तरुण ब्रह्मवीराच्या हृदयांत स्वदेश-स्वातंत्र्याची कल्पना चमकून जाऊन त्याचा सबंध देह अद्भुत अशा विद्युत् शक्तीनें चेतून गेला." त्याने उठावणीला सुरवात केली, " उठा, बंधूंनो, उठा, तुम्हांला तुमच्या धर्माची शपथ आहे. या आपल्या स्वातंत्र्यास्तव या नीच शत्रूवर आपण तुटून पडूं या." विरोध करणाऱ्या इंग्रज अधिकारी मंगल पांडयाच्या गोळीला बळी पडले. युरोपियन सैनिक त्याला पकडण्यास धांवले. तेव्हां फिरंग्याच्या हाती सांपडण्यापेक्षां मरण बरें म्हणून यानें आपल्या हातची बंदूक स्वतःवर झाडून घेतली व तो घायाळ होऊन पडला.

न्यायालयापुढें चौकशी होऊन मंगल पांडे यास फांशीची शिक्षा सुनावण्यांत आली. बराकपूरमध्यें फांशीं देण्यास कोणीहि तयार होईना. तेव्हां कलकत्त्याहून चार मांग बोलाविले, आणि चैत्र शु. १४ या दिवशीं या हुतात्म्याला वधस्थलाकडे नेण्यांत आलें. " आपल्या बरोबरीच्या सहाय्यक कटवाल्यांचीं नांवे प्राणांतींहि सांगणार नाहीं असें म्हणत असतांनाच एकदम गळफांसाचा दोर खेंचला गेला. नि मंगल पांड्याचा दिव्य आत्मा स्वर्गास गेला. स्वातंत्र्याच्या बीजाला मंगल पांड्याचें उष्ण रक्त मिळाल्यामुळें त्याचा वृक्ष लौकरच मोहोरून आला."

— ८ एप्रिल १८५७

## चैत्र शु. १५ (१) " हनुमंत आमुचें दैवत ! "

चैत्र शु. १५ रोजीं भारतीय समाजाने बुद्धि आणि बल यांसाठीं आदर्श मानलेला श्रीहनुमान याचा जन्म झाला.

गौतमकन्या अंजनी व सुमेरीचा राजा केसरिन् यांचा हा पुत्र. याच्या जन्मासंबंधीं निरनिराळ्या कथा प्रसिद्ध आहेत. पुत्रकामेष्टि यज्ञांतून निघालेल्या प्रसादापैकीं कांही भाग घारीने नेला आणि तो तप करीत बसलेल्या अंजनीच्या ओंजळींत पडला. त्यायोगे हनुमानाचा जन्म झाला. हनुमंत पराक्रमाचा मूर्तिमंत पुतळा होता. रामचंद्रांचा हा आदर्श भक्त असून सीतेचा शोध लावण्यांत त्यानें बरेच शौर्य प्रगट केले होते. लंकादहन करणे, राम-रावण युद्धांत मेलेल्यांना सजीव करण्यासाठीं द्रोणागिरी उचलून आणणें इत्यादि त्याच्या अचाट अद्‌भुत कृत्यांवरून त्याच्या शक्तीची आणि बुद्धीची साक्ष पटते. या हनुमंतासच मरुत्पुत्र म्हणून मारुति, वज्राने हनु तुटल्यामुळें हनुमंत, वज्रदेही म्हणून वज्रांग–बजरंग, बलाने भीषण म्हणून बलभीम इत्यादि नांवे आहेत.

याच हनुमानाच्या भक्ताचा प्रसार प्रसिद्ध रामभक्त समर्थ रामदासस्वामी यांनी सर्व भारतांत गांवोगांव केला होता. " आमुचे कुळीं हनुमंत। हनुमत आमुचें दैवत। तयावीण आमुचा परमार्थ। सिद्धीते न पावे कीं " असे समर्थांनीं म्हटले आहे. समर्थांचे अकरा मारुति प्रसिद्धच आहेत. प्रत्येक खेड्यांत एक तरी मारुतीचें देवालय असते आणि प्रत्येक तालमींत दर शनिवारीं मारुतीची पूजा होत असते. हा ' वीरमारुति ' समर्थांनीच प्रचारांत आणला. एकनिष्ठ सेवक व भक्त म्हणूनहि याची प्रसिद्धि आहे. ' काय भक्तीच्या त्या वाटा। मज दावाव्या सुभटा ' अशा प्रकारे भक्तिमार्ग अनेकांनीं मारुतीला पुसला होता. खुद्द रामरायांनीं पुढील गुणांबद्दल मारुतीची प्रशंसा केली आहे. "

" शौर्यं दाक्ष्यं बलं धैर्यं प्राज्ञता नयसाधनम्।
विक्रमश्च प्रभावश्च हनूमति कृतालय :॥ "

हनुमंत सर्व ठिकाणीं मनाप्रमाणें त्वरित गमन करणारा, वाऱ्याप्रमाणे प्रचंड वेगाने जाणारा आहे. त्याच्या स्वाधीन इंद्रिये आहेत. बुद्धिमान् लोकांत तो श्रेष्ठ आहे, आणि हा वानरसमुदायांत मुख्य आहे.



## चैत्र शु. १५ ( २ ) रायगडीं शिवचंद्राचा अस्त !

शके १६०२ मधील चैत्र शु. १५ रोजीं हिंदवी स्वराज्याचे संस्थापक श्री-छत्रपति शिवाजी महाराज यांचा रायगडावर अंत झाला.

राज्याभिषेकानंतर शिवरायांनीं रघुनाथपंत हणमंते यांच्या सूचनेवरून कर्नाटकाच्या स्वारीचा बेत केला. प्रथम त्यांनीं गोवळकोंड्याच्या सुलतानाकडून खंडणी वसूल केली. आणि मद्रासपर्यंतचा कर्नाटक प्रांत जिंकला. बंधु एकोजी याचेवर तंजावरचें राज्य सोंपवून शिवराय रायगडावर परत आले. राजाराम लहान होता, संभाजी उच्छृंखल निघाला, सोयराबाईचा स्वभाव खटपटी होता, मोरोपंत पिंगळे, अण्णाजी दत्तो या दोघांत द्वेष होता, या सर्व प्रकारांमुळे महाराज खिन्न झाले. पौष शु. ९ रोजीं त्यांनीं सज्जनगडावर जाऊन रामदासस्वामींची भेट घेतली. " समर्थांनीं अनेक प्रकारच्या गोष्टी राजधानीसंबंधें सांगून अध्यात्मपर विषयहि सांगितला. तीन दिवस समाधि लावून राजश्री बसले होते. अनेक प्रकारच्या गोष्टी होऊन महाराज परधामास जाणार हें समर्थांनीं सुचविलें. माघ शु. १४ स आज्ञा घेऊन रायगडास आले." त्यानंतर थोड्याच दिवसांत "राजास ज्वराची व्यथा झाली, आयुष्याची मर्यादा झाली असे कळून चुकलें. मातबर लोक जवळ आणून बोलवले.... सर्वांचे कंठ दाटून परमदुःख झालें. भागीरथीचे उदक प्राशन केले. आणि शके १६०२ रौद्र संवत्सर शनिवार चैत्र शु. १५ दोन प्रहरीं रायगडीं शिवचंद्राचा अस्त झाला." शिवरायांची योग्यता 'राजनीति' कार रामचंद्र नीलकंठ अमात्य यांनी अशी वर्णन केली.

"दक्षिण प्रांतीं आदिलशाही, कुत्बशाही व निजामशाही हीं महान् संस्थानें, याविरहित श्यामल, फिरंगी, इंग्रज, वलंदेज, रामनगरकर, पाळेगार, तसेच जागजागा पुंड, चंद्रराव, शिर्के, सावंत, दळवी, वरघांटे, निंबाळकर, घाटगे, ... आदिकरून सकलहि पराक्रमी सज्ज असतांहि, बुद्धिवैभव पराक्रमे, कोणाची गणना न करतां, कोणावर चालून जाऊन, तुंबळ युद्ध करून रणांशीं आणिले. ज्या ज्या उपायें जो जो शत्रु आकळावा त्या त्या उपायें तो तो शत्रु पादाक्रान्त करून सालेरी अहिवंतापासून चेंजी कावेरी तीरापर्यंत निष्कंटक राज्य संपादिलें."

— ४ एप्रिल १६८०

## चैत्र शु. १५ ( ३ ) आर्या पोरकी झाली !

शके १७१६ च्या चैत्र शु. १५ रोजीं पेशवाईच्या अखेरचे मराठीचे महाकवि मोरोपंत पराडकर यांचें निधन झालें.

मराठेशाहींत कोंकणांतून देशावर जीं घराणीं आलीं त्यांत पंतांचें घराणेंहि पन्हाळ्यावर येऊन दाखल झाले. त्यानंतर आपल्या वडिलांबरोबर पंत बारामतीस गेले. बाबूजी नाईक यांच्या वाड्यांत पुराण सांगतां सांगतां मोरोपंत काव्यरचना करूं लागले; आणि थोड्याच अवधींत एक अलौकिक कवि म्हणून त्यांची ख्याति झाली. मोरोपंती भारत व रामायणें प्रसिद्ध असून भागवती प्रकरणावरील त्यांचीं काव्यें सरस वठली आहेत.

"पानपतच्या लढाईपासून खर्ड्याच्या लढाईपर्यंतच्या काळांत पुण्यांतील व इतर प्रांतांतील महाराष्ट्रीय वीर व मुत्सद्दी राजकारणाच्या खणखणाटांत दंग झाले असतां मोरोपंत बारामतीस ब्रह्मकमंडलू ऊर्फ कऱ्हा नदीच्या तीरीं रामसन्निध एकांतांत मराठी भाषेची सेवा करण्यांत गुंग झाले होते. या काळांत त्यांनीं सुमारे पाऊण लाख कविता केली; आणि मराठी भाषेचें वैभव अपार वाढवलें. मोरोपंतांची प्रकृति सात्त्विक आणि सौम्य असून ते आपल्या उपासनेंत उपास्याप्रीत्यर्थ कविता रचण्यांत गढून गेले असल्यामुळे त्यांचें इतर उलाढाली-कडे लक्ष नव्हतें. त्यांचा स्वभाव तसा चळवळ्या असता तर त्यांच्या हातून वाङ्मयाची येवढ्या एकनिष्ठपणें सेवा झालीच नसती. 'केकावली' हें त्यांचें सर्वोत्कृष्ट आणि अखेरचे गोड स्तोत्र. शके १७१६ च्या चैत्रांतील रामनवमी झाल्यावर एकादशीस पंतांना ताप आला. द्वादशीस पुष्कळ वाढला. पंतांनी 'प्रांतप्रार्थना' म्हणून १७ आर्यांचे शेवटचे अत्यंत हृदयद्रावक काव्य केले. "रामाचा साद घालीत त्यांनीं देह ठेवला. गीर्वाण–सागरांतून आपल्या अतर्क्य बुद्धिप्रभावाने या मयूरमेघाने काव्यामृत शोषून त्याचा काठिण्यक्षार नाहींसा करून महाराष्ट्रभूमीवर पेयामृताचा वर्षाव सतत चाळीस वर्षें केला व कृतकृत्य झालेला नश्वर देह मंगलमय करून टाकला." मोरोपंतांच्यानंतर एवढा मोठा साधुकवि मराठी साहित्यास लाभला नाहीं.

— १५ एप्रिल १७९४

## चैत्र व. १ मूर्तिमंत पराक्रम फांसावर!

शके १७८१ च्या चैत्र व. १ रोजी १८५७ च्या स्वातंत्र्य-युद्धांतील मराठ्यांचे कुशल सेनापति रघुनाथ पांडुरंग उर्फ तात्या टोपे यांना फांशीं देण्यांत आले.

तात्या टोपे मूळचे नाशिक जिल्ह्यातील येवलें येथील राहणारे. सत्तावनच्या युद्धांत जे सेनापति आपल्या अतुल शौर्याने लढले त्यांमध्यें तात्याचे स्थान महत्त्वाचे आहे. सर्वत्र पराभव झाल्यावर नानासाहेबास मिळावयास जात असतां मानसिंगाच्या विश्वासघातानें टोपे रिचर्ड मीडकडून पकडले गेले! शिप्री येथे झालेल्या चौकशींत त्यांनीं सांगितलें—" मी इंग्रजी राज्यांत जन्माला आलो नाहीं. तसेच त्यांचा प्रजाजनहि नव्हतो. मग राजद्रोहाचा आरोप मजवर कसा? मीं हत्या केली असेन, पण खून, दरवडे, बायकामुलांची हत्या हे प्रकार मी केले नाहींत—" चौकशीचे काम संपल्यावर फांशीची शिक्षा सुनावण्यांत आली. तात्या यत्किंचितहि न डगमगतां वधस्तंभाकडे निघाले—" त्यांनीं आपण होऊन आपली मान गळफांसांत अडकविली, फांस आवळला गेला. ठोकळा उडाला नि एका हिसक्यासरशी—पेशव्यांचा राजनिष्ठ सेवक, वीर योद्धा, स्वदेशाचा हुतात्मा, धर्माचा त्राता, मानी, प्रेमळ नि उदार तात्या टोपे इंग्लिशांच्या फांसावर निष्प्राण स्थितींत लोंबकळत असलेला दिसला. त्याच्या भोंवतालचा रक्षकगण निघून गेल्यावर गर्दीतून इंग्रज स्त्री-पुरुष पुढें घुसले आणि या पराक्रमी वीराची स्मृति म्हणून तात्याच्या केसांचे झुबके मिळविण्यासाठीं त्यांच्यांत स्पर्धा सुरू झाली."

तात्या टोपे यांचा चेहरा मोठा रुबाबदार होता.—" पांच फूट उंची, धनुष्याकृति भुवया, काळेभोर डोळे, रेखीव नजर व दाढी, मिशा व कल्ले असलेल्या चेहऱ्यामुळें त्यांची चर्या भव्य दिसे. बुद्धिमत्तेची झांक व अंगांतील कर्तृत्वशक्ति त्यांच्या तोंडावर उघडपणें स्पष्ट दिसून येई." तात्या टोपे यांचे घराणें देशस्थ ऋग्वेदी असून येवलेकर या नांवाने ते प्रसिद्ध होते. एकदां निफाडकर डेंगळे यांच्या मध्यस्थीने यांना दरबारांत पंच रत्नांची टोपी मिळाल्यानें यांना टोपे या नांवानें प्रसिद्धि मिळाली.

—१८ एप्रिल १८५९

## चैत्र व. २ "एकविचारें राज्याभिवृद्धि करावी!"

शके १६५३ च्या चैत्र व. २ रोजीं साताराचे शाहू छत्रपति व कोल्हापूरचे संभाजी राजे यांचेमध्यें प्रसिद्ध असा वारणेचा तह होऊन तंटा कायमचा मिटला.

शके १६२९ मध्यें मोंगलांचे कैदेंतून सुटल्यानंतर शाहूने आपल्या राज्यविस्तारास सुरुवात केली. याच वेळी कोल्हापुरास स्वतंत्र गादी स्थापन झाली होती. तीवर राजसबाईचा मुलगा संभाजी हा कारभार पाहात होता. मराठी राज्यांत ही अशी दुही राहिल्यामुळे निजामादि शत्रूंना फावलें. दरम्यानच्या काळांत संभाजीनें शाहूच्या राज्यांत लुटालूट आरंभली. प्रतिनिधींच्या साह्यानें शाहूनें संभाजीचा पाडाव केला. संभाजी सलोखा करण्यास सिद्ध झाला. दोघां राजबंधूंची भेट कऱ्हाडापुढें जाखणवाडीच्या माळावर झाली. "परस्पर सन्निध येऊन, ऐक्यता होऊन शाहूमहाराज यांच्या पायावरी डोई श्रीमन्महाराज राजश्री संभाजीमहाराज छत्रपति यांणीं ठेविली, महाराजांनीं परस्परे उभयतां बंधूनीं आलिंगने केलीं, त्या समयीं मोहरा व रुपये व सोन्याचीं फुलें व रुप्याचीं फुले परस्पर सत्के जाहले. त्या वेळी तोफेची सरबत्ती व नाना प्रकारचीं वाद्यें, व शहाजानें वाजवून आनंद झाला. फाल्गुन शु. तृतीया मंदवारी दोन प्रहरां याप्रमाणे भेटीचा समारंभ झाला."

यानंतर चैत्र व. २ रोजी जो वारणेचा तह झाला त्यांतील कलमे थोडक्यांत अशी:— "इलाखा वारुण महाल तहत संगम दक्षिण तीर कुल दुतर्फा मुलूख दरोबस्त देखील ठाणी व किल्ले तुम्हास (संभाजीस) दिले आसत. तुंगभद्रेपासून तहत रामेश्वरदेखील संस्थाने निमे आम्हाकडे ठेवून निमे तुम्हाकडे करार करून दिलीं असत. तुम्हाशीं जे वैर करतील त्यांचें पारिपत्य आम्हीं करावें. आम्हांशी वैर करतील त्यांचें पारिपत्य तुम्हीं करावे, तुम्हीं आम्हीं एकविचारें राज्याभिवृद्धि करावी. वारणेच्या व कृष्णेच्या संगमापासून दक्षिण तीर तहत निवृत्तिसंगम (कृष्णा–तुंगभद्रेचा संगम) तुंगभद्रेपावेतों दरोबस्त देखील गड ठाणीं तुम्हांकडे दिलीं असत... इकडील चाकर तुम्हीं ठेवूं नये, तुम्हांकडील चाकर आम्हीं ठेवूं नये.—"

—१३ एप्रिल १७३१

## चैत्र व. ३ रायगड किल्ल्याचें दैव!

शके १७४० च्या चैत्र व. ३ रोजीं दोनशे युरोपियन व दोनशे एतद्देशीय शिपायांसह इंग्रज अधिकारी मेजर हॉल यास कर्नल प्रॉथरनें रायगड किल्ल्याची टेहळणी करण्यास पाठविलें.

या काळी महाराष्ट्राच्या इतिहासातील मोठे दुःखदायक पर्व सुरू झाले होतें. शके १७३९च्या कार्तिकांत दुसरे बाजीराव पेशवे पुणें सोडून गेल्यानंतर राज्य हस्तगत करण्याचे प्रयत्न लगोलग सुरू झाले. मराठ्यांची पहिली राजधानी म्हणून ज्या रायगड किल्ल्याचे वैभव गाजून राहिले होते त्याकडे इंग्रजांचें लक्ष गेलें. रायगड किल्ला बळकट असल्यामुळें त्याच्या आश्रयास बाजीरावाची पत्नी वाराणशीबाई जाऊन राहिल्या होत्या. रायगडच्या मोहिमेचें काम कर्नल प्रॉथर याच्याकडे आले होते. त्याच्या हाताखालीं पलटणी व तोफखाना अशा दोनहि प्रकारचें सैन्य होतें. बोरघाटच्या रस्त्यानें खोपवलीवरून तोफखाना रवाना झाला, आणि शिपाई लोकांच्या पलटणी लोणावळ्याजवळील डोंगरांतील पायवाटांनीं जंबुसरच्या घाटाने खालीं उतरल्या. पायथ्याशी असणाऱ्या सिद्धेश्वर-पाली नांवाच्या सुप्रसिद्ध गणपतीच्या स्थानाजवळ दोन्ही सैन्यांची गांठ पडली.

त्यानंतर रायगडाकडे मोर्चा सुरू झाला. वाटेंतील तळे आणि घोसाळे हे दोन्ही किल्ले घेण्यांत आले. इंदापूर येथे स्वाभिमानाची थोडी धग उरलेली असल्यानें इंग्रजांना विरोध झाला. पण त्याचा कितीसा उपयोग होणार? चैत्र व. ३ रोजीं सर्व सैन्य महाडास येऊन पोचले, आणि त्याच रात्री मेजर हॉल रायगड किल्ल्याची टेहळणी करण्यास निघाला. रायगडच्या पायथ्याशीं पेशव्यांच्या तीनशें लोकांनीं इंग्रजांना आडविलें. त्या वेळी मोठी चकमक उडाली. परंतु दुर्दैवानें शेवटीं इंग्रजांचा जय झाला; आणि मराठ्यांच्या या राजधानीवर तोफा चढविण्याचें काम सुरू झाले. किल्ला अतिशय अवघड असल्यानें त्यावर हल्ला कोणत्या बाजूनें व कसा करावा या योजनेंतच इंग्रजांचे पहिले आठदहा दिवस गेले. आणि लगेच रायगडावर तोफांच्या भडिमारास सुरवात झाली.

—२३ एप्रिल १८१८

## चैत्र व. ४ 'यदुवंशविलासु' रामदेवराव दिल्लीस !

शके १२२९ च्या चैत्र व. ४ रोजीं महाराष्ट्रातील देवगिरीचा वैभवशाली सम्राट रामदेवराव यादव यांस मलिक काफूरने कैद करून दिल्लीला नेले.

तेराव्या शतकांत महाराष्ट्रांत रामदेवराव यादव नांवाचा राजा देवगिरी येथें राज्य करीत होता. शके १२१६ मध्ये मोठ्या फौजेनिशीं दिल्लीपतीचा पुतण्या अल्लाउद्दीनं खिलजी यानें देवगिरीवर हल्ला करून रामदेवरावाचा पराभव करून अगणित द्रव्य नेले होतेच. यानंतर बारातेरा वर्षांनी अल्लाउद्दीनानें तीस हजार घोडेस्वार बरोबर देऊन मलिक काफूरास देवगडावर रवाना केलें. हा काफूर खंबायतच्या एका सावकाराजवळ गुलाम होता. बादशहाची मर्जी त्याच्यावर असल्यानें ही कामगिरी त्याकडे आली होती. माळव्यांतून खानदेशच्या वाटेने सुलतानपुरावरून तो देवगिरीस आला. या सरदाराशी लढा देण्यास आपण समर्थ नाहीं असें पाहून रामदेवराव हतबल झाला असतां मलिक काफूरनें त्यास कैद केले. दिल्लीस गेल्यानंतर तेथे बादशहाने त्याचे स्वागत करून त्यास एक छत्र, राजाधिराज हा किताब, व एक लाख रुपये बक्षीस दिले; तीन महिन्यांनीं तो परत आल्यावर शके १२३१ मध्यें रामदेवरावाचा अंत झाला.

रामदेवराव यादव हा कृष्णदेवाचा मुलगा. याच्या राज्यांतच या वेळीं ज्ञानेश्वर-नामदेवांच्या प्रयत्नानें भागवतधर्माचा डंका महाराष्ट्रांत झडूं लागला होता. श्रीज्ञानेश्वरांनी या राजाचा उल्लेख आपल्या ज्ञानेश्वरींत असा केला आहे :—

" तेथ यदुवंशविलासु । जो सकळकळानिवासु ।
न्यायाते पोषी क्षितीशु । श्रीरामचंद्र । "

महानुभाव पंथाचा चक्रधर—कृष्ण व हेमाद्रिसारखे जाडे विद्वान् याच्याच काळांत होऊन गेले. कृष्णभक्त बोपदेव याच काळांत चमकला. रामदेवराव वारल्यानंतर आठनऊ वर्षांतच देवगिरीचे राज्य नष्ट होऊन महाराष्ट्राचें स्वातंत्र्य हरपलें. आणि नंतर इस्लामी संस्कृतीच्या लाटेखालीं महाराष्ट्रांत भयंकर काहूर माजून राहिले.

—२४ मार्च १३०७

## चैत्र व. ५ — मत्स्येंद्रनाथांची समाधि !

शके ११३२ च्या सुमारास चैत्र व. ५ रोजीं आदिनाथ सांप्रदायाचे प्रवर्तक मत्स्येंद्रनाथ यांनीं सातारा जिल्ह्यांत मत्स्येंद्रगड येथें समाधि घेतली !

महाराष्ट्र संस्कृतीचा बनाव होतांना जे अनेक धर्मपंथ वा सांप्रदाय उदयास आले त्यांपैकीं नाथसांप्रदाय हा अत्यंत महत्त्वाचा आहे. वास्तविकपणें हा आदिनाथ सांप्रदाय वैष्णव सांप्रदायांपैकींच एक आहे. शंकरांनीं पार्वतीस क्षीरसमुद्रांत जे ब्रह्मज्ञान सागितले तें श्रीविष्णूंनीं मत्स्याचे रूप घेऊन ऐकलें, शंकरांना हें समजल्याबरोबर ' अलक्ष ' असा त्यांनीं उच्चार केला, तेंव्हां मत्स्योदरांतून बाहेर येणाऱ्या कुमाररूपी विष्णूने ' आदेश ' असा प्रतिशद्ब दिला. हाच कुमार मत्स्येंद्रनाथ. प्रसिद्ध गोरखनाथ हा याच मत्स्येंद्रनाथाचा शिष्य होय. यानें योगविद्येवर " मत्स्येंद्रसंहिता " नांवाचा ग्रंथ लिहून हठयोग व शाबरी मंत्रतंत्र विद्येचा सर्वत्र प्रसार केला. नेपाळमध्ये मत्स्येद्रांचा उत्सव सात दिवस होत असतो. या नाथासांप्रादायी लोकांचा बाह्यवेष असा आहे.

" शैली शृंगी कंथा झोली विभूत लगाया तनमो
कोटि चंद्रका तेज झुलत है चली आपने गतमो ॥ "

महाराष्ट्रांतील भागवतधर्माचे संघटक श्रीज्ञानदेव यांचे घरी विठ्ठलाची भक्ति असली तरी त्यांची गुरुपरंपरा मात्र नाथ पंथामधीलच होती. अंजनी पर्वताच्या गुहेमध्यें तपश्चर्या करणाऱ्या श्रीगैनीनाथांचा उपदेश श्रीनिवृत्तिनाथांना होता. याचा उल्लेख श्रीज्ञानदेवानीं ज्ञानेश्वरीच्या उपसंहारांत करून आपल्या या नाथसांप्रदायासंबंधीं लिहिलें आहे :—

" क्षीरसिंधू परिसरीं । शक्तीच्या कर्णकुहरीं ।
नेणो कै श्रीत्रिपुरारी । सांगितलें जें ।
ते क्षीरकल्लोळा आंत । मकरोदरीं गुप्त ।
होतां तयाचा हात । पैठें जालें ॥
तो मत्स्येंद्र सप्तशृंगीं । भग्नावया चौरंगीं ॥
भेटला कीं तो सर्वांगीं । संपूर्ण जाला ॥

— १७ मार्च १२१०

## चैत्र व. ६ भारताचार्यांचा स्वर्गवास !

शके १८६० च्या चैत्र व. ६ रोजीं सुप्रसिद्ध विद्वान्, मार्मिक संशोधक, मराठी व इंग्रजी भाषेचे विख्यात अभ्यासक भारताचार्य चिंतामण विनायक वैद्य यांचें निधन झाले.

शिक्षणक्रम पुरा झाल्यावर चिंतामणरावांनीं. प्रथम कोल्हापूर व ग्वाल्हेर संस्थानांत न्यायाधिशाचें काम केलें. त्या वेळेपासून त्यांचा विद्याव्यासंग सतत चालू राहून त्यांनीं संस्कृत, प्राकृत, मराठी, हिंदी व उर्दू या भाषांचा चांगला अभ्यास केला. त्यांनीं लिहिलेलीं श्रीकृष्णचरित्र व श्रीरामचरित्र ही पुस्तकें आबालवृद्धांना अजूनहि वाचनीय वाटतात. महाभारताचा व्यासंग दांडगा असल्यामुळें त्यांचें ' महाभारताचा उपसंहार ' हे पुस्तक अत्यंत संशोधनात्मक व विचारपूर्ण झालें आहे. रामायणावर परीक्षणात्मक लिखाणहि त्यांनीं थोडें लिहिले आहे. शिलालेख, ताम्रपट, दानपत्रे, इत्यादींच्या साहाय्यानें व पेशावरपर्यंत स्वतः प्रवास करून वैद्य यांनीं ' मध्ययुगीन भारत ' या नांवाचीं तीन पुस्तके लिहून जुन्या इतिहासांत बहुमोल भर घातली. इतिहासाचार्य कै. वि. का. राजवाडे यांच्या ' ज्ञानेश्वरीचे मराठी व्याकरणावर यांनीं लिहिलेले पांच टीकालेख ' व ' निबंध आणि भाषणे, ' या त्यांच्या पुस्तकांतील लेख पाहून यांच्या भाषाशास्त्राच्या अभ्यासाचीहि चांगलीच कल्पना येते. ' माझा प्रवास ' नांवाचे, १८५७ च्या क्रांतियुद्धाची हकीकत सांगणारें पुस्तक त्यांनीं प्रसिद्ध केले आहे. पानपत-प्रकरणावर आधारलेली " दुर्दैवी रंगू " ही त्यांची ऐतिहासिक कादंबरी सुप्रसिद्ध आहे. टिळक विद्यापीठाचे कुलपति म्हणून त्यांनीं काम केल्यावर विद्यापीठाने त्यांना विद्वत्कुलशेखर ही पदवी दिली होती. ते पुण्याच्या वैदिक संशोधन मंडळाचे अध्यक्ष आणि संस्थापक होते. ' History of Sanskirt Literature ', ' Riddle of the Ramayan ', ' Epic India ', ' Shivaji–the Maratha Swaraj ' आदि त्यांचे इंग्रजी ग्रंथहि मान्यता पावले आहेत. १९०८ सालच्या महाराष्ट्र साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद त्यांनीं विभूषित केलेलें होतें.

—२० एप्रिल १९३८

## चैत्र व. ७ — रायगड शिवरायांच्या ताब्यांत !

शके १५७८ च्या चैत्र व. ७ रोजीं श्रीशिवाजीमहाराज यांनी चंद्रराव मोरे यांचा पराभव करून रायरी ऊर्फ रायगड किल्ला आपल्या ताब्यांत आणला.

सोळाव्या शतकामध्ये स्वातंत्र्याची प्रभात सुरू होत होती. मावळ प्रांतांत श्रीशिवरायांनीं स्वराज्याची मुहूर्तमेढ रोवण्याची खटपट चालू केली. जावळीचे राजे चंद्रराव मोरे यांचा कल विजापूर दरबाराकडे होता. शिवाजी राजांच्या ताब्यांत राजगड, तोरणा, वगैरे किल्ले आल्यानंतर सहजच त्यांचें लक्ष नजीकच्या चंद्ररावांच्या ताब्यांत असलेल्या रायगडावर गेले. तेव्हां चंद्ररावांचा मोड करण्यासाठीं शिवराय शके १५७७ मध्ये जावळीवर चालून गेले. " महाबळेश्वरचा निसणीचा घाट दरियाचा उतरून जावळीस वेढा घातला. जावळी अवघड वाट, जाळया कळकीच्या दाट, तेथे महिनाभर झुंज जाहले. महिना एक महिन्यानें कृष्णाजी बाजी मोरे जावळी सोडून आपले हासमसुद्धां रायगडास गेले. रायगड बळकावून राहिले." ही हकिकत समजतांच शिवराय यांनीं आपला मोर्चा रायगडाकडे वळवला. " महाराज व चंद्रराव मोरे यांची भेट होऊन रायगड महाराजांच्या ताब्यांत द्यावा असें टरलें, या अटीच्या निश्चितीसाठीं चंद्ररावाचे दोन मुलगे बाजीराव व कृष्णराव शिवाजीच्या ताब्यांत ओलीस म्हणून राहिले. असा प्रकार होऊन रायरीचा किल्ला महाराजांच्या ताब्यांत आला."

हाच रायरीचा किल्ला पुढे छत्रपतींची राजधानी म्हणून नांवारूपास आला. रायगड हें महाराष्ट्राचें किंबहुना अखिल भारताचें एक राजकीय पुण्यक्षेत्र आहे. हा रायगड कुलाबा जिल्ह्यांतील महाड तालुक्यांत आहे. याची उंची समुद्रसपाटीपासून २८५१ फूट आहे. " रायगड पाहाडी किल्ला चांगला; आजूबाजूस शत्रूची फौज बसावयास जागा नाहीं. घोडे माणूस जाण्यास महासंकट, वरकड किल्ले पन्हाळे वगैरे बहुत पण खुलासेवार व मैदान मुलखांत वास्तव आजच्या प्रसंगास हीच जागा बरी." यावरून रायगडाची सुरक्षितता ध्यानांत येते.

—६ एप्रिल १६५६

## चैत्र व. ८ "श्रीशंभु कृपा करील!"

शके १६४२ च्या चैत्र व. ८ रोजीं शाहू छत्रपति यांच्याकडून पहिले बाजीराव पेशवे यांना कऱ्हाडनजीक मसूर येथे पेशवाईचीं वस्त्रे मिळालीं.

विशेष आजारी नसतांना बाळाजी विश्वनाथ एकाएकी मरण पावले. यांच्या मृत्युसमयीं बाजीराव एकोणीस वर्षांचे होते. लहानपणापासून बाजीराव बाळाजीबरोबर वागत असल्यामुळे प्रत्यक्ष परिस्थितीचा व राजकारणाचा अनुभव त्यांस चांगलाच होता. धनाजी व चंद्रसेन जाधव, कान्होजी आंगरे, दमाजी थोरात, निजाम, सय्यद बंधु, इत्यादि लोकांच्यासंबधीची माहिती आणि त्यांतील डावपेच बाजीरावच जाणीत होता. लेखन, वाचन, हिशेब, घोड्यावर बसणें, कसरत, भाल्याची फेक या तत्कालीन शिक्षणांत तो तरबेज होता. महत्त्वाकांक्षा, शौर्य व धाडस हे गुण तर त्याच्या अंगीं उपजतच होते.

"नानाविध संकटें, व आणीबाणीचे प्रसंग त्यास अनुभवावे लागल्यामुळें त्याचें शरीर व मन काटक व बलसमृद्ध बनलें होतें... बाळाजीच्या मृत्यूनंतर राज्याचा प्रपंच पुढें कोण चालवील, आपुलकीच्या भावनेने आपणांशी अनुरक्त राहून राज्याचा वाढणारा पसारा कोण सांभाळील, स्वार्थी व आपमतलबी सरदारांना आळा कोण घालील, ही चिंता शाहूस उत्पन्न झाली." पेशवाईची वस्त्रें कोणास द्यावीं हा प्रश्न निर्माण झाला. "नंतर वस्त्रांचे बोलणे लागलें. तें काळीं बाजीरावसाहेब बहुत उद्दाम प्रकृतीचे, अवघा वेळ शिपाईगिरींत मग्न, राज्यभार चालवावयास सबुरी असावी तो भाव नव्हता. यामुळे या पदाचे उपयोगीं नाहीत. अशी राजश्री यांसी बहुतांनीं मसलत दिली. सर्वांचे ऐकून घेऊन सर्वांस एक उत्तर दिले की, बाळाजी विश्वनाथ यांनीं या राज्यात जीवादारभ्य श्रमसाहस करून पुढें सुख भोगिले नाहीं. याजकरितां यांस तूर्त वस्त्रे देतो. याचे दैवी असल्यास श्रीशंभु कृपा करील; उपयोगी नाहीं असें दिसल्यास पुढे विचार होईल. अशी श्री देवाची प्रार्थना करून महाराजांनीं बाजीरावसाहेबांसी वस्त्रें दिली." याच प्रसंगीं चिमणाजी बल्लाळास पंडित किताब, दमाजी थोरातास सरंजाम व पुरंदरे यास मुतालिकाचीं वस्त्रे मिळालीं.

—१८ एप्रिल १७२०

## चैत्र व. ९ (१) राणा संग्रामसिंहाचा जन्म !

शके १३०४ च्या चैत्र व. ९ रोजी मेवाडचा महापराक्रमी राणा संग्रामसिंह ऊर्फ संग याचा जन्म झाला.

संग्रामसिंह हा रायमलचा पुत्र. भावाभावांच्या कलहामुळे पूर्वायुष्यांत संग्रामसिंह अज्ञातवासांत राहिला. सैन्याचा सेनापति होण्याची ज्याची योग्यता तो संग गुराखी बनला. " रणांगणावर शत्रूचा रांधा करण्याचे ज्याचें काम तो राणा संग भाकरी भाजूं लागला." श्रीनगरच्या राव करमचंदाकडे नोकरीस राहून तो सैन्यांतील शिपाई बनला. यथावकाश बंधूंचा नायनाट झाल्यावर बाप राज्याच्या विवचनेत असता संग चितोडास आला आणि थोड्याच दिवसांत तो चितोडचा राजा बनला! या वेळी मेवाडभूमि यवनांकडून घेरली गेली होती. दिल्ली, माळवा, गुजराथ, सिंध, पंजाब या प्रांतांतून आपले आसन स्थिर करून मुसलमानी सत्ता चितोडवर डोळा ठेवून संधीची वाट पाहत होती. परंतु राणा संग्रामसिंहाने त्या सर्वांना एकदम तोंड देऊन चितोडचे वैभव कायम राखले. ऐशीं हजार सेना जमवून संगाने मेवाडचे रक्षण केले. दिल्लीच्या इब्राहीम लोदीचा त्याने पराभव केला. याच वेळीं संग लुळापांगळा झाला. ऐंशी जखमांची वीरभूषणे त्याच्या कणखर देहावर शोभून दिसत होतीं. एका डोळयाने आंधळा, एका हाताने थोटा, एका पायाने लंगडा, राणा रणांगणावर तेजस्वितेने तळपत असे. रणथंभोरसारखा अजिंक्य किल्ला त्याने जिंकल्यामुळे त्याची दहशत सर्वत्र बसली. त्याच्या आयुष्यांतील क्रान्तिकारक व घनघोर असा संग्राम दिल्लीचा बादशहा बाबर याच्याशीं झाला. या युद्धांत राणा घायाळ झाला. चितोडचे रक्षण आपल्या हातून झाले नाहीं म्हणून राणा दुःखाने विव्हळत असतां कोणा अधमानें त्याच्यावर विषप्रयोग केला. त्याचा प्राण घेण्याचे सामर्थ्य कोणाच्याहि तरवारींत उरलें नव्हते म्हणून जणु त्याच्यावर हा प्रसंग आला. यांतच राण्याचा अंत झाला.

राणा संग्रामसिंह मजबूत, धिप्पाड, गौरवर्ण, तेजस्वी, कृतज्ञ, बुद्धिमान आणि न्यायी असा होता. खुद्द बाबरानेहि त्याचे स्तुति-स्तोत्र गाइले आहे !

—१२ एप्रिल १३८२

## चैत्र व. ९ ( २ ) मुरारबाजीचा अद्भुत पराक्रम !

शके १५८७ च्या चैत्र व. ९ रोजी पुरंदर किल्ल्यावर दिलेरखानाशी लढतांना अद्भुत पराक्रम करताकरता प्रख्यात वीर मुरारबाजी धारातीर्थी पतन पावला !

चंद्रराव मोरे याच्या पथकांत बाजी मुरार नोकरीस होता. याचा मुलगा मुरारबाजी. याचा जन्म शके १५३८ मध्ये झाला. शिवरायांनी मोरे यांच्यावर जेव्हा स्वारी केली तेव्हा मुरारबाजीचा पराक्रम पाहून शिवाजीने त्याला आपल्याच पदरीं ठेवून घेतले; आणि त्यास पुरंदरची किल्लेदारी दिली. दरम्यान दिल्लीहून शिवाजीचा पाडाव करण्यास आलेल्या दिलेरखानाने शके १५८७ च्या चैत्र व. ९ रोजी पुरंदरला वेढा दिला. मुरारबाजीने त्यांना दाणावैरण मिळू न देण्याची व्यवस्था करून त्यांचा दारूगोळा पेटवून दिला. मोगलांनी मोठ्या निकराने खालचा कोट काबीज केला; आणि त्यानंतर मोगल सेना गाफिल राहिली तेव्हा मराठ्यांनी वरून गोळ्यांचा वर्षाव सुरू केल्याबरोबर शत्रुसैन्याची दाणादाण उडाली. मोगल–मराठे याचे तुंबळ युद्ध झाले. खुद्द मुरार तर तरवार गाजवीत दिलेरखानाच्या तंबूपर्यंत आला तेव्हां खानासहि आश्चर्य वाटले; आणि अत्यंत त्वेषाने दिलेरखानाने मराठ्याच्यावर हल्ला केला. कित्येक मराठे वीर जखमी झाले, कित्येक मरण पावले. लढता लढता मुरारची ढाल तुटली, तेव्हा हातास शेला गुंडाळून मुरारबाजी तिच्यावर शत्रूचे वार झेलू लागला. खानाच्या व त्याच्या झटापटीत खानाने सोडलेला एक बाण मुरारजीस एकाएकी लागला व त्याचे शिर उडाले! मराठ्याचा श्रेष्ठ वीर, शिवरायांचा विश्वासू योद्धा याप्रमाणे गतप्राण झाला. मुरारबाजीचे शव मोगलाच्या हातीं लागूं न देता मराठ्यांनी ते शिवरायांकडे रायगडावर पाठविले. शिवाजीस अतोनात दुःख झाले. मुरारबाजी पडला तरी मराठ्यांनी मोगलास किल्ल्यावर येऊ दिले नाही. "एक मुरारबाजी पडला म्हणून काय झाले, आम्हीहि तसेच लढूं." असा त्यांचा निश्चय होता. त्याच्या मृत्यूच्या दुसऱ्याच दिवशी शिवाजीमहाराज पुरंदर किल्ल्यावर आले.

— ३० मार्च १६६५

## चैत्र व. १० " औरंगजेबास जिंकून राज्य रक्षावें ! "

शके १६११ च्या चैत्र व. १० रोजीं झुल्फिकारखानानें रायगडास वेढा दिला असतां राजाराम रायगडावरून प्रतापगडास गेला.

संभाजीनंतर राजाराम गादीवर आला. कांहीं दिवसांनीं राजारामास पकडण्यासाठीं मोंगलांनीं रायगड राजधानीसच वेढा दिला. रायगडावरील लोकांच्यावर मोठा कठीण प्रसंग आला. त्या वेळी सर्व मुत्सद्दी व सरदार विचारविनिमय करूं लागले. " खजिन्यांत शिल्लक नाही, पागा व फौज सर्व मोडले, किल्ले बेसरंजाम झाले, पूर्वीची अनुभवी माणसे मरून गेली. मोगलाच्या निरनिराळ्या फौजा मराठी राज्यांत सर्वत्र घुसून नाश करूं लागल्या, अशा स्थितींत राज्य राखण्यासंबंधानें मुत्सद्द्यांची बहुतेक निराशाच झाली. शत्रूशी टक्कर देणे शक्य नव्हते. " राजारामास पुढे करून राज्य वांचवावे असा विचार झाला. तो राजपत्नी येसूबाई हिला पसंत पडला. तिने सांगितले, " तुम्हीं सर्व पराक्रमी सरदारांनी एकविचारे चालून राजारामाने त्यांचे बायकांसुद्धां बाहेर पडावें. आम्हांस मुलांस घेऊन राहण्यास योग्य जागा रायगडासारखी नाहीं. तुम्ही सर्व बाहेर पडल्यावर शत्रु तुमचे अंगावर जातील. तुमचा सर्वांचा जमाव एके ठिकाणीं पोक्त झाला म्हणजे आम्हांस तिकडे काढून न्यावे. " येसूबाईची स्वार्थ-निरपेक्ष मसलत सर्वांना पसंत पडली. येसूबाईला एकटे टाकण्याचे जिवावर आले तरी प्रसंग ओळखून राजाराम बोलला, " राज्याचे अधिकारी शिवाजीराजे पूर्वीचे तेच हे ऐसे लक्ष ठेवून, आम्हीं कारभारी, आमचे आज्ञेत राहून, पूर्वीहून विशेष पराक्रम करून, औरंगजेबास जिंकून राज्य रक्षावे. याविषयी सर्वांची शपथाप्रमाणे व्हावीं. " याप्रमाणें सर्वांच्या शपथा आणि एकवाक्यता झाल्यानंतर चैत्र व. १० रोजीं राजाराम रायगडावरून प्रतापगडास गेला. त्याचेबरोबरच रामचंद्रपंत अमात्य, प्रल्हाद निराजी, शंकराजी मल्हार, सचिव हेहि बाहेर पडले आणि त्यांनीं फौजेच्या जमवाजमवीस सुरुवात केली; आणि सर्वत्र लक्ष देऊन जसा प्रसंग येईल त्याप्रमाणे वागावें, असे सर्वांनीं ठरविले. पुढे प्रतापगडासहि शत्रूनें वेढा दिल्यावर राजारामास पन्हाळगडावर जावें लागलें.

—५ एप्रिल १६८९

## चैत्र व. ११ विठोबाआण्णांचें निधन !

शके १७९५ च्या चैत्र व. ११ रोजी महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध कवि, प्रवचनकार व ग्रंथकार विठोबाआण्णा दप्तरदार निधन पावले !

मोंगलाईतील बेदर गावचे हे घराणे. यांचे आजे बाळाजीपंत यांना दप्तरदारीची सनद मिळाली आणि हे दप्तरदार झाले. 'सुश्लोकलाघव' हा आण्णांचा प्रसिद्ध ग्रंथ. याच्या कवितेंत रसिकता, विद्वत्ता, प्रेम, भक्ति, कोटिबाजपणा, इत्यादि गुण असल्यामुळे ती रसिकांना आल्हादकारक वाटते. यांचे संस्कृत ग्रंथहि प्रसिद्ध आहेत. आण्णा मोठे रामभक्त होते. उत्तरायुष्यांत यांना अर्धांगवायूचा रोग जडला. "रात्रदिवस रामनाम, रामाचे ध्यान व रामाचे भजन, असे एक वर्ष गेले. शके १७९५ ची रामनवमी आण्णानीं उत्साहाने साजरी केली. वद्य एकादशीच्या दिवशीं प्रातःकालीच स्नानसंध्या, पूजा, इत्यादि नित्यकर्मे आटोपून क्षीरीचा नैवद्य श्रीरामचंद्रास समर्पण केला. नंतर 'अपराधस्तोत्र' म्हणून तीर्थ-तुलसीपत्राचा स्वीकार केला. व अतिशय तृषा लागली होती म्हणून थोडी क्षीर सेवन केली व उदकप्राशनापूर्वी 'श्रीराम' असा मोठ्याने नामघोष करून उदक मुखांत घातले. झाले, संपले. त्याचे पंचप्राण श्रीरामनामाबरोबरच रामांत विलीन झाले."

संस्कृत आणि मराठी या दोनहि भाषांचा आण्णांचा व्यासंग मोठा जबर होता. "मोरोपंतांच्या मागे जुन्या पद्धतीने कविता करणारे जे कवि होऊन गेले, त्यांत विद्वत्तेने, सदाचरणाने, व काव्यगुणांनीं युक्त असा कवि विठोबाआण्णांसारखा दुसरा झाला नाहीं.... आण्णांची कीर्तनशैलीहि अत्यंत चित्तवेधक होती. अगाध विद्वत्ता, प्रासादिक कवित्व, अप्रतिम रसिकता व सरस वक्तृत्व, इत्यादि गुणांमुळे त्यांच्या कीर्तनास मोठा रंग येत असे."

'विधवाविवाह सशास्त्र कीं अशास्त्र ?' या शंकराचार्यांच्यापुढें झालेल्या वादांत यांनीं प्रामुख्याने भाग घेऊन त्याकरितां श्रुतिस्मृतींतील वचनांनीं युक्त असा 'विवाहतत्त्व' नावाचा ग्रंथ दप्तरदार यांनीं लिहिला. 'शिवस्तुति', 'हेतुरामायण', 'प्रयोगलाघव', इत्यादि त्यांचे संस्कृत ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

—२३ एप्रिल १८७३

## चैत्र व. १२ (१) कविवर्य रवींद्रांचा जन्म!

शके १७८३ च्या चैत्र व. १२ रोजीं आशियाचे कविसम्राट् डॉ. रवींद्रनाथ टागोर यांचा जन्म झाला.

वास्तविक पाहतां टागोरांचे घराणे श्रेष्ठ, विद्यासंपन्न आणि कुलीन असेच असले तरी तत्कालीन सनातनी लोक त्याला हलक्या जातींतील समजत असत. या घराण्यांतील पूर्वजांनीं इस्लामी कारकीर्दींत प्रधानकी बजाविली असल्यामुळें टागोरांना 'पिरली' असेंहि नांव प्राप्त झाले होते. सनातनी लोकांकडून बहिष्कृत झालेले हे घराणे मूळचे बानर्जी म्हणून प्रसिद्ध होते. रवींद्रनाथांच्या आजोबांचे नांव द्वारकानाथ टागोर. यांचे पुत्र म्हणजे प्रसिद्ध महर्षि देवेंद्रनाथ टागोर. त्यांचे चारित्र्य मोठे उदात्त व उज्ज्वल असून त्यांची तपस्या श्रेष्ठ प्रकारची होती. राममोहन रॉय यांनीं स्थापन केलेल्या ब्राह्मसमाजाचे वर्धन देवेन्द्रांनीच केले. त्यांच्या घरांत लक्ष्मी-सरस्वती एकत्रित नांदत होत्या. याच संपन्न घराण्यांत चैत्र व. १२ या दिवशीं रवींद्रबाबूंचा जन्म झाला. रवींद्रांचे थोरले बंधु द्विजेंद्रनाथ हे तत्त्वज्ञानी म्हणून प्रसिद्ध होते. दुसरे बंधु ज्योतिरिंद्र हे उत्कृष्ट चित्रकार होते. तिसरा भाऊ 'सिव्हिल सर्व्हिस'ची परीक्षा उत्तीर्ण झालेला पहिला 'हिंदी गृहस्थ' होता. याप्रमाणे टागोरांचे कुटुंब विद्या, शास्त्र, कला यांचे माहेरघरच होते. रवींद्रांच्या जन्मानंतर थोडयाच दिवसांत त्यांच्या आईचा मृत्यु झाला. वडिलांचेहि फारसे लक्ष रवींद्रांवर नसल्याने त्यांचे पालनपोषण नोकर-माणसांकडूनच झाले. त्यांच्या वडिलांना प्रवासाचा फार नाद होता; अनेक वेळी रवींद्रांनीं त्यांच्याबरोबर प्रवास करून सृष्टिसौंदर्याची माधुरी चाखली होती. वयाच्या पंधराव्या वर्षापासून रवींद्रनाथ गद्य व पद्य लिहूं लागले होते. विसाव्या वर्षीं यांना एक गूढ असा साक्षात्कार झाला.—"एका सकाळीं उगवत्या सूर्याकडे पाहत असतांना माझ्या डोळ्यांवरून एक आच्छादन दूर झाले. एकावर एक येणाऱ्या प्रकाशकिरणांच्या लाटांनी जग भरून गेलें. त्यामुळे माझ्या मनांतील उद्विग्नता व निराशा यांचा नाश झाला, आणि मला जग पूर्ववत् दिसूं लागले" अशी त्यांची साक्ष आहे.

—६ मे १८६१

## चैत्र व. १२ ( २ ) मोतिलाल नेहरूंचा जन्म !

शके १७८३ च्या चैत्र व. १२ रोजीं भारतांतील प्रसिद्ध राज्यघटनाशास्त्रज्ञ, कायदेपंडित, राजकारणी मुत्सद्दी, व वादविवादपटु पंडित मोतिलाल नेहरू यांचा जन्म झाला.

पंडितजींचे मूळचे घराणें काश्मीरकडील, परंतु अनेक पिढ्यांपासून त्यांचें वास्तव्य अलाहाबादेस झाले होते. मोतिलाल नेहरूंनी वकिली सुरू केल्यावर त्यांची प्रसिद्धि सर्वत्र झाली. थोड्याच अवधींत महात्मा गांधींच्या राजकारणानें यांना आकर्षित केले, व त्यानंतर त्यांच्या राजकारणाला चढाईचे रूप येऊन अमृतसर येथलि राष्ट्रीय सभेचे ते अध्यक्षहि झाले. पुढे असहकारितेच्या चळवळींत सबंध घराणेंच सामील झाले. त्यांनी स्वराज्य पक्ष काढून कायदेमंडळाकडे तोंड फिरविले, आणि अन्तर्गत अडवणुकीचे धोरण स्वीकारले. दिल्लीच्या मध्यवर्ती कायदेमंडळांत गेल्यानंतर त्यांच्या बुद्धिमत्तेला व ज्ञानाला योग्य ते स्थान प्राप्त झाले आणि आपल्या वादविवादकौशल्याने सरकारला यांनी अगदीं जेरीस आणले. "यांनी पायांनी घातलेली गांठ सरकारला हातानेंहि उकलू नये" अशी स्थिति निर्माण झाली.

"पंडित मोतिलाल नेहरू यांच्यांत एक प्रकारचे व्यक्तिमत्त्व व राजबिंडेपणा होता. जातील तेथें ते भव्य व प्रमुख व्यक्ति बनत. सौम्यता व पडते घेणे हे त्यांच्या स्वभावांतच नव्हते. म्यूझियममध्यें दिसून येणाऱ्या रोमन बादशहाच्या पुतळ्याप्रमाणे यांच्या चेहऱ्यावर एक प्रकारचा बादशाही करारीपणा दिसे."

कायद्याच्या चौकटींत बसून मोतिलाल वादविवाद करू लागले म्हणजे त्याच्या वक्तृत्वाला विशेष जोर चढे. विनोद, वक्रोक्ति, कल्पना, विचार, स्वाभिमान, देशप्रेम व हजरजबाबीपणा, या गुणसमुच्चयाने त्यांचे वक्तृत्व विशेष परिणामकारक वठत असे. गांधी आणि मोतिलाल यांच्यांत मूलतः मतभेद असूनहि परस्परांचा एकमेकांवर पूर्ण विश्वास होता. स्वतंत्र भारताचे पहिले मुख्य प्रधान जवाहरलाल नेहरू हे याचेच पुत्र.

— ६ मे १८६१

## चैत्र व. १३ (१) "तो गोरा कुंभार हरिभक्त !"

शके १२३९ च्या चैत्र व. १३ रोजीं प्रसिद्ध भगवद्भक्त गोरा कुंभार यांनीं समाधि घेतली.

ज्ञानेश्वरकालीन संतमंडळांत गोरा कुंभार हे वयाने व ज्ञानाने श्रेष्ठ असल्यामुळें त्याना सर्व संत 'काका' म्हणून संबोधीत असत. हे तेरढोकी येथील रहिवासी असून वैराग्य व भक्ति या बाबतींत फार थोर होते. मडकी घडविण्यासाठी माती तुडवून प्रेमाच्या भरांत परमेश्वराचे नाम घेत आनंदानें डुलत राहावे हा यांचा क्रम होता. या भजनानंदांत रागते पोर पायाखालीं तुडविलें गेलें याचेंहि भान गोरोबाकाकांना एकदां राहिले नाही. गोरोबा मोठे करारी असून उत्तम संतपरीक्षक होते. नामदेवाच्या मस्तकावर थापटणे मारून त्यांना कच्चा घट म्हणून यांनींच ठरविले. विठ्ठलाच्या भक्तिप्रेमात सदैव गुंतून राहिलेले गोरोबा रामी आणि संती या आपल्या स्त्रियाबाबतहि विरक्तच होते. "विठ्ठलाचे नाम स्मरे सर्व काळ । नेत्री वाहे जल सद्गतींत ॥ कुल्लाळाचे वंशी जन्मले शरीर। तो गोराकुंभार हरिभक्त ॥" असा उल्लेख त्यांच्यासंबंधी सांपडतो. गोरोबांची अभंगरचना थोडकीच असली तरी तींत त्यांच्या वैराग्यज्ञानाची व सगुण भक्तीची खूण पटते. वेदांतपरिभाषेतील शब्द व अनुभवाच्या खुणा त्यांत भरपूर आहेत :—

"केशवाचे भेटी लागलेंसे पिसे। विसरलो कैसे देहभावा ॥
जाली झडपणी जाली झडपणी। संचरले मनीं आदिरूप ॥
न लिपेचि कर्मी न लिपेचि धर्मी। न लिपे षड्‌र्मी पुण्यपापा ॥
म्हणे गोरा कुंभार सहजी जीवन्मुक्त । सुखरूप अद्वैत नामदेवा ॥

अशा प्रकारची गोरोबांची वाणी होती. त्यांच्या भक्तिज्ञानाबद्दल सर्व संतांना मोठा आदर होता. कविवर्य मोरोपंतांनी गोरोबासंबंधीं म्हटले आहे :—

"सद्गुरु अनुग्रहाविण हरिला तो कठिण सर्वथा पटणे ।
गोरा संत परीक्षी मस्तकि हाणूनि सर्व थापटणें ॥"

—१० एप्रिल १३१७

## चैत्र व. १३ ( २ ) "मुक्ति-नवरिला हो वरिलें!"

शके १८२० च्या चैत्र व. १३ रोजीं पुण्याचे जुलमी प्लेग-अधिकारी रँड याचा खून करणारे दामोदर हरि चापेकर हे फांशीं गेले!

हिंदुस्थानांत पहिला प्लेग शके १८९८ मध्ये आला आणि याच वर्षी सर्वत्र दुष्काळानेंहि कहर उडविला. पुण्याचे प्लेग-अधिकारी मि. रँड हे होते. या लष्करी लोकांपासून पुणेकरांना अतोनात जाच सहन करावा लागला. सर्वत्र असंतोष माजला. तेव्हां या असंतोषांतून चापेकर बंधूंनीं एक धाडसी कृत्य केले. राणीच्या राज्यारोहणाची 'डायमंड ज्युबिली' ज्या दिवशीं होती त्याच दिवशीं गणेशखिंडीच्या रस्त्यावर रँड व आयर्स्ट या दोघां इंग्रज अधिकाऱ्यांचे चापेकर बंधूंनीं खून केले. दामोदर हरि, बाळकृष्ण हरि, वासुदेव हरि हे तीन सख्खे बंधु असून तीं एका कीर्तनकाराचीं मुले होतीं. ब्राह्मण म्हणून त्यांना लष्करांत जाण्याची बंदी झाली होती.

रँडचा खून झाल्याबरोबर सर्वत्र वातावरण तंग झाले. चापेकराना पकडण्याच्या कामीं द्रविडबंधूंचे साहाय्य झाले. खटला सुरू झाला. मुंबई येथील प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेट मि. हॅमिल्टन यांच्यापुढे दामोदरपंतांनीं विस्तृत जबानी दिली. दोघां बंधूंना फांशीची शिक्षा झाली. कांहीं दिवस येरवड्यांत काढल्यानंतर चैत्र व. १३ रोजी दामोदरपंत फांशी गेले. फांशी जातांना त्याच वेळी तुरुंगांत असणाऱ्या टिळकांची गीता दामोदरपंतांनीं हातांत ठेवली होती. चापेकर फांसावर गेले त्या वेळचे अलंकारयुक्त वर्णन स्वा. वीर सावरकर यांनीं असे केले आहे.

"न्यायाधिश हा जोशी उत्तम उदय मुहूर्तो योग्य गणी।
सत्य–देशहित वऱ्हाड जमले कीर्ति नीति ह्या वऱ्हाडणी।
टिळक गजानन नमस्कारिला फांस बोहले मग पुरले।
स्मरले गीतामंत्र दामुनें मुक्ति-नवरिला हो वरिलें।
परी अहाहा! मायावी ही नवरी वर पळवील कुठे।
कुठे हरपलें वऱ्हाड सारे; अंगाला बहु कंप सुटे।"

—१८ एप्रिल १८९८

## चैत्र व. १४ "नीळ कवच घातलें श्रीरामें"!

शके १६०० च्या चैत्र व. १४ रोजी समर्थ रामदासस्वामींची "लाडकी कन्या" आणि ज्ञानसंपन्न विदुषी वेणाबाई हिचे निधन झाले.

शके १५४३ च्या आसपास वेणाबाईचा जन्म कोल्हापूर येथे झाला. लहानपणींच लग्न होऊन वैधव्य आल्यामुळे तिची मूळची शांतवृत्ति अधिकच निवृत्तिपर बनली. गीता, एकनाथी भागवत वगैरेंचे वाचन ती करू लागली. रामदासस्वामींची स्वारी घरी भिक्षेस आली असतां त्यांच्यावर वेणाबाईची भक्ति जडली. 'देह माझे मन माझे। सर्व नेले गुरुराजे।–' अशी तिची स्थिति होऊन 'तैसी मूर्ति दृष्टि पडो। तैशा पायीं वृत्ति जडो।' अशा भावनेनें ती फुलून गेली. मिरज येथे नित्य होणारी रामदासांची कीर्तने ऐकून वेणाबाईनें त्यांचा उपदेश व अनुग्रह घेतला. या तिच्या कृत्यामुळे तिला बरीच लोकनिंदा सहन करावी लागली. घरांतील माणसांनाहि तिचे हे करणे न आवडून त्यांनी तिला 'कराड प्रातीचे विष महादारुण' दिले असे म्हणतात. समर्थांच्या कृपेने त्याची बाधा झाली नाही. मूळची गौरवर्ण वेणाबाई विषबाधेमुळे काळीनिळी झालेली पाहून समर्थ बोलले–

"फिरावे लागते अरण्यांत। सोसावे लागते उष्णशीत।
नाजूकपणाचे नव्हे हे कृत्य। नीळ कवच घातले श्रीरामे॥"

यानंतर वेणाबाई रामदासस्वामींच्याच सान्निध्यांत राहूं लागली. तिचा अधिकार पाहून शके १५७७ मध्ये मिरजला स्वामींनी तिला एक मठ स्थापन करून दिला. रामदासस्वामींच्या मठांत असतांना तिच्याकडे उपाहाराचे काम असे. समर्थांच्या चरणींच समाधि व्हावी अशी इच्छा बाईच्या मनांत तीव्र झाली. वेणाबाई कीर्तन उत्तम करीत असे. "चैत्र व. १४ रोजीं सीतास्वयंवरावर कथा चालूं होती. श्रोत्यांची दाटी होऊं लागली. कथा संपल्यावर वेणाबाईने समर्थांच्या पायांवर डोके ठेवून तेथेंच प्राण सोडला." सज्जनगडावर हिची समाधि आहे. वेणाबाईने लिहिलेलें 'सीतास्वयंवर' हे काव्य मार्दव व सहृदयता या दृष्टीने मराठीत वैशिष्ट्यपूर्ण असे आहे. याखेरीज 'कौल', 'रामगुहसंवाद', इ. प्रकरणेंहि सरस आहेत.

—१० एप्रिल १६७८

## चैत्र व. ३० (१) सतीच्या अश्रूंचें मोल !

चैत्र व. ३० या दिवशीं राम-रावण युद्ध समाप्त होऊन लंकेचा बलाढ्य व दुष्ट राजा रावण मारला गेला.

मरीन वा मारीन या निश्चयाने रावण पुन्हा रणांगणावर आला. रामावर बाणांचा वर्षाव सुरू केला. राम–रावणांचे द्वंद्व–युद्ध सुरू झाले. मातलीने दिलेल्या रथावर रामचंद्र आरूढ झाले. अनेक अस्त्रांचे प्रयोग एकमेकानी एकमेकांवर केले. शेवटीं आपल्या एका बाणाने रामानें रावणाचे शिर उडविले. परतु, चमत्कार असा की, रावणास दुसरें शिर उत्पन्न झाले. असे शंभर वेळां झाल्यावर अगस्त्य ऋषीच्या सांगण्यावरून रामाने सूर्याचे स्तवन केले. आणि ब्रह्मदेवाने त्रैलोक्याच्या जयासाठी केलेला बाण सज्ज केला. त्या बाणाच्या पिसाऱ्यांत वायुतत्त्व होते. आणि त्याच्या फाळांत अग्नि व सूर्य यांचे तेज भरले होते. असा दिव्य बाण श्रीरामचंद्रांनी रावणाच्या वक्षःस्थलावर मारला. तेव्हां तो बाण त्याच्या हृदयांतून निघून जमिनींत घुसला. रावण गतप्राण होऊन रथांतून धाडकन् खालीं आला.

बिभीषणास बंधुनिधनाचें भयकर दुःख झाले, पण बिभीषणाचे सांत्वन करतांना रामाच्या मुखांतून भारतीय सस्कृति बोलली : " बिभीषणा, शोक करूं नकोस. क्षत्रिय शूराला असेच मरण यावे. आमचे वैर त्याच्या मरणाबरोबरच संपले. जसा हा तुझा भाऊ तसा माझाहि आहे." एवढ्यांत रावणाच्या स्त्रिया शोक करीत आल्या. त्यांच्या शोकाचा सूर असा होता की, " परम पतिव्रता सीता हिला तुम्ही जबरदस्तीने आणले हेच पातक तुम्हांला घातक झाले. पतिव्रतेचे अश्रु जमिनीवर कधी फुकट पडत नाहीत. "

रावण हा पुलस्त्यपुत्र विश्रव्याचा पुत्र. याच्या आईचे नांव केशिनी. गोकर्ण क्षेत्रांत याने दहा हजार वर्षे तपश्चर्या केली होती. शंकराकडून अवध्यत्वाचा वर घेतल्यानंतर याने अनेक जुल्म करण्यास सुरुवात केली. इंद्रादि देवांना त्रास दिला. वेदवतीवर जबरी केली. एकदां तर त्याने कैलास पर्वतच आपल्या बाहुबळाने हालविण्यास सुरुवात केली. तेव्हां शंकरांनी त्याला पायाच्या अंगठ्याने दाबून धरले. शेवटी सामगायनानें त्यानें शंकराला प्रसन्न करून घेतलें.

● ● ●

**चैत्र व. ३०** **( २ ) म्हैसूरच्या वाघाचें निधन !**

शके १७२१च्या चैत्र व. ३० रोजी म्हैसूरचा वाघ, हैदरअल्लीचा थोरला मुलगा टिपू सुलतान याचे निधन झाले.

टिपूचा जन्म शके १६७५मध्यें फकिरुन्निसा नांवाच्या सरदारकन्येच्या पोटीं झाला. मराठ्यांशीं झालेल्या अनेक सामन्यांत त्यानें पराक्रम गाजविला आहे. इंग्रजांशींहि त्यानें अनेकवार सामना दिला होता. सुरुवातीपासून फ्रेंचांशीं त्याचें संगनमत असे. हिंदुस्थानवर स्वारी करण्याच्या नेपोलियनच्या महत्त्वाकांक्षेंत टिपूचें साहाय्य होते. त्याचप्रमाणें इराण, तुर्कस्तान वगैरे देशांत वकील पाठवून त्यानें संबंध जोडलेले होते. सतराअठरा वर्षे त्यानें राज्यकारभार केला. एक नवीन धर्म स्थापन करून पैगंबर होण्याची महत्त्वाकांक्षा त्याने धरलेली होती. नवीन कालगणना सुरू करून मापें, वजने, नाणीं यांचीहि व्यवस्था त्यानें नव्यानेच केली. त्याचा राज्यकारभार मोठया शिस्तींत चालला होता. मुलकी व लष्करी सुधारणा त्यांत पुष्कळच झाल्या होत्या. फार्सी, कानडी व उर्दू या भाषा त्यास चांगल्याच अवगत होत्या. संकटाच्या काळीं तो ब्राह्मणांना अनुष्ठानें बसविण्यास सांगे व देवाची प्रार्थना करावयास लावी. कलाकौशल्य व वाङ्मय यांचाहि त्याला मोठा शोक होता. त्याचा ग्रंथसंग्रह बराच मोठा होता. त्याने स्वतःहि दोन ग्रंथ लिहिले होते. एकाचे नांव फर्मान-बनाम-अलीराज व दुसऱ्याचे नांव फतह-उल्मजाहिदीन असे आहे. टिपूचें सिंहासन फार मौल्यवान् व शोभिवंत होतें. त्याच्या आठहि बाजूंस वाघाचीं तोंडे बसविलीं असून त्यांतील दांत व डोळे रत्नांचे होते. वाघ हे टिपूचे आवडते जनावर होते. "विजयी पुरुष हा ईश्वराचा वाघ आहे" असें त्याचें ध्येयवाक्य होतें. टिपूची रत्नजडित तलवारहि 'विंडसर कॅसल'मध्यें पहावयास मिळते. मराठ्यांचा एक जासूद टिपूबद्दल म्हणतो : "रंग गोरा, मध्यम आहे. निळ्या घोड्यावर बसला होता. पागोटें चक्रीदार,... मिशा मध्यम गालावर." शके १७२१ च्या इंग्रजांच्याबरोबर झालेल्या लढाईंत पट्टणच्या वेशींत इंग्रजांना अडवीत असतां डोक्यांत गोळा लागून टिपू ठार झाला.

—४ मे १७९९




श्रीमच्छंकराचार्य. श्रीपरशुराम. गुरु नानक. पहिले बाजीराव.
सवाई माधवराव. चिपळुणकर. शाहूमहाराज. बिपिनचंद्र पाल.

## वैशाख शु. १ ( १ ) "रामाला दुसरा धर्म नाहीं!"

वैशाख शु. १ रोजीं पित्याचे वचन पूर्ण करण्यासाठी प्रभु रामचंद्र चौदा वर्षांचा वनवास भोगण्यासाठीं निघाले.

रामचद्रांच्या विवाहाला बारा वर्षे पूर्ण झाल्यानंतर त्यांस राज्याभिषेक करण्याची तयारी दशरथ राजाने केली. या 'अनर्था'ची बातमी मंथरा दासी-कडून कैकयीस मिळाली. कैकयीची वृत्ति पालटून गेली. दशरथाकडून पूर्वी मिळविलेल्या दोन वरांची तिला स्मृति झाली. मत्सराने भारावून गेलेल्या कैकेयीने दशरथास सांगितले: "माझ्या भरताला आजोळाहून आणून राज्यावर बसवा; आणि रामाला चौदा वर्षे वनवासास पाठवा". दुःखाच्या आवेगाने दशरथ राजास मूर्च्छा आली. कैकेयीने आपला हट्ट सोडला नाहीं. रामाला ही सर्व हकीगत समजली. त्या वेळी रामाने कैकेयीस सांगितले, "मी आनदाने राजाची प्रतिज्ञा पूर्ण करितो आणि आतांच वल्कलें धारण करून वनवासास जातो. मातापितरांची सेवा करणे व त्यांचे वचन पाळणे यांखेरीज रामाला दुसरा धर्म नाहीं." त्यानंतर रामाने आपल्या कौसल्या मातेचे सांत्वन करून तिचा आशीर्वाद घेतला. तिने रामाला सांगितले, "जो धर्म तू एवढ्या निश्चयाने पाळीत आहेस तोच तुझे वनांत रक्षण करो." रामाची हकीगत सीतेला समजली. तिने हट्ट धरला, "आपल्या वनवासाची वांटेकरीण मी आहे. भार्या ही एकटी आपल्या पतीचे भाग्य भोगणारी आहे. मी तुमच्याबरोबर येणार. पुढच्या रस्त्यांतील कांटेकुटे मी आपल्या पायांनी दाबून तुमचा रस्ता साफ करीन. तुमच्या सहवासात मला सारे सुख आहे." शेवटी रामाने होकार दिला, तेव्हां सीतेला अत्यंत आनद झाला. यत्किंचितहि दुःखी न होतां सीतेने आपली सर्व संपत्ति सख्यांना, ब्राह्मणांना व नोकरांना दान करून टाकली. रामाबरोबर येण्यास लक्ष्मणहि सिद्ध झाला. रामानेहि आपली संपत्ति परिजनादिकांना दिली आणि हीं तिघे वल्कले नेसून वाड्याबाहेर पडली. सर्व अयोध्यानगरी शोकसागरांत बुडून गेली! रामाच्या वनवासांत भविष्य-काळाच्या केवढाल्या घटना सांठविल्या होत्या!



## वैशाख शु. १ — ( २ ) रायगडचें स्वातंत्र्य हरपलें !

शके १७४० च्या वैशाख शु. १ रोजीं शेवटच्या बाजीरावाची पत्नी राजधानी रायगड लढवीत असतांना पराभूत झाली.

अठराव्या शतकात बाजीराव-इंग्रज यांच्या अनेक झटापटी होऊन बाजीरावाचा पूर्ण पराभव झाल्यावर बाजीरावाची पत्नी वाराणशीबाई रायगड किल्ल्यावर राहिली होती. या किल्ल्याकडे इंग्रजांचा मोर्चा निघाला. कर्नेल प्रॉथरने ही कामगिरी हातीं घेतली. रायगड किल्ला उंचीला जास्त व चढण्यास अवघड म्हणून तोफा चढविण्यास इंग्रजांना त्रास पडलाच. किल्ल्याचा अधिकारी शेख नांवाचा अरब असून त्याच्या हाताखाली अरबी, सिंधी, मराठे इत्यादि एक हजार शिपाई होते. त्या सर्वांनी कसून विरोध केला. " हे स्वातंत्र्यदेवतेचें माहेरघर आहे, हा सगळ्या किल्ल्यांचा राजा आहे, हा शिवाजीमहाराजांचा किल्ला आहे, रामदासांच्या भगव्या झेंड्याचा आधारस्तंभ आहे, " या भावनेने सर्व जण लढत होते. कर्नेल प्रॉथरनें शेवटचा मारा करण्यापूर्वी वाराणशीबाईंना निरोप पाठविला, " तुम्ही किल्ल्यांतून बाहेर पडून जात असाल तर आम्ही सुरक्षितपणे जाऊं देतों." तें ऐकून बाई किल्लेदाराला म्हणाल्या, " येथे माझ्या सहवासाने माझ्या पोटच्या मुलांप्रमाणे या तुमच्या सगळ्या शिपायांवर माझे मातृप्रेम जडले आहे. या माझ्या मुलाबाळांना टाकून जाऊं ? " बाईंचे हे बोलणे ऐकल्यावर सर्व जण मोठ्या जोमाने लढले. पण उपयोग झाला नाही. शेवटीं वैशाख शु. १ रोजी दक्षिणेकडील गुयरीच्या डोंगरावरून मारागिरी करणाऱ्या तोफेंतून आठ इंची गोळा रायगडावरील दारूच्या कोठींत पडून सर्वत्र भडका उडाला. भूकंप व्हावा तसा रायगड हादरला. " मशिदी आणि महादेवाचीं देवळे यांतून धुराचे लोट निघूं लागले. बुरुजाच्या भिंती धडाधड कोसळूं लागल्या. शिवाजीमहाराजांच्या वेळच्या जुन्या इमारतींचे दगड कोसळून पडूं लागले. फार काय, खुद्द शिवाजीमहाराजांची जी समाधि होती तीहि कोसळून पडणाऱ्या दगडांच्या आणि विटांच्या ढिगाखाली दिसेनाशी झाली. " आणि याच दिवशी सायंकाळीं वाराणशीबाईंच्या सल्ल्याने किल्ला खाली करून देण्याचें किल्लेदाराने कबूल केले.

— ६ मे १८१८

## वैशाख शु. २ प्रतापी वीर परशुराम !

वैशाख शु. २ या दिवशीं महापराक्रमी वीर परशुराम याचा जन्म झाला. दशावतारांतील हा सहावा अवतार होय.

भृगुकुळांतील जमदग्नीचा मुलगा परशुराम. परशुरामानें केलेल्या अद्वितीय पराक्रमामुळें त्याचे नांव विख्यात होऊन राहिले आहे. तो अत्यंत तेजस्वी असून धनुर्विद्येवर त्याची अलोट भक्ति होती. शंकराच्या कृपेमुळें त्याला कधींहि कुंठित न होणारा परशु मिळाला होता. वर्तिकावत् देशाचा राजा चित्ररथ याकडे पाहून रेणुकेचे मन बिथरल्याचा संशय जमदग्नीस आला, तेव्हां तिचा वध करण्यास त्यानें आपल्या चार मुलांना सांगितले. त्यांपैकीं परशुरामानें आपल्या मातेचा वध केला. त्यानंतर पित्याची कृपा संपादन करून रेणुकेस पूर्वीप्रमाणें जिवंतहि केलें. नर्मदेच्या उत्तर तीरावर कार्तवीर्य ऊर्फ सहस्रार्जुन ना नांवाचा पराक्रमी पुरुष दिग्विजय करीत होता. त्याने ब्रह्मनिष्ठ वसिष्ठ ऋषींचा आश्रम जाळून टाकल्यावर त्यांनीं ‘ तुझ्या सहस्र बाहूंचें वन परशुराम तोडून टाकील ’ असा शाप कार्तवीर्यास दिला आणि ही शापवाणी लौकरच खरी ठरली. सहस्रार्जुनानें जमदग्नीच्या आश्रमांतील कामधेनु पळवून नेली. इतकेंच नव्हे तर पुढें त्यानें परशुराम घरीं नसतां वृद्ध जमदग्नीचा एकवीस वेळां वार करून वध केला. परशुरामाच्या संतापानें सीमा ओलांडली.

त्याने प्रतिज्ञा केली : “ क्षत्रियांचा समूळ नाश करीन ” ; आणि चित्तांत सूड व हातांत परशु घेऊन परशुराम घराबाहेर पडला. त्यानें कार्तवीर्याच्या सैन्याची धुळधाण उडविली. परशुरामाने आपल्या कुऱ्हाडीनें त्याचे हजार बाहु खडाखड तोडून टाकले आणि त्याच्या मुलांचाहि पराभव केला. त्यानंतर परशुरामानें एकवीस वेळा क्षत्रियांचा पराभव केला. त्यानें आपली प्रतिज्ञा पूर्ण केली. ब्रह्मविद् ब्राह्मणांना कधीं आपत्काळ प्राप्त झाला तरच मी शस्त्र धारण करीन, असा त्याचा निश्चय होता. सर्व पृथ्वी हस्तगत केली तरी त्याला राज्य करावयाचें नव्हते. त्यानें एक मोठा यज्ञ केला आणि सर्व संपत्ति ब्राह्मणांना दान देऊन परशुराम तापासाप्रमाणे महेंद्र पर्वतावर आश्रम स्थापन करून राहिला.



● ● ●

**वैशाख शु. ३** **( १ ) वसंत-गौरीचा गौरव !**

वैशाख शु. ३ हा दिवस अक्षय्य तृतीया म्हणून प्रसिद्ध आहे. या दिवशीं जें जें पुण्य करावें ते तें अक्षय्य होतें असा समज आहे. याच दिवशीं कृत-युगाचा प्रारंभ होतो. वर्षातील साडेतीन मुहूर्तांपैकीं हा एक आहे.

विष्णुप्रीत्यर्थ हा सण रूढ झाला असावा. पितृस्वरूपी जनार्दनास ब्राह्मणद्वारां उदककुंभदान देण्यांत येतें. वसंतमाधवाची पूजाअर्चा करून वसंत देवतेप्रत्यिर्थ तृषाशमनासाठीं पाण्याच्या कुंभांचें दान देण्याची चाल आहे. हा दिवस वसंतो-त्सवाचा आहे. चैत्र शु. ३ पासून अक्षय्य तृतीयेपर्यंत वसंतगौरीचा उत्सव सर्व देवीच्या देवालयांत चालू असतो. मथुरा, वृंदावन, अयोध्या, काशी, द्वारका वगैरे ठिकाणच्या देवालयांतील उत्सव अत्यंत प्रेक्षणीय होतात. वसंत ऋतु सर्व ऋतूंत अत्यंत आल्हाददायक असतो. " कौमार्यावस्थेंत माहेरीं असलेल्या वसंतगौरी यौवनावस्था प्राप्त होतांच अक्षय्य तृतीयेला श्वशुरगृहीं जातात. " असें म्हणण्याचा भावार्थ हाच कीं, याच सुमारास सृष्टींतील झाडे वैवाहिक स्थितीचा उपभोग घेऊन फलद्रूप होतात. आम्रादिक वृक्षांना लुसलुशीत पालवी व सुंदर फुलें आलेलीं असतात ; आणि वैशाखाच्या आरंभीं त्यांना फळें दृष्टीस पडतात... सृष्टीस यौवन व मातृत्व प्राप्त झालेलें असते "... आणि धर्मशास्त्रानें या दिवसाला सणाचें महत्त्व प्राप्त करून दिले. वैशाखाच्या आरंभीं कडक उन्हाळा भासूं लागतो, त्या वेळीं तान्हेलेल्यांना पाणी देणे हें पुण्यकर्म समजून उदककुंभ देण्याची वहिवाट पडली. दक्षिण भारतांत याच दिवशीं रहदारीच्या रस्त्यांवर पांथस्थांना गार पाणी पिण्यास देण्याची चाल आहे.

अक्षय्य तृतीयेला कांही जण आखाजी किंवा आखेती असेंहि म्हणतात. या दिवसाच्या शुभमुहूर्तावर कोकणांत शेतकरी लोक पेरणी करतात. वसंत-गौरीच्या या उत्सवास चैत्रा गौरी किंवा दोलोत्सव असेंहि नांव आहे. या दिवशीं वसंत-कालास योग्य असे नृत्यगायनादि विधि व वसंतपूजा करण्याची वहिवाट आहे... शास्त्रकारांनीं या तात्त्विक, प्रणयोत्पादक व हर्षदायक कालास देवतेच्या ठिकाणीं मानलें आहे.



## वैशाख शु. ३ (२) गुरु नानकांचा जन्म

शके १३९१ च्या वैशाख शु. ३ रोजीं शीख पंथाचे आद्य संस्थापक गुरु नानक यांचा जन्म लाहोरनजीक तलवंडी गांवीं झाला.

त्यांच्या आईचें नांव तृप्ता असून बापाचें नांव काळू होतें. बाप धान्याचा व्यापार करीत असे. त्यांच्या पत्नीचें नांव सुलक्षणी असें असून तिला जयचंद आणि श्रीचंद असे दोन पुत्र होते. बालपणापासूनच नानकजींची बुद्धि तीव्र असून त्यांनीं हिंदु व मुसलमान धर्मांचे ग्रंथ चांगले वाचले होते. वृत्तींत विरक्तपणा भरलेला असल्यामुळें लौकिक प्रकारच्या शाळेत त्यांचें मन रमलें नाहीं. त्यांच्या बोलण्यांत नेहमीं उच्च प्रकारचे तात्त्विक विचार येत असत. वादविवादांतहि ते फार कुशल बनले. वृत्ति विरागी बनत चालली होती. व्यापारासाठीं बापानें दिलेले पैसे नानकांनीं गोरगरिबांस वांटून टाकले; अर्थातच स्वतःच्या घरांतून त्यांना बाहेर पडावें लागल्यावर ते दौलतखान नांवाच्या सुभेदाराजवळ पंडित या नात्यानें राहिले; आणि थोड्याच दिवसांत आपल्या मालकासच नानकांनीं आपले शिष्य बनविलें. त्यानंतर आपल्या विविष्ट मतप्रचारार्थ त्यांनीं पर्यटन करण्यास सुरुवात केली. असे सांगतात कीं, त्यांनीं हिंदुस्थान, सिलोन, अफगाणिस्तान या ठिकाणीं पायीं प्रवास करून आपलें धर्मकार्य केले. नानकांच्या धर्माचा आधार जातिभेद नसावा, व मूर्तिपूजा करूं नये या दोन तत्त्वांवर मुख्यतः आहे. त्यांच्या धर्मपंथांत हिंदु व मुसलमान या दोघांत भेद नाहीं. प्रत्येकाजवळ हातांत कडे, डोक्यांत कंगवा व जवळ कट्यार ठेवावी असा त्यांचा दंडक होता. नानकांच्या नांवावर प्रसिद्ध असणारा 'ग्रंथसाहेब' नांवाचा ग्रंथ शिखांना अत्यंत प्रिय आहे. नानकांच्या शिकवणीचें सार असें आहेः "परमेश्वर एकच आहे. शुद्ध अंतःकरण ही पहिली महत्त्वाची बाब आहे. सर्व मनुष्यांनीं परमेश्वराची भक्ति केलीच पाहिजे. मागील गुरूंची अथवा साधु-संतांची शिकवण या वेळीं उपयोगी पडणार नाहीं." नानकांनीं पुराणें वाचलीं होतीं, कुराणहि वाचलें होतें, परंतु त्यांत त्यांना परमेश्वर दिसला नाहीं. तेव्हां ते सत्यालाच परमेश्वर मानूं लागले.

—१५ एप्रिल १४६९

## वैशाख शु. ४ "फिरंगी यासहि मार दिला!"

शके १६६१ च्या वैशाख शु. ४ रोजीं, चिमाजी आप्पाच्या सैन्याने वसईवर निकराचा हल्ला चढविला.

शिवकालापासून पश्चिम किनाऱ्यावर पोर्तुगीझांनीं हिंदु लोकांचा फार छळ सुरू केला होता. तेव्हां त्यांचा समाचार घेणें, त्यांच्याशी वारंवार युद्ध खेळणें हें एक मराठ्यांचें कर्तव्यच होऊन बसलें होतें. अनेक प्रकारच्या तक्रारी पेशव्यांकडे व शाहूमहाराज यांच्याकडे येऊं लागल्यावर या कामावर चिमाजी आप्पा यांची नेमणूक झाली. चिमाजी कोंकणांत उतरल्याबरोबर शिंदे, होळकर, बाजी भीवराव, तुकोजी व जिवाजी पवार, पिलाजी जाधव इत्यादि मराठे सरदार एकत्रित होऊन पुढील जोराच्या लढ्याला सिद्ध झाले. वसईचा किल्ला हल्ला चढविण्यास अवघड होता. "वसई बांकी जागा, पश्चिमेकडून समुद्र, दक्षिणेकडे खाडी, पूर्वेकडे चिखल, तिहींकडून किमपि इलाज नाहीं. एक उत्तरेकडून उपाय. तिकडेहि रेती, धर नाहीं." अशा या अवघड जागीं मराठ्यांना प्रथम यश कमी मिळालें. परंतु, शेवटीं चिमाजी आप्पाच्या निर्वाणीच्या शब्दांमुळे सर्व सैनिकांनीं मोठ्या आवेशाने वैशाख शु. ४ या दिवशीं वसईवर हल्ला केला. मराठ्यांचा राष्ट्राभिमान, शौर्य, संघशक्ति इत्यादि गुण या संग्रामांत ठळकपणें दिसून येतात. या वेळीं झालेल्या हल्ल्याचें वर्णन खुद्द चिमाजी आप्पा एका पत्रांत करतात: "सुरुंगास बत्त्या दिल्या. राजश्री राणबाकडील चार सुरुंग उडाले; एक उडावयाचा होता, तोंच लोकांनीं तांतड करून हल्ला केला. तों पांचवा सुरुंग उडाला. तेणेंकरून बहुतकरून दगडांनीं दडपले... लोक जीवित्वाकडे दृष्टि न देतां चालून गेले. फिरंगी यांणी आंतून मेढा घालून बळ धरिले होतें. हल्ला करितांच हुक्के व गरनाळा, दारूचीं मडकीं, राळ, माशांचें तेल, बरखंदाजी ऐसा सीमेपरता मार दिला. परंतु, लोकांनीं मेला तो मेला, जळाला तो जळाला, त्याजवर दृष्टि न देतां ज्या जागीं गेले त्या जागाच कायम राहून फिरंगी यांसहि मार दिला." तीन महिनेपर्यंत निकराचें युद्ध होऊन वसई मराठ्यांच्या ताब्यांत आली आणि चिमाजींचें नांव अजरामर झालें.

—१ मे १७३९

## वैशाख शु. ५ इंग्रजी बावटा रायगडावर !

शके १७४० च्या वैशाख शु. ५ रोजीं इंग्रज-मराठे यांच्यामध्यें तह होऊन रायगड किल्ला इंग्रजांच्या हातीं जाऊन त्यावर युनियन जॅक झळकलें.

वैशाख शु. १ रोजीं बाजीरावपत्नी वाराणशीबाई पराभूत झाल्याच होत्या. दुसऱ्या दिवसापासून तहाची वाटाघाट सुरू झाली. मराठे अद्याप आपला बाणेदारपणा सोडण्यास तयार नव्हते. कोठून तरी मदत येईल, अजून इंग्रजांचा पराभव करूं अशी आशा त्यांना होती. तों पुन्हा इंग्रजांकडून तोफांचा भडिमार सुरू झाला. तेव्हां किल्लेदार शेख अब्दुल्ल हा स्वतः तहाच्या वाटाघाटी करण्यास गडाखालीं आला. निरुपाय होऊन तह ठरला. 'शंभर अरब व ऐंशी मराठे सैनिक यांनीं आपल्या कुटुंबासह रायगड सोडून जावें. आपल्या पांच अनुयायांसह किल्लेदारानें पुण्यास असावें. वाराणशीबाई यांचेबरोबर किल्लेदाराच्या मंडळींपैकीं कोणी नसावा'; इत्यादि कलमें ठरून वैशाख शु. ५ रोजीं कर्नल प्रॉथर वर गेला. किल्ल्याचा दरवाजा ताब्यांत घेऊन त्यानें आंत पाऊल टाकलें तों सर्व किल्ला बेचिराख झालेला त्याच्या दृष्टीस पडला. कित्येक इमारती अजूनहि पेटत होत्या. प्रॉथरनें प्रथम वाराणशीबाईची भेट घेतली. ती बिचारी दुःखानें व निराशेनें चूर होऊन गेली होती. खाजगी मालमत्तेसह तिला पुण्यास जाण्यास परवानगी मिळाली; आणि शेवटीं 'या बाईच्या पावलांबरोबर रायगडाला आणि अखिल महाराष्ट्राला स्वातंत्र्यलक्ष्मी सोडून गेली.' इंग्रजांनीं आपला बावटा किल्ल्यावर रोवला. किल्ल्यांतील पांच लक्ष रोकड नाण्यांच्या रूपानें इंग्रजांच्या हातीं आली; आणि यानंतर रायगडची झालेली दैना काय विचारावी? शके १७४० च्या वेळ्यांत इंग्रजी तोफांनीं सर्व इमारती जळून, मोडून, तोडून टाकल्या होत्या. फक्त कांहीं भिंताडे व एकदोन इमारती उभ्या होत्या. "कित्येक तळीं, हौद जलशून्य झाल्यामुळें अतिशोकानें पाणी आटलेल्या डोळ्यांसारखीं दिसूं लागलीं. नयनमनोहर गंगासागर चिखलानें ओहळून व तळाशीं फुटून भकास दिसत होता. अशा प्रकारें शिवरायांची ही राजधानी इंग्रजांच्या ताब्यांत गेली. महाराष्ट्राच्या या पुण्यक्षेत्रावर परकीय अमल सुरू झाला.

— १० मे १८१८

**वैशाख शु० ६** **( १ ) रामानुजाचार्यांची समाधि !**

शके १०५९ च्या वैशाख शु. ६ रोजीं विशिष्टाद्वैत या मताचे प्रमुख आचार्य श्रीरामानुजाचार्य यांनीं समाधि घेतली.

त्यांचा जन्म तिरुपति येथे असुरी केशव भट्टर यांच्या घरीं झाला. रामानुजांनीं कांजीवरम् येथील यादवप्रकाशांपाशीं अध्ययन केले; परंतु पुढे त्यांचे गुरूशी पटलें नाहीं. प्रथमपासूनच यांचा कल यामुनाचार्यांच्या विशिष्टाद्वैताकडे असल्यामुळें त्यांनीं अलवारांच्या प्रबंधांचें अध्ययन सुरू करून चिंचेच्या झाडाखालीं रामाची भक्ति करण्यास सुरुवात केली. कावेरी तीरावर यामुनाचार्यांच्या अंत्यविधीचा समारंभ हजारों वैष्णव करीत असलेले पाहून त्यांना खेद झाला. यामुनाचार्यांची शेवटची इच्छा ब्रह्मसूत्रावर भाष्य करावें ही होती. ती पूर्ण करण्याची प्रतिज्ञा रामानुजांनीं केली. त्यानंतर त्यांनीं कांचीपूर्ण व महापूर्ण या दोन थोर पुरुषांजवळ अध्ययन केले. रामानुज मनानें मोठे उदार, श्रद्धावान् असून अतिशय बुद्धिमान होते. स्त्रीनें दोनतीन वेळां मनाविरुद्ध वर्तन केल्यामुळें यांनीं संन्यास घेतला! त्यांच्याभोंवतीं कुरेश, दशरथी, गोविंदयति, गोविंदभट्ट, यज्ञमूर्ति, इत्यादि शिष्य गोळा झाले. रामानुजांनीं आपलें तत्त्वज्ञान 'वेदार्थसंग्रह' या ग्रंथांत सांगितलें आहे. उपनिषदांतील तत्त्वज्ञान द्वैतपर आहे असे प्रतिपादन करतांना त्यांनीं शंकराचार्यांवर खूप टीका केली आहे. वेदांतसूत्रांवरील 'भाष्य' हा यांचा प्रमुख ग्रंथ. याशिवाय 'वेदांतसार', 'वेदांतदीप', 'गीताभाष्य' वगैरे ग्रंथ रामानुजांनीं लिहिलेले आहेत. रामानुजांनीं श्रीरंगम्, कुंभकोण, तिरूमंगाई, मलबार, त्रावणकोर, गिरनार, द्वारका, मथुरा, ब्रद्रिनारायण आदि सर्व भरतखंडांतील पवित्र क्षेत्रीं भ्रमण करून आपल्या तत्त्वांचा प्रसार केला. रामानुज श्रेष्ठ प्रकारचे पुरुष होते. "सर्व दर्जाच्या व जातींच्या लोकांना त्यांनीं भक्तिमार्गास लाविलें. अत्यंजांवर सुद्धां त्यांची दयादृष्टि होती. वादी कडक पण मनुष्य प्रेमळ व लोकसंग्रहकर्ता. त्याची कृष्णभक्ति अनुपम होती." रामानुजांचें तत्त्वज्ञान 'अद्वैतामोदः' या ग्रंथांत म. म. वासुदेवशास्त्री अभ्यंकर यांनीं दिले आहे.

— २८ एप्रिल ११३७

## वैशाख शु. ६ (२) 'सुश्लोक' – कर्त्याची समाधि!

शके १६१७ च्या वैशाख शु. ६ रोजीं प्रसिद्ध पंडितकवि वामनपंडित यांनीं भोगांव येथें समाधि घेतली.

वामनपंडित हे ऋग्वेदी, 'वसिष्ठ' गोत्री ब्राह्मण असून विजापूरचे राहणारे. विजापूरचा बादशहा आपणांस बाटविणार ही बातमी कळतांच त्यांनीं विजापूर सोडले व काशी येथे संस्कृत भाषेचा व तत्कालीन शास्त्रांचा अभ्यास केला. विद्वत्ता मिळाली तरी चित्तास समाधान लाभलें नाहीं म्हणून त्यांनीं 'मलयाचला'वर तपश्चर्या केली. तेथें ध्यानमग्न असतां कोणा यतीने जो उपदेश दिला तो वामनपंडितांनीं 'निगमसार' ग्रंथांत सांठविला आहे. यानंतरहि 'कर्मतत्त्व', 'समश्लोकी', 'सिद्धांतविजय', 'अनुभूतिलेश', इत्यादि लहान लहान अध्यात्म-प्रकरणें पंडितांनीं लिहिलीं. परंतु, वामनपंडितांचें सर्व बुद्धिवैभव त्यांच्या 'यथार्थ-दीपिके'त दिसून येतें. सामान्य जनांना वामनपंडित प्रिय वाटतात ते त्यांच्या आख्यानक कवितेमुळें. 'सुश्लोक वामनाचा' म्हणून यांची प्रसिद्धि आहे. 'गजेन्द्र-मोक्ष', 'सीतास्वयंवर', 'कात्यायनी व्रत', 'वनसुधा', 'वेणुसुधा', इत्यादि सुंदर प्रकरणें रसिकांना आजहि रिझवितात. कित्येक ठिकाणीं बीभत्स व शृंगार रस हे आपली पायरी ओलांडून जातात हेंहि खरेंच आहे. जगन्नाथ पंडितांची 'गंगालहरी' व भर्तृहरीचीं 'नीतिशतकें' यांचा उत्कृष्ट मराठी अनुवाद वामनांनीं केला आहे. वामनपंडित हे कोरेगांव (शिगांव) येथून कृष्णाकांठानें तीर्थक्षेत्र पाहत पाहत महाबळेश्वर येथें जात असतांना मार्गांत गुऱ्हेघर येथे समाधिस्थ झाले. पण भोगांवच्या हद्दींत कृष्णेच्या कांठीं यांचें दहन झालें. बरोबर असलेल्या शिष्यानें–महादेवानें–तेथें त्यांची समाधि बांधली. "वामनपंडिताप्रमाणें भक्तीनें ईश्वरपदीं लीन होऊन अद्वैतविचारावर मोठमोठाले ग्रंथ लिहिणारा, अक्षर-गणांच्या वृत्तांनीं सोपी, मधुर व पुष्कळ कविता रचणारा आणि निःस्पृहतेनें केवळ ईश्वरपर वर्णन करणारा ग्रंथकार, कवि आणि साधु त्याच्यामागें आज-पर्यंत झाला नाहीं. वामनपंडितानें महाराष्ट्र भाषेवर व लोकांवर फार उपकार केले आहेत." असा अभिप्राय कै. बा. म. हंस यांनीं दिला आहे.

— ९ एप्रिल १६९५

## वैशाख शु. ७ "ईश्वरें अमृतवृष्टि केली!"

शके १६९६ जयनामसंवत्सराच्या वैशाख शु. ७ रोजीं महाराष्ट्राचे लाडके पेशवे सवाई माधवराव यांचा जन्म झाला.

सवाई माधवरावाच्या जन्माकडे सर्व देशाचे डोळे लागून राहिले होते. महाराष्ट्रांतील शेंकडों देवांना नवस करण्यांत आले होते. त्या वेळची परिस्थितिच तशी होती. नारायणराव पेशव्यांचा वध झाला त्या समयीं हा पेशवा आईच्या उदरांत एक महिन्याच्या गर्भावस्थेंत होता. रघुनाथराव गादीवर येण्याच्या खटपटींत आहे असें पाहून 'बारभाई' कारस्थानास सुरुवात झाली. त्यास यश येणें हें केवळ गंगाबाईच्या प्रसूतीवर–तिला मुलगा होण्यावर–अवलंबून होतें. सुरक्षितपणासाठीं शनिवारवाड्यांतून गंगाबाईस हालविण्याचें काम सखाराम-बापूंनीं केलें. गंगाबाईस त्यांनीं पुरंदर किल्ल्यावर सुरक्षितपणें नेऊन पोचविलें. शेवटी वैशाख शु. ७ रोजीं गंगाबाई प्रसूत होऊन तिला मुलगा झाला. ही बातमी अखिल महाराष्ट्रास कळतांच सर्वत्र आनंदीआनंद झाला. या आनंदाचें वर्णन कोठवर करावें! "फौजेंत वर्तमान पोचतांच निजाम, साबाजी हरिपंत व सर्व सरदार अबालवृद्ध यांस संतोष झाला. सरबत्ती व नौबतखाना सुरू झाला. शर्करा पृथक् पृथक् वांटल्या. नृत्यादि समारंभ, गजर, उत्सव झाले; देवानें कुलदीपक लावला. देव त्यास आयुष्य यथेष्ट करील. सर्वांचें जिवन आहे. आम्हांस आधार बळकट झाला. ईश्वरें अमृतवृष्टि करून वंशवेळी प्रफुल्लित केली. भगवंतास प्रजेचें पालन आणि धर्मसंस्थापना कर्तव्य आहे, हा निःसंदेह झाला. पुत्र झाला हा मोठा लाभ. श्रीपंढरीनाथाने राज्यास धणी दिला. साक्षात् विष्णूनें राज्यरक्षणार्थ अवतार घेतला. हा एवढा हर्ष कोणता आहे! देव सत्याकडे आहे असें पुरते समजलें. सर्व वर्तमान लहानथोरांस, तमाम सरदारांस व राजेरज-वाड्यांस कळलें. इंदुवास सुदिन. विद्यानगरीं एक वेळ सुवर्णवृष्टि झाली, तीच हल्लीं आम्हांवर वारंवार देव करतो. हाच उल्हास आहे. जगदात्मा कृपावंत होऊन कुलदीप उदय केला. त्यास आयुष्यवृद्धि करो. जगन्निवास पुढें उत्तमोत्तम करील. जगन्निवासें प्रजेचें पालन करणार उभे केले."

—१८ एप्रिल १७७४

## वैशाख शु. ८ — मोंगली सत्ता स्थिर झाली !

शके १४४८ च्या वैशाख शु. ८ रोजीं मोंगल साम्राज्याचा संस्थापक जहीरुद्दीन महंमद बाबर यानें दिल्लीच्या इब्राहीमखान लेदीचा पराभव करून मोंगल राजसत्तेचा पाया घातला !

सातआठ वर्षांपूर्वीच बाबरानें हिंदुस्थानावर पहिली स्वारी केली होती. त्यानंतर शके १४४६ मध्यें पंजाबचा सुभेदार दौलतखान यानें दिल्लीच्या सुलतानाविरुद्ध बाबराजवळ मदत मागितली. बाबर संधीची वाटच पाहत होता. तो तत्काळ हिंदुस्थानांत आला आणि पंजाब प्रांत त्यानें ताब्यांत घेतला. हिंदुस्थानांतील गैरव्यवस्था पाहून त्याला साम्राज्य स्थापन करण्याची मनीषा झाली. त्याचे सामर्थ्य मोठें असल्यामुळे दिल्लीचा इब्राहीमखान लोदी त्याच्याशीं लढण्यास असमर्थ होता. दिल्ली दरबारांत अनेक घोटाळे झालेले पाहून बाबरानें दिल्लीवर स्वारी केली. इब्राहीम लोदीजवळ एक लक्ष फौज होती तर बाबराचें सैन्य सारें वीस हजार ! तरी त्याचा प्रत्येक शिपाई कसलेला असून ' मरेन वा मारीन ' या बाण्याचा होता. बाबराचा मुलगा हुमायून हाहि मोठ्या त्वेषानें सिद्ध झाला. आपल्या तोफांचे सातशे गाडे कातड्याच्या दोरखंडांनीं जखडून, त्या ओळी पाठीमागें त्यानें फौज उभी केली. इब्राहीमच्या फौजेस बाबरानें वेढले. त्याच्या तोफखान्यानें शत्रुसैन्याची दाणादाण उडवली. दोन प्रहरपर्यंत घोर संग्राम होऊन लोदीचे पंधरा हजार शिपाई कामास आले. स्वतः लोदीहि ठार झाला. येणेंप्रमाणे दिल्ली काबीज केल्यावर हुमायूननें लागलीच आग्रा शहरहि जिकलें. दिल्लीच्या मशिदींत बाबरच्या नांवाने खुत्बा वाचण्यांत आला. त्याच्या लोकांनीं अगणित लूट मिळविली. एकट्या हुमायुनास तीन लक्ष रुपये रोख व न मोजलेले पुष्कळसें जवाहीर प्राप्त झालें. बाबरानेंहि आपल्या विजयार्थ सर्वांना धन वांटून टाकले. त्यावरून त्याला ' कलंदर ' म्हणजे ' उधळया फकीर ' हें नांव प्राप्त झालें. बाबराचा पाय दिल्लींत रोवला गेला तरी अनेक संकटें त्याच्यापुढें उभीं होतीं. अनेकांशीं त्याला झगडा करावा लागला.

— १९ एप्रिल १५२६

## वैशाख शु. ९ मराठी भाषेचा शिवाजी !

शके १७७२ च्या वैशाख शु. ९ रोजीं अर्वाचीन मराठी वाङ्मयांतील निबंध-प्रवर्तक विष्णुशास्त्री चिपळुणकर यांचा जन्म झाला.

देशाभिमान, निस्पृहता, विद्वत्ता व ग्रंथकर्तृत्व हे शास्त्रीबुवांचे गुण सर्वमान्य झालेले आहेत. न्यू. इं. स्कूल, केसरी, मराठा, चित्रशाळा व किताबखाना, यांवरून त्यांचा कर्तो देशाभिमान व्यक्त होतो. स्वधर्म, स्वदेश, स्वतःचा इतिहास, स्वभाषा-वाङ्मय यांच्याबद्दल आपल्याच सुधारकांत मनस्वी तिटकारा वसत असलेला पाहून शास्त्रीबुवांना वाईट वाटे. समाजातील दोष त्यानी कधींच लपविले नाहींत. 'संपत्तीचा उपयोग,' 'लोकभ्रम' या निबंधांतून त्यांनीं समाजाचें दोषाविष्करण केलें आहे. आपल्या लोकांना–विशेषतः पंडितांना–स्वाभिमानशून्यतेनें घेरलें आहे ही गोष्ट चिपळुणकरांनीं ओळखली. स्वाभिमानशून्यता ही राष्ट्रविध्वंसक राक्षसी आहे असें त्यांचें ठाम मत होतें. हा स्वाभिमान निर्माण करण्यासाठींच त्यांचे सद्गुण व त्यांच्या सत्कृति उपयोगी पडल्या आहेत. त्यांची निबंधमाला सहाच वर्षें चालली, परंतु तिने साऱ्या महाराष्ट्रास मोहिनी घातली. ह. ना. आपटे, शि. म. परांजपे, वि. का. राजवाडे, श्री. कृ. कोल्हटकर, ल. रा. पांगारकर, न. चि. केळकर यांना देशसेवेची व वाङ्मयसेवेची स्फूर्ति निबंधमालेपासून झाली आहे ! अवघ्या बत्तीस वर्षांच्या आयुष्यांत येवढें श्रेय चिपळुणकरांना मिळालें होतें !

याच आठवड्यांत शिवजयंतीचा उत्सव चालू असतो आणि चिपळूणकर "I am the Shivaji of Marathi language" असें म्हणत असत. या उक्तीचें समर्थन आणि स्पष्टीकरण नागपूरचे डॉ. वि. भि. कोलते असें करतात :

होता शिवाजी न, जाती तरी मातृभूमि अविंधांचिया बंधनीं
शेंडी शिरीं राहती ना मुळीं भ्रष्ट होत्या सदा हिंदुच्या नंदिनी !
विष्णूविना पूज्यभाषा मराठी, तशी हाय ! ही कां न आंग्लाळती ?
सौभाग्य होतें न कां नष्ट तीचें, तिची काव्यगंगा न कां भ्रष्टती ?

—२० मे १८५०

## वैशाख शु. १० धर्मसंस्थापक शंकराचार्य !

शके ७१० च्या वैशाख शु. १० रोजीं अवघ्या बत्तीस वर्षांच्या आयुष्यांत आसेतुहिमाचल दिग्विजय करून धर्मसंस्थापना करणारे अद्वितीय पुरुष आद्य श्रीशंकराचार्य यांचा जन्म झाला.

शंकराचार्य हे मलबारमधील एका नंबुद्री ब्राह्मणाच्या कुलांत जन्मले. त्यांच्या आजाचें नांव विद्याधिराज असून ते स्वतः, आचार्यांचे वडील शिवगुरु आणि आई आर्याम्बा असे सर्व जण कालटी येथें राहत असत. हा गांव कोचीन संस्थानांत पूर्णा ऊर्फ पेरियर नदीच्या कांठीं असून त्याच्याभोवती गर्द वृक्षराजि आहे. "पांचव्या वर्षी मुंज, आठव्या वर्षी संपूर्ण वेदाध्ययन, पूर्णा नदींत मगरीनें पाय धरल्याचे निमित्ताने आईकडून संन्यासग्रहणाची परवानगी, दहाव्या वर्षी नर्मदातीरीं ओंकारक्षेत्रीं गुरु गोविंदयतीच्याकडून संन्यासग्रहण, चार वर्षे बदरिकाश्रमीं तपश्चर्या, १६ व्या वर्षी काशीक्षेत्रीं शारीरभाष्याची रचना; माहिष्मती येथें मंडनमिश्रादिकांचा वादविवादांत पराभव, शृंगेरीस शारदा-मठ-स्थापना, भरतखंडभर दिग्विजय, काश्मीरांत सरस्वतीपीठावर आरोहण, शृंगेरी मठावर सुरेश्वराचार्यांची स्थापना, कांची येथें कामाक्षीदेवीची स्थापना व तेथेंच वैशाख शु. १५ ( शके ७४२ ) गुहाप्रवेश" असा आचार्यांचा संक्षिप्त चरित्रक्रम आहे.

भारतांत बुद्ध-जैन धर्मांचा उदय झाल्यापासून उपनिषदांतील ब्रह्मविद्येचा लोप झाला होता. त्या ब्रह्मविद्येचा उद्धार आचार्यांनीं केला. शंकराचार्यांनीं लोकांच्यासाठीं धर्मज्ञानाची पाणपोई घातली हें त्यांचे मोठेंच धर्मकृत्य होतें. दुर्लभ ब्रह्मज्ञान त्यांनीं सुलभ केले. ब्रह्मसूत्रे व भगवद्गीता यांवरील त्यांचीं भाष्यें प्रसिद्ध असून ईश, केन, कठ, प्रश्न, मंडूक, माण्डुक्य, इत्यादि बारा उपनिषदांवरील त्यांच्या भाष्यांमुळें 'आचार्य' ही पदवी सार्थ झाली आहे. त्यांच्या स्तोत्रांतून भक्तीचा जिव्हाळा दिसून येतो. अद्वैत ब्रह्मज्ञान व कोमल भक्ति यांचा मधुर संगम आचार्यांच्या स्तोत्रांतून झालेला आढळतो. त्यांचा अद्वैतबोध रुक्ष व नीरस नाहीं तर तो भक्तीने आर्द्र झालेला आहे. 'ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या जीवो ब्रह्मैव नापरः' या श्लोकार्धांत शंकराचार्यांचें तत्त्वज्ञान भरून राहिलें आहे.

—२० एप्रिल ७८८

## वैशाख शु. ११ मल्हारराव होळकरांचें निधन!

शके १६८८ च्या वैशाख शु. ११ रोजीं इंदूरच्या राज्याचे प्रसिद्ध संस्थापक मल्हारराव होळकर यांचें निधन झालें.

तो धनगर असून नीरा नदीच्या कांठच्या होळ गांवचा राहणारा. बाजीराव पेशवे यांजकडे प्रथम साधारण शिपाई म्हणून हा कामास लागला. आणि पुढें आपल्या कर्तबगारीच्या जोरावर माळव्यांतील चौथाई व सरदेशमुखी गोळा करण्याचें काम यानें आपल्याकडे घेतलें. तिकडे त्यानें चांगलाच पराक्रम केला. बहादुरखान रोहिला व महमदखान बंगश यांचा पराभव केल्यानंतर मल्हाररावाचें वजन उत्तरेंत चांगलेच वाढले. रोहिल्यांचा पुरता मोड करण्याचा विचार मल्हाररावाचा होता. कुंभेरीच्या वेढ्यांत त्याचा पुत्र खंडेराव मारला गेला. त्या वेळीं इरेस पेटून यानें प्रतिज्ञा केली कीं, 'सुरजमल्लाचा शिरच्छेद करीन व कुंभेरीची माती यमुनेत टाकीन, नाहीं तर प्राणत्याग करीन.' उत्तर भारतांतील सर्व राजकारण याच्याच सल्ल्यानें चालत असे. पेशव्यांनीं उत्तरेच्या कारभारांत ढवळाढवळ करणे त्याला खपत नसे. पानपतच्या युद्धांत पेशवे, शिंदे यांच्याशीं त्याचें फारसें जमलें नाहीं. शेवटीं जाटांचे पारिपत्य करण्यासाठीं अलमपुरास आला असतां तो मरण पावला. "दादा व सुभेदार यांच्या भेटी झाल्यानंतर मल्हारजीच्या व श्रीमंतांच्या भेटी करून दिल्या. असें असतां सुभेदाराचे शरीरीं दोन-अडीच मास समाधान नव्हते. जाठांचे पारिपत्याकरितां श्रीमंत सहवर्तमान झांशी प्रांतांत अलमपुरास आल्यावर कायम झाले. दैवी, मानवी उपाय अनुष्ठान व दानधर्म बहुत कांहीं केले. आयुर्मर्यादेकरून गुणास न येतां वैशाख शु. ११ मंगळवारीं पावणेदोन प्रहर दिवसा देवाज्ञा पावले. द्वारकाबाई व बजाबाई यांनीं सहगमन केलें." मल्हाररावांचें वय मृत्युसमयीं ७३ वर्षांचें होतें. "पेशवाईच्या अव्वलीपासून मराठेशाहींतील सर्व घडामोडी व स्थित्यंतरें पाहून त्यांत प्रत्यक्ष भाग घेतलेला अनुभविक जुना सरदार या वेळीं हा एकच होता. मल्हारराव होळकर केवळ शिपाईगिरींतच तरबेज होते असें नव्हे तर त्यांचे अंगीं मसलत, दूरदृष्टि व सावधपणा हे गुणविशेष होते."

—२० मे १७६६

## वैशाख शु. १२ शहाजीविरुद्ध तहनामा !

शके १५५४ च्या वैशाख शु. १२ रोजीं शहाजहान बादशहा व अदिलशहा यांच्यामध्ये शहाजीला पराभूत करण्याबद्दल तह झाला.

सोळाव्या शतकांत शहाजीचें सामर्थ्य वाढीस लागलें होते. मोंगल सत्तेचा पराभव होत चाललेला पाहून शहाजहानाला बिलकुल चैन पडत नव्हतें. त्याने आपला मोहरा दक्षिणेकडे वळवला. दौलताबादेस आल्याबरोबर आजूबाजूचे लोक त्यास शरण गेले. त्याचेबरोबर औरंगजेब, जयसिंह, शाहिस्तेखान, वगैरे मंडळी होतीच. पहिल्याप्रथम शहाजीचा पाडाव करण्याच्या मार्गास बादशहा लागला. शाहिस्तेखानानें जुन्नर व संगमनेर हीं स्थळें काबीज केलीं. शिवनेरीवर शहाजीचीं बायकामुले होतीं. तींहि मोगलांच्या हातांत सांपडलीं. परंतु, धीर खचूं न देतां शहाजीने मोठ्या शौर्यानें शत्रूंस तोंड दिले. पुणे, चाकण, जुन्नर, इत्यादि स्थळें काबीज करून त्यानें बायकामुलांना सोडविले आणि तो कोंकणांत माहुली किल्ल्यावर गेला. तेव्हां शहाजहानने शहाजींचा नाद तूर्त सोडून दिला व शहाजीस विजापूरचा पाठिंबा मिळतो तो मिळूं नये या खटपटीस तो लागला. त्याने आदिलशहास कळविलें, " आम्हांस तुमच्या वाटेस जावयाचें नाहीं. निजामशाही जिंकण्याचें काम पूर्ण केल्यावर आम्ही परत जाणार तुम्हीं शहाजीचे साह्यास फौज पाठवली आहे ती एकदम परत बोलवा. शहाजीस तुम्हीं सोडल्यास तुम्हांला भीमेच्या पलीकडचा व कोकणांतील निजामशाहीचा प्रदेश देऊं. शहाजीशीं लढणे आम्हांस प्राप्त आहे. त्या कामीं तुम्हीं आपली फौज आमचे मदतीस पाठवली पाहिजे ", आदिलशाहास हें बोलणे पसंत पडण्यासारखेंच होते. त्याने ताबडतोब रणदुल्लाखानास बोलावून घेऊन बादशहाच्या अटीस मान्यता लिहून दिली. आणि त्याप्रमाणे वैशाख शु. १२ रोजी तह कायम झाला. त्यांतील दोन कलमें फार महत्त्वाचीं आहेत. ( १ ) अदिलशहानें नजराणा म्हणून बादशहाला वीस लाख रुपये द्यावेत. ( २ ) शहाजीनें जुन्नर वगैरे स्थळें व किल्ले सोडून दिल्यास त्यास अदिलशहानें आपल्या नोकरीस घ्यावें पण त्यानें हीं ठिकाणें न सोडल्यास तीं जिंकण्यासाठीं अदिलशहानें आपली फौज मोंगलांच्या साह्यास पाठवावी.

— ६ मे १६३२

## वैशाख शु. १३ ‘साम्राज्य-संस्थापका’ चा अंत!

शके १६६२ च्या वैशाख शु. १३ रोजीं नर्मदातीरीं रावेरखेडी येथे थोरले बाजीराव पेशवे यांचा अंत झाला!

बाळाजी विश्वनाथांपासून माधवरावांपर्यंत मराठी राज्याचें जे संवर्धन झालें त्यांत थोरल्या बाजीरावांची योग्यता अधिक आहे. वीस वर्षांच्या कारकीर्दींत बाजीरावांनीं शिपाईगिरी व राजकारण यांची शर्थ केली. निजामासारख्या सामर्थ्यवान् प्रतिस्पर्ध्याला दमास आणून गिरिधर बहाद्दर,, महंमद बंगश, सर-बुलंदखान अशा बादशाही वीरांनाहि त्यांनीं नामोहरम केलें. एके काळचे मुंबईचे गव्हर्नर सर रिचर्ड टेंपल यानीं आपल्या ‘Oriental Experiences’ मध्यें बाजीरावासंबंधीं लिहिलें आहे कीं, “निरनिराळे सरदार एकमेकांशीं विरोध करीत असतां त्यांच्यांत ऐक्य निर्माण करणे, मुसलमानांच्या ताब्यांतला प्रदेश सोडवणें आणि हिंदूंची संघटणा करणें हीं महत्त्वाचीं कामें बाजीरावाला सिद्धीस न्यावयाचीं होतीं...... स्वरूपानें भव्य व रुबाबदार, वर्तनाने प्रेमळ, भाषणानें आकर्षक, बुद्धीनें कल्पक व तरतरीत आणि संकटांत युक्तिबाज असल्या-मुळें त्याला लागोलग यश मिळत गेलें...... युद्धसंग्रामांत ता सर्वापुढें निर्भय-पणें ठासून उभा राहत असे. सभोंवार बंदुकीच्या गोळयांचा मारा होत असतां तो कधींच कचरला नाहीं. त्याचा स्वराष्ट्राभिमान जबर असून त्यापुढें कोणतीहि अडचण तो जुमानीत नसे. त्याचा सारा जन्म उन्हातान्हांत गेला. तसाच मृत्युहि उघड्या आकाशाखालीं तंबूच्या आवरणांत झाला. लढवय्या पेशवा म्हणून त्याची ख्याति आजहि देशभर आहे.”

बाजीरावाचें प्राणोत्क्रमण ज्या जागीं झालें तेथें वृंदावनरूपांत एक छत्री उभारला आहे. इंदूर-खांडवा लाइनवर रावेरखेडी संनावद स्टेशनपासून १५ मैलांवर आहे. नदीमध्यें बाजीरावाची दहनभूमि आहे, तेथें एक ओटा बांधून त्यावर शिवलिंगाची स्थापना केलेली आहे. जवळच श्रीमंतांचा वियोग असह्य होऊन प्राणत्याग केलेल्या त्यांच्या एका हत्तीचें व घोड्याचे अशीं दोन थडगीं आहेत.

— २२ एप्रिल १७४०

## वैशाख शु. १४ — सर्वत्र परमेश्वर भरला आहे !

वैशाख शु. १४ या दिवशीं श्रीनृसिंह प्रकट झाले. दशावतारांतील हा चौथा अवतार. भगवान् विष्णूचे द्वारपाल जय-विजय हे सनकादिकांच्या शापामुळें भ्रष्ट होऊन दैत्य झाले होते. हिरण्यकश्यपु व हिरण्याक्ष अशीं त्यांचीं नांवें होतीं. विष्णूनें वराहरूप धारण करून हिरण्याक्षाचा वध केला. तेव्हां हिरण्यकश्यपूला अत्यंत क्रोध आला. त्यानें आपल्या राज्यांत तप, यज्ञ, वेदपाठ इत्यादि व्रतें करण्यास बंदी केली आणि तो अत्यंत उग्र असें तप करूं लागला. तेव्हां ब्रह्मदेव प्रसन्न होऊन त्यानें वर दिला की, सृष्टींतील कोणाहि पुरुषाच्या हातून तुझा मृत्यु घरामध्यें अगर बाहेर, रात्रीं अथवा दिवसां, पृथ्वीवर अगर आकाशांत होणार नाहीं. वरप्राप्तीनंतर हिरण्यकश्यपु देवादिकांना फारच त्रास देऊं लागला. त्याचा ज्येष्ठ पुत्र प्रल्हाद हा मोठा विष्णुभक्त होता. पित्यानें अनेक शिक्षा केल्या तरी त्यानें हरिभक्ति सोडली नाहीं. शेवटीं संतप्त होऊन हिरण्यकश्यपु बोलला, " सांग, तुझा परमेश्वर कोठें आहे ? " प्रल्हादाने उत्तर दिले, " तो तर सर्वत्र भरला आहे." यावर त्यानें क्रोधानें आपल्या हातांतील गदा जवळच्या खांबावर मारली. त्या क्षणीं त्यांतून एक सिंहाकृति स्वरूप निघालें. या नृसिंहरूप विष्णूनें हिरण्यकश्यपूला पकडून त्याचें पोट फाडून त्यास ठार मारलें.

" नृसिंहावतार हा परमेश्वराचे सर्वसाक्षित्व सिद्ध करीत असून परमेश्वर स्थिर, चर, काष्ठपाषाणादिकांत भरून उरला आहे, याचें तो उदाहरण होय. प्रवृत्तिपर विचारांचे जे लोक असतात त्यांच्या हातून अनुचित कृत्यें घडतात. त्यांना स्वतःच्या पराक्रमाची घमेंड असतें. परंतु, पापाचा घडा पूर्ण भरतांच त्यांचा नाश अकल्पित रीतीनें कसा होतो, हें नृसिंहावतार सिद्ध करीत आहे. प्रल्हाद हा या देशांत भक्तीचें बीं पेरणारा पहिला विष्णुभक्त असून तो कुलानें दैत्य होता. तरी देवांनाहि वंद्य झाला. सत्यमार्ग श्रेष्ठ मानून पित्याची अवज्ञा करणारा प्रल्हाद, मातेची अवज्ञा करणारा भरत, बंधूचा पक्ष सोडणारा बिभीषण, गुरूशीं युद्ध करण्यास तयार झालेला भीष्म, मामाचा वध करणारा कृष्ण,—या सर्वांना श्रेष्ठ मानण्यांत येतें—"



## वैशाख शु. १५ ( १ ) भगवान् कूर्मदेवांचा अवतार !

वैशाख शु. १५ या दिवशीं देवदानवांचें समुद्रमंथन यशस्वी व्हावें म्हणून भगवान् विष्णूंनीं कूर्मावतार धारण केला !

" कूर्म ( कांसव ) हा विष्णूचा दुसरा अवतार. या अवताराचे मूळ शतपथ ब्राह्मणांत सांपडतें. प्रजापतीनें कूर्माचे रूप धारण करून प्रजोत्पत्ति केल्याची कथा त्यांत आहे. " त्यानंतर सत्ययुगांत विष्णूंनीं प्रलयकालीं हरवलेल्या कांहीं अमोलिक वस्तु परत मिळविण्यासाठीं कूर्माचा अवतार घेतला. व मंदराचलाखालीं क्षीरसमुद्रांत तो अढळ राहिला. त्यानंतर दैत्यांनीं वासुकीचा दोर करून समुद्रमंथन केले व चौदा रत्नें बाहेर काढलीं, अशी माहिती 'ज्ञानकोश'कार देतात. मत्स्यभगवानानंतर परमेश्वरानें कूर्मावतार धारण केला. अत्यंत उंच असणाऱ्या व सुवर्णशृंगांनीं वेढलेल्या मेरु पर्वतावर देव राहत असतां त्यांना अमृतप्राशनाची इच्छा झाली; त्यासाठीं सर्व देव तपश्चर्या करूं लागले. शेवटीं नारायणानें उपाय सुचविला कीं, 'देव आणि असुर यांनीं समुद्राचे मंथन करावें म्हणजे अमृताचा लाभ होईल.' त्याप्रमाणें समुद्रमंथनास सुरुवात झाली. समुद्रमंथनाचें कारण इतरत्र दुसरेंहि सांगितले आहे. दैत्य-सुरांच्या युद्धांत दैत्यांनीं देवांची सर्व संपत्ति समुद्रांत टाकली. ती बाहेर काढण्यास समुद्रमंथन सुरू झाले. एवढा मोठा सागर घुसळण्यास रवी कोणती ? मंदर पर्वताची रवी करून वासुकी सर्पास दोर करण्यांत आले. आणि मंथनास सुरुवात झाली, तों मंदर पर्वत समुद्राच्या तळाशीं जाऊं लागला. सर्व देवांनीं पुन्हा नारायणाची प्रार्थना केली. तेव्हां भगवान् विष्णूंनीं कूर्माचें रूप धारण करूण तो मंदर पर्वत आपल्या पाठीवर धारण केला. त्यानंतर समुद्रमंथन यशस्वी झालें. वासुकीच्या शेपटीस देवांनीं धरिलें; आणि तोंडाकडे असुरांची योजना झाली. सर्व देवांना विष्णूंनीं आपलें बल दिलें, तेव्हां मंथनांतून सूर्य, चंद्र, लक्ष्मी, कौस्तुभ, पारिजात, अमृत, इत्यादि चौदा रत्नें बाहेर आलीं. 'अमृत आम्ही घेणार' म्हणून दैत्य-सुरांत झगडा लागला; तो थांबविण्यासाठीं पुन्हा विष्णूला मोहिनीरूप धारण करावे लागलें. असें सांगतांत कीं, मत्स्यानंतर भगवंतांनीं कूर्माचा अवतार धारण केला, यांत उत्क्रांतितत्त्व आहे.

● ● ●

## वैशाख शु. १५ (२) बिपिनचंद्र पाल यांचें निधन!

शके १८५४ च्या वैशाख शु. १५ रोजीं बंगालमधील सुप्रसिद्ध राजकारणी पुरुष व प्रक्षोभक वक्ते बिपिनचंद्र पाल यांचें निधन झालें.

बंगालमधील सिल्हट गांवीं त्यांचा जन्म झाला. मॅट्रिक झाल्यावर बिपिनचंद्र कलकत्ता येथें शिक्षणास आले. तेथें त्यांना केशवचंद्र सेन यांचा सहवास घडून त्यांनीं 'ब्राह्म समाजाचा स्वीकार केला. त्यांच्या वडिलांना आपल्या चिरंजीवांनीं केलेलें हें 'अब्रह्मण्य' खपलें नाहीं. आपल्या इस्टेटीपैकीं एक पैहि बिपिनचंद्रांना न मिळण्याची व्यवस्था त्यांनीं केली होती, पण शेवटीं त्यांचें मन पालटलें. पहिली पत्नी निवर्तल्यावर बिपिनचंद्रांनीं सुरेंद्रनाथ बानर्जींच्या विधवा पुतणीशीं लग्न करून आपलें नांव कर्त्या सुधारकांत दाखल केलें. विद्यार्जन झाल्यावर कटकच्या शाळेंत ते तीन वर्षें हेडमास्तर होते. त्यानंतर पांच-सहा वर्षें आपल्याच सिल्हट गांवीं त्यांनीं एक विद्यालय चालविलें. पुढें बंगलोरच्या शाळेचे मुख्याध्यापक व कलकत्त्याच्या ग्रंथालयाचे व्यवस्थापक अशींहि यांनीं कामें केलीं. यानंतर त्यांनीं राजकारणांत प्रवेश केला. त्यांचें पहिलें सुप्रसिद्ध भाषण मद्रास येथील राष्ट्रसभेंत हत्यारांच्या कायद्यावर झालें. त्यांच्या आवेशयुक्त व क्षोभकारक वक्तृत्वकलेची सर्वत्र प्रशंसा होऊं लागली. १९०० सालात ते तत्त्वज्ञानाच्या तौलनिक अभ्यासासाठीं इंग्लंडला गेले. तेथें ते 'स्वराज्य' नांवाचे मासिक चालवीत. भारतांत त्यांचें 'न्यू इंडिया' नांवाचें साप्ताहिक असून अरविंदबाबूंच्या 'वंदे मातरम्'शींहि त्यांचा निकटचा संबंध होता. १९११ सालीं राजद्रोहाच्या आरोपाखालीं त्यांना पुन्हा शिक्षा झाली. तथापि नंतरच्या होमरूलच्या चळवळींत सामील होऊन शिष्टमंडळाबरोबर ते विलायतलाहि गेले. त्याच्या आयुष्यांतील मध्यान्हकाल म्हणजे लाल, पाल, बाल, या त्रयीनें वंगभंग व स्वदेशी-बहिष्काराच्या प्रचंड आंदोलनाच्या वेळीं केलेल्या अद्वितीय कामगिरीचा होय. 'पहाडी आवाजाचे दणदणीत वक्ते' अशी त्यांची कीर्ति या काळांत सर्व भारतांत झाली होती. 'Indian Nationalism' हा यांचा ग्रंथ प्रसिद्ध आहे.

—२० मे १९३२

## वैशाख व. १ स्वातंत्र्य-युद्धाची पहिली ठिणगी !

शके १७७९ च्या वैशाख व. १ रोजीं विख्यात अशा 'सत्तावनच्या स्वातंत्र्य-युद्धा'ला सुरुवात झाली.

इंग्रज इतिहासकार याला केवळ 'शिपायांच्या बंडा'चे स्वरूप देतात व या क्रांतियुद्धाची भूमिकाच विकृत करूं पाहतात. चरबी लावलेली काडतुसें, शास्त्रीय सुधारणांचा विपरीत परिणाम, इत्यादि क्षुल्लक गोष्टींना नसते महत्त्व आजवर देण्यांत येऊन या स्वातंत्र्यसंग्रामाची किमत शक्य तेवढी कमी करण्याचा उपद्व्याप इंग्रजांकडून झाला. परंतु, या रणकुंडांत नानासाहेब पेशवे, झांशीची लक्ष्मीबाई, रोहिलखंडाचा खान बहादुरखान, दिल्लीचा बादशहा, इत्यादि अनेक वीराग्रणींनीं केलेल्या पराक्रमांचें संशोधन करून 'स्वधर्म व स्वराज्य' हींच महान् तत्त्वें या युद्धाच्या बुडाशीं आहेत' असा निर्णय स्वातंत्र्यवीर सावरकर यांनीं आपल्या विख्यात 'सत्तावनचे स्वातंत्र्यसमर' या पुस्तकांत दिला आहे. एकामागून एक अशीं अनेक संस्थानें डलहौसीनें खालसा केल्यामुळें सर्वत्र अग्नि धुमसत होता. दिल्लीच्या आसपास सशस्त्र उठावाची गुप्त मसलत चालू होती; आणि या धुमसणाऱ्या अग्नीची पहिली ठिणगी वैशाख व. १ रोजीं मीरत येथें उडाली. येथील शिपायांनीं या दिवशीं सायंकाळीं एकदम धामधुमीस सुरुवात केली. तुरुंगावर हल्ला करून कैदी असलेले शिपाई मुक्त केले. आणि जे गोरे दिसतील त्यांना ठार मारण्यास सुरुवात केली. चर्चमध्यें घंटांचे नाद ऐकूं येऊं लागल्याबरोबर मीरत व आसपासच्या खेड्यांतील लोक मोडकींतोडकीं शस्त्रें घेऊन गोऱ्या लोकांच्यावर धांवून गेले. "पायदळ काय, तोफखाना काय, हिंदु काय नि मुसलमान काय, सारे इंग्लिशांच्या रक्ताला तहानेलेले होते. बाजारांत एकच हलकल्लोळ उडाला. इंग्लिशांचे बंगले, त्यांच्या कचेऱ्या, त्यांच्या खानावळी यांना पेटवून देण्यांत आलें. मरितचे आकाश भेसूर दिसूं लागलें. धुराचे लोट नि ज्वालांचे भयंकर लोळ यांनीं वातावरण व्याप्त होऊन सहस्रावधि कंठांतील आरोळ्यांनीं, विशेषतः 'मारो फिरंगीको' या घोषणांनीं सर्व दिशा दणाणून गेल्या."

— १० मे १८५७

## वैशाख व. २ "टोपीकर म्लानत्व पावले!"

शके १६६१ च्या वैशाख व. २ रोजीं चिमाजीआप्पा यांनीं अद्वितीय पराक्रम करून वसईचा किल्ला जिंकून तह केला.

हिंदुस्थानच्या पश्चिम किनाऱ्यावर पोर्तुगीझांचा धर्म–च्छल वाढूं लागला. तेव्हां या प्रकरणीं लक्ष घालण्यासाठीं चिमाजीआप्पा निघाले. वसईचा किल्ला मोठा बळकट होता. पश्चिमेस व दक्षिणेस खाडी आणि पूर्वेकडे चिखल, अशी स्थिति असल्यामुळे वसईवर हल्ला करण्यास कठीण होतें. मराठ्यांनीं उत्तरेकडून मोर्चे लाविले; पण पोर्तुगीझांच्या बंदुकीपुढे कांहीं उपाय चालत नव्हता. परंतु, मराठ्यांचा निश्चय मोठा होता. वसई घेतल्याखेरीज परत फिरणार नाहीं, या निश्चयानें चिमाजीआप्पा बोलले, "–माझें मस्तक तरी किल्ल्यांत जाऊन पडूं द्या–" या निर्वाणीच्या शब्दामुळें सैनिकांना हुरूप चढला. दहा सुरुंग तयार करवून त्यांना बत्ती दिली. त्याबरोबर लोकांची दाणादाण उडाली. बुरूज धडाधड कोसळूं लागल्यावर मराठे वर चढले; व त्यांनीं निकराचा हल्ला करून वैशाख व. ८ ला वसई सर केली. 'ज्या प्रकारे वानरांकरवीं लंका घेवविली, त्या प्रकारे ही गोष्ट जाली. दक्षिणी फौजेस उपाय करून व छातीचा कोट करून झुंजावे, हे हिंमत पूर्वी कोणी ऐकिलीहि नव्हती.–" या लढ्यांत मराठ्यांनीं जो पराक्रम केला त्यास इतरत्र तोड नाहीं. चिमाजीआप्पा ब्रह्मेंद्रस्वामींस लिहितात, "इकडील लोकांनीं भारती युद्धाप्रमाणें युद्ध केलें. यामागें युद्धें बहुत जालीं. परंतु, या लढाईस जोडाच नाहीं. .... वसई स्वामीचे आशीर्वादें फत्ते झाली. श्रीचे सुदर्शन धर्मद्वेष्ट्याचे मस्तकीं वज्रप्रहार होऊन टोपीकर म्लानत्व पावले. स्वामीचे कर्तृत्वास पार नाहीं."

याप्रमाणे किल्ला सर झाल्यावर पोर्तुगीझांचे वकील तह करण्यासाठीं आले. तहाच्या शर्ती ठरून वैशाख व. २ रोजीं पोर्तुगीझांनीं किल्ला खाली केला. तेव्हां मराठ्यांनीं आंत प्रवेश केला. या तहांत एकूण बारा कलमें असून तो 'प्राचीन युद्धनीतीचा स्मरणीय मासला होय' असा निर्वाळा इतिहासकार देतात. वसईच्या अपूर्व द्विग्विजयामुळें चिमाजीआप्पाचे नांव इतिहासांत अमर झाले आहे.

— १२ मे १७३९

## वैशाख व. ३ 'बल्लवा'कडून कीचकवध !

वैशाख व. ३ या दिवशीं पांडवांपैकीं महापराक्रमी भीमसेन याने विराट-नगरीच्या सुदेष्णा राणीचा मानलेला भाऊ कीचक याचा वध केला.

बारा वर्षांचा वनवास पांडवांनीं संपाविला आणि एक वर्षाच्या अज्ञातवासासाठीं ते विराटाच्या नगरांत येऊन राहिले. दहा महिन्यांचा काळ लोटल्यावर विराटाचा सेनापति कीचक याची पापी दृष्टि रूपसंपन्न सैरंध्रीवर गेली. 'तूं माझी भार्या होऊन ऐश्वर्य व सुख यांचा उपभोग घे' अशी निर्लज्जपणाची मागणी त्यानें केली. द्रौपदीनें प्रत्येक वेळीं निषेध केला. तेव्हां कीचकानें सुदेष्णेकडून संधान बांधलें. सुदेष्णेच्या आज्ञेनुसार दासी सैरंध्री कीचकाकडे गेली. त्या कामांधानें तिचा हात धरल्याबरोबर मानिनी द्रौपदीचा अभिमान उफाळून आला. त्वेषानें तिनें कीचकाला जमिनीवर ढकललें; आणि ती तडक विराटाच्या राजसभेंत आली. कीचकहि तिच्यापाठोपाठ आला. त्यानें तिला खालीं ओढली आणि लाथ मारली! भरसभेत एवढी विटंबना झाली असतां कांहींहि होत नाहींसें पाहून तिनें राजाचीहि निंदा केली. कीचकासारख्या दुष्ट माणसाच्या हातातील बाहुलें बनलेला राजा कांहींहि करूं शकला नाहीं. भीमसेनावांचून आपणांस त्राता नाहीं, हें द्रौपदीनें ओळखलें. स्वयंपाकघरांत घोरत पडलेल्या 'बल्लवा'ला द्रौपदी म्हणाली, "माझ्या पातिव्रत्यावर आग पाखडणारा नीच कीचक उद्या जिवंत राहिला तर मी प्राण देईन!" दोघांचाहि कांहीं विचार ठरला. दुसरे दिवशीं सैरंध्री कीचकास वश झाली. ठरल्याप्रमाणें रात्रीं कीचक नृत्यशाळेमध्यें आला. तेथें त्याचा द्रौपदीशीं आचरटपणानें प्रेमालाप सुरू झाल्यावर वेषांतर केलेल्या भीमानें कीचकाशीं बाहुयुद्ध करून त्यास ठार केलें. हें समजतांच कीचकाचे सर्व बांधव सैरंध्रीवर खवळून गेले. त्यानीं कीचकाबरोबर तिलाहि बांधून जाळण्यासाठीं स्मशानांत नेलें. वेष पालटून भीमहि स्मशानांत आला. स्मशानांतील एक वृक्ष उपटून त्यानें कीचकाच्या एकशें पांच बंधूंना यमसदनास पाठविलें व द्रौपदीची मुक्तता केली. आपला सेनापति सर्व बांधवांसह ठार झालेला पाहून विराट राजाच्या मनांतहि भय उत्पन्न झालें.



## वैशाख व. ४ (१)'पण अपमान सहन करणार नाहीं'!

शके १५८८ च्या वैशाख व. ४ रोजीं आग्रा येथें शिवाजीराजे व औरंगजेब यांची पहिली व शेवटची भेट झाली.

फाल्गुन शुद्ध ९ रोजीं सर्वांचा निरोप घेऊन शिवाजीराजे रायगडहून आग्र्यास जाण्यास निघाले. प्रवासांतच बादशहाचें पत्र मिळाले कीं,– "तुम्ही बेकिलाफ आमचे वचनावर विश्वास ठेवून हुजूर तख्त मुकामीं यावें. तुमचे मुद्दे असतील ते उलगडून देऊं. कोणेविशीं दक्कत न धरावी. बादशाही कृपा संपादून तुम्हांस स्वदेशीं परत करण्यांत येईल." आग्रा येथें शिवाजीच्या तैनातीस जयसिंहाचा मुलगा रामसिंह व मुखलिसखान हे दोघे होते. वैशाख व. ४ रोजीं भेट ठरली. 'दिवाण-इ-आम' च्या शृंगारलेल्या सभागृहांत मोठा दरबार भरला. रामसिंहाबरोबर शिवाजीराजे व युवराज संभाजी आले व त्यांनीं १५०० मोहोरांचा नजराणा व सहा हजार रुपयांचें उपायन बादशहापुढें ठेवले. 'या शिवाजीराजे!' असें औरंगजेबानें म्हणतांच शिवाजीनें प्रणाम केला. बादशहानें खूण करतांच चोपदारांनीं शिवाजीला तिसऱ्या प्रतीच्या सरदारांत नेऊन उभे केलें! राजांना या अपमानाचा तीव्र संताप आला. आधींच कोणाहि मुसलमानांपुढें मान वांकविण्याचा शिवाजीस अत्यंत तिरस्कार, त्यांतून हा असा अपमानकारक प्रसंग! उद्वेगानें शिवाजीनें रामसिंहास विचारले, "पंचहजारीच्या रांगेंत उभें राहण्यासाठीं का मी येथें आलो? माझा सेनानायक नेताजी सुद्धां पंचहजारी आहे... आमच्या सैनिकांना पाठ दाखवून पळणारे जसवंतसिंहसुद्धां माझ्या पुढील रांगेत आहेत... मी येथे प्राण देईन, पण अपमान सहन करणार नाहीं!" त्यावर रामसिंह बादशहास म्हणाला, 'जंगलांत वावरणारा वाघ या अपरिचित ठिकाणीं येऊन बेहोष झाला आहे.' बादशहा त्यावर बोलला "राजास बाजूस नेऊन त्यांचे डोक्यावर गुलाबपाणी शिंपडा; व शुद्धीवर आल्यावर मुक्कामास घेऊन जा."

आणि मुक्कामास गेल्यावर महाराजांना उघडपणें बंदीवान् करण्यांत आलें. बादशहाने अधिकाऱ्यांना बजाविलें, "शिवाजीस दरबारची मनाई आहे. तुम्हीं शिवाजीवर सक्त नजर ठेवावी. तो निघून गेला तर तुम्हांस जबाबदार धरण्यांत येईल."

— १२ मे १६६६

## वैशाख व. ४ ( २ ) रघुनाथपंत हणमंते यांचें निधन !

शके १६०५ च्या वैशाख वद्य ४ रोजीं, शिवकालांतील स्वामिनिष्ठ मुत्सद्दी रघुनाथ नारायण हणमंते याचे निधन झालें.

रघुनाथ हणमंते हे कर्नाटकांत शिवाजीमहाराजांचे बंधु व्यंकोजी यांचे कारभारी होते. अत्यंत महत्त्वाकांक्षी व तडफदार म्हणून यांचा लौकिक असे. एके समयीं रघुनाथ हणमंते व्यंकोजीस टोंचून बोलले; तें सहन न होऊन व्यंकोजी बोलले, “ तुम्ही चाकर; सांगूं तितके काम करीत असावे— ” यानंतर कारभाऱ्यांनीं उत्तर दिलें— “ तुमच्या मांडीस मांडी लावून बसेन तरच नांवाचा रघुनाथ— ” आणि रघुनाथपंत शिवाजीकडे येण्यास निघाले; कांहीं तरी मोठे कार्य करून शिवरायांकडे जावें, असा मनाशीं निश्चय करून ते हैदराबादेस आले; आणि गोवळकोंड्याच्या कुतुबशहाचा दिवाण मादण्णापंत यांची त्यांनीं भेट घेतली. मादण्णांनीं रघुनाथपंताचा सत्कार करून शिवाजीस देण्यास कांहीं पत्रें दिलीं. पंत शिवरायांकडे आले. दक्षिणदिग्विजय करण्याची इच्छा महाराजांची होतीच, हणमंते यांनीं तिला चालना दिली. दक्षिणेंतील जिकलेल्या प्रांतांचा कारभार शिवरायांनीं रघुनाथपंतांकडेच सोंपविला आणि त्यांनींहि ती व्यवस्था अत्यंत चोख अशीच ठेविली— “ आधींच पंडित, त्यांत कारभारी, विशेष विद्वज्जनांचा समागम; न्यायनीतिपरनिष्ठ होते. एकोजी राजाचे काम करून महाराजांचे मुलखाचें व फौजेचें काम बोभाट न पडे असे चालविलें— ” असा अभिप्राय त्यांजविषयीं तत्कालीन पत्रांतून सांपडतो. शिवरायांनंतर संभाजीराजाचें दुराचरण पाहून कष्टी होणारे रघुनाथ हणमंते हे होते.— “ तुम्ही राज्यांतील कर्तीं माणसें ठार मारलीं, आतां औरंगजेब उत्तरेकडून स्वारी करून येत आहे, त्याचा प्रतिकार करण्याची तयारी तुम्ही काय केली आहे ?— ” अर्थातच संभाजीस हें बोलणें रुचलें नाहीं. रघुनाथ पंडितांची मोठी कामगिरी म्हणजे त्यांनीं शिवरायांच्या सांगण्यावरून ‘ राज्यव्यवहारकोश ’ तयार केला. त्यायोगें उर्दू फारसी शब्दांबद्दल भारतीय संस्कृत परिभाषा वापरणें सुलभ झालें.

## वैशाख व. ५ (१) "कुंसवाखालीं भक्ति गडप झाली!"

शके १२६० च्या वैशाख व. ५ रोजीं प्रसिद्ध भगवद्भक्त चोखामेळा, हा मंगळवेढें येथील गांवकुसूं बांधीत असतां कोसळणाऱ्या कुसवाखालीं सांपडला.

तेराव्या शतकात सर्व जमातींत साधु-संत निर्माण झाले होते. त्यांपैकीं चोखामेळा हा मंगळवेढ्याचा महार. सर्व काळ कामधंदा करीत असतांना सारखें भगवन्नाम त्याच्या तोंडांत असे. नामदेवाप्रमाणे त्याचे सर्व कुटुंब कविता करीत होतें. चोखोबाचे अभंग भक्तिरसानें भरलेले आहेत.

चोखोबांच्या जीवितांतील अद्भुत घटना प्रा. श्री. म. माटे यांनीं आपल्या "मंगळवेढ्याचें कुसूं" या लेखांत अमर केली आहे. कुसवाचें काम चालू असतां चोखा मनाशीं म्हणे, "देवा, मी रात्रंदिवस कुसवाची माती येथें उकरतों... येथें दुसरें कांहीं नाहीं, तुझें रूप विसरलों, तुझें ध्यान विसरलों, मला परदेशी कां केलेंस? मला पंढरी आठवते, मला तुझें मुख आठवतें... मला पुढचा जन्म पंढरींत दे... आतां मला घेऊन चल तुझ्याकडे, जन्मोजन्मीं तुझी सेवा दे, मला माझ्या नाम्याच्या शेजारीं वस्ती करूं दे. देवा, आज मला उदास वाटत आहे, घडीघडी तुझ्याशीं मिळून जाण्याची आस बळावत आहे, मला घेऊन चल," इतकें चोखा म्हणत आहे तों कुसूं एकदम धडाडून खालीं आलें. चोखयाच्या अंगावर मातीचा ढिगारा झाला. अजूनहि 'विठ्ठल विठ्ठल' शब्द ऐकूं येत आहे. विठ्ठलानें चोखामहाराला, या भगवद्भक्ताला, या नामपावनाला, ध्येयानें वेड्या झालेल्या या प्रापंचिकाला, आपल्या पायाशीं नेलें. ज्ञानाला समाधींत बसवून नेलें, तुकाला इंद्रायणीच्या पाण्यांतून नेलें, चोख्याला कुसवाच्या भाराखालीं दडपून नेलें! परमेश्वरा, तुझी लीला अगाध आहे!" त्यांतच चोखोबांचा अंत झाला. त्यांच्या अस्थि नामदेवाने पंढरपुरास नेऊन आपल्या हातांनीं त्या महाद्वारांत पुरल्या. आणि त्यावर समाधि बांधली.

"चोखामेळा अनामिक । भक्तराज तोचि एक
परब्रह्म त्याचे घरीं । न सांगतां काम करी—"

अशी प्रशंसा जनाबाईनें चोखोबांची केली आहे.

—९ मे १३३८

## वैशाख व. ५ (२) "मूळ कंदच उपटला !"

शके १६५८ च्या वैशाख व. ५ रोजीं चिमाजीआप्पा यांनीं अद्वितीय पराक्रम करून जंजिऱ्याच्या सिद्दीसाताचा पाडाव केला.

जंजिऱ्याच्या सिद्दीचा उपद्रव मराठी राज्यास फारच होऊं लागला. धार्मिक छळ जारी होऊन चिपळूणजवळील परशुरामक्षेत्रासहि अपाय झाला. या सर्वांचा बंदोबस्त करण्यासाठीं शाहूमहाराजानें चिमाजीआप्पास कोंकणांत पाठविलें. मराठे व सिद्दी यांची मोठी लढाई झाली. सिद्दीसात मरेन वा मारीन या पणानें लढत होता. दोनहि पक्षांनीं अद्वितीय पराक्रम केला. स्वतः सिद्दीसातास सत्तावीस जखमा झाल्या. शेवटीं, नानाजीराव सुर्वे या सरदारानें सिद्दीसातास ठार केलें. त्याच्या सैन्याचा नंतर पुरा मोड झाला. "तेराशें माणूस यांचें कंदन करून भूमंडळास सुखी करून मोठा कीर्तिघोष करून यश घेतलें, पूर्वीपासून आपणास श्री यश देतच आहे, सांप्रत हें यश आगाध श्रीनें आपलें पदरीं सर्वोत्कर्षे घातले" असें अभिनंदन चिमाजीआपाचें झाले. शाहूमहाराज, ब्रह्मेंद्रस्वामी, फत्तेसिंह भोसले, जिवाजी खंडेराव चिटणीस या सर्वांनीं चिमाजीचा गौरव केला कीं, "सिद्दीसात केवळ रावणासारखा दैत्य. तो मारून हबशाचा मूळ कंदच उपटून काढिला. चहूंकडे लौकिक विशेषात्कारें जोडिला." शाहूनें तर चिमाजीस बहुमानवस्त्रें, हिरेजडित पदक, मोत्याची कंठी, रत्नजडित तरवार, इत्यादि वस्तु अर्पण केल्या. चिमाजीच्या यशाची बातमी शाहू शिकारीस गेला होता तेथे त्यास कळली. अत्यंत खुष होऊन त्यानें बातमीदारास सोन्याचें कडें बक्षीस दिलें "आणि आनंदाप्रीत्यर्थ तोफांची सरबत्ती दिली, नौबत वाजविली, खुशाली केली."

जंजिऱ्याचा सिद्धी हा मोंगल बादशहाचा हस्तक होता; त्याचा पाडाव करऱ्याची योजना शिवकालांतहि झाली होती. सिद्दीसात मराठ्यांच्या उच्छेदास प्रवृत्त झाला होता. ब्रह्मेंद्रस्वामींच्या परशुराम मंदिराचा विध्वंस करणारा सिद्दीसात नाहींसा झालेला पाहून मराठेमंडळास आनंदाचें भरतें आलें. मराठ्यांच्या सत्तेचा दरारा सर्वत्र चालू झाला.

—१४ एप्रिल १७३६

## वैशाख व. ६ स्वातंत्र्यवीरांचा जन्मदिवस !

शके १८०५ च्या वैशाख व. ६ रोजीं सुप्रसिद्ध क्रांतिकारक, प्रभावी वक्ते आणि विख्यात साहित्यिक स्वातंत्र्यवीर सावरकर यांचा जन्म झाला.

नाशिकजवळील भगूर हें त्यांचें जन्मस्थान. इंग्लंडमध्ये कायद्याचा अभ्यास करीत असतांनाच सत्तावनच्या स्वातंत्र्ययुद्धाचें संशोधन, शिवाजी उत्सव, मदनलाल धिंग्रांच्या निषेधाला विरोध, इत्यादि कारणांमुळे सावरकर क्रांतिकारक म्हणून प्रसिद्ध झाले. क्रांतिकारकांवर सरकारचा विलक्षण रोष होता. सन १९१० मध्यें लंडनहून हिंदुस्थानांत सरकारी बंदोबस्तांत त्यांना आणले जात असतां त्यांनीं मार्सेलिस बंदराशेजारीं बोटींतून समुद्रांत उडी टाकली, आणि पोहत पोहत जाऊन फ्रान्सचा किनारा गांठला. परंतु, दुर्दैवानें फ्रेंच पोलिसांनीं त्यांना गांठून हिंदी पोलिसांच्या स्वाधीन केलें. त्यांच्याविरुद्ध खटला सुरू होऊन त्यांना दोन जन्मठेपीच्या शिक्षा झाल्या. यावर सावरकरांनीं उद्‌गार काढिले, "तुमच्या नियम–निर्बंधानुसार तुम्हीं जी परमावधीची शिक्षा मला सांगितली आहे, ती मिमूटपणें सोसण्यास मी सिद्ध आहे. आमची प्रिय मातृभूमि तत्कालीन नसली तरी शाश्वतीच्या विजयाप्रत पोचावयाची ती हालअपेष्टा व स्वार्थत्याग या मार्गांनीच पोंचेल अशी माझी श्रद्धा आहे." त्यानंतर, त्यांना डोंगरी, भायखळा, ठाणें व मद्रास या क्रमाने अंदमानला नेण्यांत आले. तेथील १४ वर्षांची रोमांचकारी हकीकत त्यांनीं आपल्या "माझी जन्मठेप"मध्यें सविस्तरपणें वर्णन केली आहे. सन १९२४ मध्यें त्यांची मुक्तता झाली. १९३७ मध्यें त्यांच्यावरील निर्बंध काढण्यांत आल्यावर त्यांनीं हिंदुसभेच्या कार्याला वाहून घेऊन सर्व भरतखंडांत हिंदुत्वाचा तुफानी प्रचार केला. गांधी-खून-खटल्याच्या निर्णयामध्यें सावरकर निष्कलंकपणें मुक्त झाले. धगधगणाऱ्या अग्नींतून सोनें शुद्ध होऊन निघालें.

कवित्व आणि स्वातंत्र्यवादी देशभक्ति यांचा मधुर संगम सावरकरांमध्यें स्पष्टपणें दिसून येतो. त्यांच्या देशभक्तीला चटकन् काव्याचें स्वरूप येतें. ब्रिस्टलच्या तुरुंगांतून आपल्या स्नेह्यांना पाठविलेल्या "शेवटचा राम राम" या गद्यकाव्यांत खरे सावरकर चमकतांना दिसतात. उच्च प्रकारचे साहित्यिक म्हणूनहि त्यांची योग्यता फार मोठी आहे.

— २८ मे १८८३

## वैशाख व. ७ (१) शिवदिननाथांचा जन्म !

शके १६२० च्या वैशाख व. ७ रोजीं नाथपरंपरेतील एका शाखेचे प्रमुख सत्पुरुष शिवदिननाथ यांचा जन्म झाला.

श्रीआदिनाथ, मत्स्येन्द्रनाथ, गोरखनाथ, गैनीनाथ, निवृत्तिनाथ, ज्ञाननाथ, सत्यामलनाथ, गैबीनाथ, गुप्तनाथ, उद्बोधनाथ, केसरीनाथ आणि शिवदिननाथ अशी यांची परंपरा आहे. शिवदिननाथ हे यजुर्वेदी कौशिक गोत्री ब्राह्मण असून यांच्या वडिलांचें नांव कृष्णाजीपंत असे होतें. ते पैठण येथील रहिवासी असून त्यांची वृत्ति ज्योतिषपणाची होती. यांचे चिरंजीव शिवदिननाथ अति खोडकर निघाले म्हणून त्यांच्या आईने त्यांना प्रसिद्ध केसरीनाथांच्या स्वाधीन केले. केसरीनाथांनीं, स्नान झाल्यानंतर पुढे खडावा आणून ठेवण्याची कामगिरी शिवदिननाथांच्यावर सोंपविली होती. एके दिवशीं त्यांच्या हातून या सेवेंत अंतर पडलें; म्हणून केसरीनाथांनीं, 'खडाव मारिली त्या मुलाला। खोंच पडली कपाळाला। रक्त भळभळां वाहतसे', अशुद्ध रक्ताबरोबर शिष्याच्या मनांतील सर्व अशुद्धता निघून गेली. शिवदिननाथांचे आचरण निर्मळ झाल्यानंतर केसरीनाथांनीं त्यांना शके १६२८ मध्यें गुरुमंत्र दिला. शिवदिननाथांनीं मराठेशाहीचें वैभव पाहिलें होतें; आणि पानिपतचा जबर धक्काहि त्यांच्या डोळ्यांसमोर होता. त्यानंतर झालेली राष्ट्राची अवस्था त्यांनीं वर्णन केली आहे, 'सोळाशतें चौऱ्यांशित झाली धुळधानी। द्वैतराज्य दुष्टबुद्धि नासिले प्रधानी ॥" या पदांत महाराष्ट्रांतील हाहाकार त्यांनीं चित्रित केला आहे. त्यांची इतर फुटकळ पद्यरचना असून 'विवेकदर्पण'; 'ज्ञानप्रदीप', इत्यादि ग्रंथरचनाहि त्यांनीं केली आहे. 'भाव धरारे, अपुलासा देव करारे'; 'तोवरि हळहळरे, नाहीं भक्तिबळ रे'; 'माझी देवपुजा देवपुजा, पाय तुझे गुरुराजा,' इत्यादि त्यांचीं पदें महाराष्ट्रांत प्रसिद्ध आहेत.

मोरोपंत त्यांच्यासंबंधीं म्हणतात—

"गावें नतपद्मातें जो दे निःसीम शिव, दिनकर या !
पटु हित उपासकांचें, श्रीशिवदिन तेवि शिवदिन कराया —"

—२२ एप्रिल १६९८

## वैशाख व. ७ ( २ ) छत्रपति शाहू यांचा जन्म !

शके १६०४ च्या वैशाख व. ७ रोजीं छत्रपति संभाजी व येसूबाई यांचे चिरंजीव शाहू छत्रपति यांचा जन्म झाला.

त्याचें मूळचें नांव शिवाजी. संभाजीच्या वधानंतर सूर्याजी पिसाळ याच्या फितुरीमुळे रायगड औरंगजेबाच्या ताब्यांत आला. त्या वेळीं तो व राजमाता येसूबाई असे मोगलाच्या हातीं सांपडले. बादशहानें शाहूची कैदेतील व्यवस्था उत्तम ठेविली होती. प्रत्येकाच्या खर्चास नेमणुका देऊन नोकराचाकरांचीहि व्यवस्था चांगली करण्यात आली होती. शाहूला राजा ही पदवी देऊन सात हजारांची मनसबहि दिली. शाहू, येसूबाई वगैरेंचा परामर्श घेण्यांत औरंगजेबाची मुलगी झीन्नतुन्निसा ही तत्पर होती. ती स्वतः शाहूस कांहीं कमी पडूं देत नसे. दागदागिने, कपडालत्ता, मेवामिठाई, जे जें कांहीं हवे असेल तें ते तिनें त्यांना पुरविलें. असे असलें तरी शाहूवरील पहारा मात्र सक्त असे. पुढें औरंगजेबाच्या समाप्तीनंतर अजमशहानें मराठ्यांत दुफळी निर्माण व्हावी या हेतूनें त्यांना सोडून दिलें. वयाचीं सतरा वर्षें कैदेंत घालविल्यामुळे त्याच्यामध्ये थोडी विलासप्रियता शिरली असली तरी राज्य चालवण्याचे ज्ञान प्राप्त झालें होते. शाहूची सुटका झाल्यानंतर खंडो बल्लाळ व धनाजी जाधव हे त्यास येऊन मिळाले, तेव्हां शाहूनें सातारा येथे आपणांस राज्याभिषेक करवून घेतला. येथपासून शाहू व ताराबाई असे दोन पक्ष मराठ्यांमध्ये निर्माण झाले. प्रथमपासूनच मदत करणारा म्हणून बाळाजी विश्वनाथ यास शाहूने पेशवाई दिली. बाजीराव व बाळाजी बाजीराव यांना हाताशीं धरून त्यांनीं मराठी राज्याचा फारच विस्तार केला. कोल्हापूरच्या संभाजीवर चाल करून त्याला जहागिरी देऊन वारणेचा प्रख्यात तह करविला.

जंजिऱ्याच्या सिद्दीविरुद्ध मोहीम उभारून तेथील हिंदूंना निर्भय करण्यासाठीं त्यांनीं फारच प्रयत्न केले. शाहूचें वजन महाराष्ट्रांत बरेंच वाढलें. शंकराजी मल्हार नरगुंदकर यानें शाहू व मोंगल यांच्यांत एक तह घडवून आणला. या तहामुळें शिवाजीच्या राज्याशिवाय खानदेश, गोंडवन, वऱ्हाड, हैदराबाद व कर्नाटक हे प्रांत त्यांना मिळाले; आणि दक्षिणेंतील मोंगलाईंत चौथाई व सरदेशमुखी प्राप्त झाली.

— १८ मे १९६८.

## वैशाख व. ८ ‘ यांनींच कौरवांचा पराभव होईल ! ’

वैशाख व. ८ या दिवशीं पांडवांपैकीं अर्जुनानें अज्ञातवासांत शमीच्या वृक्षावर ठेवलेलीं शस्त्रें धारण करून कौरवांचा पराभव केला.

वनवासाचीं बारा वर्षें संपल्यावर अज्ञातवासांतील एक वर्ष काढण्यासाठीं पांडव विराट राजाकडे राहिले. बरोबरचीं शस्त्रें, धनुष्यबाण, इत्यादि नगरांत नेल्यास लोक ओळखतील म्हणून तीं शस्त्रें, कवचें, धनुष्ये, बाण व त्यांचे भाते नगराबाहेरील स्मशानांतील एका मोठ्या शमीच्या वृक्षावर ढोलींत ठेवण्यांत आलीं. मध्यंतरीं कीचकाचा वध झाला तेव्हां त्रिगर्त देशाचा राजा सुशर्मा व कौरव यांनीं विराटाच्या मत्स्य देशावर स्वारी करून सूड उगविण्याचें ठरविलें. दक्षिणेकडून सुशर्म्याने स्वारी करून विराटाच्या हजारों गाई हरण केल्या. विराट राजाची व सुशर्म्याची लढाई होऊन विराटाचा पराभव झाला. परंतु भीम, नकुल व सहदेव या पांडवांच्या साहाय्यानें विराटाची सुटका झाली. याच वेळीं कौरवांनीं नगराच्या उत्तरेकडून हल्ला करून विराटाच्या साठ हजार गाई लांबविल्या. कौरवांचा फडशा पाडण्यासाठीं विराटपुत्र उत्तर निघाला. अर्जुन-बृहन्नडा—त्याचा सारथी झाला. भीष्म, द्रोण, अश्वत्थामा, दुर्योधन, इत्यादि धनुर्धराशीं युद्ध करण्याचा प्रसंग पाहून उत्तराचें धैर्य खचून गेलें. “ बृहन्नडे ! माझा प्राण वांचीव. गाई नेल्यात तर नेऊं देत ” अशी गयावया राजपुत्र उत्तर करूं लागला. ‘ युद्धाकरतां उभें राहिल्यावर परत फिरणे क्षत्रियाचे ब्रीद नव्हे. ’ असा अर्जुनानें धीर दिला आणि आपला रथ शमीवृक्षाकडे वळविला. उत्तराकरवीं त्यांवरील शस्त्रें काढलीं. अर्जुन बोलला, “ या झाडावर पांडवांचीं शस्त्रें आहेत. त्यायोगेंच कौरवांचा पराभव होणें शक्य आहे.” उत्तराने त्यावर पुसले, “ पांडव कोठें आहेत ? ’ त्या वेळीं अर्जुनानें सर्व रहस्य प्रकट केले. आपला स्त्रीवेष उतरून शुभ्र पुरुषवेष धारण केला. आपल्या दिव्य अस्त्रांचे स्मरण केलें. साडेबत्तिस वर्षें हातांत वागविलेलें व एक वर्ष स्वस्थ पडून राहिलेलें गांडीव धनुष्य हातीं घेऊन अर्जुनानें मोठ्या तेजस्वितेनें टणत्कार केला ! आणि कर्ण, कृप, द्रोण, अश्वत्थामा, भीष्म, विकर्ण, दुर्योधन या सर्वांशीं युद्ध करून विराटाच्या गाई सोडविल्या.



## वैशाख व. ९ खंडेराव दाभाड्यांचा पराक्रम !

शके १६३९ च्या वैशाख व. ९ रोजीं प्रसिद्ध वीर खंडेराव दाभाडे यांनीं अहमदनगर येथें मोंगलांचा पराभव केला.

दोन वर्षापूर्वी दक्षिणच्या सुभ्यावर 'देखरेख करण्यासाठीं म्हणून सय्यद हुसेन याची नेमणूक दिल्लीहून झाली होती. सन १७१५ च्या ५ एप्रिल रोजीं तो दिल्ली सोडून दक्षिणेंत येण्यास निघाला. परंतु, बादशहाचा डाव वेगळाच होता. सय्यदास कारभार न देतां त्यास मारून टाकावे म्हणून बादशहानें अगोदरच दाऊदखान पन्नीस हुकूम दिला होता. नर्मदा नदीतीरीं सय्यद आल्यावर त्याला समजून आले कीं, दाऊदखान पन्नी हा बऱ्हाणपूरपर्यंत आपणावर चाल करून येत आहे. दोघांच्यांत सलोखा होणें अर्थातच शक्य नव्हतें. याच वेळीं शाहू महाराजांचे सेनापति नेमाजी शिंदे हे मोठ्या फौजेस बरोबर होऊन बऱ्हाणपूर येथें राहिले होते. दाऊदखान व सय्यद हुसेन यांचा बनाव कसा काय होतो याकडे त्यांचें लक्ष होतें.

थोड्याच दिवसांत बऱ्हाणपूर येथें लालबागच्या मैदानांत हुसेनअल्ली व पन्नी यांजमध्यें लढाई होऊन तींत दाऊदखान मरण पावला. अशा रीतीनें बादशहाचा हेतु पूर्णपणें फसला. तरी बादशहानें हुसेनचा पाडाव करण्यासाठीं मराठ्यांना चेतविलें होतेंच. त्याला अनुसरून मराठ्यांनीं मोंगलांच्या मुलखांवर हल्ले करण्यास सुरुवातहि केली. खंडेराव दाभाडे यांनीं खानदेश व गुजरात या देशांवर स्वाऱ्या करून त्या दोन प्रांतांमधील दळणवळणाचा मार्ग आपल्या स्वाधीन आणला. तेव्हां हुसेनअल्लीकडून झुल्फिकारबेग नांवाचा सरदार खंडेरावाचें पारिपत्य करण्यास आला. खंडेराव यांनीं मोठ्या युक्तीनें सर्व सैन्याचा पाडाव करून झुल्फिकारबेग यासहि ठार केलें. त्यानंतर मनसूरखान, ऐवजखान, करीमबेग वगैरे सरदार मराठ्यांचा पराभव करण्यास तयार झाले. अहमदनगरशेजारीं दोनहि सैन्यांची गांठ पडून निकराची लढाई झाली व वैशाख व. ९ रोजीं दाभाडे व सुलतानजी निंबाळकर यानीं मोंगलांचा पुरा मोड केला.

—२४ एप्रिल १७१७

## वैशाख व. १० मलिक अंबराचा मृत्यु !

शके १५४८ च्या वैशाख व. १० रोजीं अहमदनगरच्या निजामशाहींतील प्रसिद्ध दिवाण मालिक अंबर याचा मृत्यु झाला.

मलिक अंबर लहानपणीं एक गुलाम होता. बगदाद येथील एका व्यापाऱ्यानें त्याला हिंदुस्थानांत आणले आणि अहमदनगरच्या चंगीजखान नांवाच्या वजिरास विकलें. आपल्या बुद्धिबळाने त्यानें निजामशाहीचें बहुतेक राज्य परत मिळविलें. दक्षिण देश जिकण्यासाठीं जहांगीरनें पंधरा-वीस वर्षें अतोनात प्रयत्न केले; पण मालिकअंबरानें ते सर्व हाणून पाडले. अहमदनगर राजधानी मोंगलांच्या हातीं असल्यामुळें कांहीं थोडा वेळ जुन्नर येथें व नंतर दौलताबादेस निजामशाहीची सोय केली; आणि याच हेतूनें खडकी येथें नवीन शहर वसविलें. त्यासच पुढें औरंगाबाद हें नांव प्राप्त झालें.

मलिक अंबराचा उद्योग सर्वगामी असे. "रयतेस दिलदिलासा देऊन ताब्यांतील प्रदेशाची आबादानी ठेवली. त्यामुळें वसुलाची उपज होऊन पदरीं लढाऊ फौज बाळगण्याचें सामर्थ्य त्यास आलें. त्याच्या लष्करांत मराठे व मुसलमान सारखेच खुष असत. मोंगलाशीं लढण्यांत त्याने डोंगराळ प्रदेशाच्या आश्रयाने गनिमी काव्याचा उपयोग केला आणि मोंगलाशीं टक्कर देण्यासाठीं आदिलशाही व कुतुबशाही यांच्याशीं सख्य ठेवले. या रीतीनें पंचवीस वर्षेंपावेतों या चतुर मुत्सद्यानें जो प्रयत्न निजामशाही तारण्यासाठीं केला त्याची वाखाणणी सर्वत्र होऊं लागली."

भातवडी येथे शहाजीच्या मदतीनें मोंगल सैन्याचा यानें जो पराभव केला त्यामुळे त्याची सर्वत्र वाहवा झाली. जवळजवळ वर्षभर हा सामना बनून येत होता. "दोहोंकडून चालून येणाऱ्या फौजांच्या चिमट्यांत सांपडलेला हा गृहस्थ निश्चित अपयशाऐवजीं प्रचंड विजय संपादूं शकला हें केवळ त्याच्या बुद्धीचें सामर्थ्य होय.... नाना प्रकारच्या युक्त्यांनीं त्यानें प्रतिपक्षास हैराण करून मोंगल, आदिलशहा व कुतुबशहा या तीन राज्यांच्या संघावर मात केली." कोणत्याहि विरोधाला न जुमानतां पराक्रम गाजवीत असतांना शके १५४८ मध्यें त्याचें निधन झालें.

—१० मे १६२६

## वैशाख व. ११ " भक्तीच्या पेठा वसविल्या तुवां ! "

वैशाख व. ११ हा दिवस नारदजयंतीचा म्हणून प्रसिद्ध आहे. देवर्षि नारद हे पूर्ण ब्रह्मचारी, मोठे तत्त्वज्ञानी, उत्तम गायक, निःसीम हरिभक्त आणि दुसऱ्याची उन्नति करण्यासाठीं निःस्वार्थबुद्धीनें सदैव झटणारे असे होते. नारदस्मृति व नारदपंचरात्र असे यांचे दोन ग्रंथ आहेत. यांची भक्तिसूत्रे फार प्रसिद्ध असून नवविधा भक्तींपैकीं 'कीर्तन' भक्ति नारदांची होती. महाराष्ट्रास दीर्घकाळ परिचित असलेल्या कीर्तनसंस्थेचे आद्य प्रणेते नारदच होत. पारमार्थिक आणि सांस्कृतिक ज्ञान सर्वसामान्य जनतेला सुस्पष्ट करून सांगणे व लोकांचीं मनें भक्तिप्रेमाकडे वळविणें हें कीर्तनसंस्थेचें ध्येय आहे. नारदांनीं हें कार्य अखंडपणें केले. आजच्या वृत्तपत्रव्यवसायाचे जे प्रमुख अंग वार्ताहर वा बातमीदार यांचें मूळ थेट नारदापर्यंत पोंचतें. नारदांची अस्थिरता प्रसिद्ध आहे. नारद हें ब्रह्मांडांतील यच्ययावत् व्यवहार जाणणारे, गुप्तवार्ता कळवून सुरासुर मनुष्यांना उद्योगप्रवण करणारे, त्रिलोकांत दुराभिमानी जीवांमध्यें कलह उत्पन्न करून त्यांचा गर्व दूर करणारे आणि लोककल्याणार्थ सतत भ्रमण करणारे म्हणून प्रसिद्ध आहेत. 'महती' नांवाची वीणा वाजवीत ज्ञानप्रसाद करून नारदांनीं असंख्य लोकांना सुखी केलें आहे. "Narad's constant mission is the good of Universe" असें एका आंग्ल पंडिताने म्हटलें आहे.

नारदांचा संगीतशास्त्रावरहि एक उत्कृष्ट ग्रंथ आहे. नारदांचे संगीतज्ञान, आणि त्यांविषयींच्या अनेक आख्यायिका, भागवत, ब्रह्मवैवर्त, इत्यादि ग्रंथांत सापडतात. 'नारदांची शरिरकांति दैदीप्य अग्नीप्रमाणें सतेज आहे. नेत्रांचे तेज बालार्कवत् आहे. मस्तकावर जटाभार बांधला असून शरीर सुवर्णभूषित आहे. त्यांनीं कक्षेंत एक वीणा बाळगली आहे. ...' इत्यादि वर्णन 'हरिवंश' नांवाच्या ग्रंथांत सांपडतें.

श्रीधरानें शिवलीलामृतांत नारदांचा थोडक्यांत विशेष सांगितला आहे तो असा—

" (नारदा,) तूं भक्तिप्रकाश दिवटा । कीं भाक्तिमार्गाचा मार्गद्रष्टा ।
नारदा, तुझा उपकार मोठा । भक्तीच्या पेठा वसविल्या तुवां ॥ "



## वैशाख व. १२　(१) 'होती ऐसी नाहीं झाली मुक्ताबाई!'

शके १२१९ च्या वैशाख व. १२ रोजीं प्रसिद्ध संत ज्ञानदेव यांची बहीण मुक्ताबाई हिने एदलाबाद येथे समाधि घेतली.

ज्ञानेश्वरादि चार भावंडांत मुक्ताबाई आपल्या वैशिष्टयानें प्रसिद्ध आहे. चौदाशे वर्षे जिवंत राहून गर्व करणाऱ्या योगेश्वर चांगदेवाची ती गुरु होती.

" चवदाशें वर्षें शरीर केलें जतन। नाहीं अज्ञानपण गेलें माझें ॥ १ ॥
अहंकारें माझें बुडविलें घर। झालों सेवाचोर स्वामीसंगे ॥२॥
अभिमानें आलों श्रीअलंकापुरीं। अज्ञान केले दूरी मुक्ताबाईनें ॥ ३ ॥ "

अशी चांगदेवांची कबुली आहे. समाजाकडून होणाऱ्या छळाला कंटाळून ज्ञानेश्वर खिन्न झाले; आणि खोलींत बसून त्यांनीं खोलीचे दार (ताटी) लावून घेतलें. तेव्हां 'ताटी उघडा ज्ञानेश्वरा' म्हणून मुक्ताबाईनें म्हटलेले ताटीचे अभंग प्रसिद्ध आहेत.

आपलें अवतारकृत्य संपवून ज्ञानेश्वर व सोपानदेव समाधिस्थ झाले होते. 'तापसांचा मेळा फुटला' म्हणून मुक्ताबाई खिन्न झाली. 'मुक्ताई उदास झाली असे फार। आतां हें शरीर रक्षूं नये' असे विचार तिच्या मनांत येऊं लागले. "वैशाखाचा महिना असल्यामुळें ऊन रखरख करीत होतें. तापी तीरावर वैष्णवांचा मोठा समुदाय जमला होता. एदलाबादेहून दोन मैलांवर असणाऱ्या माणेगांव येथें एकांतांत निवृत्तीने गंगाधारेजवळ मुक्ताईला तिच्या ब्रह्मभावाचें स्मरण दिले. "अंतरबाहेर स्वामींचें स्वरूप। स्वये नंदादीप उजळीला.' असें म्हणून स्वरूपाकार स्थितींत आकाश गर्जून विजेचा प्रचंड कडकडाट झाला व मुक्ताबाई सहजस्वरूपीं मिळून गेली. 'एक प्रहर झाला प्रकाश त्रिभुवनीं। जेव्हां निरंजनीं गुप्त झाली ॥' तो दिवस वैशाख वद्य द्वादशी हा होय. मुक्ताबाई डोळयांनीं न पाहतांच एकाएकीं गुप्त झाली म्हणून सर्वांना वाईट वाटले. 'होती ऐसी नाहीं झाली मुक्ताबाई। संत ठायीं ठायीं स्फुंदताती।" अशी अवस्था सर्वांचीच झाली. मुक्ताबाई गुप्त झाल्या तेथून दोन मैलांवर त्यांचें देऊळ बांधलें आहे. त्यांचे अभंग गोड आहेत.

— १९ मे १२९७

## वैशाख व. १२ (२) केशवचैतन्यांची समाधि !

शके १४९३ च्या प्रजापति संवत्सरीं वैशाख व. १२ रोजीं राघवचैतन्यांचे विख्यात शिष्य व प्रसिद्ध भगवद्भक्त तुकारामबोवा यांचे गुरु केशवचैतन्य ऊर्फ बाबा चैतन्य यांनीं पुणें जिल्ह्यांतील जुन्नर गांवाशेजारील ओतूर येथे समाधि घेतली.

शके १४४२ मध्ये तिनवेल्ली येथील तपोनिष्ठ ब्राह्मण नृसिंहभट्ट हा यवनांनीं त्रास दिल्यामुळे पुनवाडी म्हणजे पुणें येथे येऊन राहिला. त्याला त्र्यंबक, विश्वनाथ व बापू असे तीन पुत्र झाले. वडिलांच्या मृत्यूनंतर मुलांमध्यें कलह सुरू झाले. विश्वनाथांची म्हणजे " बाबांची वृत्ति उदासीन । त्रिकाळ करावें संध्यास्नान । धर्मालागी उदार पूर्ण । गृहकृत्य कांहीं करूं नये " अशी परिस्थिति असतां दोघां बंधूनीं यांना घराबाहेर काढलें. आपली पत्नी गिरिजाबाई हिला बरोबर घेऊन विश्वनाथबाबा तीर्थयात्रा करीत करीत ओतुरास आले. बाबा संसारानें तप्त झाले होते. " कानीं नाहीं बाळी बुगडी । मिळालीं नाहीं लेणीं लुगडीं। सुख नाहींच अर्धघडी। जालें यांचे संगतीनें " अशी तक्रार बायकोहि करूं लागली. याच समयीं ओतुरास यांना राघवचैतन्य भेटले. राघवचैतन्य हे " उत्तमनामनगरी । मांडवी पुष्पावतीचे तीरीं ॥ " फार दिवस तप करीत होते. उत्तम नगरी म्हणजे ओतूर. 'जाल्या नखांच्या चुंबळी। अंगावरी वाढली धूळी। जटा लोंबती भूतळीं। देह शुष्क जाहला।' अशी तीव्र तपश्चर्या राघव-चैतन्यांची सुरू होती. विश्वनाथबाबांनीं वैतागून 'संन्यासदीक्षा द्या' असा आग्रह राघवचैतन्यांजवळ धरला. पण पुत्र झाल्याशिवाय संन्यासदीक्षा घेतां येत नाहीं, असे सांगून त्यांनीं विश्वनाथाला परत पाठविलें. पुढें दीड वर्षानें बाबाजीस पुत्र झाल्यावर " वैराग्यें चित्त शुद्ध जालें. । स्त्रीचें रीणही फिटलें ॥ " म्हणून राघवचैतन्यांनीं त्यांना संन्यासदीक्षा देऊन त्यांचें नांव केशवचैतन्य ठेवलें. त्यानंतर हे गुरुशिष्य त्र्यंबकेश्वर, द्वारका, प्रयाग, काशी, इत्यादि तीर्थयात्रा करून आले. जनांची उपाधि वाढल्यावर राघवचैतन्यांनीं समाधि घेतली. त्यांचे शिष्य केशवचैतन्य यांनीं त्यांचेनंतर शके १४९३ मध्यें वैशाख वद्य १२ ला समाधि घेतली.



—२० मे १५७१

## वैशाख व. १३ पांडव अज्ञातवासास निघाले !

वैशाख व. १३ या दिवशीं द्यूतांत पराभव झाल्यामुळें पांडव बारा वर्षांच्या वनवासास व एक वर्षाच्या अज्ञातवासास निघाले.

सर्वस्व हरण झाल्यावरहि धर्मराज पुन्हा द्यूत खेळावयास बसला. आतां कोणता पण होता ? तर जो हरेल त्याने बारा वर्षें वनवास भोगावा व एक वर्ष अज्ञातवासांत काढावें. पूर्वीप्रमाणेंच कपटाने डाव टाकून शकुनीनें 'जित' म्हणून पण जिंकला !

पांडवांनीं आपलीं बहुमोल वस्त्रें टाकून देऊन वल्कले धारण केलीं. दुःशासनान द्रौपदीसंबंधानें गलिच्छ उद्‌गार काढल्याबरोबर भीम संतापून गेला; आणि त्याचा वध युद्धांत करण्याची प्रतिज्ञा भीमाने केली. जाण्यापूर्वी धृतराष्ट्रास नमस्कार करून युधिष्ठिर म्हणाला, " ईश्वराच्या दयेनें वनवास संपल्यावर मी आपल्या पायांचें दर्शन घेण्यास पुन्हा येईन." या वेळीं भीष्म–द्रोणांचीं मने दुःखानें आणि लज्जेने करपून गेलेलीं असल्यामुळें त्यांनीं कांहींच उत्तरे दिलीं नाहींत. द्रौपदीहि, कुंती, गांधारी यांचा निरोप घेण्यास निघाली. कुंतीनें तिला नीट उपदेश केला. धर्मानें वागणारे पांडवहि यानंतर वनवासास निघाले. सर्वांच्या-पुढें युधिष्ठिर, त्याच्यामागून क्रमानें भीम, अर्जुन, नकुल, सहदेव, द्रौपदी व धौम्य असे चालले. जातांना धर्मानें आपले डोळे हातांनीं झांकले होते; भीम आपल्या प्रचंड बाहूंकडे पाहत होता; अर्जुन रस्त्यानें वाळू टाकीत होता, सहदेवानें आपल्या तोंडास काळें फासलें होतें; व नकुलाने आपलें सर्वांग धुळीने माखले होते. द्रौपदी आपले केस मोकळे सोडून आणि त्या केसांनीं आपलें तोंड झांकून रडत चालली होती. पांडव वनवासास निघाले तेव्हां सृष्टिमातेनेंहि आपलें दुःख उत्पात व अपशकुन यांच्या द्वारां प्रकट केलें. नारद धृतराष्ट्राकडे येऊन बोलले, " दुर्योधनाच्या या अपराधांमुळें सर्व कौरवांचा व क्षत्रियांचा भीमार्जुनांच्या हातून युद्धांत संहार होणार !" कौरवपक्षास अर्थातच त्याबद्दल पांडवांच्या वनवास–गमनाबद्दल कांहीं वाईट न वाटतां उलट आनंदच झाला. 'आजपासून दुर्योधन सार्वभौम राजा झाला' असें कर्णानें म्हटल्यावर धृतराष्ट्रासहि हर्ष झाला.

● ● ●

## वैशाख व. १४ खंडेराव दाभाडे यांचा मृत्यु !

शके १६५१ च्या वैशाख व. १४ रोजीं मराठेशाहीच्या आपत्प्रसंगीं पराक्रम गाजविणारे खंडेराव दाभाडे यांचें निधन झालें.

दाभाडे घराण्याचा मूळ पुरुष येसाजी. याचा खंडेराव हा थोरला मुलगा. छत्रपति राजाराममहाराज जिंजीस गेले तेव्हां तो त्यांचेबरोबर होता, तेथून परत आल्यावर छत्रपतींनीं त्यांना सेनाधुरंधर हें पद देऊन खंडेरावास गुजराथकडे व बागलाणाकडे मुलुखगिरीवर पाठविलें. आणि वस्त्रें व पोशाख देऊन निशाण व जरिपटका हवालीं केला. पुढें शाहूनें त्याला सेनापतिपद दिलें. त्याच वेळीं दिल्लीच्या बादशहानें दख्खनचा सुभेदार सय्यदबंधूंपैकीं हुसेनअल्ली याच्याविरुद्ध उठविण्यास शाहूस कळविलें असतां शाहूनें तें काम खंडेरावावर सोंपविलें. यानें खानदेश–गुजराथवर स्वाऱ्या करून हुसेनचा रस्ता अडवून त्याची फौज कापून काढली. यानंतर शाहूनें त्याला कळवलें कीं, "आपण गुजराथ व काठेवाडाकडे मराठ्यांचा अमल बसवावा. दरमहा हुजूरखर्चास ऐवज देत जावा. फौज बाळगावी, थोरले महाराज धान्य व नक्त श्रावणमासीं धर्मादाय देत असत. तो सेनापति यांनीं आपल्या तालुक्यांपैकीं दोनचार लाख रुपये खर्च करून कोटि लिंगें ब्राह्मणांकडून करीत जावीं."

बाळापूरच्या लढाईत तो हजर असून फत्तेसिंग भोंसल्याच्या आधिपत्याखालीं कर्नाटकांत झालेल्या स्वारींतहि त्याची कामगिरी मोठी होती. वसई ते सुरत-पर्यंतचें कोंकण काबीज केल्यामुळें शाहूनें त्याच्याबद्दल पुढील उद्‌गार काढले, "बडे सरदार मातबर, कामकरी, हुषार होते," इतिहासप्रसिद्ध उमाबाई दाभाडे ही त्यांचीच पत्नी. त्यांचा मुलगा त्रिंबकराव हाहि बापासारखा शूर होता. संताजी घोरपडे, धनाजी जाधव, रामचंद्रपंत, शंकराजी नारायण, इत्यादि लोकां-पेक्षां राजाराममहाराजांनीं खंडेरावास जास्त उत्पन्न दिलें होतें. जवळजवळ सातशें गांवांची देशमुखी त्याला मिळाली असल्यानें तो वतनदाराचा मुकुट-मणि ठरतो. त्यांचा पराक्रम विशेष दर्जाचा होता. अनेक प्रसंगीं त्यांनीं आपल्या शौर्यानें मराठेशाहीचें नांव राखलें आहे.

— १५ मे १७२९

## वैशाख व. ३०  मराठी राज्याचें उदक सुटलें!

शके १७४० च्या वैशाख व. ३० रोजीं शेवटचा पेशवा बाजीराव हा अशीरगडाजवळ ढोलकोट येथे जनरल मालकम याच्या स्वाधीन झाला आणि त्यानें मराठी राज्याचें उदक इंग्रजाच्या हातावर सोडलें!

अठराव्या शतकांत मराठ्यांच्या राज्यास उतरती कळा लागली. शके १७३९ च्या पावसाळ्यांत बाजीराव पंढरपुराहून माहुलीस गेला व तेथें इंग्रजांशी युद्ध करण्याची तयारी करूं लागला. त्याचा मुख्य सेनापति बापू गोखले हा होता. पण अल्प तयारीनें तरबेज इंग्रजांशीं तोंड देणें कठीण होतें. खडकी, कोरेगांव, अष्टी या ठिकाणीं लढाया होऊन मराठ्यांचा पराभव झाला. नागपूरकर भोसलेहि पराजित झाला. शेवटीं बाजीरावानें पळ काढला आणि नर्मदा उतरून शिंद्याची मदत मिळवण्याचा प्रयत्न चालू केला. पण त्यांतहि त्याला यश आले नाहीं. बाजीराव अगदी कंटाळून गेला होता. बहुतेक आश्रितांनीं त्याला सोडले होते. सैन्यांतील अरब, पुरभय्ये असे आडदांड लोक बंडखोर होण्याच्या मार्गावर असल्यामुळे बाजीरावास शरण जाण्याखेरीज मार्ग नव्हता. त्यानें आपला वकील महू येथील छावणींत असणाऱ्या जनरल मालकमकडे पाठविला. मालकमनें त्याला सालिना आठ लक्ष रुपये जहागिरी देण्याचे कबूल केल्यावर बाजीराव त्याच्या छावणींत येऊन राहिला. "मी दक्षिणेत कधींहि परत जाणार नाहीं व मी किंवा माझे वारस पेशवाईच्या गादीवर किंवा मुलुखावर हक्क सांगणार नाहींत." अशीं कबुली बाजीरावानें दिली. मराठी राज्याचे सौभाग्य त्या ठिकाणीं हरपलें! मराठ्यांची राज्यलक्ष्मी आपण होऊन इंग्रजांच्या घरांत गेली! बाजीरावास गंगा-कांठीं राहण्याची परवानगी मिळाली. आणि बरीच चौकशी होऊन कानपुरा-जवळ बिठूर ऊर्फ ब्रह्मावर्त हें क्षेत्र बाजीरावानें पसंत केलें, तेव्हां त्याची तिकडे रवानगी झाली.

छत्रपति शिवराय यांनीं संस्थापिलेल्या, बाळाजी विश्वनाथ, बाजीराव, माधवराव यांनीं वर्धिलेल्या मराठी राज्याचा अशा विपरीत रीतीनें अंत झाला।

— ३ जून १८१८




श्रीशिवाजी. राणी लक्ष्मीबाई. राणा प्रताप, [illegible]
विवेकानंद. चित्तरंजनदास. हेडगेवार. [illegible]

## ज्येष्ठ शु. १ श्रीराम–हनुमंत भेट !

ज्येष्ठ शु. १ या दिवशीं पंपा सरोवराकाठीं प्रभु रामचंद्र आणि हनुमंत यांची भेट झाली.

मतंग ऋषींच्या आश्रमांतील शबरीचा पाहुणचार स्वीकारून रामचंद्र पंपा सरोवराच्या तीरीं आले. सरोवराची शोभा पाहून रामांना सीतेची पुन्हा स्मृति झाली आणि त्यांच्या विलापास सुरुवात झाल्यावर लक्ष्मणानें त्यांना धीर दिला. राम-लक्ष्मण सरोवराच्या कांठानें ऋष्यमूक पर्वताकडे येत असतांना त्यांना सुग्रीवानें पाहिलें. वालीच्या भीतीने सुग्रीव या पर्वतावर दडून राहिला होता. हे वालीकडून तर कोणी आले नसावेत ना, या शंकेनें सुग्रीव भयभीत झाला. त्याने मारुतीस तपास करण्यास सांगितल्यावर हनुमंतानें पर्वतावरून उड्डाण केले, आणि कपिरूप सोडून भिक्षूच्या रूपानें तो राम-लक्ष्मणापुढे येऊन ठाकला. राम-लक्ष्मणाला त्यानें वालीच्या दुर्वर्तनाची हकीकत सांगून सुग्रीवाशीं सख्य करण्यास विनंति केला. लक्ष्मणाने आपली अयोध्यावियोगापासून सीताहरणा-पर्यंतची सारी हकीकत निवेदन केली. त्यांनींहि सुग्रीवाच्या भेटीची इच्छा व्यक्त केल्यावर हनुमान मोठ्या प्रेमानें म्हणाला, " सुग्रीव सीतेच्या शोधांत आपणांस खात्रीने मदत करील."

त्यानंतर आपलें मूळचे कपिरूप धारण करून राम-लक्ष्मणांना आपल्या पाठी-वर बसवून मारुतीनें उड्डाण केलें आणि ऋष्यमूक पर्वत ओलांडून मलय पर्वता-वर आणून सोडले. तेथें त्याने त्यांची आणि सुग्रीवाची भेट घडवली. दोघांनाहि फार आनंद झाला; व त्यांनीं एकमेकांस प्रेमाने आलिंगन दिलें. हनुमानानें याच समयाला काष्ठें आणून अग्नि प्रज्वलित केला. आणि त्याला साक्ष ठेवून राम- सुग्रीवांचें सख्य कायम केलें. त्यानंतर रावणाबरोबर असणाऱ्या सीतेने कांहीं दागिने टाकलेले होते ते ओळखण्यास सुग्रीवानें रामापुढें टाकले. ते अलंकार पाहून रामाच्या डोळ्यांत अश्रु जमा झाले., सीतेच्या चरणसेवेंतच मग्न असणाऱ्या लक्ष्मणानें फक्त नूपुर ओळखून हे दागिने सीतेचेच आहेत असा निर्वाळा दिला.

● ● ●

## ज्येष्ठ शु. २ हळदीघाटाचा घनघोर संग्राम !

शके १४९८ च्या ज्येष्ठ शुद्ध २ रोजीं अकबरपुत्र सेलिम आणि महापराक्रमी राणा प्रताप यांची हळदीघाट येथें घनघोर लढाई झाली.

राणा प्रताप आपलें सामर्थ्य वाढवून चित्तोड परत घेण्याची गर्जना करीत आहे हें अकबरास समजल्यावर त्याने मानसिंग आणि सेलिम यांना राणा प्रतापचा पराभव करण्यास पाठविले. दोनहि सैन्यांच्या गांठी हळदीघाटाच्या खिंडींत पडल्या. प्रतापसिंह मानसिंहावर डोळा ठेवून होता. राणा बेफामपणे सैन्याच्या मध्यभागीं शिरला व त्याने आपला चित्तक घोडा सेलिमच्या हत्तीवर धातला. " चित्तक हत्तीच्या गंडस्थळावर पाय ठेवून उभा राहिला. प्रतापनें तीव्र वेगानें सेलिमच्या वक्षावर भाल्याचा प्रहार केला. परंतु सेलिम बचावला....या झटाप्रटींत प्रतापास सात जखमा झाल्या. चित्तकाचा पायहि जखमी झाला होता. त्याने आपल्या धन्यास वांचविण्याची पराकाष्ठा केली." दुथडी भरून वाहणाऱ्या ओढ्यापलीकडे चित्तकनें एकदां उडी मारून राण्याला शत्रुसैन्यांतून दूर केले. चित्तक थकून गेला होता. प्रतापास पाठीवर घेऊन तो एकसारखा धांवत होता. या संकटाच्या काळीं अकबरास फितूर झालेला प्रतापाचा भाऊ पश्चात्तापाने शुद्ध होऊन राण्यास भेटला. आपल्या धन्यास आधार मिळाला असें पाहून त्या मुक्या जनावराने जमिनीला पाठ लावून धन्याच्या पायाशीं प्राण सोडला. या स्वामिभक्त 'चित्तक'चें स्मारक एक चबुतरा बांधून करण्यांत आलें.

हळदीघाटाच्या लढाईत राणा प्रतापाचे पुष्कळच सैन्य कापलें गेले. किल्ल्याच्या संरक्षणासाठीं प्रतापानें बराच टिकाव धरला. पण कोणा दुष्टाने ज्या पाण्यावर राण्याची उपजीविका होत होती त्या विहीरींत विष कालविलें... प्रताप आश्रयहीन झाला. सेलिम व प्रताप या दोघांचेहि अनेक हाल झाले. प्रतापाच्या चौदा हजार सैन्याची कत्तल झाल्यामुळें त्याच्यावर भयंकर प्रसंग ओढवला गेला. या कत्तलीमुळें मेवाडमधील प्रत्येक घरांत रडण्याचा सूर ऐकूं येत होता.

—३० मे १५७६

## ज्येष्ठ शु. ३ राणा प्रतापसिंहाचा जन्म !

शके १४६२ च्या ज्येष्ठ शु. ३ रोजीं उदेपूरचा पराक्रमी राणा प्रतापसिंह याचा जन्म झाला.

अतुल पराक्रम, आत्यंतिक स्वार्थत्याग, मूर्तिमंत देशाभिमान, आणि धर्माभिमान इत्यादि गुणांमुळें राणा प्रतापांचे नांव अजरामर झाले आहे. प्रतापसिंह हा उदयसिंहाचा पुत्र. गादींवर आल्यापासूनच चितोडचे पूर्वीचें वैभव व सामर्थ्य परत आणण्याच्या तयारीस राणा प्रताप लागला. परिस्थिति प्रतिकूल होती. बहुतेक रजपुतांनीं मुसलमानांना आपल्या मुली देऊन सोयरीक केली होती. प्रतापी राण्याला हें सहन झालें नाहीं. मागील राणे कमकुवत निघाले, तेवढ्या अवधींत अकबर बादशहानें सारीं रजपूत राज्यें आपल्या ताब्यांत आणण्याचा सपाटा चालविला होता. चितोड परत घेणे हें राणा प्रतापाचे ध्येय होतें. त्यासाठीं त्याला कित्येक दिवसपर्यंत रानावनांतून हिंडावे लागलें, कंदमुळांवर निर्वाह करावा लागला. त्याची धडाडी पाहून अकबर म्हणे, "मला शरण ये, मी तुला तुझें राज्य देतो." त्यावर राणा प्रताप सांगे, "मी बाप्पारावळचा वंशज, राज्यप्राप्तीसाठीं शत्रूला शरण जाऊन अभिमानशाली रजपूत कुल कलंकित करणार नाहीं." चितोडच्या गादीवरून उदेपूरचें घराणे पदच्युत झाल्यापासून चितोडला एक प्रकारचें वैधव्य आलें होतें. चितोड परत घेईपर्यंत सोन्यारुप्यांच्या ताटांऐवजीं पानापत्रावळीवर भोजन करावयाचें, आणि बिछान्यावर न झोंपतां गवताच्या शय्येवर झोंपावयाचे अशी प्रतापाची प्रतिज्ञा होती. एखाद्या तपस्व्याप्रमाणें राण्यानें आपली दाढीहि वाढविली होती.

प्रताप खरा योद्धा होता. त्याच्या शौर्याची वाहवा प्रत्यक्ष शत्रुहि करीत. "त्याचा स्वधर्म, स्वदेश व स्वकुल यासंबंधींचा अभिमान तर सूर्याइतका तेजस्वी आणि प्रखर होता. अकबरांशीं युद्ध करण्यांत दाखवलेलें शौर्य अलौकिक होतें. तो जसा वीर तसाच मोठा क्षमाशील, उदार अंतःकरणाचा व नीतिपरायण होता. त्यानें अनेक वेळां युद्धप्रसंगीं सांपडलेल्या बेगमांना सन्मानपूर्वक वागविलें. त्याच्या मरणानंतर शत्रूंनींहि आंसवे गाळलीं."

—९ मे १५४०

## ज्येष्ठ शु. ४　　शिवरायांची मुंज !

शके १५९६ मधील ज्येष्ठ शु. ४ रोजी छत्रपति श्रीशिवाजीमहाराज यांची चव्वेचाळिसाव्या वर्षी मुंज झाली.

तीस वर्षांच्या अविरत पराक्रमाने संस्थापलेल्या राज्याला खरें वैभव प्राप्त व्हावे म्हणून राज्याभिषेकाचा विचार शिवरायांनीं केला. परंतु, व्यावहारिक अडचणी पुष्कळ निर्माण झाल्या. भोंसल्यांचे कुळ महाराष्ट्रांतील इतर सरदार हीन समजत असत. धार्मिक आचारहि लुप्त झालेले असल्यामुळें हें क्षत्रिय घराणें शूद्रांत मोडत होतें. शास्त्रोक्त राज्याभिषेक व्हावयास शिवरायांना 'क्षत्रिय' होणें जरूर होते. 'स्वराज्य नष्ट झाल्यामुळे धर्माचार लुप्त झाले होते. महाराष्ट्रांत तर यादवांचें राज्य संपल्यानंतर राज्याभिषेकाचा विधिच कोणास ठाऊक नव्हता' शिवाजीचें हें काम करण्यास त्या काळीं महाराष्ट्रांत कोणीहि पंडित तयार नव्हते. कलियुगांत क्षत्रियांचें अस्तित्व नाहीं असे प्रतिपादन शास्त्री, पंडित करूं लागले होते. त्यामुळे शिवाजीस मूळ संशोधन करणे प्राप्त झालें. बाळाजी आवजी चिटणीस यांच्याकडून उदेपूरहून राज्याभिषेक समारंभाची व आपल्या भोंसले-कुलाची पूर्वपीठिका प्राप्त करून घेतली. गोविंदभट्ट खेडकर वगैरे मंडळींस काशीस पाठवून त्या वेळचा सुप्रसिद्ध विद्वान् गागाभट्ट यांस दक्षिणेंत येण्याविषयीं शिवाजीने विनंति केली. रामदासस्वामी व इतर प्रतिष्ठित मंडळींचा सल्ला घेऊन शिवरायानें आपले इष्ट कार्य करण्यास प्रारंभ केला.

वैशाखाच्या महिन्यांत चिपळुणास जाऊन शिवाजीने लष्कराची पहाणी केली आणि नंतर परशुरामाच्या मंदिरांत पूजा करून शिवराय रायगडास आले. नंतर प्रतापगडावर जाऊन त्यांनीं तुळजाभवानीचे दर्शन घेतलें व देवीला छपन्न हजार रुपये किमतीचें सुवर्णछत्र अर्पण केलें. तेथून परत आल्यानंतर ज्येष्ठ शुद्ध ४ रोजीं शिवरायांची मुंज झाली. रायगडावर एक महान् घटना घडणार म्हणून सर्वांचे डोळे शिवरायांकडे लागून राहिले. अनेकांच्या डोळ्यांचें पारणें थोड्याच दिवसांत फिटणार होतें.

— २९ मे १६७४

## ज्येष्ठ शु. ५ सालबाईचा तह !

शके १७०४ च्या ज्येष्ठ शु. ५ रोजी इंग्रज आणि मराठे यांच्यांत प्रख्यात असा सालबाईचा तह झाला.

वडगांवच्या तहानुसार राघोबाचा पेशवाईवरील अधिकार नाहींसा झाला होता. बुंदेलखंडांतील बारा लाखांची जहागिरी घेऊन झांशी येथे त्यांनी राहावे असे ठरले होते. पण वस्ताद रघुनाथरावांनीं चोळीमहेश्वरजवळ नर्मदा उतरीत असतांना शिंद्यांच्या फौजेवर हल्ला करून तिचा नाश केला. व तो इंग्रजांच्या आश्रयास जाऊन राहिला. इंग्रज सेनापति गॉडर्ड यास वडगांवचा तह कबूल नव्हता. त्यानें पावसांळा झाल्यावर गुजराथमध्ये लढाईस सुरुवात केली. डभई व अहमदाबाद हीं शहरे आपल्या ताब्यांत घेतलीं. गॉडर्डचा समाचार घेण्यास महादजी शिंदे सिद्ध झाले. परंतु फारसा उपयोग झाला नाहीं. कोंकणांतील लढाईस सुरुवात झाल्यावर वसई इंग्रजांच्या ताब्यांत गेली. रामचंद्र गणेश मृत्यु पावले. इंग्रजांची सरशी होत चालल्यामुळे नानांनीं सर्वांची जूट करण्याचा निश्चय केला. शिंदे, होळकर, भोंसले, निजाम, हैदर व फ्रेंच या सर्वांनीं एकत्र व्हावें; व चोहो बाजूंनीं इंग्रजांस वठणीस आणावें अशी योजना होती; पण तीहि नीटशी सिद्धीस गेली नाहीं. हैदराने मात्र मद्रासकर इंग्रजांस जेर केल्यामुळें इंग्रज तहास तयार झाले; पण नाना हैदराखेरीज तह करण्यास तयार नव्हते. त्यामुळे गॉडर्ड पुण्यावर चाल करून आला. परशुरामभाऊ पटवर्धन बारा हजार फौजेनिशीं तोड देण्यास निघाले. हरिपंत, तुकोजी होळकर व नाना यांनींहि तीस हजार फौजेसह गॉडर्डवर हल्ला केला. रसद बंद झाल्यामुळे गॉडर्डचें कांहीं चालेनासे झाले. इंग्रजसेना जर्जर झाल्यावर गॉडर्ड कसाबसा पनवेलीस जाऊन पोचला. शिंद्यांच्या मदतीने तहाच्या वाटाघाटी सुरू झाल्या. शेवटीं ज्येष्ठ शु. ५ रोजीं सालबाई येथें तह ठरला. मुख्य कलमे अशीं होतीं —

(१) राघोबाने इंग्रजांचा पक्ष सोडावा.
(२) एकमेकांनी एकमेकांचीं घेतलेलीं ठाणीं परत करावींत.
(३) साष्टी इंग्रजांचेकडेच राहावी.
(४) शिंदे याना मध्यस्थीबद्दल भडोच मिळावे.

— १७ मे १७८२

## ज्येष्ठ शु. ६ सिंहगड व जसवंतसिंग!

शके १५८६ च्या ज्येष्ठ शु. ६ रोजीं जसवंतसिंगानें सिंहगडचा वेढा उठविण्याचें ठरवून सिंहगडावर डागलेल्या तोफा खालीं आणिल्या.

शाहिस्तेखानाचा समाचार घेऊन शिवराय सिंहगडास परतले. पहांट झाल्याबरोबर मोंगली फौजा त्वेषानें सिंहगडावर चाल करून आल्या. मोंगल अगदीं नजीक आल्याबरोबर वरून शिवाजीनें तोफांचा मारा सुरू केला. बरेच लोक जखमी झाले. खान मोठ्या विचारांत पडला. — वेढा घालून बसावें तरी पुढें पाऊसकाळ नजीक आला; शिवाजी दगेबाज आहे, तोफखाना आल्याशिवाय यशप्राप्ति नाहीं; बरें तोफखाना आणावा तरी अडचणीच्या जागेंत मराठे सहज त्याचाच नाश करतील,— या चिंतेत खान असतांच किल्ल्यावरील गोळ्याने त्याचा हत्ती ठार झाला. शाहिस्तेखान नाउमेद झाला. आपली उरलीसुरली फौज घेऊन शिवाजीच्या जवळ राहणें ठीक नाहीं असें समजून औरंगाबाद येथें छावणींत जाऊन राहिला. त्यानंतर जसवंतसिंगानें सिंहगडास वेढा घातला. हा जसवंतसिंग औरंगजेबाचा मोठा मित्र होता. सहा महिनेपर्यंत जसवंतसिंगाने पुष्कळ यत्न केला. दारूगोळा आणि माणसें यांची फारच हानि झाली आणि येत चाललेल्या अपयशाबद्दल इतरांना दोष देऊन त्याने कोंडाण्याचा वेढा उठविला. अर्थात् कोणत्याहि प्रकारचा फायदा त्याला झाला नाहीं.

जसवंतसिंग हा मारवाडच्या गजासिंहाचा धाकटा मुलगा. तो जसा शूर होता तसा उत्तम लेखकहि होता. 'आनंदविलास', 'अनुभवप्रकाश', 'अपरोक्षसिद्धांत', 'सिद्धांतबोध', 'भाषाभूषण' वगैरे ग्रंथ यानें लिहिले आहेत. हिंदी साहित्यांतील तो मुख्य आचार्य होता. 'भाषाभूषण' नांवाचा ग्रंथ पाठ्य पुस्तक म्हणून प्रसिद्ध आहे. औरंगजेब बादशहाची मर्जी याजवर फार होती. काबूलच्या स्वारींत त्यानें चांगलाच पराक्रम केल्यावर बादशहानें त्याला 'राजा' ही पदवी दिली. शेवटीं औरंगजेबाचें व त्याचे पटेना. तेव्हां त्याची रवानगी दूर काबूल येथें झाली. तेथेंच जमरुद येथें त्याचा अंत झाला. जसवंतसिंगानें आपल्याजवळ गुहिलोत चतुराजी या कृषिविद्याविशारदास ठेवलें होते. त्याच्याच संमतीने यानें काबूलचे डाळिंब मारवाडांत आणलें.

— २० मे १६६४

## ज्येष्ठ शु. ७ "वीरांगनेप्रमाणें मला मृत्यु येत आहे !"

शके १७८० च्या ज्येष्ठ शु. ७ या दिवशीं झांशीच्या लक्ष्मीबाईनीं १८५७ च्या स्वातंत्र्यसमरांत आत्मबलिदान केले.

"हातांत तलवार आणि कुडींत प्राण आहे तोंपर्यंत झांशी माझी आहे" अशी राणीची प्रतिज्ञा होती. परंतु ह्यू रोझ यानें झांशीस वेढा दिलेला परतवितां न येऊन राणी ग्वाल्हेरला आली. तेथेंहि शत्रूचा वेढा पडला. शत्रूची फळी फोडून जाण्याचा प्रयत्न तिने केला. दोन इंग्रज शिपाई तिच्या पाठीमागें धांवत होते. वाटेंत एक नाला आला. राणीचा घोडा पैलतीर गांठूं शकला नाहीं. स्वतःचा देह जिवंतपणे दुसऱ्याच्या हातीं जाऊं नये ही भारतीय स्त्रीची वृत्ति राणीमध्ये उसळून वर आली. यासाठीं तिनें आपली रक्ताने न्हालेली तलवार सरसावली. एका शिपायाने पुढून राणीवर वार केला. दुसऱ्याने मागून केला. राणीचे शरीर रक्तानें माखून गेले. उग्र रूप धारण करून शेवटचा प्रयत्न तिनें केला. दोनहि शिपाई मारल्यानंतर रणशालिनी लक्ष्मी फिकी पडली. राणीनें शेवटचे वाक्य उच्चारले, "वीरांगनेप्रमाणे मला मृत्यु येत आहे." तिच्या मुखावर थोडा उल्हास उमटला आणि या भारतीय स्वातंत्र्यलक्ष्मीनें आपले डोळे मिटले !

वरसईकर विष्णुभट गोडसे यांनीं आपल्या 'माझा प्रवास' या लिखाणांत लक्ष्मीबाईचें करुण चित्र रेखाटले आहे. "झांशीची राणी दृष्टीस पडली. तिचें सर्व अंग धुळीनें भरलेले होते. तोंड किंचित् आरक्त असून म्लान व उदास दिसत होतें. बाईस तृषा फार लागली होती. मी रस्सीमडकें विहिरींत सोडणार तोंच बाई म्हणाल्या कीं, तुम्ही विद्वान् ब्राह्मण, मजकरतां पाणी काढूं नका. मीच काढून घेतें.... बाईनीं मृण्मय पात्रांतून ओंजळीनें पाणी पिऊन तृषा हरण केली. दैवगति मोठी विचित्र आहे. नंतर मोठ्या निराशेनें बोलल्या कीं, "मी अर्धा शेर तांदुळाची धनीन, मजला ××× विधवाधर्म सोडून हा उद्योग करण्याची कांहीं जरूरी नव्हती. परंतु हिंदुधर्माचा अभिमान धरून या कर्मास प्रवृत्त झाले; व याचकरितां वित्ताची, जीविताची सर्वांची आशा सोडली."

— १८ जून १८५८

## ज्येष्ठ शु. ८ "तुझ्या पापाचें हेंच प्रायश्चित्त"!

ज्येष्ठ शु. ८ या दिवशीं प्रभु रामचंद्रांनीं सुग्रीवाचा बंधु वाली याचा वध केला.

वाली दुराचरणी होता. सुग्रीवाच्या बायकोचे हरण करून वालीने त्याला देशोधडीला लावलें होतें. वाली मोठा बलाढ्य असा राजा होता. तेव्हां त्याला शासन करण्याचें रामाने ठरविलें. दोघां भावांमधील वाली ओळखतां यावा म्हणून गजवेलीची माळ सुग्रीवाच्या गळयांत रामांनीं घातली. राम, लक्ष्मण, हनुमान, इत्यादि मंडळी झाडींत दडून बसल्यावर सुग्रीवाने मोठ्याने भूःभूकार केला; आणि वालीस हांक ठोकली. रंगमहालांत असलेला वाली त्वेषाने बाहेर येऊं लागला तेव्हां त्याच्या पत्नीने न जाण्याविषयीं वालीला विनवणी केली. पण वाली न ऐकतांच किष्किधा नगरीच्या बाहेर आला. भावाभावांचे युद्ध पुनः सुरू झाले. त्यांनीं एकमेकांना लाथांनीं, बुक्क्यांनी, थपडांनी व झाडांच्या फांद्यांनीं यथेच्छ झोडपलें, पण कोणीहि हार जाईना. सुग्रीवाची बाजू पडती दिसूं लागल्यावर रामांनीं एक बाण सोडून वालीला विव्हल केले. बाण वर्मी लागल्यामुळें वाली धाडकन् जमिनीवर पडला. इंद्रानें दिलेला सुवर्णकंठा गळयांत असल्यामुळें त्याचा प्राण गेला नाहीं. झाडाआडून बाण मारल्यामुळे वालीनें रामास पुष्कळ दोष दिला. तेव्हां रामांनीं त्याला सांगितलें; "हल्लीं तूं कामांध होऊन धर्माचरण सोडून निंद्य कर्म करीत आहेस. भावाच्या पत्नीवर नजर ठेवण्यात तुझेकडून केवढे पाप होत आहे! तुझ्यासारख्या पातक्याला वध हीच शिक्षा आहे." वालीनें रामाचें म्हणणें मान्य केलें. आपल्या पुत्राचा, अंगदाचा सांभाळ करण्यास वालीनें रामापाशीं विनंति केली. वालीवधाची बातमी तारेला—त्याच्या पत्नीला समजतांच तिनें अतोनात शोक केला. सुग्रीवहि किंकर्तव्यमूढ होऊन बसला होता. त्याला वालीचें उत्तरकार्य करावयास लक्ष्मणाने सुचविलें. चंदनकाष्ठेच्या चितेवर सुग्रीव व अंगद, यांनीं वालीचा देह उचलून ठेविली. आणि त्याला यथाशास्त्र अग्नि दिला. याप्रमाणे रामांनीं आपल्या समक्ष वालीच्या उत्तरकार्याचा समारंभ पार पाडला. शूरांचें वैर मरणानंतर संपतें. अशा प्रकारें दुराचारी वालीस रामाने मुक्त केलें.

● ● ●

## ज्येष्ठ शु. ९ परशुरामपंत प्रतिनिधींचें निधन !

शके १६४० च्या ज्येष्ठ शु. ९ रोजी औंध संस्थानचे मूळ संस्थापक परशुराम त्र्यंबक प्रतिनिधि यांचे निधन झाले.

सातारा जिल्ह्यांतील वर्धनगडाखालील किन्हई गांवाचे हे कुलकर्णी होत. वयाच्या चौदाव्या वर्षी कुलकर्णीपण सोडून हे विशाळगडी गेले व तेथें निळो सोनदेव अमात्य यांच्या पदरीं यांनीं नोकरी पत्करली. राजाराममहाराज जिंजीकडे गेले त्या वेळेस त्यांनी यांना सरदारकी देऊन ‘समशेर बहादरजंग’ अशी पदवी दिली. मोंगलांना तोंड देण्यासाठी यांची योजना झाल्यावर मोठ्या पराक्रमानें मोंगलांपासून यांनीं पन्हाळा घेतला; आणि मिरजेपासून रांगण्यापर्यंत सारा मुलूख सोडविला. शौर्याबरोबरच यांच्या अंगीं भगवद्भक्तिहि उत्कटपणें वास करीत होती. स्वतः चागले संस्कृतव्युत्पन्न असून कीर्तन करीत. त्यांची थोडी-बहुत काव्यरचनाहि आहे. त्यांना राजाराममहाराजांनी प्रतिनिधिपद शके १६२१ मध्यें तात्पुरतें दिलें; त्यानंतर त्यांना पेशवेपदहि देण्यांत आलें होतें. शाहूमहाराजांनीं पुन्हा पंतांना प्रतिनिधिपद, “एकनिष्ठपणाची सीमा केली, महत्कार्य करून राज्यरक्षण केले, म्हणून वंशपरंपरेनें वतनी करून दिलें.” ताराबाईने शाहूच्या विरुद्ध राजनिष्ठ राहण्याबद्दल ज्यांच्याकडून शपथा घेतल्या होत्या त्यांपैकीं ते एक होते. त्यासाठी त्यांना तुरुंगवासहि भोगावा लागला. परंतु खटावकरांवर केलेल्या स्वारींत त्यांच्या मुलानें चांगला पराक्रम केल्यामुळें यांची मुक्तता होऊन प्रतिनिधिपद यांना पुनः मिळाले. शके १६४० मध्यें यांचा मृत्यु सातारा येथे झाला. यांचें व यांच्या पत्नीचे वृंदावन संगम माहुलीस आहे.

याच्या चिरंजीवांनीं कोल्हापूरकरांचा पक्ष स्वीकारल्यामुळें शाहूची प्रतिनिधीं-वर इतराजी झाली. शाहूच्या सांगण्यावरून त्याला ठार करणार इतक्यांत खंडो-बल्लाळ तेथें आले व त्यांनीं प्रतिनिधींचा जीव वांचविला. या वेळेपासून प्रति-निधींच्या घराण्यांत श्राद्ध होई त्या वेळेस इतर ब्राह्मणांबरोबर खंडोबल्लाळ चिटणिसाच्या घराण्यांतील एका प्रसिद्ध मनुष्यास आमंत्रण होत असे.

— २७ मे १७१८

## ज्येष्ठ शु. १० गंगा नदीचें अवतरण !

ज्येष्ठ शु. १० या दिवशीं इक्ष्वाकु-कुलांतील प्रसिद्ध राजा भगीरथ यानें आपल्या पितरांच्या' उद्धारासाठीं मोठ्या प्रयत्नानें गंगेला प्रसन्न करून पृथ्वीवर आणिले.

गंगा स्वर्गातून विष्णूच्या चरणापासून निघाली ती शंकराच्या मस्तकावरून खालीं पृथ्वीवर वाहत वाहत आली व हरिद्वार, प्रयाग, वाराणशी वगैरे स्थानांवरून पूर्व समुद्राला जाऊन मिळाली. याच गंगेमुळें सगराच्या पुत्रांचा उद्धार झाला. त्याचप्रमाणे असत्य भाषण, कठोर भाषण, चहाडी, वृथा वल्गना; चौर्यकर्म, हिंसा, अनीतिकारक विषयभोग, परापहार, दुराग्रह व अनिष्ट चिंतन या दहा पातकांचे हरण गंगास्नानाने होत असल्यानें तिला दशहरा असेहिं नांव आहे. गंगा नदी ही हिंदुस्थानची वरदायिनी माता आहे. अनेक कवींनीं तिचे स्तवन केलें आहे. शंकराचार्य म्हणतात — " हे देवी, तुझ्या जलाचें पान करून सर्व विषयांपासून मी अलिप्त झालों आहे. आतां भगवंतांचे पूजन करावें अशी इच्छा आहे. तूं तापत्रयाचे निवारण करणारी आहेस –" आदि कवि वाल्मीकि म्हणतात, – " तुझ्यावरील तरंगांचे सौंदर्य अवलोकन'करीत व तुझे जलपान करीत तुझ्या कांठीं मी वास करून राहावे. तुझे नामस्मरण करीत असतांनाच माझा देह पडो — "

गंगेच्या कथेस सामाजिक व ऐतिहासिक महत्त्व आहे — " यांत प्राचीन इक्ष्वाकु वंशाचा इतिहास गोंवलेला दिसतो. सगर राजाचे सहस्रावधि प्रजानन पूर्व देश काबीज करण्यासाठीं गेले. त्यांचेंच कार्य पुढे चालवून भगीरथानें आर्यांची विजय-पताका ' गंगासागरावर ' रोविली. ' सगर ' राजाची स्मृति म्हणून सगरास सागर आणि भगीरथाच्या प्रयत्नाने गंगेच्या कांठचा प्रदेश हस्तगत झाला म्हणून गंगेस भागीरथी हीं नांवें प्राप्त झालेलीं असावीत — " मराठीचे महाकवि मोरोपंत यांनीं म्हटलें आहे. —

" न उपासावे, गंगे देवि ! तुला अंतरोनि पायसदा ।
तुकडा शिळाहि खावा; जवळ करावे तुझेचि पाय सदा – "



## ज्येष्ठ शु. ११ — शिवरायांची सुवर्णतुला !

शके १५९६ च्या ज्येष्ठ शु. ११ रोजीं श्रीछत्रपति शिवाजीमहाराज यांनीं आपली सुवर्णतुला केली. तिला १६,००० होन लागले.

आपल्या संस्कृतीत दानविधीला फार महत्त्व आहे. अग्निपुराणांत एके ठिकाणीं सोनें, घोडा, तीळ, हत्ती, दासी, रथ, भूमि, घर, कन्या व कपिला अशीं दहा महादानें सांगितलीं असलीं तरी त्यांची संख्या तुलापुरुष, हिरण्यगर्भ, ब्रह्मांड, कल्पवृक्ष, गोसहस्र, कामधेनु, हिरण्याश्व, हेमहस्तिरथ, पंचलांगल, हैमधरा विश्वचक्र, कल्पलता, सप्तसागर, रत्नधेनु, महाभूतघट, अश्वरथ– अशीं सोळा समजलीं गेलीं आहे. हीं दाने कोणीं केव्हां कोठे करावींत याविषयीं अग्नि, गरुड, भविष्योत्तर, मत्स्य, लिंग, इत्यादि पुराणांत सांगितलें आहे. दानसागर, दान-चंद्रिका, दानमयूख, दानकल्पद्रुम, वगैरे ग्रंथांतूनहि याची माहिती आली आहे. अशा प्रकारचीं महादानें आपल्या देशांत फार पूर्वींपासून चालत आलीं आहेत. " तात्त्विक वाङ्मयात्मक पुराव्यांवरून या महादानांचे अस्तित्व सातव्या शतकांत होते असें म्हणावयास हरकत नाहीं. परंतु त्यांच्या अस्तित्वाचा काळ आणखीहि मागे जातो. शिलप्पदिकारंमधील प्रसंग खरोखरीच इ. सनाच्या दुसऱ्या शतकांत झाला असेल तर या दानाचा काळ त्या शतकापर्यंत जाऊन पोंचतो. तुलादान करणारे पुरुष राजे किंवा राजकल्पव्यक्ति असल्या तरी स्त्रिया व राजपुरुषेतर व्यक्ति यांची तुला करण्यास धर्मशास्त्राचा विरोध नाहीं. तुलेकरितां उभारावयाचें तोरण लांकडी असावें असें धर्मशास्त्रांत सांगितलें असलें तरी विजयनगर सम्राटांनीं व त्रावणकोरच्या राजांनीं वारंवार तुला कर-ण्यास सोईचे जावें म्हणून कायमचीं दगडी तोरणें उभारलेलीं होतीं. तुलारोहण सवस्त्र, सायुध व सालंकार करावे असें सांगितले आहे. त्यामुळें तुला करणाऱ्या व्यक्तीचे निश्चित वजन समजणे कठीण पडतें. "

विजापूरच्या सुलतानाचा प्रधान मुरार जगदेव यानें शके १५५५ भाद्रपद अमावास्या ( सूर्यग्रहण ) अशा समयीं भीमा व इंद्रायणी यांच्या संगमावर तुला केल्याचें प्रसिद्ध आहे.



—४ जून १६७४

## ज्येष्ठ शु. १२ (१) कालिकत बंदरीं वास्को-ड-गामा !

शके १४२१ च्या ज्येष्ठ शु. १२ रोजीं प्रसिद्ध पोर्तुगीझ खलाशी वास्को-ड-गामा हा 'केप-ऑफ-गुड-होप' ला वळसा घालून कालिकत या बंदरांत येऊन दाखल झाला.

हिंदुस्थानच्या सुवर्णभूमीकडे पश्चिमेकडील व्यापाऱ्यांचें लक्ष चौदाव्या-पंधराव्या शतकापासूनच लागलेले होतें. शके १४१९ मध्यें वास्को-ड-गामा युरोपचा किनारा सोडून निघाला. प्रवासांत सर्व मिळून दोनशे लोक होते. नोव्हेंबरच्या सुमारास त्यांनी आफ्रिकेचें दक्षिण टोक ओलांडिले. त्या ठिकाणीं तुफानांचा फारच त्रास झाल्यामुळे लोक कंटाळून गेले. पण पुढे लौकरच ख्रिस्तजयंतीच्या दिवशी त्यांना जमीन लागली. तिचे त्यांनीं-नाताळ-म्हणजे जन्म-असे अन्वर्थक नांव ठेविले. त्यानंतर मोझांबिक, मोंबासावरून वास्को-ड-गामा मलिंद येथे आला. तेथील राजानें त्याचा सत्कार करून सांगितलें, "खंबायत येथें न जातां कालिकोट येथे जा." त्यानंतर प्रवास करीत करीत गामा यानें कालिकत बंदरांत ज्येष्ठ शु. १२ या दिवशीं आपलीं जहाजे नांगरलीं. पोर्तुगीझ लोकांना हा मार्ग सांपडला तेव्हां 'भुकेलेल्या लांडग्यांचे कळप उत्कृष्ट मेंढरांच्या कळपांवर जसे जाऊन पडतात" तशी त्यांची स्थिति झाली. त्या वेळीं कालिकत हे व्यापाराचें फार मोठे केंद्र होतें. तेथील राजास झामोरिन म्हणजे सामुद्री असें नांव होतें. त्याच्या राज्यांतील व्यापार मक्का व कायरो येथील श्रीमान अरबांच्या ताब्यांत होता. अर्थात् त्यांना पोर्तुगीझांबद्दल वैमनस्य वाटले. गामा मोठा वस्ताद होता. 'हरवलेल्या गलबतांचा शोध करण्यास आलो आहो; आतां मसाले वगैरे विकत घेऊन परत जाऊं' असे राजास गामानें कळविलें. आणि झामोरिननेंहि त्याला वाटेल तो व्यापार करण्यास परवानगी दिली. अनेक प्रकारच्या चिजा गामाने राजास नजर केल्या. राजा खुष झाला. त्यानें कळविलें, "आपल्या घराण्यांतील सरदार वास्को-ड-गामा हे आमच्या राज्यांत आल्यामुळें आम्हांस फार संतोष होत आहे." त्यानंतर गामानें झामोरिनलाच पराजित करून पाश्चात्य संस्कृतीचा पाया भारतांत रोविला.

—२२ मे १४९९

## ज्येष्ठ शु. १२ ( २ ) संभाजी राजे यांचा जन्म !

शके १५७९ च्या ज्येष्ठ शु. १२ रोजीं धर्मवीर छत्रपति संभाजीमहाराज यांचा पुरंदर किल्ल्यावर जन्म झाला.

दोन वर्षांतच आई सईबाई वारल्यामुळें त्याचे संगोपन आजी जिजाबाई हिने केले. संभाजींचें बालपण साहसांत व धामधुमींतच गेलें. वयाच्या नवव्या वर्षी बापाबरोबर तो आग्र्यास गेला होता. तेथे शिवाजीच्या साहसाचा विलक्षण परिणाम त्याच्या मनावर झाला. तो शूर, उदार, आणि दिलदार होता. पुढे तो उतावळा व तामसी बनला. विवेक व शांत विचार त्याला कधीं सुचला नाही. समर्थ रामदास व अमात्य रघुनाथ पंडित हणमंते यांच्या संगतीचा व शिकवणीचा उपयोग झाला नाही. राज्यावर आल्यावर अनेक प्रकारची क्रूर कृत्ये त्याच्या हातून घडलीं. सचिव अण्णाजी दत्तो, त्याचा भाऊ सोमाजी, हिरोजी फर्जंद, बाळाजी आवजी, सावत्र मातोश्री सोयराबाई, इत्यादि अनुभवी व थोर माणसे संभाजीच्या क्रोधास बळी पडलीं ! एकट्या कलुषाशिवाय त्याचा कोणावरहि विश्वास नव्हता. अशा या संभाजीला शेवटीं अत्यंत कठोर प्रायश्चित्त पश्चात्तापदग्ध अवस्थेंत मिळाल्यामुळें त्याचे सर्व दुर्गुण लुप्त झाले.

"— आज राजापुरास तर उद्यां भडोचेस, आज हबसाणांत तर उद्यां फोंड्यावर असा जो एकसारखा विजेप्रमाणे चमकत होता, ज्याने अनेक मुलूख मारून मोंगल बादशहास जर्जर केले, गंगेच्या तीरीं सहा हजार विश्वासघातकी लोकांचा मोठ्या शिताफीनें समाचार घेतला, ज्याने वाघाप्रमाणे शत्रूवर उडी घालण्यास कधींहि जिवाची पर्वा केली नाहीं त्यास औरंगजेबासारख्या बलिष्ठ बादशहानें व्यसनाधीनतेच्या वन्य अवस्थेंत विश्वासघाताने पकडले, आणि नीचतेनें त्याचा शिरच्छेद केला. म्हणून आम्ही तज्जातीयांनीं संभाजीचा तिरस्कारच केला पाहिजे असें नाही —" स्वतः केलेल्या अपराधांचें त्यास मिळालेल्या कठोर प्रायश्चित्तानें महाराष्ट्राच्या अंतःकरणांत नवीन चैतन्य निर्माण झालें आणि त्यायोगें पुढे मराठ्यांनीं सर्व मोंगल बादशाही उलथून पाडली. आपल्या राजाच्य अमानुष वधाबद्दल महाराष्ट्रांत सूडाची भावना व्यक्त होत होती.

— १४ मे १६५७

## ज्येष्ठ शु. १३ "आकाश-पृथ्वी शब्देंकरून पूर्ण जाली!"

शके १५९६ च्या ज्येष्ठ शु. १३ रोजीं रायगडावर हिंदवी राज्याचे संस्थापक श्रीशिवाजीमहाराज यांना राज्याभिषेक झाला.

बालपणापासून केलेल्या उद्योगाची सांगता राज्याभिषेकानेच होणें योग्य होतें. हिंदूंचा त्राता, त्यांचा रक्षक, त्यांचा राजा, धर्मरक्षणास सिद्ध आहे हें राज्याभिषेकामुळेंच जगाला जाहीर होणार होतें. मनांत अढी धरून बसणाऱ्या सरदारांना व शत्रुत्वानें वागणाऱ्या अदिलशहा, कुतुबशहा वगैरे पातदशहांना शिवाजीची योग्यता समजून येण्यास हेंच एक साधन होते. आपलें क्षत्रियत्व सिद्ध करून विरोधकांची तोंडे शिवाजीमहाराजांनी बंद केलीं. रायगडावर राज्याभिषेकाची तयारी जोरांत सुरू झाली. "महानद्यांची पुण्योदकें; सुलक्षणी गजाश्व, व्याघ्रचर्म व मृगचर्म, छत्रचामरादि राजचिन्हें, सुवर्णकलश, सिंहासन, असें सर्व साहित्य जमविण्यांत येऊन आप्तजन, विद्वान्, पंडित, लहानमोठे सरदार व सेवकजन, इत्यादि लोकांना निमंत्रणें पाठवून बोलावण्यांत आले." ज्येष्ठ शु. ४ ला मुंज व शु. ६ ला समंत्रक विवाह, हे विधि झाले. मंगलस्नान करून वस्त्रभूषणे परिधान केल्यानंतर ज्येष्ठ शु. १३ रोजीं तीन घटका रात्र उरली तेव्हां शिवाजी महाराजांनीं सिंहासनारोहण केलें. त्यानंतर ब्राह्मणांनीं मंत्राक्षतांची व इतरांनीं सुवर्ण-रौप्यपुष्पांची वृष्टि शिवरायांवर केली. राज्यांत तोफांची सरबत्ती झाली. गागाभट्टांना एक लक्ष रुपये दक्षिणा व बहुमोल वस्त्रभूषणे मिळालीं. त्याचप्रमाणे गोसावी, तापसी, गोरगरीब यांचाहि योग्यतेनुरूप समाचार घेण्यांत आला.

या राज्याभिषेकप्रसंगीं शिवाजीस इंग्रजांनीं एक अंगठी, एक चांगली खुर्ची, एक हिरेजडित शिरपेच, दोन हिरेजडित सलकडीं व तीन मोतीं असे जिन्नस दिले. समारंभाचा खर्च पन्नास लाखांचेवर झाला असावा. नवीन राज्याभिषेक शक सुरू करण्यांत आला. पांचसहा शतकें पारतंत्र्यांत रगडून निघालेलें हिंदुराष्ट्र स्वतंत्र झालें. याचा उल्लेख बखरकार करतात, 'ते समयीं मंगलवाद्य, भेरी, गायनादि समारंभ होऊन सर्वहि आकाश-पृथ्वी शब्देंकरून पूर्ण जाली!"

— ६ जून १६७४

## ज्येष्ठ शु. १४ "गंगा मातुश्री साक्ष आहे!"

शके १७७९ च्या ज्येष्ठ शु. १४ रोजीं सत्तावनच्या स्वातंत्र्यसंग्रामांतील विख्यात अशा कानपूरच्या लढ्याला सुरुवात झाली.

दहा मेला सुरू झालेल्या सत्तावनच्या समराच्या ज्वाला सर्व उत्तर हिंदुस्थानांत पसरूं लागल्या. मीरत, दिल्ली येथे लढा सुरू झाला होताच. कानपूरच्या लढ्याला महत्त्व येण्याचें कारण कीं, दुसऱ्या बाजीरावाचे दत्तक पुत्र नानासाहेब पेशवे हे या संग्रामांत सामील झाले. कानपूरचा कलेक्टर हिलडेसन् हा नानासाहेबांचा मित्र होता तरी सुद्धां इंग्रज अधिकारी मनांत ओळखून होतेच कीं, " नानासाहेब बिथरलेले दिसतात. " परंतु हिल्डर्सन् यांच्या सांगण्यावरून नानासाहेबांची योजना दारूगोळा व पैसा यांवर झाली होती. कानपूर येथील पलटणींत दंगलोला सुरुवात होत होती. कटवाल्यांतील टिकासिंग वगैरे प्रमुख व्यक्ति नानासाहेबांकडे आल्या. बऱ्याच वाटाघाटी होऊन नावेमध्यें कटवाले व नानासाहेब याच्यांत शपथविधि झाला. नानांनीं अभिवचन दिलें, " मी तुमच्या म्हणण्याबाहेर नाहीं, जर इतके लोक धर्माकरितां मरून जाण्यास तयार आहेत तर मीहि आपल्या बायकांमुलांवर पाणी सोडतों. यास गंगा मातुश्री साक्ष आहे.! " आणि त्याप्रमाणें नानासाहेबांनी कानपूरच्या रेसिडेन्सीवर ज्येष्ठ शु. १४ रोजीं हल्ला चढविला. इंग्रजांनीं ब्रेरेच दिवस टिकाव धरिला. परंतु शेवटीं नानासाहेबांपुढे कांहीं चालत नाही हें पाहून बायकामुलांचें रक्षण व्हावें म्हणून इंग्रजानीं शस्त्रे खालीं ठेविलीं आणि ते क्रांतिकारकांना शरण आले. नानासाहेब क्रांतिवीरांना मिळाल्यामुळें सरकारी खजिन्यांतील अडीच लक्ष रुपये व सर्व दारूगोळा क्रांतिकारकांच्या हातीं आला. इंग्रज लोक मोठ्या शौर्यानें लढले, पण नाइलाजास्तव त्यांना तह करणें भाग पडलें. नानासाहेबांना एक लक्ष रुपये देऊन इंग्रजांनीं बचावासाठी योजना स्वीकारली व प्रयागास नावेत बसून जाण्यास इंग्रजांना परवानगी मिळाली. सत्तावनच्या क्रांतियुद्धांत ज्यांनीं प्राणपणानें सामना दिला त्यांत नानासाहेबांची योग्यता मोठी आहे. परंतु दुर्दैवानें शेवटीं त्यांना यश मिळालें नाहीं.

— ६ जून १८५७

## ज्येष्ठ शु. १५ (१) महात्मा कबीरांचा जन्म!

शके १३२१ च्या ज्येष्ठ शु. १५ ला उत्तर हिंदुस्थानांतील विख्यात संत आणि धर्मसुधारक कबीर यांचा जन्म झाला.

चौदह सौ पचपन साल गए, चंद्रवार एक ठाट ठए।
जेठ सुदी बरसायत को, पूरनमासी प्रगट भए॥"

असा एक दोहा कबीरांच्या जन्मासंबंधीं प्रसिद्ध आहे. भारतीय इतिहासांत कबीरांचे स्थान अत्यंत महत्त्वाचे आहे. चौदाव्या शतकांत सामाजिक विषमता वाढून बाह्याचारामुळें हिंदु-मुसलमानांत तीव्र मतभेद निर्माण झाले होते. विद्येचे मालक ब्राह्मण बनले असून इतर समाज अज्ञानग्रस्त झाला होता. धर्माच्या नांवावर अधर्म सुरू होऊन सर्वत्र कलह माजून राहिला असतांना बहुजन-समाजाला योग्य मार्ग दाखविण्याचे कार्य कबीरांनीं केले. दोनहि धर्मातील सत्याचे कठोर रूप कबीरांनीं स्पष्ट करून पाखंडी व ढोंगी लोकांच्यावर प्रहार केले. सरळ जीवन, सत्यता आणि स्पष्ट व्यवहार असा यांचा उपदेश होता. कबीरांचे काव्य 'बीजक' नामक ग्रंथांत एकत्रित केले आहे.

कबीरांच्या जन्मासंबधी अनेक मतभेद आहेत. दंतकथा अशी आहे की, रामानंदांच्या आशीर्वादानें एका विधवा ब्राह्मण स्त्रीस जो मुलगा झाला तोच पुढे कबीर म्हणून प्रसिद्धीस आला. जनलज्जेस भिऊन त्या स्त्रीने आपल्या मुलाचा त्याग केल्यावर नीरु नांवाच्या कोष्ट्यानें कबीरांचे पालनपोषण केले. लोई नांवाच्या स्त्रीशीं त्यांचा विवाह होऊन कमाल व कमाली अशीं दोन अपत्येंहि यांना झाली होतीं. कबीरांचे तात्त्विक सिद्धांत फारच उच्च दर्जाचे आहेत. त्यामध्ये गूढवादाची छाया असून परमेश्वर हा प्रियतम व जीव ही पत्नी अशा भावनांवर त्यांचे तत्त्वज्ञान साकार झालें आहे. कबीरांच्या सत्यभक्तीमुळें त्यांना फारच त्रास सहन करावा लागला. त्या वेळच्या सिकंदर लोदीने त्यांचे हातपाय जखडून त्यांना गंगेत फेकून दिले होते, परंतु परमेश्वराच्या कृपेने ते जगले. कबीरांचा जातिभेद, उपासतापास या कर्मकांडावर बिलकुल विश्वास नव्हता. आपल्या तत्त्वाच्या प्रसारासाठीं त्यांनीं सर्व हिंदुस्थानभर प्रवास केला.

—२० मे १३९९

## ज्येष्ठ शु. १५ ( २ ) शहाजी राजांची सुटका!

शके १५७१ च्या ज्येष्ठ शु. १५ रोजीं शहाजी राजे यांची विजापूरकरांच्या कैदेतून सुटका झाली.

अदिलशाहींतील सरदार मुस्तफाखान याने २५ जुलै १६४८ या दिवशीं शहाजीस कैद केले होते. बादशहास ही हकीकत समजल्यावर अफझलखान आणि खानखानान महंमदखान यांना शहाजीला आणण्यासाठीं बादशहानें जिंजीस रवाना केले. खान महंमदाने मोठा विजय मिळवून शहाजीस विजापूर येथे आणिलें. शहाजीबद्दल दरबारांतहि तूर्त अनुकूल वातावरण नव्हते. कर्नाटक प्रदेश जिंकून तेथे स्वामित्व स्थापिण्यास शहाजी विरोधी आहे, तो हिंदूंचा कैवारी आहे, बंगलोर येथें स्वतंत्र राज्य स्थापन करण्याचा त्याचा हेतु आहे, इत्यादि कागाळ्या बादशहाच्या कानावर होत्याच. इकडे शिवरायांनाहि याविषयीं चिंता होतीच. माघार न घेतां सुटका करण्याचा प्रयत्न त्यांनी चालू केला. शहाजीबद्दल कर्नाटकांत सर्व ठिकाणीं आदर आहे, मावळांतील शिवाजीचें कर्तृत्व वाढत आहे, या स्थितींत शहाजीशी नमतें घ्यावें असा विचारहि बादशहा आतां करूं लागला होता; आणि त्या दृष्टीने वाटाघाटी सुरू झाल्या. 'कोंडाणा, बंगलोर व कंदापिली हीं ठिकाणे शहाच्या ताब्यांत यावीत; आणि शहाजीनें निष्ठेने सेवा करावी' असा सूर होता. शहाजीने वरकरणी मान्यता देऊन म्हटले, "माझी व कुटुंबाची अब्रूने उद्योग करण्याची व्यवस्था लावून द्यावी; म्हणजे आम्ही इमाने-इतबारें सेवा करण्यास तयार आहोंत; बंडाळी करून राज्यास अपाय करण्याची इच्छा नाहीं." यानंतर शहाजीची सुटका ज्येष्ठ शु. १५ स सन्मानपूर्वक झाली. पांच लक्षांची जहागिरी आणि तंजावरचा कारभार यांची प्राप्ति होऊन शहाजी कर्नाटकांत रवाना झाला. यानंतर कान्होजी जेधे व दादाजी कृष्ण लोहोकरे यांच्यांत आणि शहाजींत मोगली अदिलशाही फौजेस विरोध करण्याच्या शपथा झाल्या. शहाजीच्या सुटकेमुळें कोंडाणा व बंगरूळ हे किल्ले विजापूरकरांकडे गेले. शिवरायांवरहि नजर ठेवण्याची जबाबदारी कांहीं अशीं शहाजीवर येऊन पडलीच.

— १६ मे १६४९

## ज्येष्ठ व. १ रणजितसिंगांचें निधन !

शके १७६१ च्या ज्येष्ठ व. १ रोजीं पंजाबांतील शीख लोकांचा शूर, मुत्सद्दी व युद्धशास्त्रांतील जाणता महाराजा रणजितसिंग यांचे निधन झालें.

महासिंगानंतर वयाच्या तेराव्या वर्षी रणजिंतसिंग गादीवर आला. आपल्या पराक्रमानें वयाच्या एकोणिसाव्या वर्षी शीख राजांचे आधिपत्य त्यानें आपणांकडे घेतलें. स्वतःस 'राजा' ही पदवी घेऊन १७२४ मध्यें त्यानें अमृतसर जिकलें. इंग्रज अधिकारीहि त्याला भिऊन वागत असत. इंग्रज नमतें घेऊन त्याला आपला जिवलग दोस्त म्हणवीत असत. त्याने चाळीस वर्षे सतत परिश्रम करून शीख लोकांत लष्करी सामर्थ्य उत्पन्न केलें. त्याचें निधन झाले तेव्हां दिल्ली, आग्रा, अलाहाबाद आदि इंग्रजांच्या मुख्य छावणींतून त्याच्या' वयाच्या' संख्ये-इतक्या एकूणपन्नास तोफांची सलामी देण्यांत आली होती. सर लॉवेल ग्रिफीन याच्यासंबंधीं लिहितो, "रणजितनें आपलें राज्य लष्करी दराऱ्यावर व शिस्तीवर स्थापन केलें; त्याचा राज्यकारभार व्यवस्थित होता." त्यानें शीखांच्या सैन्यांत उत्तम पायदळ, सुव्यवस्थित घोडदळ व चांगला तोफखाना यांची भर घातली. त्याच्या सैन्यांतील वेंचुरा, अलार्ड व ऑव्हिटे बिलो हे तीन सेनापति प्रसिद्ध नेपोलियनच्यां हाताखालीं शिक्षण घेतलेले होते.

रणजितसिंग अटक नदी उतरून पलीकडे जाऊं लागला तेव्हां त्याचा गुरु येऊन म्हणूं लागला कीं, 'अटकेच्या पलीकडे जाण्यास हिंदूंना मनाई आहे.' तेव्हां त्याने उत्तर दिले कीं,

"सब भूमि है गोपालकी, इसमे अटक कहॉं।
जिसके मनमें खटक रही, वोही अटक रहा —"

"सर्व पृथ्वी देवाची असून तिच्या पाठीवर कोठेंहि जाण्यास हरकत नाहीं. ज्याच्या मनांत संशय आहे तोच थांबून राहतो."

त्याच्या जन्माच्या वेळीं पंजाबांत लहान लहान राज्यें निर्माण झालीं होतीं. त्यांच्यांत वारंवार तंटे लागत असत; परंतु रणजितसिंगानें सर्वांना आपल्या सत्तेखालीं आणून त्यांना योग्य दिशा दाखवली.

— २७ जून १८३९

## ज्येष्ठ व. २ संघटनेचा प्रवर्तक गेला !

शके १८६२ च्या ज्येष्ठ व. २ या दिवशीं सकाळीं ९ वाजून २७ मिनिटांनीं राष्ट्रीय स्वयंसेवक संघ या संघटणेचे जनक डॉक्टर हेडगेवार यांनीं अंतिम श्वास सोडला.

आदल्याच दिवशी त्यांचे लंबर पंक्चर केले त्या वेळीं त्यांना अतोनात वेदना झाल्या. आदल्या दुपारीं त्यांच्या मानसिक व्यथांची परिसीमा झाली. त्यांच्या अंतःकरणांत त्या वेळीं प्रलयकाळाचें तुफान उसळले होतें. रक्ताचे पाणी करून जोपासलेल्या व वाढवलेल्या कार्याचें आपल्या मागें काय होईल या आशंकेनें त्यांच्या हृदयांत न भूतो न भविष्यति असा आकात उडाला होता ... रात्रीं २॥ वाजल्यासून त्यांना मूर्च्छा आली. ज्येष्ठ व. २ ला पहांटे १०६ पर्यंत तापमान चढले. निर्दय मृत्यूचें हे क्रूर कर्म भोवतालच्या मंडळींना पाहवत नव्हते. सुमारें तासभर ऊर्ध्व चालू होतें ... ९ वाजून २७ मिनिटांनीं श्वासोश्वास बंद होऊन डॉक्टरांनीं मान खालीं टाकली ! सबंध नागपूर शहर दुःखाने हादरून निघालें. हजारों लोक डॉक्टरांच्या अंत्यदर्शनास येत होते. शवाची मिरवणूक नागपूरच्या इतिहासांत अत्यंत मोठी व अभूतपूर्वच होती. वाटेत शेकडो ठिकाणीं हार घालण्यांत आले ; पुष्पवृष्टि झाली. छायाचित्रें घेण्यांत आलीं. रेशीमबाग संघस्थानींच दहनाला परवानगी मिळाली होती. संघाच्या 'ओ. टी. सी.' मधील स्वयंसेवकांच्या चाळीस दिवसांच्या तपश्चर्येने पावन झालेल्या भूमीवरच दहनविधि झाला !

"डॉक्टर लहानपणापासूनच एक उच्चतम ध्येय डोळयांसमोर ठेवून वागत असत. अठरा वर्षें सतत विचार आणि तपश्चर्या केल्यानंतरच त्यांनीं एक विचारसरणी निश्चित करून राष्ट्रीय स्वयंसेवक संघाची स्थापना केली. त्यांनीं आपली विचारपद्धति व कार्यपद्धति अशा कुशलतेनें रचलेली आहे कीं, पक्षोपपक्षांचें वैमनस्य टाळून व सर्व प्रकारच्या पक्षभेदांपासून अलिप्त राहून संघकार्याची अखंडितपणे प्रगतिच होत राहावी."

हिंदूंच्या अवनतीचें मूळ त्यांच्या मनोदौर्बल्यांत आहे हे डॉक्टर हेडगेवार यांनीं सांगितले व वैयक्तिक संसाराची तमा न बाळगतां आसेतुहिमाचल हिंडून संघटणेचा महिमा व तंत्र भारतीय समाजाच्या अंतःकरणावर खोल बिंबविलें.

—२१ जून १९४०

## ज्येष्ठ व. ३ "महाराष्ट्र धर्म रक्षावा !"

शके १६१३ च्या ज्येष्ठ व. ३ रोजीं छत्रपति राजाराममहाराजांनीं हणमंतराव घोरपडे यांना सरंजाम दिला.

संभाजीच्या वधानंतर मोगली सत्तेविरुद्ध प्रक्षुब्ध झालेल्या महाराष्ट्रानें जो लढा दिला त्याला इतिहासांत तोड नाहीं. त्या बिकट प्रसंगीं महाराष्ट्रांतील व्यवस्था रामचंद्रपंत, संताजी घोरपडे, धनाजी जाधव, शंकराजी नारायण, इत्यादि कर्त्या पुरुषांवर सोपवून, राजाराममहाराजांनी जिंजीकडे प्रयाण केलें. जिंजीस पोंच-तांना राजारामाबरोबरच्या मंडळींना बराच त्रास झाला. प्रल्हाद निराजी व खंडो बल्लाळ या स्वामिभक्तांनीं अनेक हालअपेष्टा सोसून जिंजी गाठली. राजारामाने त्यांचा योग्य तो सत्कार केला. जिंजी हे राजधानीचे ठिकाणच झालें. सर्वत्र थोडे स्थिरस्थावर झाल्यावर राजाराममहाराजांनी अष्टप्रधानांच्या नेमणुका करून राज्यकारभारहि चालू केला. त्यांनीं स्वतः छत्रपतिपद व राजचिन्हे धारण केलीं होतीं, परतु विधिपूर्वक राज्याभिषेक–समारंभ मात्र झाला नाहीं. कारण राज्याचा खरा मालक शाहू हा अटकेत होता याची जाणीव राजारामाला पुरेपूर होती. "चिरंजीव शाहू कालेकरून तरी श्री देशीं आणील; तेव्हां संकटीं जीं माणसे उपयोगी पडलीं त्यांच्या तसनसी आम्ही करविल्या, याचा चित्तीं द्वेष करावा हें तरी अविचाराचे कलम. शाहू सर्व राज्यास अधिकारी, आम्ही करतो ते तरी त्यांच्यासाठींच आहे. प्रसंगास सर्व लोकांस त्यांजकडेच पाहणे आहे. हें कारण ईश्वरेंच नेमिले आहे." अशी भावना राजारामाची होती. याच भावनेस अनु-सरून निरनिराळे प्रधान नेमण्यांत आले. औरंगजेबाचा सर्व उद्योग हाणून पाड-ण्याचा डाव मराठ्यांनी रचिला होता. ज्येष्ठ व. ३ रोजीं राजाराममहाराजांनी हणमंतराव घोरपडे यांना सरंजाम ठरवून देऊन त्यांत लिहिले, "महाराष्ट्र धर्म पूर्ण रक्षावा हा तुमचा संकल्प जाणून तुम्हांस जातीस व फौजा खर्चास सहा लक्ष होनांची नेमणूक चालवण्याचा निश्चय करून दिधला असे." याखेरीज आणखीहि कार्यकर्ते होते, त्यांचा योग्य तो सन्मान राजारामाने केला. तिमाजी पिंगळे, सुदर बाळाजी, परसोजी भोसले, आदि वीरपुरुषांचा सत्कार करण्यांत आला होता.

— ४ जून १६९१

## ज्येष्ठ व. ४ टिपूविरुद्ध त्रिवर्गाचा तह !

शके १७१२ च्या ज्येष्ठ व. ४ रोजीं म्हैसूरच्या टिपूचा पराभव करण्यासाठीं मराठे, निजाम व इंग्रज या त्रिवर्गानें एक मोठा तह केला.

चारपांच वर्षांपूर्वीच मराठ्यांनीं टिपूवर मोहीम काढून त्याचा पराभव केला होता. पण त्या वेळीं त्याला पुरती दहशत बसली नव्हती, आणि तहहि घाईने करण्यांत आला होता. तेव्हां सहजच टिपूचा पुनः एकदां जंगी पराभव करावा अशी उत्कंठा मराठे व निजाम या दोघांना लागून राहिली होती. थोड्याच अवधींत म्हणजे शके १७११ मध्ये टिपूने इंग्रजांचा मित्र त्रावणकोरचा संस्थानिक किरीटी रामराजा यावर स्वारी केली. त्यामुळे इंग्रजहि टिपूचा समाचार घेण्यास सिद्ध झाले. आणि टिपूवर संयुक्त स्वारी करण्याचे निजाम, मराठे व इंग्रज यांनी ठरविलें. तिघा स्वतंत्र सत्ताधीशांमध्ये युद्धासारख्या कामगिरीसंबंधी वाटाघाटी सुरू झाल्या. कोणी कोणाच्या हाताखालीं वागावयाचें, मोहीम केव्हां कशी करावयाची, इत्यादि व्यवस्था वर्ष-सहा महिने चालली होती. शेवटीं ज्येष्ठ व. ४ रोजीं पुण्यास सह्या होऊन तह कायम झाला. त्याचीं मुख्य कलमे तीन होतीं : ( १ ) पावसाळ्यापूर्वी व नंतर मराठे व निजाम यांनी टिपूच्या उत्तर सरहद्दीवर पचवीस पंचवीस हजार फौजेनिशीं स्वारी करून साधेल तेवढा मुलूख ताब्यांत घ्यावा. ( २ ) लॉर्ड कॉर्नवॉलीस या इंग्रजी गव्हर्नर जनरलने वेळ पडली कीं दहा हजार इंग्रज स्वारांची फौज दोघांकडे पाठवावी. अर्थात् फौजेचा खर्च इंग्रजांनींच करावयाचा. स्वारीवर निघालेल्या मराठे व निजाम यांच्या सैन्यांच्या मदतीस इंग्रजांनीं दोन दोन पलटणी व सहा सहा तोफा द्याव्यात. त्यांचा खर्च मात्र मराठे व निजाम यांचेकडे असावा. ( ३ ) टिपूचा मुलूख जो मिळेल तो तिघांनीं सारखा वांटून घ्यावा. याखेरीज आणखी अकरा कलमे होतीं, पण तीं तितकी महत्त्वाचीं नाहीत. मोहिमेत मराठ्यांबरोबर मॅलेट व निजामाबरोबर केनावे हजर होते. इंग्रजांकडे सेनापति म्हणून प्रथम मेडोझ व नंतर शेवटपर्यंत स्वतः कॉर्नवॉलीस होता. मराठ्यांचे तर्फे हरिपंत फडके व परशुरामभाऊ पटवर्धन हे प्रमुख होते.

— १ जून १७९०

## ज्येष्ठ व. ५ "या उज्ज्वल कल्पनेला काळें फांसूं नका!"

शके १८३० च्या ज्येष्ठ व. ५ रोजीं मराठींतील ध्येयवादी लेखक व शुद्ध स्वातंत्र्याचे पुरस्कर्ते कै. शि. म. परांजपे यांच्या 'काळ' कचेरीला सकाळीं सहा वाजतां पोलिसांचा गराडा पडला.

स्वदेशभक्तीला राजद्रोहाचें रूप देऊन ब्रिटिश राजवटींत जे खटले झाले त्यांमध्यें शिवरामपंत परांजपे यांच्या या खटल्याचें महत्त्व विशेष आहे. आपल्या ध्येयवादित्वामुळें 'काळ' पत्रानें चांगलाच लौकिक मिळविला होता. सरकारी संक्रांत 'काळ' वर अनेक प्रसंगीं आली होती. 'सरकारविरुद्ध अप्रीतीचे मनोविकार वाढविण्याचे प्रयत्न करणें' हा मुख्य आरोप असला तरी 'हिंदुस्थानांत बॉबगोळे येण्याला कारण इंग्लिश लोकच' हा लेख मुख्यतः कारणीभूत झाला. या खटल्याच्या वेळीं शिवरामपंत यांनीं केलेलं भाषण अति तेजस्वी होतें. या भाषणावरहि सरकारनें बंदी घातली होती. हायकोर्टांत शिवरामपंत यांनीं सांगितले, "हें न्यायाचें कोर्ट आहे आणि येथूनच मला न्याय मिळावयाचा आहे ही गोष्ट माझ्या पूर्ण ध्यानांत आहे. माझ्या लिखाणांत राजद्रोहाचा हेतु मुळींच नव्हता. वस्तुतः माझे लेख स्वदेशभक्तीनें लिहिलेले आहेत.... मी सरकारविरुद्ध राजद्रोह पसरवीत नव्हतो, मी तो थांबवीत होतो.... मी माझ्या देशासाठीं आपले प्राण झिजविले आहेत; आणि यांत मीं कांहीं दोषास्पद गोष्ट केली नाहीं; या माझ्या कार्यांत प्रत्यक्ष न्यायदेवता साहाय्य आहे. या कामांत परमेश्वर माझा पाठिराखा आहे.... वाटेल तर मला आपण दोषी ठरवून शिक्षा करा, मी ती भोगण्यास तयार आहें; पण देशभक्तीसारख्या उज्ज्वल कल्पनेला गुन्हेगारीचे काजळ फांसूं नका!" या परिणामकारक भाषणानंतर शिक्षा सांगतांना जस्टिस दावर बोलले, "तुमच्यासारख्या विद्वान् व गुणी गृहस्थावर हा प्रसंग यावा हें पाहून मला फार वाईट वाटते.... या गुन्ह्यास जन्मठेप, काळ्या पाण्याची किंवा पुष्कळ वर्षांच्या कैदेची शिक्षा सांगितली आहे हें तुम्हांस माहीत आहेच. अगदीं सौम्य शिक्षा म्हणून राजद्रोहाच्या अपराधाबद्दल पंधरा महिने व जातिद्वेषाबद्दल चार महिने सक्तमजुरीची शिक्षा तुम्हांस दिली नाहीं तर मीं आपलें कर्तव्य केलें नाही असें होईल."

—१९ जून १९०८

## ज्येष्ठ व. ६ (१) भाऊसाठीं प्राणत्याग!

शके १६८३ च्या ज्येष्ठ व. ६ रोजीं थोरले बाजीराव पेशवे यांचे चिरंजीव बाळाजी बाजीराव उर्फ नानासाहेब पेशवे यांचे निधन झाले.

त्यांचा जन्म शके १६४२ सालीं मौजे साते (नाणें मावळ) येथें झाला. शाहूनें मिरजेवर स्वारी केली तेव्हां हे प्रथमच लढाईत सामील झाले. बाळाजी बाजीरावांनीं एकवीस वर्षें राज्यकारभार केला. शाहूच्या हयातीपर्यंत त्यांनीं सुरज भेलसे, माळवा, प्रयाग, बंगाल, कर्नाटक, नेवाई, इत्यादि स्वाऱ्या केल्या. कुकडीच्या लढाईत निजामाचा पराभव त्यांनींच केला. "आम्ही गनीम लोक शिवाजी महाराजांचे शिष्य आहोत." असे बाणेदार उद्गार काढून त्यानें निजाम व पेशवे यांचा सलोखा राखला. याच्या कारकीर्दीत मराठी राज्याचा विस्तार बराच झाला. "राज्याची हद्द कृष्णेपासून तुंगभद्रेपर्यंत पुढे सरकली. पेशव्यांची सत्ता कळसास पोचून ते आतां हिंदुस्थानांत सार्वभौमसत्ता स्थापणार असा रंग दिसूं लागला-" पर्वतीवरील देवदेवेश्वराचे देवालय त्यांनींच बांधले. त्याचप्रमाणें पर्वतीचे तळे बांधून पुणे शहराच्या पेठा त्यांनींच वसविल्या. ते उत्तम संस्कृतज्ञ, कलमबहाद्दर, धोरणी व अत्यंत हिशेबी होते. "ते कोठेहि असले तरी सर्व ठिकाणचे व्यवहार स्वतः पहात असत. श्रीरंगपट्टणास राहून दिल्लीचा व बुंदेलखंडांतून कर्नाटकचा कारभार ते पहात असत. उत्तरेकडील वर्चस्व कमी होऊं नये म्हणून त्यांनीं लागोपाठ तीन स्वाऱ्या करून शत्रु-मित्रांवर वर्चस्व बसविले. स्वभावतः ह्यांचा कल तडजोडीकडे असला तरी प्रसंगीं कडकहि होता. बाबूजी नाईक, रामचंद्र शेणवी, महादोबा पुरंदरे, रघूजी भोसले, दमाजी गायकवाड, वगैरे लोक त्यांना विरोध करीत. परंतु यांनीं सर्वांना आपल्या ताब्यांत आणिलें." भाऊसाहेब पानिपताकडे गेल्यावर हे नगर येथें निजामच्या बंदोबस्तासाठीं राहिले होते. पानिपतच्या पराभवाची बातमी यांना भेलसे येथे समजली. त्यांचा धीर खचून ते परत फिरले. आणि एकसारखा भाऊचा ध्यास घेतला. प्रकृति क्षीण होत चालली. बंधुशोक अनावर झाला. तेव्हां हवा पालटण्यासाठीं नानासाहेब पर्वतीवर गेले. तेथेच ज्येष्ठ व. ६ रोजीं त्यांनीं "भाऊ भाऊ" करीत प्राण सोडला.

— २३ जून १७६१

## ज्येष्ठ व. ६ (२) विवेकानंद समाधिस्थ झाले!

शके १८२४ च्या ज्येष्ठ व. ६ रोजीं हिंदुधर्माचा ध्वज जगभर फडकविणारे थोर तत्त्वज्ञानी व उत्कृष्ट वक्ते स्वामी विवेकानंद यांनीं समाधि घेतली.

त्यांचे मूळचें नांव नरेंद्रदत्त. कलकत्त्याजवळ सिमूलिया या गांवीं शके १७८४ साली त्यांचा जन्म झाला. कलकत्ता येथील ख्रिश्चन कॉलेजमध्ये शिकत असतांनाच त्यांनीं भारतीय व पाश्चात्य तत्त्वज्ञानांचा अभ्यास केला. प्रथम यांचा ओढा बुद्धिवादाकडे असून ब्राह्मसमाजाकडे कल होता. तथापि, रामकृष्ण परमहंसांच्या दर्शनानें त्यांच्या मनाची तळमळ दूर होऊन ते त्यांचे शिष्य बनले. – "ईश्वरसाक्षात्कार म्हणजे धर्म अशी यांनी धर्माची व्याख्या केली. प्रथम संन्यास, नंतर सर्व धर्माविषयीं ऐक्यबुद्धि, व नंतर ईश्वरप्राप्ति असा यांचा साधनक्रम होता. रामकृष्णपरमहंस समाधिस्थ झाल्यावर सहा वर्षे ते हिंदुस्थानभर हिंडले. हिमालय व तिबेट येथेंहि कांहीं काळ यांनीं घालविला. नंतर मद्रासहून जपानमार्गें अमेरिकेला गेले. तेथे भरलेल्या जागतिक धर्मपरिषदेंत विवेकानंदांनीं चांगलाच लौकिक मिळविला. आपल्या व्याख्यानांतून भारतीय तत्त्वज्ञानाचे उज्ज्वल रूप सागून त्यांनीं सर्व अमेरिका हालवून सोडली व अगणित शिष्य जोडले. त्यांचा जगप्रसिद्ध 'राजयोग' हा ग्रंथहि याच काळांत लिहिला गेला. त्यानंतर विवेकानंद इंग्लंडला गेले. तेथे मॅक्समुल्लरसारख्या पंडिताशीं परिचय होऊन भगिनी निवेदितासारख्या शिष्या त्यांना लाभल्या. हिंदुस्थानांत आल्यावर यांनीं रामकृष्ण मठाची स्थापना करून आपल्या वेदान्ताला जनसेवेची जोड दिली. कलकत्त्याजवळ बेलूर येथे व हिमालयांत मायावती येथे दोन मठ स्थापून प्लेग, दुष्काळ वगैरेत मदत करण्याची व्यवस्था त्यांनीच केली. अमेरिकेची दुसरी सफर करावी असा यांचा विचार होता. परंतु शरीर मधुमेहाने पोंखरलेलें होतें, पूर्वीचा उत्साह ओसरलेला होता, व भाषणांतील तेजहि कमी झालें होतें. तेव्हां सिलोनहून परत फिरून लौकरच यांनी समाधि घेतली.

रामकृष्णांच्या तत्त्वज्ञानाच्या प्रसारासाठीं यांनी वेदान्त मठ बेलूर या संस्थेची स्थापना केली. शिवाय मायावती येथील 'अद्वैताश्रम' ही संस्था प्रसिद्धच आहे.

—४ जुलै १९०२

## ज्येष्ठ व. ७ (१) " आणि तूं रांडेसारखा रडतोस ? "

शके १६७७ च्या ज्येष्ठ व ७ रोजीं राणोजी शिंद्यांचा ज्येष्ठ पुत्र जयाप्पा शिंदे याचा खून बिजेसिंग यानें मारेकरी घालून केला.

मेडते येथील लढाई जिंकल्यावर जयाप्पाने नागोरास वेढा दिला. जमीन रेताड असल्यामुळे सुरुंग लावूनहि तटाला खिंडारे पाडणे शक्य नव्हते. वेढा सात-आठ महिने चालला होता. त्यामुळे शत्रुपक्षाचा बिजेसिंग त्रस्त झाला. शेवटीं ज्येष्ठ व. ७ रोजीं जयाप्पा चौरंगावर स्नान करून रुमालाने डोळे पुशीत असतां बिजेसिंगांकडून गुप्तपणें आलेल्या तिघां मारेकऱ्यांनीं दोन सुरे जयाप्पाच्या कुशींत खुपसले. जयाप्पा धाडकन् जमिनीवर पडला. थोरल्या बंधूचा हृदयद्रावक शेवट दत्ताजी शिंद्याला कळतांच तो धांवत आला आणि शोक करूं लागला. बिजेसिंगास जोर चढून तो युद्धास प्रवृत्त झाला. सैन्यांत एकच गोंधळ उडून गेला. जयाप्पा मोठा हिंमतीचा असून अजून सावध होता. डोळे उघडून पाहतो तों धाकटा बंधु दत्ताजी शोक करीत असलेला त्याला दिसला. तेव्हां या शूराने त्याला धीर दिला —

" वैरी युद्धास आला, आणि तूं रांडेसारखा रडतोस ? हे क्षात्रधर्मास उचित नाही. आतां मजलो कांहीं होत नाहीं. तुम्हीं शत्रूचा पराभव करावा." या भाषणानें दत्ताजीस ईर्षा चढून त्यानें शत्रूशीं जोराचा सामना दिला. निकराचे युद्ध होऊन बिजेसिंगाचा पराभव झाल्यावर दत्ताजी परत भावापाशीं आला. तों जयाप्पाचे निधन झालें होते. दत्ताजीचा शोक अनावर झाला. ताऊस सरोवर म्हणजे मोराच्या सरोवराजवळ जयाप्पाची छत्री आहे.

जयाप्पा मोठा पराक्रमी होता. शके १६७३ मध्ये फर्रुखबादची लढाई करून त्यानें रोहिल्यांचा मोड केला. ज्या वेळीं सुरजमल्लानें तेजराम यास जयाप्पा शिंदे याजकडे पाठवून आपला बचाव मल्हाररावापासून करण्यास विनवलें तेव्हां त्यानें त्यास तसें आश्वासन दिले; पण यामुळे शिंदे-होळकर यांचे वैमनस्य वाढले.

— ३० जून १७५५

## ज्येष्ठ व. ७ ( २ ) "नानांचा हात लंगडा पडला!"

शके १७१६ च्या ज्येष्ठ व. ७ रोजीं पेशवाईंतील प्रसिद्ध मुत्सद्दी हरिपंत फडके यांचें निधन झालें.

मराठ्यांच्या इतिहासांतील हा काळ अत्यंत विपरीत असा होता. या साला-च्याच आसपास महादजी शिंदे, सवाई माधवराव, अहल्याबाई होळकर, कवि मोरोपंत आदि कर्ती माणसें निघून गेल्यामुळें मराठेशाही पोरकी झाली. नाना फडणिसांच्या घरीं बाळंभट नांवाचा एक भिक्षुक होता. त्याचा हा मुलगा. माधवराव पेशवे यांनीं कारकुनाच्या जागी याची नेमणूक केली. नारायणरावाच्या वधानंतर बारभाईंच्या कारस्थानास मिळून त्यानें मोरोबादादाचें कारस्थान उघ-डकीस आणले. माहीतगिरीं राघोबाचा पाठलाग करून त्याची फौज त्यानेंच उधळून लावली. कर्नल कीटिंग राघोबासह पुण्यावर चाल करून आला तेव्हां त्याच्याशीं सामना हरिपंतांनींच दिला. हैदराकडे त्याची नेमणूक झाली तेव्हां मानाजी फांकडे व बाजीपत बर्वे या फितुर लोकांस, यशवंतराव मान्याला तोफेच्या तोंडीं देऊन त्याने आळा घातला. इंग्रज-मराठे युद्ध, टिपूंवरील स्वाऱ्या यांमध्ये याचा पराक्रम विशेष आहे. नाना फडणिसांच्या पूर्ण विश्वासांतील हरिपंत होता. आपल्या पूर्वायुष्यांत हरिपंत फडके सावकार वानवळे यांच्या घरीं नोकर होते. पुढें नांवा-रूपाला आल्यानंतरहि फडके आपल्या धन्याच्या श्राद्धदिना दिवशीं नियमित जेवा-वयास जावयाचे. "बोलावणे घेण्याचा आमचा मान नाहीं. आम्ही वेळेला येत जाऊं" असें त्यांनीं सांगून ठेवलें होतें. वानवळे यांच्या घरीं असतांना जी धाबळी व जे भांडें वापरीत ती धाबळी आणि तेंच भांडें यजमानाच्या घरीं आपल्या लौकिकाच्या काळींहि वापरीत. अशी त्यांची निष्ठा होती. ज्येष्ठ व. ७ रोजीं सिद्धटेक येथें गणपतीची सेवा करीत असतांना पोटदुखीच्या विकारानें त्यांचें निधन झाले. नानांचा हात लंगडा पडला! कारण त्यांच्या पूर्ण विश्वासांतील हरिपंत होते. फडके यांचे पुत्र बाबा ऊर्फ रामचंद्र खर्ड्याच्या लढाईत जरीपटक्या-वर होते. हरिपंतांना चिंतामण, लक्ष्मण व माधव असे आणखी तीन मुलगे होते.

— १९ जून १७९४

## ज्येष्ठ व. ८ "शिंदा दखनेंत आला!"

शके १७१४ च्या ज्येष्ठ व. ८ रोजीं मराठेशाहींतील प्रसिद्ध वीर व मुत्सद्दी महादजी शिंदे हे उत्तरेतून पेशवाईची व्यवस्था लाविण्याच्या हेतूनें पुण्यास आले.

महादजींचे दक्षिणेंतील आगमन हें अनेक तर्कवितर्कांचें व मतभेदांचें प्रकरण तत्कालीन महाराष्ट्रांत निर्माण झालें होतें. "हिंदुस्थान, गुजरात सोडून शिंदा दखनेंत आला। हुकूम केला बादशहानें त्याला-" या एका पोवाड्यांतील पालुपदांतहि हाच भाव व्यक्त होत आहे. पुणें सोडून महादजींना जवळजवळ एक तप झाले होतें. येवढ्या काळांत बालपेशवे सवाई माधवराव वयांत आले होते, त्यांना पाहण्याची इच्छा शिंदे यांना होतीच. पुण्याची सर्व सत्ता आपल्याच हातीं असावी अशी जरी महादजींची इच्छा नसली तरी उत्तरेंतील कारभार अधिक व्यवस्थित राखण्यासाठीं मूळ आधार असणारी पेशवाई खंबीर करावी असा विचार महादजींनीं केला असावा. उत्तरेंतील गैरव्यवस्थेमुळे आणि दगदगीने शिंद्यांना नकोसे झाले होते. या सर्व भानगडी तुम्हीच सांभाळा असा आग्रह त्यांनीं पेशव्यांकडे व नानांकडे सारखा चालविला होता. नाना फडणिसांनीं त्यांना लिहिले, "तुमच्याशिवाय दुसऱ्याच्या हातून तिकडची व्यवस्था उरकणार नाहीं; इतकेहि असून तुम्ही आग्रहानें याल, तर या. दौलतेवर ईश्वराचा क्षोभ झाला, असेंच समजावे लागेल." तरी सुद्धां पुण्याच्या कारभाराची नीट व्यवस्था लावावी म्हणून महादजी दक्षिणेंत आले. मराठ्यांच्या सार्वभौम सत्तेस इंग्रजांचा मोठाच शत्रु निर्माण झाला होता; तेव्हां त्यांच्याविरुद्ध एकजूट करण्याचा प्रयत्न महादजी करणार होते; शिवाय पेशव्यांनीं आपला धनीपणा गाजवून उत्तरेंतील सत्ता स्थिर करावी असाहि हेतु शिंदे यांच्या मनांत होताच. त्या दृष्टीनें महादजी तरुण माधवरावांना वारंवार भेटून पूर्वपरंपरा समजावून देत होते; पेशव्यांच्यांत मर्दानी व लष्करी पेशाची आवड निर्माण करीत होते. नाना एका पत्रांत लिहितात, "पाटीलबावा जांबगांवीहून ज्येष्ठ व. ८ रोजीं पुण्यास आले. श्रीमंतांचे दर्शनाचा मुहूर्त निश्चयांत आला.... पाटीलबावा येऊन श्रीमंतांचे पायावर डोई ठेवून भेटले. श्रीमंतांनीं आपले गळ्यांतील मोत्याची माळ पाटीलबावांचे गळ्यांत घातली. येणेप्रमाणें समारंमानें भेट बहुत चांगली झाली."

— १२ जून १७९२

## ज्येष्ठ व. ९ (१) राजमाता जिजाबाईचा अंत !

शके १५९६ च्या ज्येष्ठ व. ९ रोजीं शिवरायांची मातोश्री जिजाबाई यांचें निधन झाले.

जिजाबाई ही लखूजी जाधवरावांची मुलगी. वाड्यांत रंगपंचमीचा दरबार झाला तेव्हां मालोजी भोसले आपल्या लहानग्या शहाजीसह हजर होते. दरबारांत जिजाबाई व शहाजी मुलांच्या स्वभावास अनुसरून रंगाचा खेळ खेळूं लागलीं. त्या समयीं थोडा रागद्वेषाचा संवाद झाला तरी पुढें भोसल्यांचा लौकिक वाढल्यानंतर हें लग्न पार पडले. त्यांच्याच पोटीं पुढे स्वराज्यसंस्थापक श्रीशिवराय जन्मास आले. शिवाजीला योग्य शिक्षण देऊन त्याचेकडून मराठ्यांचे स्वराज्य स्थापण्याची तयारी जिजाबाईनें केली. आरंभींच्या राजकीय मसलती हिच्याच सल्ल्यामुळें होत असत. फलटणच्या बाटलेल्या बजाजी निंबाळकरास शुद्ध करून घेण्याची खटपट तिनेंच केली. प्रारंभींचे जीवन खडतरपणें गेलें असलें तरी आपला मुलगा छत्रपतिपदावर शोभलेला पाहून या माउलीला केवढी धन्यता वाटली असेल ! डोळ्यांदेखत राज्याभिषेकाचा समारंभ झाल्यानंतर बारा दिवसांतच तिचा मृत्यु झाला.

जिजाबाई मानी, निश्चयी, स्वतंत्र विचाराची व धाडसी होती. तिला स्वतःला लिहितां-वाचतां येत असून शिवाजीला धार्मिक शिक्षणाचे बाळकडू तिनेच पाजले. शहाजी कर्नाटकांत होता तेव्हां पुण्याच्या जहागिरीची व्यवस्था जिजाईच पाही. तिनें न्यायनिवाडेहि केले होते.

रायगडावरील पावसाळी हवा सोसवत नव्हती, म्हणून शिवाजीने तिची व्यवस्था गडाखालीं पांचाड गांवीं केली. तेथेंच तिचा अंत झाला. मातुःश्रीच्या सेवेसाठीं शिवरायांचें एक स्वतंत्र खातेच होतें. पहाऱ्याचे शिपाई, पुजारी, पुराणिक, वगैरे नेमून देवपूजेची व दानधर्मांची स्वतंत्र व्यवस्था लावून दिलेली होती. एक दिवाण, एक चिटणीस, एक फडणीस व एक पोतनीस इतके कामगार व कारकून मंडळी जिजाबाईच्या तैनातीस असत. आईच्या व्यवस्थेंत थोडा जरी बिघाड झाला तरी शिवाजीला खपत नव्हता.

—१७ जून १६७४

## ज्येष्ठ व. ९ ( २ ) भय्या दार उघडेना !

शके १८३६ च्या ज्येष्ठ व. ९ रोजीं लोकमान्य टिळक यांची मंडाले येथील दीर्घकालीन कारावासातून मुक्तता होऊन ते पुण्यास येऊन पोंचले.

सहा वर्षांपूर्वी राज्यद्रोहाच्या गुन्ह्याबद्दल टिळकांना जबरदस्त शिक्षा झाली होती. ती संपूर्ण भोगल्यानंतर टिळक नक्की केव्हां सुटणार याचा अंदाज लोकांना नव्हता. सरकारनेहि त्यांच्या सुटकेची बातमी अगदी गुप्त ठेविली होती. तरी आपल्या मनाशीं सुटकेचा दिवस नक्की ठरवून पोलिस इन्स्पेक्टर सदावर्ते हे पुण्याहून मंडालेस गेले होते. त्यांनीं ज्येष्ठ व. ९ रोजीं टिळकांना आणून मध्य-रात्रीस पुण्याच्या गायकवाडवाड्यासमोर उभे केलें. सर्वच कांहीं अपनेक्षित होते. दरवाजाच्या देवडीवर भय्या झोंपला होता. टिळकांना त्याने ओळखिलें नाही. दरवाजा उघडण्यास तो नाखुष होता ! शेवटीं सर्व खुलासा झाल्यावर टिळकांचा प्रवेश स्वतःच्या वाड्यांत झाला. अर्ध्या तासांत सर्व पुण्यांत ही शुभवार्ता पसरली. माणसांची रीघ सुरू झाली. टिळकांच्या दर्शनास हजारो स्त्री-पुरुष येत होते. शेंकडो गांवाहून अभिनंदनाच्या तारा व गौरवाचीं पत्रे येत होती. ‘ टिळक सुटले ’ या अग्रलेखांत ‘ केसरी ’नें ईश्वरी शक्तीचे आभार मानिले. दोनतीन दिवसां-नंतर अण्णासाहेब पटवर्धन यांच्या अध्यक्षतेखालीं सार्वजनिक सभेत एक सभा भरून टिळकांच्या सुटकेबद्दल पानसुपारीचा जाहीर समारंभ करावा असे ठरलें; त्याप्रमाणें गायकवाडवाड्यांत प्रचंड सभा भरली. नागपूर, वऱ्हाड, खानदेश, सोलापूर, बेळगांव, इत्यादि ठिकाणांहून मंडळी उपस्थित झाली होती. ‘टिळक महाराज की जय ’ असा जयघोष करून लोकांनीं टिळकांचें स्वागत केलें. सुटकेनंतरच्या आपल्या पहिल्याच जाहीर भाषणांत टिळकांनीं उद्गार काढले, “ सुखाला भागीदार मिळाले कीं तें वाढतें. आज येथे जमलेला समाज व गेले दोन-तीन दिवस माझ्या भेटीसाठीं आलेली मंडळी यांना पाहून माझ्या सुटकेपासून मला जें सुख झालें असेल त्याची वाढ सहस्रपट नव्हे लक्षपट झाली आहे.” लोकमान्यांच्या या कारागृहवासांत ‘ गीतारहस्य ’ या अद्वितीय ग्रंथाचा जन्म होऊन ‘ गीतारहस्य बाला, कमला विनायकाला, दे स्फूर्ति गावयाला, ती धन्य बंदिशाला ’ या काव्यपंक्ति सार्थ पावल्या.

— १७ जून १९१४

## ज्येष्ठ व. १० आगरकर यांचें निधन !

शके १८१७ च्या ज्येष्ठ व. १० रोजी महाराष्ट्रांतील थोर समाजसुधारक, बुद्धिवादी पुरुष, 'सुधारक' पत्राचे संपादक गोपाळ गणेश आगरकर यांचें निधन झालें.

अत्यंत दारिद्र्यांत त्यांनीं आपलें शिक्षण पूर्ण केलें. त्यांची तडफ लहानपणीहि दिसून येई. शाळेंत येण्यास उशीर झाल्यावर शिक्षक 'तुम्ही असेच मागें पडणार' असें म्हणाले. त्यावर यांनीं उत्तर दिलें, "तुमच्यासारखा एम्. ए. होईन तरच नांवाचा आगरकर!" आणि आर्थिक परिस्थितीशीं तोंड देऊन इतिहास व तत्त्वज्ञान हे विषय घेऊन ते एम्. ए. झाले. त्याच्या अगोदरच यांनीं आपल्या जीवितध्येयाबद्दल स्वतःच्या आईला लिहिले– "आपल्या मुलाला मोठ्या पगाराची चाकरी लागेल असें तूं समजत असशील, पण तुला सांगून टाकतों कीं, विशेष संपत्तीची, विशेष सुखाची हांव न धरतां मी फक्त पोटापुरत्या पैशांवर संतोष मानून सर्व वेळ परहितार्थ खर्च करणार!"

आगरकरांचें शिक्षण पूर्ण झाल्यावर ते चिपळुणकरांच्या नेतृत्वाखालीं निघणाऱ्या 'केसरी', 'मराठा' या पत्रांना येऊन मिळाले. आणि दुसऱ्याच वर्षी त्यांना व टिळकांना प्रसिद्ध अशी 'डोंगरीच्या तुरुंगांतील एकशें एक दिवसांची शिक्षा' झाली. पुढें 'केसरीकारां'शीं यांचे मतभेद झाल्यावर यांनीं सन १८८८ मध्यें 'सुधारक' पत्र काढून त्यांत निर्भीडपणें आपले सामाजिक सुधारणेसंबंधीं विचार मांडण्यास सुरुवात केली. अर्थातच ठार मारण्याची धमकी, खोटी प्रेतयात्रा, यांसारखा त्रास आगरकरांना सहन करावा लागला. तरीसुद्धां या त्यागी वृत्तीच्या पुरुषांत फरक पडला नाहीं. होळकर सरकारची दरमहा पांचशें रुपयांची नोकरी नाकारून यांनीं बाणेदार वृत्ति प्रकट केली. १८९२ सालीं आगरकर फर्ग्यूसन कॉलेजचे प्राचार्य झाले. शेवटीं दारिद्र्य, दमा आणि देशकार्य यांनीं जीर्ण झालेल्या-यांच्या शरीराचा अंत ज्येष्ठ व. १० या दिवशीं झाला. मृत्यूनंतर यांच्या पेटींत उत्तरकार्यासाठीं म्हणून ठेवलेली रुपयांची पुरचुंडी सांपडली. महाराष्ट्राचा निर्भय समाजसुधारक गेला म्हणून सर्वांनाच हळहळ वाटली.

— १७ जून १८९५

## ज्येष्ठ व. ११ (१) फिरंग्यासी बिघाड केला.

शके १६०५ च्या ज्येष्ठ व. ११ रोजीं छत्रपति संभाजी राजे हे 'स्वार होऊन राजापुरास गेले. फिरंग्यासी बिघाड केला. रेवदंडियासी (चौलास) वेढा घातला'

शिवाजीच्या वेळेपासूनच पश्चिम किनाऱ्यावर पोर्तुगीझ, सिद्दी व इंग्रज या सत्तांचा धुमाकूळ चालू होता. शिवाजीनें पुष्कळच बंदोबस्त केला तरी सवड सांपडतांच हे लोक मराठ्याना त्रास देत असत.– "रायगडावरील मराठ्यांची राजधानी म्हणजे जंजिऱ्याच्या सिद्दीवर मोठेच दडपण उत्पन्न झालें. हा सिद्दी पुढे मोंगल बादशहाचा दर्यावर्दी हस्तक बनला. धर्माच्या व व्यापाराच्या बाबतींत मराठ्याचा उच्छेद करणें हें सिद्दी व पोर्तुगीझ या दोघांचेहि नेहमींचेंच उद्दिष्ट होते आणि या बाबतींत ते सदैव एकमेकाना साह्य करीत–" संभाजीचे लक्ष प्रथमपासूनच पश्चिम किनाऱ्याकडे होते. दरम्यानच्या काळात शहाजादा अकबर बापावर उठून संभाजीच्या आश्रयास आला. त्याच्या वतीने संभाजीनें सिद्दी, पोर्तुगीझ, इंग्रज यांना तंबी दिली कीं, खबरदार मोंगलास मदत कराल तर! परंतु, सिद्दी आणि पोर्तुगीझ यांनीं निरनिराळ्या कारवाया करण्यास सुरुवात केली. अर्थातच त्यांचा पराभव करणें संभाजीला भाग पडले. तसेंच सिंधुदुर्गाप्रमाणेच कारवार बंदराच्या तोंडाशीं अंजदीव नांवाच्या बेटावर एक दुर्ग बांधावा अशी शिवाजीची इच्छा होती. त्याप्रमाणे संभाजीने काम सुरू करतांच पोर्तुगीझ गव्हर्नरानें तें ठाणेंच हस्तगत केले. अर्थातच संभाजीस त्याचा संताप आला. तो वाढण्याची आणखी एक गोष्ट घडली. मोंगल सेनापति रणमस्तखान याने मराठयांचा मुलूख जिंकून कल्याण येथे आपले ठाणे दिले. मोगलाचा पराभव संभाजीस करणें शक्य होते. पण पोर्तुगीझांनीं आपल्या जहाजांतून धान्यसामग्री मोंगलांना पुरवली, त्यामुळें संभाजीचा डाव फसला. शेवटीं संभाजीने पोर्तुगीझांच्या विरुद्ध युद्धच पुकारलें. या युद्धांत प्रथम चौलाचा व नंतर फोंड्याचा वेढा हे दोन निकराचे संग्राम झाले. चौलच्या तटावर मराठयांनी निकराचा हल्ला केला. पोर्तुगीझांनीं पुष्कळ मराठे कापून काढले. जवळच्या कोरलाईलच्या किल्ल्यावरहि मराठ्यांनी छापा घातला. पण स्थळ हातीं आलें नाहीं. पुढें फोंड्याच्या वेढ्यांत मात्र मराठे विजयी झाले.

—१० जून १६८३

## ज्येष्ठ व. ११ (२) चित्तरंजन दास यांचें निधन !

शके १८४७ च्या ज्येष्ठ व. ११ रोजीं बंगालमधील सुप्रसिद्ध वकील, कवि, वृत्तपत्रकार व राजकारणी पुढारी चित्तरंजन दास यांचें निधन झालें.

दासांचें कुटुंब सुसंस्कृत असून ब्राह्मसमाजी होते. चित्तरंजन दास बी. ए. झाल्यानंतर पुढील शिक्षणासाठीं इंग्लंडला गेले. तेथें त्यांनीं बॅरिस्टरीच्या अभ्यासा-बरोबरच अनेक राजकीय व्याख्याने देण्याचा उपक्रम केला. भारतांत परत आल्यावर यानीं हायकोर्टात बॅरिस्टरी करण्याला प्रारंभ केला. बंगाली भाषेतील ते एक मोठे कवि होते. 'सागर-संगीत', 'किशोर-किशोरी', 'अंतर्यामी', इत्यादि त्यांचे कविता-संग्रह प्रसिद्ध आहेत. याशिवाय साहित्य व वैष्णववाङ्मय याच्या चर्चेसाठीं 'नारायण' नांवाचे मासिक कित्येक दिवस ते चालवीत होते. सन १९१५ मध्यें त्यांना बंगाली साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदाचा मान मिळाला होता. 'वन्दे मातरम्' व 'फॉर्वर्ड' याहि पत्रांशीं यांचा संबंध होता. 'वन्दे मातरम्' वरील राज्यद्रोहाचा खटला व माणिकतोळा बागेंतील प्रसिद्ध खटला यांमधून त्यांच्या वकिलीकौशल्याची ख्याति होऊन धडाडीचे राष्ट्रीय पुढारी म्हणून चित्तरंजनदास यांची कीर्ति झाली.

सन १९१७ पासून मोठ्या जोमानें त्यांनीं राजकारणांत भाग घेण्यास सुरुवात केली. "राजकीय पुढाऱ्यांत आवश्यक असणारी लढाऊ वृत्ति त्यांच्यांत भरपूर होती. त्यांच्याइतका परमावधीचा त्याग आणि असाधारण लोकप्रियता इतरत्र क्वचितच आढळते. कवीचे हृदय आणि सत्पुरुषांची उदारता यांच्यांत एकवटली होती. ते एखाद्या राजासारखा दानधर्म करीत....त्यांनीं आपली सर्व संपत्ति मेडिकल कॉलेज व स्त्रियांचा दवाखाना यांकरितां देऊन टाकिली. आणि यानंतर लोक यांना 'देशबंधु' या नांवाने संबोधूं लागले. त्यांच्या मृत्यूने शत्रुपक्षसुद्धां हळहळला. महात्मा गांधींनी यांच्या स्मारकासाठीं दहा लक्ष रुपये जमविले आणि बेळगांव राष्ट्रसभेच्या वेळीं त्यांच्या इच्छेप्रमाणे त्यांच्या कलकत्ता येथील वाड्याचे हॉस्पिटलमध्यें रूपांतर केले—"

—१६ जून १९२५

## ज्येष्ठ व. १२ "लोपलासे भानु पडला अंधार!"

शके १२१९ मधील ज्येष्ठ व. १२ रोजीं प्रसिद्ध संत ज्ञानदेव यांचे थोरले बंधु निवृत्तिनाथ यांनीं समाधि घेतली.

तेराव्या शतकांत ज्ञानेश्वरादि भावंडांनीं भागवत धर्माच्या संघटणेचें आपलें अवतारकार्य संपविलें. १२१९ शकामध्यें अवघ्या आठ महिन्यांच्या अवधींत या चारहि भावंडांची अवतारसमाप्ति झाली. ज्ञानदेवांनी समाधि घेतल्यावर सोपानदेव, मुक्ताबाई यांनीं आपला कारभार आटोपला. सर्वात वडील असे निवृत्तिनाथ मागे राहिले! सारे विपरीतच होतें.

ज्येष्ठाच्याहि आधीं कनिष्ठाचें जाणें। केले नारायणे उफराटे॥
उफराटे फार कळले माझे मनीं। वळचणीचें पाणी आढ्या आलें!॥

असे उद्गार निवृत्तिनाथांच्या मुखांतून निघाले. एदलाबादेशेजारच्या माणेगांवीं मुक्ताबाईस मुक्त करून निवृत्तिनाथ तेथून निघाले. वाटेत सप्तशृंगीच्या डोंगराला प्रदक्षिणा घातली, देवीचे दर्शन घेतले आणि त्र्यंबकेश्वरास आल्यावर ज्येष्ठ व. १२ स त्यांनी आपला देह ठेविला! ज्ञानदेवांनीं आपले श्रीगुरु निवृत्तिनाथ यांचा गौरवपूर्ण उल्लेख ज्ञानेश्वरींत अनेकवार केला आहे. नाथपंथांतील गैनीनाथ यांचा उपदेश निवृत्तिनाथांना होता. तरीहि त्यांच्या पंथाला वैष्णव संप्रदायच म्हणणे इष्ट आहे. निवृत्तिनाथांच्या समाधीनंतरं नामदेवांनी उचित अशा शब्दांत म्हटलें कीं,

"लोपलासे भानु पडला अंधार। गेला योगेश्वर निवृत्तिराज॥ १॥"
"गेल्या त्या विभूति अनादि अवतार। आतां देवा! फार आठवते॥ २॥"

निवृत्तिनाथांना लहानपणापासूनच पूर्वसंस्कारबलामुळे उत्तम बोध प्राप्त झालेला होता. लहानपणी चुकून निवृत्तिनाथ अंजनी पर्वताच्या गुहेंत शिरले. त्या गुहेत श्रीगैनीनाथ तप आचरीत बसले होते. निवृत्तिनाथांनीं त्यांच्या पायावार लोटांगण घातलें. गैनीनाथांनाहि हा अधिकारसंपन्न बालशिष्य पाहून संतोष वाटला. त्यांनीं निवृत्तिनाथांना महावाक्याचा बोध देऊन योगमार्गाची दीक्षा दिली. गैनीनाथ हे आदि सांप्रदायांतील होते. त्यांनी निवृत्तिनाथास आपल्या सांप्रदायांत मिळवून घेऊन श्रीकृष्णाची उपासना दिली व नामस्मरणाचा प्रसार करण्याची आज्ञा दिली.

— १७ जून १२९७

## ज्येष्ठ व. १३ 'शिवराज-भूषण' काव्याची समाप्ति !

शके १५९६ च्या ज्येष्ठ व. १३ रोजीं हिंदी साहित्याच्या रीतिकालांतील विख्यात राष्ट्रीय कवि भूषण याने 'श्रीशिवराज-भूषण' नांवाचे काव्य समाप्त केलें.

हिंदी वाङ्मयाच्या इतिहासांत भूषण कवीचें नांव आपल्या वैशिष्ट्यानें चमकून राहिले आहे. रीतिकालांत राजदरबारांतील सर्व कवि शृंगाररसात्मक काव्य निर्माण करीत असतांना कवि भूषण मात्र छत्रसाल राजा व श्रीशिवाजीमहाराज यांच्या पराक्रमांचीं वर्णनें गात असतांना दिसतो. अकबर, जहांगीर, शहाजहान इत्यादि मोंगल बादशहांनीं आपले धोरण थोडे उदारपणेंच स्वीकारलेले असल्यामुळें हिंदु-मुसलमानांत एक प्रकारचा विश्वास निर्माण होत होता. परंतु औरंगजेबाच्या कडव्या धर्मवेडामुळे विद्वेषाची ज्वाला पुन्हा भडकली. इस्लामी संस्कृतीच्या आक्रमणास बेडरपणे तोंड देण्यास उत्तरेस बुंदेलखंडांत राजा छत्रसाल सिद्ध झाला, आणि दक्षिणेत श्रीशिवरायांनी हिंदु राष्ट्राच्या स्थापनेचा विचार करून त्या दिशेने आपला पराक्रम चालू ठेविला. भारतांतील या तेजस्वी पुरुषांचे शौर्य काव्यांत नमूद करणारा जाग्रत कवि भूषण हाच होता. 'छत्रसाल-दशक' नामक काव्यांत छत्रसालाचा पराक्रम वर्णिला आहे. आणि 'शिवबावनी', 'शिवराज-भूषण' यांतून श्रीशिवाजीचे गौरवपूर्ण स्तोत्र गाइले आहे.

महाकवि भूषण हा काश्यप गोत्री कनोजी ब्राह्मण असून याचा जन्म यमुनातीरावर त्रिविक्रमपूर या गांवीं झाला. चिंतामणि त्रिपाठी, मतिराम हे ग्रंथकार भूषणचेच बंधु समजले जातात. दक्षिणेत श्रीशिवरायांनीं सर्व शत्रूंना जिंकून रायगडावर स्वतंत्र राजधानी स्थापन केली आहे, असे समजून उत्तरेंत राहणारा भूषण कवि शिवाजीचें दर्शन घेण्यासाठी महाराष्ट्रांत आला. आणि "त्याने कलियुगांतील कवींनीं हिंदु धर्माचा उच्छेद करणाऱ्या म्लेंछ राजाचीं कवनें रचून भ्रष्ट केलेल्या वाणीला पवित्र करण्याच्या हेतूने गोब्राह्मणप्रतिपालक श्रीशिवरायांचेच चरित्र नाना प्रकारच्या शब्दार्थालंकारांनीं सजवावें अशी बुद्धि धरली व तदनुसार प्राचीन महाकवींचा काव्यरचनामार्ग त्यांच्याच कृपेने समजावून घेऊन अलंकारमय शिवभूषण नामक शुभ ग्रंथ ज्येष्ठ व. १३ या दिवशीं समाप्त केला."

— २१ जून १६७४

## ज्येष्ठ व. १४ मराठी राज्याची समाप्ति !

शके १७३९ च्या ज्येष्ठ व. १४ रोजीं बाजीरावानें इंग्रजांशीं '१३ जूनचा' तह करून मराठी राज्य घालविलें !

मराठेशाहीच्या अस्ताचे जे निरनिराळे दिनांक मानण्यांत येतात त्यांमध्यें ज्येष्ठ व. १४ (१३ जून १८१७) हा फार महत्त्वाचा आहे. या समयीं शेवटचा बाजीराव पेशवा गादीवर असून त्याचा हस्तक त्र्यंबकजी डेंगळे अटकेंतून सुटून देशांत पुंडावा करीत होता. त्याला बाजीरावाचें साहाय्य आहे असे समजून एल्फिन्स्टन साहेबाने 'त्रिंबकजीस आमच्या स्वाधीन करा' असा आग्रह बाजीरावाजवळ सुरू केला. शेवटीं युद्धापर्यंत पाळी आल्यावर बाजीरावाने एल्फिन्स्टनला बोलावून सांगितले– "गैरसमज उगाच वाढत आहेत. तुमच्याबद्दल माझे मनांत यत्किंचितहि द्वेषबुद्धि नाहीं. तुमच्याच आश्रयाने लहानाचा मोठा झालों आहे. माझें हे शरीर नखशिखांत इंग्रजी अन्नानें वाढलें आहे हे मी कसें विसरेन? तुमच्याशीं मी युद्ध करीन तरी कसा?–" बाजीरावाचे हें मिठ्ठास भाषण ऐकूनहि एल्फिन्स्टनवर विशेष परिणाम झाला नाहीं. त्यानें बजाविले– "एक महिन्याचे आंत त्रिंबकजीस स्वाधीन करा आणि जामीन म्हणून रायगड, पुरंदर, सिंहगड हे किल्ले स्वाधीन करा–" किल्ले इंग्रजांकडे गेले. त्र्यंबकजीस पकडण्यांत बाजीरावास यश आले नाहीं. जाहीर बक्षीस लावूनहि त्र्यंबकजी सांपडला नाहीं. प्रत्यक्ष युद्ध करण्याची धमकी बाजीरावांत नाहीं हे जाणून एल्फिन्स्टन साहेबाने तहाचीं कलमे तयार केलीं. त्यायोगे महाराष्ट्राबाहेरचा चौतीस लाख वसुलाचा सर्व प्रदेश इंग्रजांकडे जाऊन इतर मराठे सरदारांशीं बाजीरावाचा कांहीं एक संबंध राहणार नव्हता. तहास मान्यता देण्यास अखेरपर्यंत बाजीरावानें टाळाटाळी केली. पण शेवटीं, मोठ्या नाखुषीने ज्येष्ठ व. १४ रोजीं त्याने तहावर सही केली.– "वास्तविक याच तहाने बाजीरावानें मराठेशाहींतील पुढारीपण गमावलें. तो केवळ एक लहानसा संस्थानिक बनला. येणेप्रमाणें मराठी राज्यास उतार लागून राज्य बुडण्याचे दिवस येऊन ठेपले. मराठी राज्यसंस्थापना हें एक दैवी कार्य होते. परंतु त्याचा वारसा बाजीरावाच्या नामर्दपणामुळें इंग्रजांकडे जाऊं लागला."

—१३ जून १८१७

## ज्येष्ठ व. ३० शेवटची वेल सुकली!

शके १८३९ च्या ज्येष्ठ व. ३० रोजीं दुसऱ्या बाजीरावाची मुलगी कुसुमावती (बयाबाई आपटे) वयाच्या सत्तराव्या वर्षी काशी येथें निधन पावली.

एकोणिसाव्या शतकाच्या सुरुवातीस इंग्रजांकडून बाजीराव पराभूत झाला आणि त्याची रवानगी ब्रह्मावर्ताकडे झाली. कुसुमाबाईचा जन्महि याच प्रदेशांत झाला. मराठी राज्याचा शेवट १७४० या शकात झाला. आणि बरोबर शंभर वर्षांनंतर पेशव्यांच्या घराण्यांतील शेवटची व्यक्ति बयाबाई हिचाहि अंत १८३९ च्या सुमारास झाला ही योगायोगाची गोष्टच आहे. पेशवे यांनी पुणे सोडल्यानंतर त्यांच्या वंशजाचे पाय पुन्हा पुण्यास लागले नाहीत. शके १८३५ मध्ये मात्र बयाबाई पुण्यास आल्या होत्या. याच वर्षी कै. तात्यासाहेब केळकर यांचे 'तोतयाचे बंड' हें नाटक रंगभूमीवर आले असल्यामुळे नाटककाराच्या आग्रहावरून कुसुमावतीबाई आपल्या घराण्याचे 'नाटक' पाहण्यास आल्या होत्या. "मराठी राज्य नामशेष झाल्यानंतर नाना फडणिसाच्या वाड्याची शाळा बनावी, माणकेश्वराच्या वाड्यांत थिएटर यावे, आणि पदभ्रष्ट पेशव्याची कन्या तेथे पार्वतीबाईचें नाटक पाहण्यास बसावी ही करुण प्रसंगाची जुळणीच कल्पनातीत आहे.

कुसुमावतीबाई आपटे वारल्यानंतर कै. अच्युतराव कोल्हटकर यांच्या 'संदेशां'त पुढील मजकूर आला— "कुसुमाबाई अप्रसिद्ध होत्या. त्यांचा पिता हतभागी होता; हें जरी खरें असलें तरी त्या श्रीशिवरायांच्या स्वराज्यांतील शेवटचा दुवा असल्यामुळें त्यांचें महत्त्व, त्यांची किमत, व त्यांच्याविषयींची आदरबुद्धि हीं तिळमात्र कमी होत नाहीत. भाग्यहीनपणांत कुसुमाबाई वारली, यामुळे तर त्यांच्यासंबंधाने दुःख करण्याचें दुप्पट कर्तव्य आपल्यावर येऊन पडलेलें आहे. ही शेवटची स्त्री मृत झालेली पाहून, पेशवे कुळांतील ही शेवटची पताका खालीं पडलेली पाहून आपण दुःखी झालें पाहिजे, शोक केला पाहिजे, अश्रूंनीं ही महाराष्ट्र भूमि नाहविली पाहिजे.—"

"ती निःस्पृह, धैर्यशाली व अभिजात असून भटांच्या घराण्यांतील ठेवण तिच्या चेहऱ्यांत दिसते —" असें इतिहासकार राजवाडे यांनीं लिहून ठेवलें आहे.

— १९ जून १९१७




दादाभाई नवरोजी. माधवराव पेशवे. लो. टिळक. स्वा. वी. सावरकर.
सुभाषचंद्र बोस. प्रफुल्लचंद्र रॉय. बाजी प्रभु. सार्वजनिक काका.

## आषाढ शु. १ महाकवि कालिदास !

आषाढ शु. १ हा दिवस भारताचा महाकवि कालिदास याच्या स्मृतीसाठीं मानण्यांत येतो.

या थोर कवीचें जीवनचरित्र उपलब्ध नाहीं. साहित्यशास्त्रावर ग्रंथ लिहिणारा रसिक पंडित आनंदवर्धन याने म्हटलें आहे : "जगतांत कालिदासादि दोनचार किंवा पांचसहा माणसांनाच फार तर महाकवि म्हणतां येईल." जयदेव कवीनें तर कालिदासाला 'कविकुलगुरु' ही पदवी अर्पण केली आहे. बाण कवि कालिदासाच्या काव्याला मधुररसाने थबथबलेल्या मंजिरीची उपमा देतो. 'पृथ्वीवर राहूनहि स्वर्गसुखाचा अनुभव कोणास घ्यावयाचा असला तर त्यानें शरदृतूंतील चंद्रकिरण, शर्करायुक्त दूध, तारुण्यांतील मादक नवाळी, कोमलांगी युवती आणि कालिदासाची कविता यांचे सेवन करून पाहावें असा अभिप्राय भारतीय रसिकांनीं व्यक्त केला आहे. पाश्चात्य विद्वानांनींहि कालिदासाची महती ओळखली आहे. 'कालिदास हा भारतीय शेक्सपियर होय' ही उक्ति मोनियर वुइलियम्सच्या प्रस्तावनेतच प्रथम सार्थ पावली. प्रसिद्ध जर्मन कवि गटे यानें असे उद्गार काढले कीं, "स्वर्ग आणि पृथ्वी यांचें मधुर मीलन जर कोठे पाहावयाचें असेल, आणि तारुण्याची टवटवी व परिपक्वतेची फळें जर कोणास एके स्थळीं असलेली बघावयाची असतील तर मी शाकुंतलाकडे बोट दाखवीन." चेझी नांवाचा रसिक शाकुंतलांतील 'आलक्ष्यदन्तमुकुलान्' हा वत्सलरसपूर्ण श्लोक वाचून आनंदानें नाचूं लागला.

"कालिदासाचा जन्म ब्राह्मणकुलांत झाला. माळव्यांतील उज्जयिनीस तो राहत असे. तो शिवभक्त असून राजकवि होता. श्रुति, स्मृति, इतिहास, पुराणे, योग, सांख्य, अद्वैत वेदान्त, ज्योतिःशास्त्र, कामशास्त्र, वैद्यक, व्याकरण, अर्थशास्त्र, संगीत, चित्रकला, आदि शास्त्रांचा आणि कलांचा त्यास उत्तम परिचय होता. ठिकठिकाणीं प्रवास करून रीतीभातींचे आणि लोकस्थितीचे ज्ञान त्याला उत्तम तऱ्हेनें प्राप्त झालें होतें. राजदरबार, युद्धें, संधि, राजशासन यांची त्यानें जवळून माहिती करून घेतली होती ... तो वृत्तीनें रंगेल असला तरी गृहस्थाश्रमाची पवित्रता व एकनिष्ठ पत्नीप्रेम याची त्याला पूर्ण जाणीव होती —"



## आषाढ शु. २ स्वातंत्र्यवीरांचें साहस!

शके १८३२ च्या आषाढ शु. २ या दिवशीं स्वा. वी. सावरकर यांनीं मार्सेलिस बंदरानजीक बोटींतून समुद्रांत उडी टाकली!

हिंदुस्थानांत अशांतता पसरत आहे, त्याला कारण सावरकर असे समजून त्यांना लंडन येथेच अटक झाली; आणि त्यांची रवानगी हिंदुस्थानांत करण्याचें ठरलें. ' मोरिया ' बोट मार्सेलिस बंदराच्या धक्क्यालगत उभी राहिली. काय करावयाचें तें निश्चितपणें ठरवून त्यांनीं पाहऱ्यावर असणाऱ्या शिपायास ' शौच-कूपाकडे घेऊन चल ' म्हणून म्हटलें. शौचकूपांत गेल्यावर आपल्या अंगांतील Sleeping gown आंतील आरशावर सावरकरांनीं टाकून दिला. अंगावरील बहुतेक कपडे उतरवून त्यांनीं पोर्टहोलकडे उडी झोकली. पोर्टहोलमधून जाण्याचा त्यांचा प्रयत्न सुरू होता. याच वेळीं हा सावरकरांचा यत्न बोटीच्या क्वार्टर-मास्टरच्या ध्यानांत आला. त्यानें आरडाओरड केल्यामुळे बोटीवरचे शिपाई जागृत झाले. सावरकर पाण्यांत उडी टाकीत पोहत पोहत किनाऱ्या-पर्यंत निघाले होते. त्यांच्यामागून क्वार्टर मास्टर व पोलिसहि त्यांचा पाठलाग करीत होते. किनाऱ्यावर आल्यावर सावरकर ' गाडी गाडी ' म्हणून ओरडूं लागले. तों त्यांना पाठलाग करणाऱ्या पोलिसांनीं गांठलें; आणि त्यांना पकडून ' मोरिया ' बोटीवर आणले. पोर्टहोलमधून निसटून जाण्यासाठी निकराचा प्रयत्न केलेला असल्यामुळें त्यांच्या छातीच्या दोनहि बाजूंची कातडी सोलून निघाली होती.

जवळजवळ साडेपांचशें यार्डाचें अंतर सावरकरांनीं समुद्रांतून तोडलें होते. बंदरावरून चाललेल्या ट्राम्स त्यांना दिसत होत्या. पण जवळ पैसा नव्हता. पोशाखहि जेमतेम, म्हणजे अशिष्ट माणसाप्रमाणे; त्यामुळेच त्याना शिपायांच्या हातीं शेवटीं सांपडावे लागलें. भारतांतील धडाडीच्या क्रांतिकारकाचा हा धाडसी प्रयत्न जरी फसला तरी त्यांच्या या पराक्रमामुळें सर्व जगाचें लक्ष त्यांचेकडे वेधून राहिलें. सावरकरांच्या जीवितांत अनेक रोमहर्षक प्रसंग आले आहेत, त्यांतील हा एक आहे.

—८ जुलै १९१०

## आषाढ शु. ३ (१) ' वन्दे मातरम् 'च्या जनकाचा जन्म !

शके १७६० च्या आषाढ शु. ३ रोजीं सुप्रसिद्ध बंगाली कादंबरीकार, कवि व ' वन्दे मातरम् ' या भारताच्या राष्ट्रगीताचे जनक बंकिमचंद्र चतर्जी यांचा जन्म झाला.

आधुनिक बंगाली भाषेचे निर्माते व आद्य प्रवर्तक म्हणून बंकिमचंद्राचा लौकिक आहे. कलकत्त्याजवळ कान्तलपारा या गांवीं यांचा जन्म झाला. हुगळी कॉलेज व प्रेसिन्डेसी कॉलेजमध्ये शिक्षण घेतल्यावर डेप्युटी मॅजिस्ट्रेटच्या जागेवर यांची नेमणूक झाली. सन १८७२ मध्यें बंकिमचंद्रांनीं ' वंगदर्शन ' नांवाचे पत्र सुरू केले. त्यानंतर यांच्या कादंबरी लेखनास सुरुवात झाली. " यांच्या कादंबऱ्या ऐतिहासिक, सामाजिक व संमिश्र अशा तीन स्वरूपांच्या आहेत. यांची भाषा अकृत्रिम, सुबोध, हृदयस्पर्शी, आणि सरस अशी आहे. कल्पनाचातुर्याबरोबर मार्मिक व भारदस्त विनोदहि यांच्या लेखनांत भरपूर आढळतो. असंभाव्य व काल्पनिक सृष्टीपेक्षां नित्य व्यवहारांतील स्वभावचित्रण करण्याकडे यांचा कल अधिक असल्याने वाचक पात्रांशीं समरस होतो. शिवाय विवेकाला चालना देऊन स्वाभिमानाला जागृत करण्याचा जिव्हाळाहि यांच्या लेखनांत आढळतो.-" दुर्गेशनंदिनी, कपालकुंडला, मृणालिनी, रजनी, चंद्रशेखर, विषवृक्ष, आनंदमठ, कृष्णकांतेर विल, आदि यांच्या कादंबऱ्या फार प्रसिद्ध आहेत. कादंबरी-लेखनाखेरीज अनेक ऐतिहासिक, धार्मिक व तात्त्विक, चर्चात्मक निबंध लिहून यांनीं बंगाली भाषेचें वैभव खूपच वाढविले. हिंदु धर्म, संस्कृति, भाषा यांच्या उन्नतीसाठीं यांनी फारच श्रम घेतले. यांच्या आनंदमठ कादंबरीतच 'वंदे मातरम्' हें राष्ट्रगीत प्रथम भारतीयांपुढें आलें. यांच्या कामगिरीचा गौरव म्हणून कलकत्ता विद्यापीठानें यांचा पुतळा सेनेट गृहांत उभारला आहे. यांच्या लिखाणांत संस्कृत भाषेचें सौंदर्य व बंगालीचा जोम यांचा सुरेख मिलाफ झाला आहे. यांचे ग्रंथ संदेश देणारे असूनहि त्यांत कलेची हानि झालेली दिसत नाहीं. "जुन्या संस्कृतीच्या अभिमानाची गुप्त सरस्वती यांच्या वाङ्मयांतून जुन्या दृश्यांच्या वर्णनानें मधून मधून प्रगट होते.... इंग्लंडपासून शिस्त शिकावी व स्फूर्तीकरितां हिंदु धर्माकडे यावे असा यांचा संदेश होता."

— २५ जून १८३८

## आषाढ शु. ३ (२) आझाद हिंद सेना !

शके १८६५ च्या आषाढ शु. ३ रोजीं नेताजी सुभाषचंद्र बोस यांचें एक स्वप्न मूर्त स्वरूपास आलें.

सन १९४२ च्या फेब्रुवारींत सिंगापूरचे ब्रिटिशांचे हिंदी सैन्य जपानला शरण गेलें. या सैन्याच्या सहाय्यानें हिंदुस्थान ब्रिटिशांविरुद्ध लढून स्वतंत्र व्हावा या गोष्टीस जपाननें मान्यता दिल्यामुळें पहिली आझाद हिंद सेना स्थापन झाली. परंतु मतभेदामुळें तिचें विसर्जन झाल्यावर सदर जनतेनें सुभाषबाबूंची वाट पाहिली. १९४३ च्या जूनमध्यें ते टोकियोला गेले. तेथें त्यांचें हिंदी आणि जपानी लोकांकडून प्रचंड स्वागत झालें. "ज्या शत्रूनें तलवार उपसली आहे त्याला तलवारीनेंच तोंड द्यावयास पाहिजे. स्वातंत्र्य-प्रेमी हिंदी लोकांचे रक्त जेव्हां वाहूं लागेल तेव्हांच भारत स्वतंत्र होईल." असे आग्रहाचें प्रतिपादन त्यांनीं सुरू केलें. त्यांच्या संघटन-कौशल्यांतून प्रचंड सामर्थ्य निर्माण झालें. अलौकिक वक्तृत्वामुळें व व्यक्तिमत्त्वाच्या प्रभावानें शेंकडों लोक सैन्यांत दाखल झाले. आणि —

आषाढ शु. ३ हा दिवस उजाडला.—

नेताजींच्या स्वप्नाला मूर्त स्वरूप आलें. या दिवशीं हातांत शस्त्र घेतलेले, मातृभूमीच्या उद्धारासाठीं जिवावर उदार झालेले लाखों सैनिक त्यांच्यासमोर उभे होते. दुसऱ्या आझाद सेनेच्या स्थापनेचा तो दिवस होता. सैनिकांचें स्वागत करून नेताजी बोलले—"ब्रिटिश साम्राज्याच्या जोखडापासून भारताची सुटका करणारें हें सैन्य आहे. हिंदुस्थान स्वतंत्र झालेला पाहण्यास आपणांपैकीं कोण जिवंत राहणार याला महत्त्व नाहीं, तो स्वतंत्र होणारच. पण त्याच्या स्वातंत्र्यासाठीं आम्ही सर्वस्वाचा होम करणारच एवढा आत्मविश्वास मात्र पाहिजे—"

भारताच्या स्वातंत्र्याची गर्जना करणारी १८५७ नंतरची ही हिंदुस्थानची पहिलीच सेना होती. आणि हिच्याचद्वारां या स्वतंत्र सरकारनें ब्रिटन व अमेरिका यांच्याविरुद्ध युद्ध पुकारलें.

—५ जुलै १९४३

## आषाढ शु. ४ ग. कृ खापर्डे यांचें निधन!

शके १८६० च्या आषाढ शु. ४ रोजीं सुप्रसिद्ध वकील, विद्वान्, वक्ते व सार्वजनिक कार्यकर्ते गणेश कृष्ण खापर्डे यांचें निधन झालें.

वकिलीला लागणारे विद्वत्ता, मोहक वाणी हे गुण यांच्याजवळ होतेच. पण याचबरोबर सार्वजनिक कार्याची हौसहि यांना भरपूर होती. सन १८९२ मध्यें नागपूर येथें भरलेल्या सामाजिक परिषदेचें अध्यक्षस्थान व सन १८९७ मध्यें उमरावती येथें भरलेल्या राष्ट्रीय सभेचें स्वागताध्यक्षपद याना मिळाले होतें. याशिवाय मुंबई, मद्रास व काशी येथील कॉंग्रेसमध्ये लॉर्ड कर्झनच्या धोरणावर यांनीं केलेलीं उपरोधिक भाषणें प्रसिद्ध आहेत. लोकमान्य टिळकांचे हे अनुयायी असून 'मी एका लोकमान्य टिळकाखेरीज कोणाचाहि अनुयायी जन्मात झालों नाहीं!' असें हे अभिमानाने म्हणत असत. सन १९०७ सालच्या सुरतेच्या कॉंग्रेसमधील यांची कामगिरी महनीय आहे. मराठी, उर्दू, हिंदी, संस्कृत, वगैरे भाषांप्रमाणेंच गुजराथी भाषेंतहि आपलें मोहक, विनोदी व परिणामकारक वक्तृत्व गाजवून यांनीं तेथील वातावरण बदलून टाकलें. १९०८ सालीं टिळकांना शिक्षा होतांच अपील वगैरे करण्यासाठीं हे इंग्लंडला रवाना झाले.

सन १९१७ मध्यें भारतमंत्री मॉंटेग्यू यांना राजकीय सुधारणा करण्यासाठीं एक कॉंग्रेस डेप्युटेशन भेटण्यास गेलें, त्यांत यांचे नांव होतें. मॉंटेग्यू सुधारणा अमलांत आल्यावर 'कौन्सिल ऑफ स्टेट'मध्यें हे निवडून आले व तेथें यांनीं उत्कृष्ट कामगिरी बजावली. कॉंग्रेस डेप्युटेशनमधून हे इंग्लंडला गेले तेव्हां आपल्या इंग्रजी वक्तृत्वामुळें यांनीं मोठा लौकिक मिळवला. 'हिन्दी मार्कट्वेन' म्हणून तेथील वृत्तपत्रें यांना संबोधूं लागलीं.

"यांच्या उंच, भव्य शरीरयष्टीप्रमाणेंच यांचा पोषाखहि नेहमीं भपकेदार व वैशिष्ट्यपूर्ण असे. विशेषतः यांचा भरजरी फेटा डोक्यावर श्रीच्या वेलांटीप्रमाणे मोठ्या भपकेदारपणें उभवून डोक्याला लपेटलेला असे. त्यामुळें त्यांच्याकडे कोणाचेंहि लक्ष सहज वेधून राही. औदार्यपूर्ण व खर्चिक वागणूक, डौलदार पोषाख, आणि भारदस्त खुमासदार भाषण यांमुळें यांना लोक 'वऱ्हाडचे नबाब' या टोपण नांवानें संबोधीत असत.

— १ जुलै १९३८

## आषाढ शु. ५ वल्लभाचार्यांचें निधन !

शके १४५३ च्या आषाढ शु. ५ रोजीं पुष्टिमार्गाचे प्रसिद्ध संस्थापक वल्लभाचार्य यांचे निधन झालें.

तेलगू प्रांतांतील कांकरव गांवीं राहणाऱ्या लक्ष्मणभट्ट नांवाच्या कृष्ण यजुर्वेद पढलेल्या एका तेलंगी ब्राह्मणाचा हा मुलगा होय. लक्ष्मणभट्टाच्या बायकोचें नांव 'एलमागार' असें होतें. तिला घेऊन तो काशीयात्रेस जात असतां वाटेंतच ती प्रसूत होऊन तिला मुलगा झाला. त्याचे नांव वल्लभ ठेवण्यांत आलें. वल्लभानें कांहीं दिवस मथुरेस व कांहीं दिवस वृंदावनांत वस्ती केली. असें भाविकतेनें सांगितलें जाते कीं, श्रीकृष्णानें वल्लभाला दृष्टांत दिला कीं,— "कृष्णावतारीं माझे सवंगडी असलेले गोप पुन्हा या युगांत अवतीर्ण झाले आहेत व त्यांच्याशीं मला पुन्हा पहिल्याप्रमाणें क्रीडा करतां यावी यासाठीं त्यांना माझे भक्त अगर उपासक बनीव.—" या संदेशाप्रमाणे वल्लभानें श्रीनाथजी या नांवानें प्रसिद्ध असलेल्या कृष्णाच्या एका विशिष्ट अवताराशीं आपल्या पंथाची सांगड घातली. हा पंथ पुष्टिमार्ग या नांवानें प्रसिद्ध आहे. वल्लभाचार्यांचा सिद्धान्त थोडक्यांत असा आहे :— "आदिपुरुष अगर आत्मा एकटा असल्यामुळे त्यास बरें वाटेना ; नाना रूपें धारण करावीं अशी त्यास इच्छा झाली. त्याप्रमाणें तो स्वतः अचेतन सृष्टि, जीव व अन्तर्यामिन् आत्मा झाला. यानें आपल्या अतर्क्य शक्तींनें चित् व आनंद हे दोन गुण अचेतन सृष्टींत इंद्रियांना अगोचर किंवा अदृश्य अशा स्वरूपांत ठेवले.—"

आपल्या पंथाच्या प्रसारासाठीं संस्कृत भाषेत वल्लभाचार्यांनीं अनेक ग्रंथ लिहिले आहेत. त्यांपैकीं वेदान्तसूत्र, अणुभाष्य, सुबोधिनी व तत्त्वदीप निबंध हे तीन फार प्रसिद्ध आहेत. त्यांच्या सतरा लहान ग्रंथांपैकीं 'सिद्धांतरहस्य' सुप्रसिद्ध आहे. वल्लभांचे चार व त्यांच्या मुलाचे चार असे आठ शिष्य व्रज प्रदेशांत प्रसिद्ध असून त्यांना 'अष्टछाप' अशी संज्ञा आहे. त्यांनीं व्रज भाषेंत अनके प्रकारच्या धार्मिक कविता लिहिल्या आहेत. यांच्या पुष्टिपंथाचे (१) प्रवाहपुष्टि, (२) मर्यादापुष्टि, (३) पुष्टि पुष्टि (४) शुद्ध पुष्टि असे चार प्रकार आहेत.

— १९ जून १५३१

**आषाढ शु. ६** **इंग्रजी सत्ता दृढ झाली !**

शके १६७९ च्या आषाढ शु. ६ रोजीं इंग्रजी सत्तेचा पाया हिंदुस्थानांत स्थिर करणारी प्रसिद्ध अशी प्लासीची लढाई झाली.

अलिवर्दीखानानंतर त्याचा नातू मिर्झा महंमद ऊर्फ सिराजउद्दौला हा बंगालचा सुभेदार झाला. त्याचे आणि इंग्रजाचें मुळींच पटले नाहीं. क्लाइव्ह व वॅटसन हे कलकत्ताकर इंग्रजांना मदत देण्यास आले, आणि त्यांनीं बंगाल्यांतील फ्रेंचांचें चंद्रनगर हें ठाणें काबीज केले व क्लाइव्हनें नबाबाविरुद्ध कारस्थान उभारिले. अलिवर्दीखानाचा जांवई मीरजाफर हा नबाबाचा सेनापति होता. त्याच्याशी संधान बांधून बंगालची सुभेदारी त्यास देण्याचें आमिष क्लाइव्हनें दाखविले. या गुप्त कारस्थानास रंग येत असतांना उमीचंद नांवाच्या श्रीमान् व्यापाऱ्यास याचा सुगावा लागला; आणि कटाची गुप्तता राखण्याबद्दल त्यानें क्लाइव्हपाशी वीस लाख रुपयांची मागणी केली. परंतु क्लाइव्ह त्याच्यापेक्षां सवाई होता. त्याने या कराराचे दोन कागद केले : एक पांढरा खरा व दुसरा तांबडा खोटा. खोट्या कागदावर रकमेचा उल्लेख करून खऱ्या कागदावर मात्र तो गाळण्यांत आला. त्यानंतर सर्व तयारी झाल्यावर क्लाइव्ह चंद्रनगरहून निघाला आणि आषाढ शु. ६ रोजीं प्लासी येथे जाऊन पोचला. नबाबाचे सैन्य तयार होतेंच. दोनहि सैन्यांची लढाई सुरू झाली. नबाबाच्या तोफखान्याने इंग्रज फौजेवर जोराचा मारा केला. क्लाइव्हचे सैन्य मातीच्या टेकडीमागें असल्यामुळे तोफेच्या गोळ्यांचा उपयोग कांहीं झाला नाहीं. उलट इंग्रजांनीं केलेल्या माऱ्यामुळें मात्र नबाबाचे फारच नुकसान झाले. पावसाचा कहर झाल्याने सर्व दारूगोळा भिजून निरुपयोगी झाल्यामुळें नबाबाचे कांहीं चालेनासे झाले. त्याचेकडील मीरमदन नांवाचा इमानी सरदार गोळा लागून पडला. त्यामुळे नबाबाचा धीर खचून त्याच्या फौजेने पळ काढण्यास सुरुवात केली. अशा प्रकारें या लढाईत इंग्रजांना जय मिळाला. या लढाईचें राजकीय महत्त्व फार मोठें आहे. मीर जाफर दुर्बल राहून खरी सत्ता क्लाइव्हच्या हातीं आली. बंगालचा नबाब इंग्रजांच्या हातांतील बाहुले बनल्यामुळें प्लासीच्या लढाईचा दिवस म्हणजे हिंदुस्थानांतील इंग्रजी सत्ता दृढ करणारा दिवस समजला जातो.

**— २३ जून १७५७**

## आषाढ शु. ७ "ईश्वरें मोठा घात केला!"

शके १६९९ च्या आषाढ शु. ७ रोजीं नारायणराव पेशवे यांची पत्नी व सवाई माधवराव पेशवे यांची आई गंगाबाई हिचें निधन झालें.

ही साठे यांच्या घराण्यांतील होय. हिचें लग्न सिंहगडीं त्र्यंबकराव मामानें लावलें. नारायणरावाच्या वधानंतर गंगाबाई गरोदर असल्याचें समजल्यावरून राघोबादादाच्या पक्षाच्या लोकांकडून हिला मारण्याचे प्रयत्न सुरू झाले. त्यामुळें हिचें संरक्षण करणें हें एक बारभाईचें कर्तव्य होऊन राहिले. नारायणरावास माधवरावांनीं आपल्या हातीं सोंपविले असतां त्याचा बचाव करणें आपणाला अशक्य झालें म्हणून सखारामबापू अगोदरच दुःखी होते. आणि आतां गंगाबाईस मारण्याचे प्रयत्न सुरू झाले तेव्हां आपण इतकी मंडळी पेशव्यांचें अन्न खाल्लेली जवळ असतां गंगाबाईच्या असहाय स्थितींत तिचा आपल्याकडून नुसता बचावसुद्धां होऊं नये, याबद्दल कारभारी मंडळीस खेद झाला. त्यामुळे अर्थातच चाललेल्या बारभाईच्या कारस्थानास जोर आला. शनिवारवाड्यांत गंगाबाईची अवस्था अत्यंत वाईट आहे असें निश्चित होतांच' पुष्कळ वाटाघाटी झाल्यावर सखारामबापूनें नारो अप्पाजी तुळशीबागवाले यांच्या साह्यानें बाईस शनवारवाड्यांतून माहेरीं साठे यांच्या घरीं जाण्याच्या निमित्तानें बाहेर काढून लगोलग पालखींत बसवून बंदोबस्तानें पुरंदर किल्ल्यावर पोहोंचतें केलें. तेथूनच शके १६९६ माघ शु. ५ रोजीं गंगाबाईच्या नांवानें कारभार सुरू झाला. यानंतर येथेच वैशाख शु. ७ ला गंगाबाई प्रसूत झाली. आणि तिला मुलगा झाला. हाच महाराष्ट्राचा आवडता पेशवा सवाई माधवराव. याच्या वयाच्या चाळिसाव्या दिवशींच याला पुरंदर किल्ल्यावर पेशवाईचीं वस्त्रें प्राप्त झालीं. या मुलाच्या आयुष्यांतील अत्यंत दुःखद प्रसंग म्हणजे गंगाबाईचा मृत्यु होय. "ईश्वरें मोठा घात केला. श्रीमंत लहान आहेत, मातुश्री पांघरूण होतें तें गेलें. निरुपाय गोष्ट भगवंतें घडविली. किल्ल्यावरच दहन झालें. रावसाहेब बाईसाहेबांस पुसतात, कोठें आहेत? तेव्हां सांगतात देवास गेली आहेत. 'त्यास आणवा' असें म्हटल्यावर आणवितों असे सांगून विसरी पाडितात." बालपेशव्यावरील हा प्रसंग करुणरम्य नाहीं असें कोण म्हणेल?

— १२ जुलै १७७७

## आषाढ शु. ८ 'तख्ताची जागा' हस्तगत झाली!

शके १६५५ च्या आषाढ शु. ८ रोजीं परकीय सत्तेत असलेला रायगड किल्ला श्रीनिवासराव प्रतिनिधि यांनीं ताब्यांत घेतला.

राजारामाच्या मृत्यूनंतर औरंगजेबास हुरूप चढून त्याने एकामागून एक असे किल्ले हस्तगत करण्यास सुरुवात केली. परंतु मराठ्यांनीं सुद्धां मोठ्या शिताफीनें जवळजवळ सर्व किल्ले परत मिळविले. परंतु पुढे मराठयांचा सर्व कारभार सातारा येथून चालू झाल्यामुळें रायगडचें महत्त्व कमी झाल्यासारखें झालें. त्याचा फायदा जंजिऱ्याच्या सिद्दीनें घेण्यास सुरुवात केली. राजापुरी, तळगड, घोसाळगड, बिरवाडी, रायगड, इत्यादि ठाणीं सिद्दी याकूतखानानें काबीज केलीं. दरम्यानच्या काळांत ब्रह्मेंद्रस्वामी आणि सिद्दी यांचें मोठें वितुष्ट येऊन स्वामी धावडशीस येऊन राहिले. आणि सिद्दीचे पारिपत्य करण्यासाठीं सारखा आग्रह सुरू झाला. बाजीराव पेशवे यांची या कामगिरीवर नेमणूक झाली. त्यांनीं मोठा पराक्रम गाजवून गेलेलीं ठिकाणें हस्तगत केलीं. तरी सुद्धां अंजनवेल, गोवळकोट, विजयदुर्ग, जंजिरा, रायगड व उंदेरी हीं महत्त्वाचीं ठाणीं शत्रूच्याच हातांत होतीं. शाहूने सिद्दीचा समाचार घेण्यासाठीं श्रीनिवासराव प्रतिनिधीचीहि योजना केली. प्रतिनिधि यांनीं कारस्थान रचून हा विख्यात असा रायगडचा किल्ला, मराठ्यांच्या 'तख्ताची जागा' आषाढ शु. ८ रोजीं आपल्या ताब्यांत घेतली. शाहूमहाराजांना ही वार्ता समजल्यावर त्यांनीं प्रतिनिधींना स्वहस्तें पत्र लिहिलें—"घेतलया स्थळाचें संरक्षण होय तें करणें आम्ही ईश्वरी इच्छा आहे तर श्रावणांत रायरी व बाजे किल्ले पाहावयास येऊं. रा. शिवाजीमहाराज, व. रा. आबासाहेब संभाजीमहाराज, व काकासाहेब (राजाराममहाराज) व ताराबाई यांस कोणास न जाहलें तें कार्य चि. फत्तेसिंगबाबा व रा. प्रधान यांनीं केले ही कीर्त जगत्रयीं व निजामउल्मुल्क व दिल्लीपावेतों जाहली. हा लौकिक जेणेकरून कायम राहील तें करणें. 'अनारंभो मनुष्याणां प्रथमं बुद्धिलक्षणम्' जें सांगणें तें जातेसमर्थीं सांगितलेंच आहे.—" रायगड हस्तगत झाल्यामुळें पंतप्रतिनिधींचें वजन बरेंच वाढलें.

—८ जून १७३३

## आषाढ शु. ९ — शिवराय–जयसिंग भेट !

शके १५८७ च्या आषाढ शु. ९ रोजीं शिवाजी राजे यांनी मिर्झा राजा जयसिंग यांची भेट घेतली.

औरंगजेबानें राजा जयसिंग याची नेमणूक शिवाजीचा पाडाव करण्यासाठीं म्हणून केली. त्याच्या हाताखालीं पठाण दिलेरखान हा होता. दोघेहि महापराक्रमी होते. जयसिंग तर युद्धकौशल्यांत अत्यंत बाकबगार असा होता. परंतु शिवाजीस जिंकणें अत्यंत अवघड होतें. शाहिस्तेखान, जसवंतसिंग, अफजलखान यांचीं उदाहरणे ताजीं होतीं. तीं ध्यानांत ठेवूनच जयसिंग मोठ्या तयारीनिशी पुण्यापर्यंत आला आणि लोहगड, पुरंदर व राजगड या ठिकाणीं त्यानें युद्ध चालू ठेविलें. दिलेरखानाने पुरंदर किल्ल्यास वेढा घातला. या वेळीं मुरारबाजीनें अद्वितीय पराक्रम करून आत्मार्पण केलें. जयसिंगाचीहि तयारी जोरांत चालली होती. धोरणाने सलोख्याचा तह करावा असा विचार शिवाजीने केला. आपल्या मनांतील हेतु शिवाजीने पत्रद्वारें जयसिंगास कळविला. त्यांत लिहिले, " हे श्रेष्ठ सरदारा, तुझ्यामुळें रजपुतांची मान उन्नत आहे. मीं असें ऐकलें आहे कीं, मजवर हल्ला करण्यासाठीं व दख्खन जिंकण्यासाठीं तूं आला आहेस ; पण तुझ्या या कृत्याने देशावर व धर्मावर मोठी आपत्ति ओढवलेली आहे. आपण या वेळीं हिंदु, हिंदुस्थान व हिंदु धर्म यांच्या संरक्षणार्थ फार जोराचे प्रयत्न केले पाहिजेत." शिवराय जयसिंग यांची भेट ठरली. जयसिंगाच्या शिबिरांत शिवाजी दाखल झाला तेव्हां मोठी खळबळ उडून राहिली. ज्याला त्याला वाटे, शिवाजी काय गडबड उडवितो कोणास ठाऊक, परंतु त्याजबरोबर फारसे लोक नाहीत असें पाहून लोकांची अंतःकरणे शांत झालीं. आपल्या तंबूला लागूनच शिवाजीला राहण्यासाठीं जयसिंगाने एक स्वतंत्र तंबू दिला. एके दिवशीं रात्रीं मनूची व जयसिंग पत्ते खेळत असतां शिवाजीनें आंत येऊन विचारलें, ' हे कोण ? ' जयसिंगानें उत्तर दिले, ' हे फिरंग्यांचे राजे आहेत. ' नंतर मनूची व शिवाजी यांचे पुष्कळ वेळां संभाषण झालें. शिवाजीचा मुक्काम जयसिंगाकडे दोनतीन दिवस होता. शिवाजीचें राष्ट्रप्रेम व त्याचा सद्धेतु यांचा परिणाम जयसिंगावर झाला.

— ११ जून १६६५

## आषाढ शु. १० (१) गुलाबरावमहाराजांचा जन्म !

शके १८०३ च्या आषाढ शु. १० रोजी असामान्य साधु पुरुष गुलाबरावमहाराज यांचा जन्म झाला.

उमरावतीपासून दहाबारा मैलांवर असणाऱ्या लोणी (टाकळी) या गांवीं यांचा जन्म झाला. हे नऊ महिन्यांचे होतांच यांचे डोळे जाऊन यांना कायमचें अंधत्व प्राप्त झालें. लहानपणीं आई वारल्यानंतर यांचें पालनपोषण आईच्या आईनें केले. यांची श्रीज्ञानदेवावर अत्यंत निष्ठा. एके दिवशीं श्रीज्ञानदेवांनीं स्वप्नांत येऊन दृष्टांत दिला कीं, "वैदिक धर्म व कृष्णभक्ति यांचा प्रसार करा." त्यानंतर यांनीं स्वतःला 'ज्ञानेश्वरकन्या' व 'कृष्णपत्नी' अशीं नांवें घेऊन आपल्या कार्यास सुरुवात केली. यांची कवित्वशक्ति अपूर्व होती. बसल्या बैठकीस हजार-बाराशें ओव्या अगदीं सहज निर्माण करून हे इतरांना भगवत्प्रेम चाखवीत असत. यांच्या बुद्धीचें वैभवहि मोठेंच होतें. सांख्य, योग, वेदान्त, वैद्यक, व्याकरण, आदि विषय हे शिकवीत असत. हे मधुराद्वैताचे पुरस्कर्ते असून यांची ग्रंथसंपत्तिहि पुष्कळ आहे. संप्रदायसुरतरु, भागवत-रहस्य, प्रेमनिकुंज, साधुबोध (व्यवहारधर्मबोध), अभंग-गाथा, आदि ग्रंथ यांच्या सांप्रदायाचें तत्त्वज्ञान विषद करणारे आहेत. पाश्चात्य तत्त्ववेत्त्यांचा परिचयहि गुलाबरावांना उत्तम प्रकारें होता. प्लेटो, ॲरिस्टॉटल, सॉक्रेटीस, कँट, हेगेल, मिल्ल, इत्यादि तत्त्ववेत्त्यांच्या ग्रंथांचें विवरण हे सुबोधपणें करीत. "यांच्याकडे पाहिलें कीं हा पुरुष मूर्तिमंत चमत्कार आहे असे वाटे. हे बोलूं लागले कीं भक्तिमार्गाचा नुसता पाऊस पडे. हे चर्चा करूं लागले कीं यांची निर्दोष वादसरणी, विलक्षण ज्ञान व युक्तिवाद पाहून मन कुंठित होई. यांची अत्यंत मधुर वाणी ऐकून चित्त नागासारखें डोलूं लागे... अव्यंग कर्म, विशुद्ध ज्ञान, अलोट भक्ति या तिहींचें एकीकरण यांच्यांत झालेलें होतें. पण याशिवाय अर्वाचीन चिकित्सक दृष्टीलाहि ज्याचा उलगडा होत नाहीं अशा कित्येक गूढ गोष्टी यांच्याजवळ होत्या." असें कै. ल. रा. पांगारकर यांनीं म्हटलें आहे. अवघ्या चौतिसाव्या वर्षी यांनीं समाधि घेतली.

— ६ जुलै १८८१

## आषाढ शु. १०  (२) दादाभाई नवरोजींचें निधन!

शके १८३९ च्या आषाढ शु. १० रोजीं राष्ट्रसभेच्या आद्य संस्थापकांपैकीं एक, स्वराज्य या राजकीय ध्येयाचे जनक आणि अर्थशास्त्राच्या साह्याने सरकारविरुद्ध लढणारे पहिले जहाल टीकाकार दादाभाई नवरोजी यांचे निधन झालें.

यांचें शिक्षण मुंबईस एल्फिन्स्टन इन्स्टिटयूटमध्ये झाल्यावर तेथेंच त्यांनीं शिक्षक व प्राध्यापक म्हणून काम केलें. मुंबईत यांनीं स्टूडण्ट्स लिटररी अॅण्ड सायण्टिफिक् सोसायटी स्थापून तिच्या गुजराथी व मराठी शाखा काढल्या. सन १८५५ मध्ये 'रास्त गोफ्तर' हें गुजराथी साप्ताहिक यांनींच काढलें. सन १८५५ मध्यें लंडनच्या कामा अॅण्ड कंपनींत मॅनेजरची नोकरी धरून आपल्या राजकीय कामगिरीस आरंभ केला. सन १८६७ मध्यें ईस्ट इंडियन असोसिएशन स्थापन करून तिच्यातर्फे हिंदुस्थानविषयक निबंध वाचणें व व्याख्यानें देणें वगैरे कार्यें सुरू झालीं.

राज्यकारभारांतील दोष मांडण्यापासून ते स्वराज्य हें ध्येय जाहीर करून त्याकरतां प्रयत्न करणारी प्रमुख संस्था असे स्वरूप देण्यापर्यंतच्या कॉंग्रेसमधील प्रत्येक स्थित्यंतरांत यांनीं प्रामुख्याने भाग घेतला. कलकत्ता, लाहोर व पुनः कलकत्ता या तीन अधिवेशनांचे हे अध्यक्षहि होते. राष्ट्राच्या जीवनांत इतर कोणत्याहि गोष्टीपेक्षां आर्थिक व शैक्षणिक बाबींना अत्यंत महत्त्व असतें ही गोष्ट यांनींच लोकांपुढें प्रथम ठळकपणें मांडली. 'पॉव्हर्टी अॅण्ड अन-ब्रिटिश रूल इन इंडिया' हा यांचा अत्यंत महत्त्वाचा असा अर्थशास्त्रीय ग्रंथ होय. हल्लींची ब्रिटिश सत्ता 'जेवढें उकळतां येईल तेवढें उकळून घ्या' अशा स्वरूपाची आहे. हिंदुस्थानप्रमाणें ती इंग्लंडलाहि घातक आहे. सध्यांच्या हिंदुस्थानच्या विपन्न स्थितींत एक पैचाहि फायदा हिंदुस्थानच्या पदरात पडूं न देतां लक्षावधि रुपयांचें मालाच्या रूपानें शोषण चाललें आहे. हें यांनीं आंकड्यांनीं सिद्ध करून दाखविलें आणि त्यावर परिणामकारक उपाययोजना सुचवून मालक–गुलाम या नात्यापेक्षां सहकार्याच्या भावनांनीं हिंदुस्थानाकडे पाहण्याची सूचना यांनीं सरकारला दिली. England's duties to India, Financial Administration of India हे यांचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

—३० जून १९१७

## आषाढ शु. ११ शयनी एकादशी !

आषाढ शु. ११ हा दिवस महाएकादशी म्हणून प्रसिद्ध असून याला शयनी एकादशी असेंहि नांव आहे.

एकादशीच्या उत्पत्तीसंबंधानें अशी कथा सांपडते. कुंभ दैत्याचा पुत्र मृदुमान्य हा शंकराच्या कृपेमुळें अमर होऊन देवांना त्रास देऊं लागला होता. ब्रह्मा-विष्णु वगैरे देव भिऊन गेले व त्यांनीं त्रिकूट पर्वतावर धात्री झाडाखालीं एका गुहेचा आश्रय केला. अर्थात् तेथें त्यांना उपोषण घडलें. त्याच स्थानीं त्यांच्या श्वासापासून एक दिव्य शक्ति निर्माण झाली. तिने दाराशी टपून बसलेल्या मृदुमान्य दैत्याचा नाश केला. हिचेंच नांव देवी एकादशी. हिच्यांत सर्व देवांचें तेज एकवटलेलें असल्यामुळे शिव व विष्णु या दोनहि देवांच्या भक्तांत एकादशी प्रिय झाली.

या दिवशीं विष्णु शयन करतात; चातुर्मासाचा आरंभ याच दिवशीं होतो. भारतीय संस्कृतींत विष्णुदेवतेला फारच महत्त्वाचें स्थान आहे. यालाच नारायण, वासुदेव अशींहि नांवें आहेत. याच देवाच्या वैष्णवधर्मास मोठेंच महात्म्य प्राप्त झाले आहे. याच धर्माचा विकास कालांतराने भागवत धर्मांत झाला. भक्तिप्रेमाला महत्त्व देऊन शूद्र, अतिशूद्र यांनाहि या धर्मांत परमेश्वराचा मार्ग मोकळा झाला. 'उंच नीच कांहीं नेणे हा भगवंत' असें तत्त्वज्ञान रूढ झालें. महाराष्ट्रांत तर या भागवत धर्मानें फारच प्रगतिकारक असें कार्य केलें आहे. ज्ञानेश्वर-नामदेवांच्या काळांत या भागवत धर्माच्या मंदिराचा पाया घालण्यांत आला आणि तुकारामबोवांनीं भगवद्भक्तीचा कळस त्यावर चढविला. आषाढी एकादशीस पंढरपुरास आजहि दोन दोन लाखांची यात्रा भरत असते. ज्ञानेश्वर, तुकाराम, एकनाथ, निवृत्तिनाथ, मुक्ताबाई, मत्स्येंद्रनाथ, सोपानदेव, सांवतामाळी यांच्या पालख्या आजहि मोठ्या थाटाने मिरवीत मिरवीत पंढरपुरास जात असतात. या वारकरी सांप्रदायानें लोकजागृतीचें काम सतत सातआठशें वर्षें करून देशाची मोठीच सेवा केली आहे. परमार्थाच्या प्रांतांत लोकशाहीचे रूप विकसित करण्यांत या पंथास चांगलेंच यश आलें आहे.



## आषाढ शु. १२ दाहिर राजाचा वध !

शके ६३४ च्या आषाढ शु. १२ रोजीं महंमद कासीमनें सिंध देशच्या दाहिर राजावर स्वारी करून त्याचा वध केला !

प्राचीन काळापासून भारताशीं अरब लोकांचा व्यापार होता. या वेळीं बगदाद येथे वलीद खलीफा गादीवर होता. सिंध देशच्या राजाशीं दाहिरशीं मुसलमानांचें भांडण निघाले. सिंध देशांतील देवल नामक बंदरांत मुसलमानांचे एक हजार लोक रजपुतांनीं पकडून ठेवले होते. त्यांची मागणी मुसलमानांनीं दाहिरकडे केली. पण देवल बंदर त्याच्या ताब्यांत नसल्यामुळे फौजेनिशीं देवल येथील देवालयावर हल्ला केला. देवल हस्तगत झाल्यावर त्यांतील ब्राह्मण मुसलमानी धर्म स्वीकारीनात म्हणून कासीमनें सतरा वर्षांवरील सर्व ब्राह्मणांची कत्तल केली व इतरांस गुलाम म्हणून स्वदेशीं पाठविलें. त्यानंतर कासीमने दाहिरवर स्वारी केली. उभयतांची मोठी लढाई होऊन तींत तो मरण पावला; तरी त्याच्या शूर राणीनें सर्व फौज एकत्र करून पुनः एकदां निकराचें युद्ध केलें, पण तिला अपयश आलें. आणि शेवटीं सिंध देश इस्लामी राज्याच्या ताब्यांत गेला.

दाहिर हा चचाचा मुलगा असून जातीनें तो ब्राह्मण होता.

या दाहिर राजास दोन मुली होत्या. त्यांना पकडून कासीमने खलीफ वलीद यास नजर म्हणून पाठवल्या. त्यांनीं आपल्या बापाचा वध करणारा कासीम याचा विलक्षण पद्धतीनें सूड घेतला. वडील मुलीवर खलीफाची मर्जी बसली. तेव्हां ती बोलली – ‘ मजवर कासीमनें बलात्कार केला असल्यामुळें मी भ्रष्ट झालें आहें –” खलीफास कासीमचा अत्यंत संताप आला, आणि त्यानें कासिमास ठार मारून त्याचें प्रेत दमास्कस येथें आणवलें; तेव्हां मुलीस मोठा आनंद होऊन ती उद्‌गारली, “माझ्या बापाचा घात करणाऱ्या दुष्टाचा चांगला सूड घ्यावा एवढ्याचसाठीं मीं हा आरोप त्याजवर केला. मी भ्रष्ट नाहीं ! –” मुलीचें हें खोटें वर्तन पाहून खलीफानें तिलाहि ठार मारिलें. पातिव्रत्यापेक्षां मरण पत्करणें तिला श्रेयस्कर वाटलें.

— २० जून ७१२

## आषाढ शु. १३ पापाचें घोर प्रायश्चित्त !

शके १८३१ च्या आषाढ शु. १३ रोजी हिंदुस्थानांतील प्रसिद्ध क्रान्तिकारक मदनलाल धिंग्रा यानीं इंडिया ऑफिसचे राजकीय ए. डी. सी. सर विल्यम कर्झन वायली यांचा खून केला !

धिंग्रा यांचें घराणें पंजाबांतील हिन्दु क्षत्रियाचे होय. इंग्लंडमध्ये आल्यावर याचें मन क्रान्तिवादाकडे झुकूं लागलें. 'नॅशनल इंडियन असोसिएशन' या संस्थेचा वार्षिक समारंभ आषाढ शु. १३ रोजीं रात्रीं 'इंपीरियल इन्स्टिटयूट' च्या जहांगीर हॉलमध्यें होता. आठ वाजण्याच्या सुमारास मदनलाल या ठिकाणीं आले. हॉलमध्यें प्रवेश मिळण्याची व्यवस्था करून ते आंत शिरले. नऊ-साडेनऊ वाजण्याच्या सुमारास सर्व निमंत्रित मंडळी जमा झाली. साडेदहाच्या सुमारास कर्झन वायली व त्यांच्या पत्नी समारंभस्थानीं येऊन पोंचलीं. मदनलालजींना आपणाशीं कांहीं बोलावयाचे आहे असें समजून वायलीसाहेब त्यांचेजवळ गेले. क्षणार्धांत आपल्याजवळचे पिस्तुल काढून मदनलालनीं पहिला बार उडविला. लागोपाठ दुसरी, तिसरी व चौथी गोळी झाडण्यांत आल्यामुळे वायली गतप्राण होऊन जमिनीवर पडले. डॉ. लालकाका मदनलालांच्या पांचव्या गोळीला बळी पडला, आणि शेवटची गोळी स्वतःवर उडवून घेण्यासाठीं मदनलाल सिद्ध झाले तों सर लेस्ली प्रोबिन यांच्या प्रयत्नामुळें मदनलालांना हें कृत्य करणें शक्य झालें नाहीं.

कोर्टांतील चौकशीच्या वेळीं केलेल्या वक्तव्यांत मदनलालजी म्हणाले, "जर्मनांनीं इंग्लंड देश पादाक्रांत केल्यास त्या आक्रमणाविरुद्ध लढणारा इंग्रज जर देशभक्त ठरणार असेल तर मी इंग्रजांविरुद्ध केलेला झगडा अधिकच न्याय्य व देशाभिमानाचा आहे. गेल्या पन्नास वर्षांत आठ कोटी हिंदी लोकांचे खून झाले, या खुनांचें पाप इंग्रजांच्या डोक्यावर बसतें असें माझें मत आहे.... इंग्रजांनीं हिन्दुस्थान देश आक्रमून राहूं नये. आपल्या पावन मायभूमीला दूषित करणाऱ्या इंग्रजाला हिंदी लोकांनीं मारणें ही गोष्ट संपूर्णपणे समर्थनीय आहे." मदनलाल यांच्या या वक्तव्याबद्दल सर्वत्र मोठी खळबळ उडाली.

— १ जुलै १९०९

## आषाढ शु. १४ "मी गुन्हेगार नाहीं!"

शके १८३० च्या आषाढ शु. १४ रोजीं लोकमान्य टिळक यांच्यावरील राज्यद्रोहाच्या दुसऱ्या खटल्याचें काम सुरू झालें.

या वेळीं बंगाल्यांत क्रांतिकारकांचें युग सुरू झालें होतें. त्यावरील 'केसरी' तील लिखाण सरकारला झोंबून टिळकांच्यावर खटला भरण्यांत आला. न्या. दावर यांचेपुढें काम सुरू झालें. टिळक स्वतःच काम पाहणार होते. स्वतःच्या बचावाचे भाषण टिळकानीं साडेचार दिवसपर्यंत केलें. त्यांतील विद्वत्तापूर्ण विवेचन पाहून कायदेपंडितांनीं माना डोलविल्या. इंग्लंडमधील राज्यद्रोहाचा कायदा, तेथील खटले, ज्यूरीच्या अधिकाराचें क्षेत्र, मुद्रणस्वातंत्र्याचा इतिहास, त्याचा कायदा आदि विषयांवर मुद्देसूद विवेचन टिळकांनीं केलें. त्याचा फारसा उपयोग झाला नाहीं. शिक्षा सांगण्यापूर्वीं आरोपीस विनंति केली त्या वेळीं लो० टिळक बोलले : All I wish to say is that in spite of the verdict of the Jury, I maintain that I am innocent. There are higher powers that rule the destinies of things and it may be the will of Providence that the cause which, I represent, my prosper more by my sufferings than by my remaining free. (मला सांगावयाचें असें फार थोडेंच आहे. ज्यूरीने मला दोषी ठरविलें तर खुशाल ठरवो. पण मी गुन्हेगार नाहीं. लौकिक गोष्टींचें नियंत्रण करणारी अशीहि एक शक्ति न्यायपीठाहूनहि वरिष्ठ आहे. कदाचित् ईश्वराची इच्छाच असेल कीं, मला शिक्षा व्हावी आणि मीं शिक्षा भोगल्याच्या कारणानेंच मीं अंगीकारिलेल्या कार्याला ऊर्जित दशा यावी.) यावर न्यायमूर्तींनीं शिक्षा सांगितली, "तुम्हांला शिक्षा सांगतांना मला दुःख होत आहे. कमींत कमी शिक्षा म्हणून सहा वर्षांची काळे पाण्याची सजा मी तुम्हांस देतों." रात्रीचा दहाचा सुमार होता तरी कोर्टाबाहेर लोकांची गर्दी पावसांत उभी होती. तिला चकवून, कोर्टाच्या मागील दारानें टिळकांना बाहेर नेऊन आगगाडींत बसविण्यांत आलं. दुसऱ्या दिवशीं टिळक साबरमतीच्या तुरुंगांत दाखल झाले. तो दिवस (२३ जुलै) त्यांच्या बावन्नाव्या वाढदिवसाचा होता.

— १३ जुलै १९०८

## आषाढ शु. १५ — लो. टिळकांचें निधन !

शके १८४२ च्या आषाढ शु. १५ रोजीं भारतातील राजकीय असंतोषाचे जनक, थोर राजकारणी मुत्सद्दी, वृत्तपत्रकार, वेदादि प्राचीन वाङ्मयाचे अभ्यासक, लोकमान्य टिळक यांचा मुंबईला अंत झाला.

टिळकांचें अंत्यदर्शन घेण्यासाठीं मुंबईकडे सारा महाराष्ट्र धांवला, पुण्याहून स्पेशल आगगाडी सुटली. स्मशानयात्रा मुंबईसच निघण्याचें ठरलें. चौपाटीवर दहनविधि करण्यास सरकारनें परवानगी दिली. दिवस रविवारचा होता. दुपारीं दोन वाजतां स्मशान-यात्रा निघाली. अनेक प्रमुख लोकांनीं प्रेतास खांदा दिला त्यांत म. गांधीहि होते. अफाट जनसमुदाय लोटला होता. पाऊस जोराचा पडत होता, तरी त्याची पर्वा कोणाला होती ? दिंड्यांचें भजन सुरू असून जागजागीं पुष्पवृष्टि होत होती. चौपाटीवर पोहोंचल्यावर थोर लोकांचीं समयोचित भाषणें झाल्यावर टिळकांचा पार्थिव देह चंदनकाष्ठांच्या सरणावर ठेवून त्यास अग्निसंस्कार करण्यांत आला.

त्या दिवशींच्या 'संदेश' मध्यें अच्युतराव कोल्हटकर लिहितात—

"--गेल्या चाळीस वर्षांत सूर्यानें इतक्या येरझाऱ्या केल्या, वायु इतके वेळ वाहला, समुद्राला इतके वेळ भरती आली, तारे इतक्या वेळां चमकले, पण त्या प्रत्येक चमकण्यानें, भ्रमणानें, लाटेनें, पवनानें हेंच तत्त्व पुनः पुनः प्रस्थापित केलें आहे कीं, टिळक म्हणजेच महाराष्ट्र आणि महाराष्ट्र म्हणजेच टिळक ! ह्या चाळीस वर्षांतील एक कृति काढा, एक गोष्ट घ्या, एक वर्तमानपत्र वाचा, एक राजकारण उलगडा, त्या शोधकांना काय आढळेल ? १८८० मध्यें टिळक महाराष्ट्राच्या राजकीय पटांगणांत उतरले आणि १९२० मध्यें ते महाराष्ट्र सोडून गेले. इतक्या अवधींत एकच नांव भरलेले आहे आणि तें कोणतें ? तर 'बाळ गंगाधर टिळक !'" टिळकांच्या निधनानंतर सर्व भरतखंडांत त्यांचीं स्मारकें झालीं. मुंबईला ज्या ठिकाणीं त्यांच्या शवाला अग्नि देण्यांत आला त्या ठिकाणीं सन १९३३ मध्यें टिळकांचा भव्य पुतळा लोकनायक बापूजी अणे यांच्या हस्तें उभारण्यांत आला.

— १ ऑगस्ट १९२०

## आषाढ व. १ "आतां मी सुखानें मरतों!"

शके १५८२ च्या आषाढ व. १ या दिवशीं बाजी प्रभू देशपांडे याने श्रीशिवाजी-महाराज यांच्या जिवासाठीं आपला प्राणत्याग केला!

सिद्दी जौहार उर्फ सलाबतखान हा शिवाजी ज्या पन्हाळगडावर होता तेथें स्वारीसाठीं चालून आला होता. पन्हाळ्याच्या वेढ्याचें स्वरूप बिकट झालें. शिवाजीनें शरणागतीची आणि तह करण्याची हुलकावणी दाखविली; आणि वेढा ढिला पडतांच आषाढ व. १ या दिवशीं मध्यरात्रीं मावळ्यांची एक हजारांची टोळी घेऊन शिवाजी शत्रूच्या चौक्या–पहारे चुकवून बाहेर पडला– आणि थेट विशाळगडाकडे निघून गेला. सलाबतखानाचा जांवई सिदी मसूद व फाजलखान पाठलाग करूं लागले. विशाळगडाचा घाट चढत असतां शत्रु पाठलाग करीत आहे असे पाहून शिवाजीनें बाजीप्रभूस सांगितले, "मी किल्ल्यावर जाऊन तोफा ऐकवितो, तोंपर्यंत शत्रु या खिंडींत थोपवून धर."

शूर वीर बाजी प्रभु खिंडींत उभा राहिला. यवन येऊन भिडले. अनेक हल्ले मागे परतविले गेले. फाजलखान ताजा दमाची तुकडी घेऊन आला. बाजीचे बहुतेक लोक पडले होते. तरी तो निकराने लढत तोफेच्या आवाजाकडे लक्ष देत होता. स्वामिभक्त बाजीला गोळी लागून तो खालीं पडला. प्राणोत्क्रमणापूर्वी तोफांचे आवाज ऐकूं आले. बाजी प्रभूच्या चेहऱ्यावर समाधान चमकलें —"मी आपली कामगिरी बजावली, आतां सुखानें मरतों —" असें म्हणून त्यानें प्राण सोडला.

बाजीप्रभु हा हिरडसचा देश कुलकर्णी. यानें शिवाजीस अनेक वेळां मदत केली होती. मोगल, आदिल, सिद्दी, सावंत, आदि शत्रूंनीं शिवाजीस घेरलें असतांना याच शूर वीरानें प्राणपणानें शिवरायांना मदत केली. शेवटीं आपल्या स्वामीसाठीं यानें प्राणहि दिलेला पाहून याच्या एकनिष्ठेची साक्ष पटते. याच्या मृत्यूनंतर उरलेल्या मावळ्यांनीं शत्रूंच्या अफाट सैन्याला तोंड देत देत याचे शव रांगण्यावर नेलें. शिवरायासाठीं प्राण देणारे असे जे सौंगडी त्या काळांत निर्माण झाले होते त्यांत बाजी प्रभु देशपांडे याचें नांव प्रामुख्यानें चमकणारें आहे.

—१३ जुलै १६६०

## आषाढ व. २ — रा. स्व. संघावरील बंदी उठली!

शके १८७१ च्या आषाढ व. २ रोजीं 'राष्ट्रीय स्वयंसेवक संघ' या विख्यात संघटणेवरील बंदी हिंद सरकारनें उठविली. एक वर्ष पांच महिने व आठ दिवसांचा वनवास संघाला भोगावा लागला.

महात्मा गांधीं यांच्या वधानंतर दि. ४ फेब्रुवारीला सरकारनें रा. स्व. संघ बेकायदा ठरविला. हिंदुस्थानास मिळालेलें स्वातंत्र्य धोक्यांत आणून देशाच्या नांवास काळे फासणाऱ्या अनेक विद्वेषी व अत्याचारी वृत्ति निर्माण झाल्या होत्या, त्या सर्वांना आळा घालण्याचा विचार सरकार करीत होते. अतिशय मोठया प्रमाणावर हिंदु समाजाचें सांस्कृतिक ऐक्य करणाऱ्या संघाकडेहि सरकारची वक्रदृष्टि फिरली. संघ बेकायदा ठरवितांना अत्याचार, जाळपोळ, चोरी, दरोडेखोरी, खून, शस्त्रें जमविणें इत्यादि प्रकारचे गंभीर आरोप संघावर ठेविण्यांत आले होते. सहासात महिने झाल्यानंतर बंदी उठविण्याचा विचार प्रांतिक सरकारच्या सल्यानें झाला. परंतु त्याला यश आले नाहीं. पू. गोळवलकर गुरुजी यांनी पं. नेहरू व सरदार पटेल यांच्या भेटी घेतल्या, पण त्याचा परिणाम त्यांच्या स्थानबद्धतेतच झाला. त्यानंतर नऊ डिसेंबर रोजीं सबंध भरतखंडांत संघानें अभूतपूर्व असा सत्याग्रह सुरू केला. लक्षावधि स्वयंसेवक तुरुंगांत गेले. २० जानेवारीला 'केसरी'कार ग. वि. केतकर यांच्या मध्यस्थीनें संघ सत्याग्रह स्थगित झाला. ८ एप्रिल रोजीं दिल्लीस पंतप्रधानांची बैठक भरली होती. त्यांत सरसंघचालकांनीं पाठविलेल्या घटनेच्या मसुद्याचा विचार होऊन सत्याग्रहींना मुक्त करण्यास सरकार तयार झालें. मद्रासचे प्रागतिक पुढारी श्री. व्यंकटरामशास्त्री यांनीं संघ-घटनेचा मसुदा तयार करण्यास मोठेंच साह्य केले. परंतु त्यांचें आणि सरकारचें पटलें नाहीं. शेवटीं मध्यप्रांताचे गृहमंत्री श्री. द्वारकाप्रसाद मिश्र यांच्या प्रयत्नास यश आलें आणि आषाढ व. २ रोजीं संघ-बंदी रद्द झाल्याचें जाहीर झालें. संघाच्या इतिहासांत ही मोठीच घटना आहे. प्रसिद्धीची हांव न धरितां संघानें आपला विस्तार अवघ्या पंचवीस वर्षांतच हिंदुस्थानच्या कानाकोपऱ्यांतूनहि केला ; आणि संघास लाभलेल्या या वनवासा-मुळें मात्र संघाचें नांव आपोआपच जगांत प्रसिद्ध झालें.

— १२ जुलै १९४९

## आषाढ व. ३ गोस्वामी तुलसीदासांचा देहत्याग !

शके १५४४ च्या आषाढ व. ३ रोजीं हिन्दी भाषेचे महाकवि रामभक्त तुलसीदासजी यांनीं असी घाटावर देहत्याग केला.

तुलसीदासांना रामकृपा झाल्यावर शंकरांनीं संदेश दिला कीं, 'तुम्ही लोकभाषेंत काव्यरचना करून रामचरित्र स्पष्ट करा.' याप्रमाणें अयोध्येलां येऊन संवत् १६३१ च्या रामनवमीला त्यांनीं आपल्या विख्यात रामचरितमानस ग्रंथाला सुरुवात केली. दोन वर्षें सात महिने सव्वीस दिवसांनी ग्रंथाची समाप्ति झाली. लोकभाषेतील या काव्याविरुद्ध कांहीं लोकांनीं गवगवा केला. तरी ग्रंथ आपल्या गुणांनीं लोकप्रियता मिळवूं लागला. सुप्रसिद्ध पंडित मधुसूदन सरस्वतिहि यांच्यापाशीं चर्चा करण्यास आले; व शेवटीं प्रसन्न होऊन त्यांनीं पुढील उद्गार काढले :

" आनन्दकानने ह्यास्मिञ्जङ्गमस्तुलसीतरुः
कवितामञ्जरी भाति रामभ्रमरभूषिता ॥ "

तुलसीदासांच्या मित्रमंडळींत नबाब अब्दुल रहीम खानखाना, महाराजा मानसिंग, नाभाजी आदि मोठमोठे लोक होते. केशवदास, सूरदास यांच्या भेटी तुलसीदासांनीं घेतल्या होत्या. यांची ग्रंथसंपत्ति पुढीलप्रमाणें आहे : (१) रामचरितमानस (२) कवित्त रामायण (३) दोहावली (४) रामगीतावली (५) रामाज्ञा (६) बरवै रामायण (७) रामलला नहछु (८) वैराग्यसंदीपनी (९) कृष्णगीतावली (१०) पार्वती मंगल (११) जानकी मंगल (१२) रामसतसई (१३) ननुमद बाहुक इत्यादि. यांपैकीं रामचरितमानस हा सर्वश्रेष्ठ ग्रंथ लोकमान्य झाला असून याच्या कोट्यवधि प्रती आजपर्यंत खपल्या आहेत. राजाच्या महालापासून गरिबाच्या झोंपडीपर्यंत याचा प्रसार आहे. एके दिवशीं कलियुगानें मूर्तरूप धारण केलें व तो तुलसीदासजीजवळ येऊन त्यांना त्रास देऊं लागला, तेव्हां हनुमानाच्या सांगण्यावरून श्रीरामचंद्राला त्यांनीं एक 'विनयपत्रिका' लिहिली तिची प्रसिद्धि हिन्दी वाङ्मयात मोठीच आहे. अर्वाचीन कालांतील साधु पुरुष स्वामी रामतीर्थ हे तुलसीदासांच्या वंशांतीलच होत.

— ३० जुलै १६२२

## आषाढ व. ३ (२) माधवरावांस पेशवाई !

शके १६८३ च्या आषाढ व. ३ या दिवशीं माधवराव पेशवे यांना वयाच्या सतराव्या वर्षी पेशवाईचीं वस्त्रें मिळालीं. त्या वेळची बिकट परिस्थिति आणि माधवरावांची योग्यता यांचे वर्णन कै. हरिभाऊ आपटे यांच्या 'करमणुकीं' त स्वा. वी. सावरकर यांनीं पुढीलप्रमाणे केलें होते :—

"हिंदुपदपादशाहीची पानपतच्या भयंकर रणकंदनाने दुर्दशा झाली आहे. दोन लाख बांगडी फुटल्यामुळे महाराष्ट्रांतून प्रत्येक घरांतून अबलांच्या हृदयद्रावक किंकाळ्या व वृद्ध मातापितरांचे हंबरडे ऐकूं येत आहेत. स्वराज्य-प्रासादाचे स्तंभ जे सरदार लोक ते खाल्ल्या घरचे वासे मोजूं लागले आहेत. नुकताच उद्गीरच्या लढाईत बडविलेला निजाम, म्हैसूरचा हैदर, रोहिलखंडाचा नबाब, असे एक ना दोन अनेक जण पेशवाईच्या नाशासाठीं "व्रणार्त पशुच्या शिरावरि वनीं उभे काकसे" राहिले आहेत. दोन महिन्यांत स्वकुलगृहाचे तीन आधारस्तंभ पडल्यानें वरील इमारत डळमळूं लागली आहे. होळकर, भोसले, बुंदेले, इत्यादि कृतघ्न सरदार खुशाल तमाशा पाहत उभे आहेत. अशा आणीबाणीच्या प्रसंगीं सतरा वर्षांचे पोर—कीं ज्या वयांत स्वतःच्या शरिराचीहि शुद्ध नसते, व भावंडांतील कलह मिटविण्याची अक्कल नसते—अशा अल्प वयांत हा राजबिंडा माधव प्रपितामहांनी संपादन केलेल्या व पितृपितामहांनीं अटकेस नेऊन भिडवलेल्या जरिपटक्याचा असह्य तोल सांभाळण्यास दंड ठोकून उभा राहिला. आणि अवघ्या दहा वर्षांचे आंत मराठ्यांची कर्तबगारी जनतेला दिसून आली."

माधवराव पेशवे हे बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब पेशवे व गोपिकाबाई यांचे दुसरे चिरंजीव. "माधवराव केवळ सत्याचा पक्षपाती असून थाटमाट, चैन किंवा आराम त्यास बिलकूल खपत नसे. सत्य हें खडतर व कष्टसाध्य असते ; त्याचीच मूर्तिमंत प्रतिमा माधवराव होता. आपण राष्ट्राचे सेवक आहोंत अशी त्याची एकनिष्ठ भावना होती. आणि त्याचा कारभार सर्वस्वीं लष्करी बाण्याचा होता. वाटाघाटींत किंवा विचारांत निष्कारण वेळ न घालवितां झटपट काम करून सर्वांगीण प्रगति संपादण्याकडे त्याचे लक्ष असे."

 —२० जुलै १७६१

## आषाढ व. ४ (१) 'कुलीखाना' चा नेताजी पालकर!

शके १५९८ च्या आषाढ व. ४ रोजीं श्रीशिवाजीमहाराज यांनीं प्रसिद्ध वीर नेताजी पालकर यास शुद्ध करून परत हिंदु धर्मात घेतले.

नेताजी पालकर हा सातारा जिल्ह्यांतील खंडोबाची पाली येथील राहणारा. अफझलखानाच्या लोकांवर तुटून पडून त्याचा पराभव करण्यांत याचाच पराक्रम विशेषत्वानें कारणीभूत झाला. गनिमी काव्याचा आश्रय करून नेताजीने अनेक मुसलमानी अधिकाऱ्यांना बेजार केले होते. दक्षिणेकडील मुलखांत धामधूम उडवून यानें पुष्कळ खंडणी वसूल केली होती. दक्षिणच्या मोहिमेंत ज्या वेळीं जयसिंग होता त्या वेळीं औरंगजेबाच्या सांगण्यावरून जयसिंगाने नेताजीस दिल्लीस पाठविलें होतें. तत्पूर्वीच त्याचा व शिवाजीचा बेबनाव झालेला होता. 'सरनोबत नेताजी पालकर याचा मेहुणा रात्रीस गैरहजर जाला. वर्तमान राजांस विदित होऊन रागास येऊन एक महिन्याची गैरहजेरी करूं लागले. त्या समयीं नेताजींनी बहुत रदबदली केली. म्हणोन स्वामींनीं इतराजी करून दूर केलें', असा खुलासा यासंबंधी सांपडतो. पुढें नेताजी दिल्लीस पोंचल्यावर औरंगजेबाने सांगितले, "तुम्ही मुसलमान व्हा म्हणजे मोठी नोकरी देऊं, नाहीं तर जन्मभर अशीच कैद भोगीत राहिले पाहिजे." तेव्हां शके १५८९ मध्यें बादशहानें त्यास मुसलमानी धर्माची दीक्षा देऊन त्याचे नांव महंमद कुलीखान असें ठेविले. तिकडे चाललेल्या अफगाणिस्तानच्या डोंगरी मुलखांत या कुलीखानानें चांगलेच यश कमाविलें; आणि बादशहाची कृपा संपादन केली. तेव्हां बादशहाने त्यास दिलेरखानाबरोबर शिवाजीचे पारिपत्य करण्यासाठीं पाठविले. परंतु दक्षिणेत आल्यावर हा एके दिवशी गुप्त रूपाने मोंगली छावणींतून शिवाजीकडे आला. शिवरायांनी लगेच आषाढ व. ४ रोजी त्याला प्रायश्चित्त देऊन परत हिंदु धर्माची दीक्षा दिली. "नेताजी पालकर वृत्तींचे निवाडे दूरदृष्टीने विचारून करतात. मुद्दाम महाबळेश्वरास मनुष्य पाठवून विज्ञानेश्वराचा ग्रंथ आणविला.... धर्मशास्त्राचा मथितार्थ काढून ... धर्मतः आपले पूर्वज स्मरोन निवाडा केला." असा मजकूर याच्या न्यायप्रियतेबद्दल सांपडतो.

—१९ जून १६७६

## आषाढ व. ४ (२) सार्वजनिक काकांचें निधन !

शके १८०२ च्या आषाढ व. ४ रोजीं महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध कार्यकर्ते व वकील गणेश वासुदेव जोशी ऊर्फ 'सार्वजनिक काका' यांचें निधन झालें.

काकाचे मूळचे घराणे रत्नागिरीचे. सातारा येथें शिक्षण झाल्यावर यांनीं पुणें येथे नाझर कचेरींत नोकरी धरली. त्यानंतर वकिलीची परीक्षा देऊन यांनीं आपला जम चांगलाच बसविला. पुण्याच्या 'सार्वजनिक सभे'चे संस्थापक हेच होत. तत्कालीन अनेक प्रकारच्या सार्वजनिक चळवळींत काका भाग घेत असत. पुणे शहर-सुधारणा, कायद्याचे मसुदे देशी भाषेंत व्हावेत म्हणून खटपट, मुंबईच्या हायकोर्टांत एतद्देशीय न्यायाधीश नेमण्यासंबंधीं प्रयत्न, ज्यूरीचे हक्क, रेल्वे-उतारूंच्या तक्रारी, दुष्काळांत मदत, इत्यादि अनेकविध कार्यातून यांनीं पुढाकार घेतलेला असे. महाराष्ट्रांत तरी स्वदेशीची मोहीम यांनीच प्रथम सुरू केली. 'देशी व्यापारोत्तेजक मंडळ' स्थापन करून तिच्या द्वारां देशी मालाचीं दुकानें उघडण्यांत आलीं. त्यांनीं जन्मभर स्वदेशीचें व्रत पाळलें. स्वदेशी छत्र्या, काड्याच्या पेट्या व देशी माग यांचा कारखाना आपल्याच घरीं काढून यांनीं बरीच झीजहि सोसली. – "लवाद कोर्टांची स्थापना करणें, कलकत्त्यास व मुंबईस वर्तमानपत्रकर्त्यांची परिषद भरविणे, शेतकी कमिशनच्या. वेळीं शेतकऱ्यांची बाजू योग्य तऱ्हेने मांडणे, वासुदेव बळवंत फडके यांचे वकीलपत्र घेण्यास कोणी धजत नसतां त्यांचे वकीलपत्र घेऊन काम पाहणें, जळलेला विश्रामबाग-वाडा बांधण्यासाठीं निधि उभारणे, इत्यादि अनेक कार्यें करीत करीतच काकांनीं आपला देह चंदनाप्रमाणे झिजविला. अफगाणिस्तानाच्या अमिराकडे जाऊन रद-बदली करण्याचीहि तयारी यांनीं दर्शविली होती. सुरतेच्या दंग्यामुळें तेथील वकिलांवर संकट आले असतां हे त्यांच्या मदतीसाठीं गेले होते —"

आपल्या मातेच्या सांगण्यावरून यांनीं पुण्यास विष्णुमंदिर बांधिले. तें 'नव्या विष्णूचे मंदिर' म्हणून प्रसिद्ध आहे. यांच्या स्मारकासाठीं सहा हजार रुपये जमले होते. त्यांत नऊ हजार रुपये घालून 'सार्वजनिक सभे'चा दिवाण-खाना खरेदी करून काकांचें स्मारक केले गेलें आहे.

—२५ जुलै १८८०

## आषाढ व. ५ (१) धनाजी जाधवाचा मृत्यु !

शके १६३२ च्या आषाढ व. ५ रोजीं आपल्या अद्भुत पराक्रमाने पडत्या काळांत मराठेशाहीला सांवरून धरणारा प्रख्यात वीर धनाजी जाधव याचा अंत झाला.

धनाजी हा लखूजी जाधवाच्या वंशांतील असून शंभुसिंगाचा मुलगा होता. याचा जन्म १५७२ शकांत झाला व तो १५९५ शकाच्या उमराणीच्या लढाईंत प्रसिद्धीस आला. संभाजीच्या वधानंतर महाराष्ट्रांत मराठ्यांनीं मोंगलांना तोंड देण्याचा जो अद्वितीय पराक्रम केला त्यांत धनाजीच्या शौर्याची ख्याति विशेष आहे 'हीं माणसें प्रतिसृष्टि निर्माण करतील' असा शिवाजीने याचा गौरव केला होता. धनाजी जाधवास मोंगल सैन्य फार घाबरत असे. याच्या कर्तबगारीविषयीं ताराबाई म्हणते, "—जाधवराव कैलासवासी स्वामीचे संपूर्ण कृपेस पात्र झाले ते आपल्या कर्तृत्वावरी व हुकूमबारदारी एकनिष्ठेवरी झाले. राज्याभिवृद्धीविषयीं त्यांहीं कांहीं सामान्य कसाला, श्रमसाहस केला नाहीं. जीविताची तमा न धरतां स्वामिकार्यीच तत्पर राहून, कैलासवासी स्वामींनीं जे समयीं हुकूम केला, ते समयीं कर्नाटकांत फौजांनीं धाऊन जाऊन, स्वामीस प्राप्त झालीं संकटें निरसन करून, स्वामिगौरवाचें सुख त्यांहींच अनुभविले, व सेवाधर्मेकरून त्यांहींच कैलासवासी स्वामींस संतुष्टविले. तेव्हां स्वामीस मशारनिल्हेविना दुसरे प्रिय कीं प्राण (कोणी) होतें असे नाहीं. सर्व प्रकारें कार्यास येतील हा भरंवसा दृढ मनीं मानिला होता. औरंगजेबासारखा शत्रु पराभव पावल्याचें यश मशारनिल्हेस प्राप्त झाले.—" संभाजीच्या वधानंतर महाराष्ट्रांत मोंगलांचा सूड घेण्याची विलक्षण बुद्धि निर्माण झाली होती. शत्रूला नकोसें करून सोडण्याइतपत पराक्रम धनाजी जाधव आणि संताजी घोरपडे या जोडीनें केला. परंतु खेदाची गोष्ट ही कीं, दोघांच्यांत एकोपा सहसा टिकला नाहीं. पुढें शाहूनें राज्यपद स्वीकारल्यानंतर वसुलाच्या सर्व खात्याची देखरेख धनाजी जाधवच पाहत होता. १६३२ च्या सुमारास रांगण्याची मोहीम पार पाडून येत असतां वारणा नदीकांठीं वडगांव येथें हा वृद्ध व अनुभवी सेनापति मृत्यु पावला.

—२७ जून १७१०

## आषाढ व. ५ ( २ ) कान्होजी आंग्र्यांचें निधन !

शके १६५१ च्या आषाढ व. ५ या दिवशीं मराठी राज्यांतील प्रसिद्ध मुत्सद्दी व धडाडीचे दर्यावर्दी सरदार कान्होजी आंग्रे यांचें निधन झालें.

संभाजी, राजाराम यांच्या बिकट कारकीर्दींत कान्होजी आंग्रे यांच्या पराक्रमानें मोंगलांना नकोसें होऊन गेले होतें. राजारामाकडून सुवर्णदुर्गावर नेमणूक झाल्यावर त्यांनीं मराठेशाहीच्या पडत्या काळांत पश्चिम किनाऱ्याचे संरक्षण उत्तम रीतीनें केलें. यामुळे त्यांना 'ध्वजवृन्दाधिकारी', 'सरखेल' इत्यादि किताब मिळत गेले. मराठ्यांच्या आरमाराचे हे मुख्य अधिपति झाल्यानंतर इंग्रज, फिरंगी व मुसलमानांचें आंग्र्यांपुढें कांहीं चालेनासें झालें होते.

" तळकोंकणांत पुंडावे होऊन प्रांत वैराण पडला. महाराष्ट्र धर्म राहावा ऐसे नव्हतें. त्या वेळेस फिरंगी व हबशी हेहि प्रांतांत धर्म-उच्छेद करीत होते. तेव्हां 'सरखेल' साहेबांचे पुण्यप्रतापे स्वरक्षणार्थ थोर थोर मातबर सरदार जमा होऊन शामलाची क्षिति केली. आणि श्रमेंकरून कोंकणांत धर्म राखिला. सरखेल-साहेब यांनीं धर्मस्थापना केली. ही कीर्ति या लोकीं व परलोकीं जाऊन उरली आहे. " अशा अर्थाचा मजकूर आंग्रे यांच्या थोरवीबद्दल जुन्या कागदोपत्रीं सांपडतो. मुंबईच्या गव्हर्नरास कान्होजी आंग्रे यांनीं ठणकावून लिहिलें कीं— " आमचें राज्य जुलूम, बलात्कार, चांचेगिरी यांजवर चालले आहे, असें म्हणणे तुम्हां व्यापाऱ्यांना शोभत नाहीं. शिवाजीमहाराजांनीं चार बादशहांबरोबर लढाया केल्या आणि स्वपराक्रमाने राज्य स्थापन केलें. याप्रमाणें आमच्या राज्य-सत्तेचा प्रारंभ आहे. ह्याच साधनांच्या योगानें आमचे राज्य टिकले आहे. हें चिरकालिक आहे कीं नाहीं याचा विचार तुम्हींच करावा. जगांत चिरकालिक असें कांहींच नाहीं. " कान्होजी हे तुकोजी आंग्रे यांचे चिरंजीव. पहिल्याने जोशी नांवाच्या ब्राह्मणाकडे गुरें वळण्यांत बालपण गेलें. परंतु याची तरतरी पाहून त्या ब्राह्मणाने याला हत्यारें वगैरे पुरविलीं व याला चांगले तयार केलें. त्यानंतर अचलोजी मोहिते, सुवर्णदुर्गाचा किल्लेदार यांचेकडे कान्होजीला नौकरी लागली. त्या वेळीं यांनीं हबशाच्या मुलखावर अनेक वेळां हल्ले केले होते.

— ४ जुलै १७२९

## आषाढ व. ५ (३) "कळी उमलली जों न…."

शके १७३२ च्या आषाढ व. ५ रोजी मेवाडचा राणा भीमसिंग यांची अत्यंत रूपवान, सुशील व सद्‌गुणी मुलगी कृष्णाकुमारी विष पिऊन मरण पावली.

उपवर झालेल्या कृष्णाकुमारीला अनेक राजांच्या मागण्या आल्या. जोधपूरचा मानसिंग व जयपूरचा जगत्‌सिंह यांच्यांत भांडणें लागली. अमीरखान नांवाच्या पठाणानें लढ्याचें मूळच नाहींसें करण्याची सूचना भीमसिंगास केली. राणा पेचांत पडला. कन्या मानसिंहाला द्यावी कीं जगत्‌सिंहाला द्यावी, अशा द्विधा मनःस्थितींत आपल्या प्रिय कन्येचा बळी घेण्याचेच त्याने ठरवले. ठरल्याप्रमाणें जवानसिंह पाजळलेली कट्यार घेऊन कृष्णाकुमारीच्या महालांत गेला. पण सात्त्विक, निरपराध, सौंदर्यमयी कृष्णाकुमारीकडे पाहतांच त्याच्या हातून कट्यार गळून पडली. "समरांगणावर समबल अशा शत्रूच्या उरांत प्रवेश करणारी कट्यार त्या कोमल, सुंदर, निष्पाप स्त्रीच्या हृदयाचा ठाव कशी बरे घेणार?" शेवटी तिच्याकडे विषपेला पाठवण्यांत आला. आपल्या आईस तत्त्वज्ञानाचा उपदेश केल्यावर पित्यावरील संकट टळावे म्हणून तिने तो पेला पिऊन टाकला. परंतु तिला तें विष पचले नाहीं. तीनहि वेळीं विष उलटून पडले. शेवटीं जालीम विषाचा पेला हातीं घेऊन कृष्णा उद्गारली – "परमेश्वरा, आतां तरी विषाचा परिणाम होऊं दे, आणि मला तुझ्या चरणाजवळ ने –" विषप्राशनानंतर कृष्णाकुमारी कायमचीच शांत झाली. कृष्णाची दीन आई वेडी झाली. 'कृष्णा कृष्णा' करीत अन्नत्याग करून ती मरण पावली.

या प्रसंगावर विनायक कवींनीं सुंदर कविता केली आहे. सुरवातीसच ते म्हणतात: —

"कळी उमलली जो न पावली पूर्ण विकासाला,
  अदय कराचा तोंच जीवरी पडला कीं घाला।
सुनील गगनीं चमकूं लागे सुंदर इंदुकला
  तोंच तिचा निर्घृण राहूने धरला हाय गळा।
भीम नृपाला प्रियतर बाला कृष्णा वेल्हाळा।
  नडली, पडली बली अकाली, त्यायोगें काळा ॥"

—२१ जुलै १८१०

## आषाढ व. ६ लोकमान्य टिळकांचा जन्म !

शके १७७८ च्या आषाढ व. ६ रोजीं हिंदुस्थानांतील राजकीय असंतोषाचे जनक, थोर राजकारणी मुत्सद्दी, वृत्तपत्रकार, वेदादि प्राचीन वाङ्मयाचे अभ्यासक व संशोधक, आणि 'स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे' या मंत्राचे द्रष्टे लोकमान्य बाळ गंगाधर टिळक यांचा जन्म झाला.

टिळकांचा जन्म ज्या कोंकण भूमींत झाला तेथूनच त्यांनी आपले स्वभाव-विशेष निवडले होते. "रत्नागिरीच्या जन्मभूमीपासून तांबूस व स्निग्ध मातीच्या तेजाचें अनुकरण त्यांच्या डोळयांनीं केले होते. समुद्रापासून त्यांनीं खोल स्वभाव व सर्वसंग्राहकपणा घेतला होता. सह्याद्रीपासून त्यांनीं आपल्या आकांक्षांचा उत्तुंगपणा घेतला होता. कोंकणी खडकाळ कांतळांतून त्यांच्या निश्चयी मनाचा कठोरपणा निर्माण झाला होता. कोंकणच्या किंचित् पित्तकारक; पण एकंदरींत निरोगी अशा हवेचें अनुकरण त्यांच्या स्वभावाने केले होतें. नारळाप्रमाणें त्यांच्या अंतरंगांतील गुणग्राहकतेचें मधुर जल त्यांच्याशीं निष्ठा-पूर्वक वादाची टक्कर खेळणारासच मिळे. फणसाप्रमाणें त्यांची रीतभात वरून खडबडीतच होती; पण कांटेरी फणसांत जसे रसाळ गरे असतात, तसेच त्यांच्या पोटांत शिरणाराला सरळ युक्तिवाद व प्रेमळ भावना सांपडत.–"

सन १८०० च्या सुमारास विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं काढलेल्या न्यू. इं. स्कूलला जाऊन टिळक मिळाले. 'केसरी', 'मराठा' हीं पत्रे नांवारूपाला चढून 'केसरी'कार टिळक म्हणून त्यांची कीर्ति वाढू लागली. स्वदेशी, स्वराज्य, बहिष्कार व राष्ट्रीय शिक्षण या चतुःसूत्रीच्या जोरावर त्यांनीं सर्व देशाला जागृत केले. सन १९०८ मध्ये त्यांच्यावर राज्यद्रोहाचा खटला होऊन त्यांना सहा वर्षांची काळया पाण्याची शिक्षा झाली. बंदिवासांत त्यांच्या प्रसिद्ध 'गीतारहस्याचा' जन्म झाला. वैदिक संस्कृति आणि वाङ्मय यांचा अभ्यासहि टिळकाचा फार मोठा होता. त्याचींच फळें म्हणजे त्यांचे विद्वन्मान्य असे 'ओरायन्' व 'आर्क्टिक होम इन दी वेदाज्' हे इंग्रजी ग्रंथ होत. याखेरीज 'ए मिसिंग व्हर्स इन् सांख्यकारिका' हेंहि पुस्तक त्यांनीं लिहिले आहे. 'केसरी'तील त्यांचे लेखहि वैशिष्ट्यपूर्ण आहेत.

— २३ जुलै १८५६

## आषाढ व. ७ " जो मित्र आमचा तो मित्र तुमचा ! "

शके १६९१ च्या आषाढ व. ७ रोजीं श्रीमंत थोरले माधवराव पेशवे आणि जयपूर संस्थानचे राजे पृथ्विसिंग यांच्यांत सलोख्याचा तह झाला.

पानिपतच्या भयंकर संहारामुळें उत्तर हिंदुस्थानांतील मराठ्यांची सत्ता कमजोर झाली होती. नजीबखान, सुजा उद्दौला, इत्यादि सरदारांना आतां मराठ्यांचें भय वाटेनासे झालें होतें. होळकर, भोंसले, बुंदेले या सरदारांना ते जुमानीत नसत. मराठ्यांचा सर्व दरारा नाहींसा होऊन शत्रु-पक्ष बळावत चालला होता. ही परिस्थिति बदलून टाकून पानिपतच्या युद्धांत आलेले अपयश धुऊन काढावें असा माधवराव पेशव्यांचा हेतु होता. आपल्या पराक्रमानें, तेजाने आणि बाणेदारपणाने पुन्हां एकदां उत्तरेत सर्वांच्यावर विजय मिळवावा या प्रयत्नांत माधवराव होते. गोहदच्या लढाईत तह करूनहि पराभूत झालेले राघोबादादा परत आल्यावर पेशवे यांनीं प्रसिद्ध शूर मुत्सद्दी रामचंद्र गणेश कानडे आणि विसाजी कृष्ण बिनीवाले या दोघांना उत्तरेचा बंदोबस्त करण्यास पाठविले ; आणि रजपुतांशीं सलोखा करण्याचेंहि बजावून ठेविले. त्याप्रमाणें पेशवे आणि पृथ्विसिंग यांच्यांत तह आषाढ व. ७ या दिवशीं झाला. पृथ्विसिंगाचें म्हणणे असें होतें — " परगणे रामपुरा आम्हांस द्यावा .... आम्ही आपणांसी स्नेहवृद्धि दिवसेंदिवस अधिक करावी, आमची फौज तुमचे फौजेस सामील व्हावी. जो मित्र आमचा तो मित्र तुमचा. हिंदुस्थानप्रांतीं मनसबा पडेल तो एकविचारें करावा ... आमची फौज जितकी येईल त्याचे हजिरीप्रमाणें आम्हांस वाटा द्यावा. ... आम्हाकडे बाकी शिंदे होळकर मारफत आहे, त्यापैकीं आठ लक्ष सोड द्यावी — " यावर पेशव्यांचें म्हणणें असें कीं, " रामपुरा सरदाराकडे सरंजाम आहे. यास्तव सरदार हुजूर आलियावर त्यांस पुसून त्याची वाटाघाट झालियावर रामपुऱ्याच्या मोबदला तनखा वसूल बमोजीब तुम्हांपासून सरकार उपयोगी महाल घेऊन रामपुरा देऊं. तुमच्या फौजेच्या मदतीनें आमचें काम झाल्यास फक्त नवा मुलूख जो मिळेल त्यापैकीं तुमचे फौजेचे चाकरीबरोबर बमोजीब तुम्हांस हिस्सा दिला जाईल. ... तुम्हांस आठ लाख रुपये सूट दिली असे. – " येणेंप्रमाणें करारनामा होऊन पेशवे आणि पृथ्विसिंग यांच्यांत सलोखा झाला.

— २५ जुलै १७६९

## आषाढ व. ८ प्रा. विजापूरकर यांचें निधन !

शके १८४८ च्या आषाढ व. ८ रोजीं मराठी वाङ्मय, स्वदेशी, राष्ट्रीय शिक्षण व सदाचार यांचे निःसीम पुरस्कर्ते व समर्थ विद्यालयाचे संस्थापक प्रा. विष्णु गोविंद विजापूरकर यांचें निधन झालें.

विजापूरकरांच्यावर उपनिषदें व समर्थ सांप्रदाय यांची छाप विशेष होती. कोल्हापूर व पुणें या ठिकाणीं शिक्षण घेऊन एम्. ए. झाल्यावर अहमदाबाद कॉलेजमध्यें फेलो व राजाराम कॉलेजमध्यें इंग्रजी व संस्कृत या विषयांचे प्रोफेसर म्हणून यांनीं कामें केलीं. सन १८९६ मध्ये विजापूरकर यांनीं 'ग्रंथमाला' नांवाचें मासिक सुरू केलें. त्यानंतर दोन वर्षांनीं समर्थ नांवाचें साप्ताहिक सुरू करून 'विश्ववृत्त' मासिकांतून स्थानिक, प्रांतिक हालचालींचा ते परामर्श घेऊं लागले. अर्थात् राजकीय बाब आड येऊन त्यांना प्राध्यापकाच्या जागेवरून कमी व्हावें लागलें. सन १९०९ च्या जून महिन्यांत प्रा. विजापूरकरांनीं समर्थ विद्यालय सुरू केलें. प्लेगमुळें चार महिने हें विद्यालय मिरजेस असलें तरी त्यानंतर तळेगांव येथें तें स्थिर झाले. त्यांच्या 'विश्ववृत्त' मासिकांत 'वैदिक धर्माची तेजस्विता' या नांवाखालीं पं. श्री. दा. सातवळेकर यांचा लेख प्रसिद्ध झाला. त्यांतील 'राज्यद्रोहा'वरून प्रा. विजापूरकर यांना तीन वर्षांची साधी कैद झाली. त्या वेळीं सरकारी कायद्यास अनुसरून समर्थ विद्यालय बंद पडलें. त्यांच्या सुटकेनंतर सर महादेव चौबळ यांना अध्यक्ष करून या विद्यालयाचें रूपांतर 'नवीन समर्थ विद्यालय' असें करण्यांत आले. त्याच्या सुरवातीचे वेळीं सर चौबळ म्हणाले, "प्रो. विजापूरकरांची धर्मनिष्ठा व सात्त्विकतेची प्रत्यक्ष मूर्ति डोळ्यांपुढें असतां मी तरी जास्त काय सांगणार? साधी राहणी व उच्च विचारसरणी यांचा असा नमुना इतरत्र क्वचितच पाहावयास मिळेल." यांच्या अनेक ग्रंथांपैकीं न्या. रानडे यांच्या पुस्तकाचें 'मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष' हें भाषान्तर फार महत्त्वाचें आहे. राष्ट्रीय शिक्षणाचे आद्य प्रवर्तक म्हणून प्रा. अण्णासाहेब विजापूरकर यांचें नांव कायम आहे. त्यांचा स्वदेशी बाणा, स्वदेशी राहणी व स्वदेशी विचार सर्वांना मोहून टाकीत.

— १ ऑगस्ट १९२६

## आषाढ व. ९ बाळाजी बाजीरावाची कामगिरी !

शके १६६५ च्या आषाढ व. ९ रोजीं बाळाजी बाजीराव पेशवे यानी माळव्याची सनद मिळवली.

पंधरा वर्षांपूर्वी भोपाळच्या लढाईत निजामुल्मुल्काने बाजीरावाशीं तह केला होता. त्यांत माळव्याची सनद बादशहापासून मराठ्यांना देण्याचे कलम होते; पण पुढच्या गडबडींत ही सनद पेशव्यांना प्राप्त झाली नाहीं. दिल्लीच्या पातशहास बाळाजी बाजीरावाने जयसिंग व निजामुल्मुल्क यांचेतर्फे पुष्कळ पत्रेंहि पाठवलीं. तेव्हां बादशहाने पंधरा लाख रुपये पेशव्यांना दिले; पण माळव्याच्या सनदेसंबंधीं नांव काढलें नाहीं. दरम्यान आपल्या मुलाचें-नासिरजंगाचे बंड मोडण्यासाठीं निजामुल्मुल्क दक्षिणेंत आला. लगेच बाळाजीनें पूर्णा नदीचे कांठीं एदलाबद येथें त्याची भेट घेऊन त्यास मदतीसाठी मराठ्यांचे एक पथक दिले; आणि आपल्या सामर्थ्याने अमल बसवण्यासाठीं बाळाजी माळव्यांत गेला; आणि तेथे होळकर, शिंदे, जाधव यांच्या हस्ते आपली सत्ता स्थापन केली. धवलपूर येथें सवाई जयसिंगाची भेट घेऊन बाळाजीने स्नेह कायम केला व सहा महिन्यांच्या आंत माळव्याची सनद मिळवून देतों अशी त्यापासून हमी घेतली. पुढें अलीवर्दीखान बंगालचा सुभेदार बनला. त्याने ओरिसा प्रांतावर स्वारी करून तेथील अधिकारी मुर्शिदकुलीखान यास हांकून दिलें. तेव्हां याचा दिवाण मीर हबीब अलिवर्दीखानाच्या नोकरींत राहूनच त्याच्या नाशाचा प्रयत्न करीत होता. आश्विन महिन्याच्या दुर्गापूजेच्या उत्सवांत मराठे दंग असतांना अलिवर्दीखानानें त्यांच्या लष्करावर हल्ला केला. भास्करपंताचा या वेळीं पराभव झालेला पाहून रघूजी भोसले याने स्वतः बिहार प्रांतावर स्वारी केली. याच संधींत माळव्याची सनद देण्याचे कबूल करून दिल्लीच्या पातशहाने बाळाजीस मदतीस बोलाविलें. बाळाजीनें तें मान्य करून अलिवर्दीखानास मदत करण्यासाठीं म्हणून मुर्शिदाबादेकडे कूच केलें. आडवाटेनें शिरून बाळाजीनें रघूजीचा मोड केला. येणेप्रकारे काम व्यवस्थित बजावल्यानंतर सनद देणे प्राप्तच होतें. त्याप्रमाणें आषाढ व. ९ ( शके १६६५ ) ला पेशव्यांस माळव्याची सनद मिळाली.

— ४ जुलै १७४३

## आषाढ व. १०  "पेशवाईचा शेवट झाला!"

शके १७७९ च्या आषाढ व. १० रोजी सत्तावनच्या स्वातंत्र्य-समरांतील प्रमुख सूत्रधार आणि कार्यकुशल सेनापति धोंडोपंत उर्फ नानासाहेब पेशवे यांचा पराभव झाला.

स्वातंत्र्य-युद्धाचा वणवा पसरत चाललेला पाहून नानासाहेबहि क्रांतिकारकांना मिळाले आणि कानपूर येथे त्यांनीं इंग्रजांवर विजय संपादन केला. त्यानंतर झांशी, नीमच, नशिराबाद, राजपुताना, इत्यादि ठिकाणी युद्ध सुरू झाले. पाटणा, आरा, जगदीशपूर येथेहि उठावणी झाली. अर्थातच आतां इंग्रजांचा प्रतिकारहि तितक्याच जोराने होऊं लागला. मुंबईचा गव्हर्नर एल्फिन्स्टन याने इराणच्या स्वारीवरून परत आलेली फौज उत्तरेंत पाठविली. हॅवेलॉक व औट्रॅम या वेळीं पर्शियाच्या स्वारीत गुंतले होते. त्यांना बोलावून त्यांच्याकडे सैन्याचे नेतृत्व देण्यांत आले. जनरल नील एतद्देशीयांची हत्या करीत करीतच कलकत्त्याहून निघाला. त्याने अलाहाबादचे ठाणे हस्तगत केले. हॅवेलॉक त्यास फत्तेपूर येथे येऊन मिळाला. दोघांनीं ते शहर बेचिराख केले. त्यानंतर पांडु नदीच्या लढाईत बाळासाहेब पेशव्यांचा पराभव झाला. या निर्वाणीच्या प्रसगी नानासाहेबांनीं सामना देण्याचें ठरविले; आणि ते आषाढ व. १० या दिवशीं आपल्या सैन्यासह अहीरवा गांवापाशी तयार झाले. हॅवेलॉकचे सैन्य समोरून येतांच कानपूर व कॅटोन्मेंट या दोन रस्त्याच्या मध्यावर अर्धचंद्राकृति व्यूह रचून नानासाहेबांची सेना सिद्ध झाली. पेशव्यांचे हे कौशल्य पाहून कसलेला सेनापति हॅवेलॉकहि चकित झाला! युद्धाला सुरुवात झाल्यानंतर नानासाहेब पेशव्यांनीं जातीने फार मेहनत घेतली. लढाई निकराची झाली; पण दुर्दैवाने तींत पेशव्यांचा पराभव झाला! अत्यंत दुःखमय अंतःकरणाने नानासाहेब ब्रह्मावर्तास निघून गेले. तेथील लोकांचा निरोप घेऊन आपल्या बायकामुलांसह ते नांवेत चढले. मध्यावर आल्यावर शेल्यांतील अमूल्य राजरत्नें गंगामातेस अर्पण करून ते बोलले: "परमेश्वरा, दीडशें वर्षांनंतर पेशवाईचा आज शेवट झाला." तरीसुद्धां पुनः युद्ध करण्याची धमक त्यांच्यांत होतीच.

—१६ जुलै १८५७

## आषाढ व. ११ — प्रफुल्लचंद्र रे यांचा जन्म !

शके १७८३ च्या आषाढ व. ११ रोजीं बंगालमधील महान् संशोधक, रसायनशास्त्रज्ञ व देशभक्त सर प्रफुल्लचंद्र रे यांचा जन्म झाला.

कलकत्ता येथें वास्तव व रसायनशास्त्राचे शिक्षण संपूर्ण करून गिलख्रिस्त या शिष्यवृत्तीच्या लाभामुळे हे सन १८८२ मध्यें इंग्लंडला गेले. तेथें रसायनशास्त्राचे डी. एस्‌सी. झाल्यानंतर एडिंबरो येथील केमिकल सोसायटीचे उपाध्यक्ष म्हणून यांना निवडण्यांत आलें., इंग्लंडमध्यें असतांना 'बंडापूर्वीचा व नंतरचा हिंदुस्थान' या विषयावरील चढाओढींत मान्य झालेला यांचा निबंध जप्त झाला. व इंडियन एज्युकेशनल सर्व्हिसला हे अयोग्य ठरले. भारतांत परत आल्यानंतर कलकत्ता येथील प्रेसिडेन्सी कॉलेजांत प्राध्यापक म्हणून काम करीत असतांना सन १८९६ मध्ये मर्क्युरस नायट्राइट या काम्पाउंडचा शोध यांनीं लावला. सन १९०४ मध्यें बंगाल सरकारनें यांना पाश्चात्य देशांतील प्रयोगशाळा पाहण्यास पाठविलें.

इंडियन स्कूल ऑफ केमिस्ट्री व इंडियन केमिकल सोसायटी या दोन महत्त्वाच्या संस्था काढून यांनीं 'हिस्टरी ऑफ हिंदु केमिस्ट्री' या नांवाचा विख्यात ग्रंथ दोन भागांत लिहिला. रसायनाच्या अनर्व, अर्व व वास्तव या तीन शाखांपैकीं अनर्व रसायनांत संशोधन सुरू करण्याचा मान यांचाच आहे. यांच्या मर्क्युरस नायट्राइटच्या शोधामुळें शास्त्रीय जगांत मोठी खळबळ उडून या हिंदी शास्त्रज्ञाचे नांव सर्वतोमुखीं झालें. बर्थेलॉट, व्हिक्टर मेयर, व्होलार्ड, रास्को, इत्यादि पाश्चात्य शास्त्रज्ञांनीं यांची मुक्तकंठानें स्तुति केली. आपल्या पगारांतून सांठलेल्या अकरा लाख रुपयांची देणगी यांनीं कलकत्ता विद्यापीठास दिली. देशाकडे व राजकारणाकडेहि यांचें लक्ष भरपूर असे. सन १९२२ सालीं उत्तर बंगालमधील जलप्रलयाचे वेळीं सरकारला करतां आले नाहीं तें यांनीं एका हांकेसरशीं सहा लाख रुपये जमवून केलें. 'Life and Times of C. R. Das'; 'Life and Experiences of a Bengali Chemist.' 'History of Hindu Chemistry' हे यांचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

— २ ऑगस्ट १८६१

## आषाढ व. १२ "इंग्रजांनीं निघून जावें!"

शके १८६४ च्या आषाढ व. १२ या दिवशीं प्रसिद्ध असा आठ ऑगस्टचा 'चले जाव' ठराव पास झाला.

भारताच्या स्वातंत्र्याच्या इतिहासांत आठ ऑगस्ट या दिवसाला फारच महत्त्व आहे. १९४२ सालीं याच दिवशीं रात्रीं दहा वाजतां अखिल भारतीय कॉंग्रेस सभेने सुप्रसिद्ध 'चले जाव'चा ठराव पास केला. आदल्या दिवसापासूनच मुंबई येथें सभा सुरू झाली होती. 'आम्ही स्वतंत्र होणार,' या आकांक्षेऐवजी 'आम्ही स्वतंत्र झालों' या बाण्याचा अवतार तेथे होत होता. हजारों लोकांची सभेस गर्दी लोटली होती. मौ. आझाद, पंडित नेहरू, म. गांधी, इत्यादि पुढाऱ्यांचीं वक्तव्यें होत होतीं. 'मी स्वतंत्र आहें' असें समजून वागा, असा आदेश म. गांधींनीं सर्वांना दिला. "करेंगे या मरेंगे" हा निर्वाणीचा मंत्रहि सांगितला. आणि 'इंग्रजांनीं येथून निघून जावें' अशा अर्थाचा ठराव आषाढ व. १२ रोजीं केला!

आणि त्याच रात्रीं अचानकपणें सर्व भारतांत धरपकड सुरू झाली. दुसऱ्या दिवशीं सकाळींच म. गांधी, महादेवभाई देसाई, मीराबेन आणि सौ. कस्तुरबा याना पकडून त्यांची रवानगी 'आगाखान पॅलेस'मध्यें झाली. आझाद, नेहरू आदि पुढाऱ्यांनाहि पकडण्यांत आलें. आणि जनता दिङ्मूढ बनली. सर्वत्र दंगली सुरू झाल्या. सर्व देशभर क्रोध निर्माण होऊन भयंकर अत्याचार होऊं लागले. जनता व सरकार यांचा जंगी लढा सुरू झाला. सरकारी कोर्टकचेऱ्या जाळून जनता असंतोष प्रदर्शित करीत होती आणि गोळीबार, अश्रुमोचक धूर, ब्रेनगन्स, इत्यादींच्या साह्यानें सरकार तो दडपण्याचा प्रयत्न करीत होतें.

याच चळवळीपासून पद्धतशीर क्रांति कशी करावी, जाळपोळ, लुटालूट करून सरकारला त्रस्त कसें करावें, इत्यादींचे धडे भारतीय जनतेनें घेतले असले तरी तत्कालीन ब्रिटिश सरकारला कळून चुकलें कीं, भारत आतां जागा झाला आहे. याच आंदोलनामुळें सरकारला समजून आलें कीं, भारतीयांना स्वाधीनतेची भूक जबर लागलेली आहे.

— ८ ऑगस्ट १९४२

## आषाढ व. १३ संत नामदेवांची समाधि !

शके १२७२ च्या आषाढ व. १३ या दिवशीं पंढरीच्या विठ्ठलाच्या सगुण भक्तीचा प्रसार करणारे प्रसिद्ध भगवद्‌भक्त श्रीनामदेव हे समाधिस्थ झाले.

तेराव्या शतकामध्यें महाराष्ट्रांत भक्तीचा जो डांगोरा पिटला जात होता, त्याचे बरेंचसें श्रेय नामदेवाकडे आहे. नगर जिल्ह्यांतील नेवासे गांवीं याच काळीं ज्ञानदेवांची ज्ञानेश्वरी अवतरली होती. पांडुरंगाचा निस्सीम सगुणभक्त नामदेव याचेसह आपण तीर्थयात्रा करावी अशी प्रेरणा ज्ञानदेवांना झाली. आणि "तुझिये संगतीचें नित्य सुख घ्यावें। सार्थक करावे संसाराचे ॥" असे नामदेवांना विनवून ज्ञानदेवादि मंडळींनीं उत्तर हिंदुस्थानची तीर्थयात्रा पूर्ण केली. भागवत धर्माचा प्रसार साऱ्या भारतांत झाला. परंतु नामदेवाची थोरवी आणखी एका दृष्टीने मोठी आहे. ज्ञानदेवादि भावंडांचें प्रयाण झाल्यावर नामदेव कांहींसे उदास झाले. उत्तरेंत म्लेंच्छ राज्य होऊन धर्माचा ऱ्हास होत होता. तें पाहून नामदेव पांचपन्नास वारकऱ्यांसहित परत उत्तरेंत गेले. पंजाबपर्यंत त्यांनीं विठ्ठलभक्ति पोंचविली ! हिंदी भाषेत कवने केलीं, त्यांपैकीं कांही शीखांच्या 'ग्रंथसाहेबां'त संग्रहीत केलेलीं आहेत. पंजाबांत गुरुदासपूर जिल्ह्यांत 'घोमान' गांवीं नामदेवाच्या पादुकाची पूजा आज सहाशें वर्षे चालू आहे. 'बाबा नामदेवायी' म्हणून त्याच्या अनुयायांना नामाभिधानहि प्राप्त झाले. जुनागडचे नरसी मेहता आणि शीख पंथाचे प्रवर्तक नानक यांनीं नामदेवांच्या भक्तीची आणि अभंगवाणीची प्रशंसा केली आहे. आजहि पंजाबांत या नामदेवांचे अनुयायी हजारोंनीं दिसतात. तेव्हां तेराव्या शतकांतील 'भोळ्या-भाबड्या' वारकरी संताची ही कामगिरी अपूर्व नाही असें कोण म्हणेल ?

नामदेवांचे पूर्वज यदुशेट हे शिपी जातींतील होते. यांच्यापासून पांचवा पुरुष दामाशेटी. यांच्या बायकोचें नांव गोणाई. याच दांपत्यास शके ११९२ मध्यें जे पुत्ररत्न झालें तेच प्रसिद्ध नामदेव होत. बालपणापासूनच नामदेव विठ्ठलभक्तींत रंगून गेले...... याच दिवशीं मराठी वाङ्मयांत प्रसिद्ध असलेली 'नामयाची दासी जनी' हिनें सुद्धां समाधि घेतली.

—३ जुलै १३५०

## आषाढ व. १४ ‘ सांवता पांडुरंग-स्वरूपीं भीनला ! ’

शके १२१७ आषाढ व. १४ या दिवशी पंढरपूरजवळच्या अरणभेंडी येथील प्रसिद्ध भगवद्भक्त सांवता माळी यांनीं समाधि घेतली. यांच्या समाधीचे वर्णन एका अभंगांत सांपडते: —

“उठोनि प्रातःकाळीं करूनिया स्नान। घालुनी आसन यथाविधी ॥ १ ॥
नवज्वरें देह झालासे संतप्त। परि मनीं आर्त विठोबाची ॥ २ ॥
प्राणायाम करूनी कुंभक साधिला। वायु निरोधिला मूळतत्त्वीं ॥ ३ ॥
बारा शते सतरा शालीवान शक। मन्मथ नामक संवत्सर ॥ ४ ॥
ऋतु ग्रीष्म कृष्ण आषाढ चतुर्दशी। आला उदयासी सहस्रकर ॥ ५ ॥
सांवता पांडुरंग-स्वरूपीं भीनला। देह समर्पिला ज्याचा त्यासी—॥ ६ ॥

तेराव्या शतकांत पंढरीचा विठ्ठल ‘लेकुरवाळा’ झाला होता. ज्ञानेश्वर, नामदेव यांचे प्रभावी नेतृत्व लाभून प्रत्येक ज्ञातीमध्यें एक एक महान् संत निर्माण झाला; आणि हिंदु समाजाला बांधीव स्वरूप येऊं लागले. कोणतीहि व्यक्ति एका विशिष्ट पायरीवर येऊन पोहोंचली म्हणजे तिची जात लोपून जाई. ‘देव भावाचा भुकेला। यातिकूळ नाहीं त्याला॥’ असा सर्वांचा भाव असल्यामुळे जातिभेदाचें स्वरूप कमी होत होते. सांवता माळी बागकामाचे आपले कर्तव्यकर्म करीत असतांच ‘वैकुंठींचा देव आणूया कीर्तनीं। विठ्ठल गाउनी नाचो रंगीं॥’ ऐवढा आत्मविश्वास प्राप्त करूं शकले. सबंध बागकामच जणुं हरिरूपाने त्यांना दिसे. “माझी विठाई, ‘कांदा, मुळा, भाजी, लसूण, मिरची, कोथिंबिरी’ या रूपानें नटून आली आहे. तिची सेवा नको करायला?” अशी त्यांची भावना असे. यांच्या अभंगांतून भक्तीचा जिव्हाळा व अनुभवाची साक्ष दिसून येते. यांच्या जीविताचे मर्म असे होतें:—

“नामाचिये बळें न भीऊं सर्वथा। कळिकाळाच्या माथा सोटे मारूं॥
वैकुंठींचा देव आणूया कीर्तनीं। विठ्ठल गाउनी नाचो रंगी॥
सुखाचा सोहळा करूनी दिवाळी। प्रेमें वनमाळी चित्तीं धरूं।
सांवता म्हणे ऐसा भक्तिमार्ग धरा। तेणें मुक्ति द्वारां वोळंगती॥

— १२ जुलै १२९५

## आषाढ व. ३० राजे जयसिंग यांचें निधन!

शके १५८९ च्या आषाढ व. ३० रोजीं मानसिंगाच्या वंशांतील प्रसिद्ध राजा भीर्झा जयसिंग यांचें निधन झालें.

जयसिंग यांचें वजन शहाजहान व औरंगजेब यांच्या दरबारांत चांगले होतें. शिवाजी राजे यांना पकडून आणण्यासाठीं औरंगजेबाकडून यांची योजना झाली होती. श्रीशिवाजीमहाराजांनीं या श्रेष्ठ सरदाराला लिहिलेलें पत्र स्वाभिमानाने रसरसलेले आहे:—"हे श्रेष्ठ सरदारा, तुझ्यामुळे रजपुतांची मान उन्नत झाली आहे ... मीं असें ऐकिलें आहे कीं, मजवर हल्ला करण्यासाठीं व 'दख्खन' जिकण्यासाठीं तूं आला आहेस. हिंदूंचे हृदय व नेत्र यांच्या रक्ताने तूं जगांत यशस्वी होऊं पाहत आहेस; तुझ्या हें ध्यानांत येत नाही कीं, यानें तुझ्या तोंडास काळोखी फांसली जात लाहे. ... या तुझ्या कृत्यानें देशावर व धर्मावर आपत्ति ओढवलेली आहे. ... जर तूं आपण होऊन दक्षिण देश जिकण्यास आला असतास तर माझें शरीर व डोळे मी तुझ्या वाटेवर बिछान्याप्रमाणें पसरले असते. मी तुझ्या घोड्याबरोबर मोठी सेना घेऊन आलो असतों. ... पण तू सज्जनांना फसविणाऱ्या औरंगजेबाच्या थापांना भुलून इकडे आला आहेस. ... जेव्हां अफझलखान व शास्ताखान यांचे हातून काम होईनासे दिसलें तेव्हां तुझी योजना झालेली दिसते. ... आम्हां लोकांशीं युद्ध खेळून हिंदूंचें शिर धुळीस मिळवण्याचें काम मात्र तूं करूं नकोस. जर तुझ्या तीक्ष्ण तरवारींत पाणी असेल व घोड्यांत दम असेल तर हिंदु धर्माच्या शत्रूवर हल्ला करून इस्लामचें जडमूल खोडून टाक. ... आजवर तूं किरकोळ लोकांशीं खेळलास म्हणून तुझा दम कायम आहे. पण तूं आतां सिंहाशीं युद्ध करण्याची धिटाई धरून आला आहेस. या धांवपळींत तुला काय मिळणार? तूं मृगजळाच्या पाठीमागें व्यर्थ धांवत आहेस.. आमचीं पोरेंबाळें, देश, धन, देव व पवित्र देवपूजक या सर्वांवर पराकाष्ठेचें दुःख कोसळलें आहे. आणि हाच क्रम आणखी कांहीं दिवस चालला तर आम्हां हिंदु लोकांचे नांव सुद्धां या पृथ्वीवर राहणार नाहीं. ... आम्हीं लोकांनीं या वेळीं हिंदु, हिंदुस्थान व हिंदु धर्म यांच्या संरक्षणासाठीं फार जोराचे प्रयत्न केले पाहिजेत."

—११ जुलै १६६७.




रामकृष्ण परमहंस. भगवान् श्रीकृष्ण. श्रीज्ञानदेव. ईश्वरचंद्र विद्यासागर.
अरविंदबाबू घोष. मदनलाल धिंग्रा. अहल्यादेवी. काकासाहेब खाडिलकर.

## श्रावण शु. १ "पण मोंगलांस दमास आणूं!"

शके १६८५ च्या श्रावण शु. १ ला मराठ्यांच्या फौजेने राक्षसभुवन येथें निजामास गांठून अकल्पितपणें त्याचा प्रचंड पराभव केला.

एरव्हीं, निजामाशीं सख्य करणारा राघोबादादा तर त्याच्यावर फार संतप्त झाला होता. गोपिकाबाईला त्याने लिहिले— "यवनाशीं सख्य करावयासी लिहिले, तरी हे गोष्ट कदापि व्हावयाची नाही. दबून सलोखा केला तर तो वरसास बोकांडी बसेल. यास्तव लबाडी फिरोन न करी असें शासन केले पाहिजे. नाचण्यावऱ्यांची भाकरी खाऊं, पण मोगलास दमास आणूं–" या निश्चयानें राघोबा जूनपासूनच तयारीत होता. पण कर्तबगार माधवराव पेशव्यांनीं मोठ्या मुत्सद्देगिरीने राघोबाचा बेत लांबविला. पावसाळ्यांत मराठे सहसा स्वारीवर जात नसत. पण या वेळी मात्र मुद्दाम गोदावरी नदीचे पाणी अपरंपार चढलेलें असतांना निजाम हलके हलके सैन्य पार करीत असतांना कांहीं एक वार्ता न देतां अचानक मराठ्यांनी शत्रूस गांठून त्याचा फन्ना उडविला. लढाईनंतर माधवराव पेशवे लिहितात– "निजामचे आमचे झुंज जाले. फार निकडीचें हत्यार जालें. त्याचा मोड झाला. आमची फत्ते झाली. विठ्ठल सुंदर याचे डोचके कापून आणलें—"

या राक्षसभुवनच्या लढाईचें महत्त्व फार आहे. पानिपतच्या संहारामुळे मराठी राज्य खिळखिळे झालें होतें. छत्रपति, नागपूरचे भोसले, प्रतिनिधि वगैरे सत्ताधीश पेशव्यांस मानीत नव्हते. निजाम याच संधीची वाट पाहत होता. पेशव्यांच्या घरांत भांडणे सुरू होती, कारभारी मंडळींत मतभेद होते. अशा या बिकट प्रसंगीं माधवराव पेशव्यांनीं स्वतःच्या हिंमतीवर मराठेशाहीचें तारूं सांवरून धरले. निजामाच्या पराभवामुळें मराठ्यांचा पुनः सर्वत्र वचक बसला; आणि माधवरावास पुढील प्रचंड उद्योगास अवश्य असणारें साहस, अनुभव आणि लष्करी शिक्षण मिळालें. याबद्दल रियासतकार सरदेसाई लिहितात — "या अवधींत आप्त, शत्रु, मित्र, आपले, परकीय, भिन्न भिन्न प्रकारच्या यशापयशाचे नमुने, जाळपोळीचे प्रकार, इतकें कांहीं माधवरावाच्या निदर्शनास आलें कीं, राज्य कसें हांकावें याची जणुं उत्कृष्ट शिकवणच त्यास या वेळीं प्राप्त झाली.—"

— १० ऑगस्ट १७६३

## श्रावण शु. २ (१) विश्वासराव पेशवे यांचा जन्म !

शके १६६४ च्या श्रावण शु. २ रोजीं नानासाहेब पेशवे व गोपिकाबाई यांचे पराक्रमी पुत्र विश्वासराव यांचा जन्म झाला.

लहान वयांतच विश्वासरावांनीं मोठमोठाले पराक्रम केले होते. औरंगाबाद व शिंदखेड येथील लढाईंत मराठ्यांनीं निजामाचा पूर्ण पराभव केल्यानंतर उद्‌गीर येथील लढाईंत विश्वासराव भाऊसाहेबांबरोबर होतेच. त्या वेळीं हत्तीवरून उत्तम प्रकारें तिरंदाजी करून विश्वासरावांनीं मोठेंच शौर्य दाखविलें. दहा हजारांची स्वतंत्र फौज विश्वासरावांच्या हाताखालीं दिलेली होती. अब्दालीचें पारिपत्य करण्यास भाऊसाहेब उत्तर हिंदुस्थानांत निघाले. त्या वेळीं त्यांनीं विश्वासरावास बरोबर घेतलें. सन १७६० मध्यें दिल्ली शहर हस्तगत करून तेथें दरबार भरविला आणि सर्वांकडून विश्वासरावास नजरा करविल्या. नंतर विश्वासरावांनीं किल्ल्याची पहाणी लष्करी दृष्टीनें केली. या वर्षी आलेला दसऱ्याचा समारंभहि त्यांच्याच नेतृत्वाखालीं पार पडला. पानिपतच्या घनघोर संग्रामास सुरुवात झाली त्या वेळीं हे व भाऊसाहेब हत्तीवर बसून लढत होते. सकाळीं आठ वाजतां लढाईस तोंड लागलें. दुपारीं एक भयंकर घटना घडली. 'मराठ्यांच्या दुर्दैवाने ऐन वेळेस जुंबरेदाराची गोळी लागोन विश्वासराव घोड्याखालीं आले. नानासाहेबांचें निधान हरपलें... हें वर्तमान भाऊसाहेबांनीं ऐकून अत्रसानें सोडिलें. बहुत विलाप केला." जखमा झाल्यामुळें मृत्यूची वाटचाल करणाऱ्या विश्वासरावांनीं भाऊस सांगितलें, "तुम्ही चला, लढाई बिघडेल–" भाऊसाहेब 'गिलचा खाशानिशीं मारीन' म्हणत गर्दीत घुसले. विश्वासराव गोळी लागून ठार झाले. जवळच एका हत्तीवर पार्वतीबाई होतीं. शेजारीं हत्तीवर प्रेत पाहून तोंडावरील शेला काढण्यास शागिर्दास तिने सांगितलें, तों विश्वासरावांचे सुंदर वदन दृष्टीस पडलें. उरांत दुःखाचा भडका होऊन ती रडूं लागली. नाना फडणिसांची आई बोलली, "बाई अजून रडे पुढेंच आहे." पेशव्यांच्या घराण्यांत विश्वासराव फारच सुंदर होते. ते केवळ मदनाचे पुतळे दिसत.

—२२ जुलै १८४२

**श्रावण शु. २** **( २ ) राणोजी शिंदे यांचें निधन !**

शके १६६७ च्या श्रावण शु. २ या दिवशीं मराठेशाहींतील प्रसिद्ध वीर राणोजी शिंदे यांचे निधन झालें.

पहिल्या बाजीरावाने हिंदुपदपातशाहीच्या लौकिकासाठीं जो प्रचंड उद्योग केला, त्यांतून अनेक शूर आणि कर्तबगार माणसें उदयास आलीं. त्यांत मल्हारराव होळकर, उदाजी पवार, राणोजी शिंदे, गोविंदपंत बुंदेले, हे प्रमुख होते. हीं सर्व घराणीं आपल्याला रजपुतांपैकींच समजत असत. शिंदे हे घराणें सुद्धां अस्सल क्षत्रियांचें होतें. प्राचीन काळच्या सेंद्रक नांवाच्या क्षत्रिय घराण्यावरून शिंदे नांव आले असें सांगतात. किंवा शिसोदे याचा अपभ्रंश शिंदे असा होऊं शकेल. शिंद्यांचें मूळचें गांव शिंदखेड असले तरी राणोजी शिंदे हे मात्र सातारा जिल्ह्यांतील कोरेगांव तालुक्यांत कण्हेरखेड नांवाचे गांव आहे, तेथील पाटील घराण्यांतील होते. शाहूमहाराज कैदेत होते तेव्हां याच घराण्यांतील मुलगी अंबिकाबाई ही त्यांना दिली होती. तिचे वडील औरंगजेबाच्या नोकरींत होते. त्यांच्याच घराण्यांत राणोजी शिंदे प्रसिद्धीस आले. घरी अत्यंत गरिबी असल्यामुळें राणोजींनीं प्रथम बाळाजी विश्वनाथाच्या पागेत बारगिराची नोकरी पत्करिली. पुढें राणोजीची स्वामिनिष्ठा पाहून पेशव्यांनीं राणोजीस इतर सरदारांबरोबर माळवा व उत्तर हिंदुस्थान येथील कामगिरीवर पाठविले. राणोजी शिंद्यांनीं तिकडे मोठाच पराक्रम करून नांव कमावले. " राणोजी स्पष्टवक्ता व धन्याची भीडभाड ठेवणारा नव्हता. त्याचीं पत्रें बाणेदार आहेत. राणोजीचा बाप जनकोजी मुलाचा पराक्रम पाहण्यास हयात होता. पुण्याजवळच्या अनेक भानगडींत व गांवकींच्या कारभारांत राणोजीचें प्राधान्य होतें ही गोष्ट पुरंदरे रोजनिशींतील अनेक उल्लेखांवरून व्यक्त होते. शिंद्यांच्या घराण्याचा मराठेशाहीच्या पुढील इतिहासाशीं निकट संबंध आहे. इतकेच नव्हे तर पाऊण शतकाच्या मराठेशाहीचा इतिहास बराचसा या एका घराण्याने बनविला आहे असें म्हणण्यास चिंता नाहीं— " राणोजी शिंदे श्रावण शु. २ या दिवशीं सुजावलपूर येथें मृत्यु पावले; पुढें त्या स्थळास राणेगंज असें नांव प्राप्त झालें.

— १९ जुलै १७४५

## श्रावण शु. २ (३) वासुदेव बळवंतांना अटक!

शके १८०१ च्या श्रावण शु. २ रोजीं भारतांतील पहिले क्रांतिकारक वासुदेव बळवंत फडके यांना इंग्रज अधिकारी मेजर डॅनिअल यांनीं देवरनावडगी येथे अटक केली.

या वेळीं वासुदेव बळवंत अज्ञातवासांत गाणगापूर येथें दिवस कंठीत होते. सरकार मोठ्या जारीनें तपास करूं लागले. पुण्यास एका देवळांत पुराणास बायका जमल्या असतांना वासुदेव बळवंतांच्या वास्तव्याचा स्फोट झाला. मेजर डॅनिअलची या कामगिरीवर नेमणूक होऊन त्या दृष्टीने प्रयत्नहि सुरू झाले. हैदराबाद सरकारची मदत मिळाल्यानंतर शोध करण्यासाठीं जारीने प्रयत्न होऊं लागले. अर्थात् वासुदेव बळवंतांना ही वार्ता समजल्याखेरीज कशी राहणार? लागलीच गाणगापूर येथील आपले बिऱ्हाड आवरून ते पंढरपूरच्या मार्गास लागले. इंग्रज अधिकारी डॅनिअल हा पाठलाग करीत होताच. फडके यांची वृत्ति थोडी निराशेची होती. मोठ्या प्रमाणांत आपणांस यश मिळावे या दृष्टीने यत्न होण्यासाठीं ते साधनसामग्रीच्या तजविजीत होते. पण आतां हा सरकारी ससेमिरा पाठीशीं आणि प्रकृतिहि ठीक नव्हती. अंगांत ताप होता. भीमा नदीच्या तीरावर एका सहकाऱ्यासह ते आले तों नदीस महापूर आलेला! पैलतीरावर जाणे तर अत्यंत आवश्यक. तेव्हां त्यांनीं एका नावाड्यास भरीस घालून भीमेची प्रार्थना केली, आणि आपणांस सुयश दे असे म्हणून भरल्या नदींत नाव घातली. मजल दर मजल करीत फडके देवरनावडगी या गांवीं येऊन पोचले. या गांवाच्या शेजारीं जुनें देऊळ होते. त्या ठिकाणी शीण घालवावा म्हणून त्यांनीं मुक्काम केला. अत्यंत श्रम झाल्यामुळें त्यांना गाढ झोंप लागली. दाढी, जटा वाढलेल्या चेहऱ्या-वर एक प्रकारचें गांभीर्य आणि तेज विलसत होते. परंतु या खंबीर माणसाचे दैव आज ठीक नव्हते. बाहेर मुसळधार पावसाची वृष्टि होत असतांनाच मेजर डॅनिअल येऊन थडकला. झोंपेच्या अधीन झालेल्या सावजास डॅनिअलनें प्रथम निःशस्त्र केले. आणि मग वासुदेव बळवंतांना गचांडी देऊन उठविलें. फडके हतवीर्य झाले. शत्रूच्या स्वाधीन होण्याखेरीज त्यांना दुसरा मार्ग नव्हता.

— २१ जुलै १८७९

## श्रावण शु. २ (४) मदनलाल धिंग्रांचा देहान्त!

शके १८३१ च्या श्रावण शु. २ रोजीं भारतांतील विख्यात क्रांतिकारक मदनलाल धिंग्रा यांस ब्रिटिश राजसत्तेने फांशीं दिले.

गेल्याच महिन्याच्या शु. १३ रोजीं मदनलाल यांनीं कर्झनवायली यांचा खून केला होता. लागलीच खटल्यास सुरुवात होऊन त्यांस फांशींची शिक्षाहि झाली. त्याची अमलबजावणी श्रावण शु. २ रोजी झाली. "आज मदनलालजी यांना झालेली देहान्ताची शिक्षा अमलांत येणार! त्यामुळें प्रभातकाळींच या तुरुंगांत गडबड उडालेली आहे. आदल्या रात्रीं लागलेल्या गाढ झोपेंतून जागे झालेले मदनलालजी उत्तम प्रकारचा पोशाख करून आपल्या परलोकच्या प्रवासासाठीं सिद्ध झालेले आहेत. लौकरच त्यांचा देहांत होणार म्हणून दुःखित होऊन त्यांचे देशबंधु तुरुंगाच्या बाहेर घोटाळत आहेत....... मदनलालांच्या या अलौकिक वर्तनाचा ज्यांच्या मनावर भलाबुरा परिणाम झाला, असे दोन-तीनशे इंग्रजहि आतुरतेने तुरुंगाबाहेर उभे आहेत. सकाळचा फराळ मदनलालजींनीं शांतपणे भक्षण केला. नऊच्या ठोक्याला घंटेचा घणघण आवाज होऊं लागला. ख्रिस्ती धर्माचे उपदेशक मदनलालजींजवळ आले, पण आपल्या हिंदुत्वाचा अभिमान बाळगणाऱ्या धिंग्राजींनीं त्यांच्या तोंडून एक शब्दहि ऐकला नाहीं. आपणांस येणारा मृत्युहि हिंदु पद्धतीने यावा असा त्याचा आग्रह होता. मदनलालजी वधस्तंभाकडे निघाले. त्यांचा उघडा उन्नत शीर्षभाग त्यांच्या अचल चित्तवृत्तीची ग्वाही देऊं लागला. मदनलालजी वधस्तंभावर चढले! पाशांत त्यांचा गळा गुंतला! ठोकळा उडाला!! आणि मदनलालजी मृत्यूच्या साम्राज्यांत दाखलहि झाले."

आदल्याच दिवशी मदनलालजींचे प्रभावी वक्तव्य प्रगट झाले होते.—"परकी शस्त्रास्त्राच्या साह्यानें दास्यांत जखडून टाकण्यांत आलेले राष्ट्र नेहमींच युध्यमान असतें. निःशस्त्र जातीला उघड उघड रणांगणांत उतरून सामना देणें अशक्य होत असल्यामुळें, मीं दबा धरून हल्ला चढवला. मला तोफा वापरूं देण्यांत आल्या नाहींत म्हणून मीं पिस्तुल काढलें व ते झाडलें."

— १७ ऑगस्ट १९०९

## श्रावण शु. ३ राघोबादादांचा जन्म !

शके १६५६ च्या श्रावण शु. ३ रोजीं थोरल्या बाजीरावांचे तिसरे चिरंजीव रघुनाथराव ऊर्फ दादासाहेब पेशवे यांचा जन्म झाला. मराठ्यांचा भगवा झेंडा यांनींच अटकेपार फडकविला.

आपल्या पूर्वायुष्यांत यांनीं उत्तरेकडील राजकारण बरेंच गाजविले. उत्तरेवरील दुसऱ्या स्वारींतील यांचा पराक्रम अवर्णनीय आहे. अब्दालीच्या पाठोपाठ यांनीं दिल्ली काबीज करून मथुरा, वृंदावन, गया, कुरुक्षेत्र वगैरे गांवे सोडविलीं. पंजाबांत जाऊन अब्दालीचे लोक तेथून पिटाळून लावले व मराठ्यांचे झेंडे अटकेवर रोविले. यानंतर यांनीं उद्गीर येथील लढाईंत शौर्य गाजविलें. पुढें माधवराव व रघुनाथराव यांचे सारखें बिनसत चालले. माधवरावांच्या अटकेंतच यांना दिवस काढावे लागले. नारायणरावानें राज्यकारभार सुरू केला त्या वेळीं यांना लोभ सुटला; आणि नारायणरावास धरावें असा यांना हुकूम सोडला; पण 'ध'चा 'मा' होऊन नारायणरावांचा वध झाला.

यांच्या घरभेदीपणामुळें मराठी राज्याचें फारच नुकसान झालें. आपल्याविरुद्ध कांहीं कारस्थान होत आहे हें पाहून यांनीं कर्नाटकांतील हैदरशीं कल्याणदुर्गचा तह केला आणि माधवरावांनीं मिळवलेला पन्नास लक्षांचा मुलूख गमावला. त्याचप्रमाणे कृष्णा व तुंगभद्रा या नद्यांतील पाऊण कोट रुपये उत्पन्नाचा मुलूख फक्त सहा लक्ष खंडणीच्या करारावर शत्रूस देऊन टाकला. स्वकीयांशीं पटत नाहींसें पाहून हे अहमदाबादेस इंग्रजांचे आश्रयास गेले; आणि तेथून सुरतेस आल्यावर इंग्रजांशीं तह केला. इंग्रजी राज्याचे पांढरे पाय मराठी दौलतींत रुजण्यास सुरुवात झाली. पुढे सालबाईच्या तहामुळें इंग्रजांचा आश्रय यांना मिळाला नाहीं. तेव्हां निरुपाय होऊन गोदावरीतीरावर राहण्याचें यांनीं ठरविलें; आणि दरमहा पंचवीस हजारांची नेमणूक घेऊन हे कोपरगांवीं राहूं लागले. तेथेंच त्यांचा अंत झाला. नारायणराव पेशवे यांचा वध यांनींच करविल्यामुळें शेवटीं स्पष्ट कबुली देऊन यांनीं प्रायश्चित्तहि घेतलें. "हा चंचल असला तरी कोणत्याहि संकटांतून मार्ग काढण्यास, किंवा पेशवाई मिळवण्याकरतां प्रयत्न करण्यास हा मागें कधींच सरला नाहीं."

— १ ऑगस्ट १७३४

## श्रावण शु. ४ संभाजी राजांचा पराक्रम !

शके १६०४ च्या श्रावण शु. ४ रोजीं छत्रपति संभाजी राजे यांनीं मराठ्यांच्या प्रांतास उपद्रव देणारीं पोर्तुगीझांचीं जहाजें पकडलीं.

छत्रपतींच्या आसनावर संभाजी कायम झाल्यावर त्याला मुख्यतः जंजिऱ्याचे सिद्दी, गोव्याचे पोर्तुगीझ आणि मोंगल बादशहा यांच्याशीं युद्ध-प्रसंग करावे लागले. रायगड राजधानीच्या नजीकच सिद्दीचे स्थान होतें. 'घरांत जैसा उंदीर, तैसा महाराजाचे राज्यास सिद्दी' असल्यामुळें त्याचें पारिपत्य करण्याचें संभाजीने प्रथम ठरविले. परंतु या मोहिमेत संभाजीला फारसें यश प्राप्त झालें नाहीं. कारण गोव्याचे पोर्तुगीझ सिद्दीला मदत करीत असत, तेव्हां पहिल्याने पोर्तुगीझांचा मोड केल्याखेरीज इलाज नव्हता. म्हणून संभाजीने आपला मोर्चा पोर्तुगीझांकडे वळविला. धार्मिक जुलूम करून मराठ्यांचा व्यापार नष्ट करणे हे उद्योग पोर्तुगीझांचे सुरू होते. याच वेळीं शहाजादा अकबर बापाविरुद्ध बंड करून संभाजीच्या आश्रयास आला होता. आणि संभाजीविरुद्ध मोंगलांना मदत करण्याचें काम पोर्तुगीझांनीं चालू ठेविलेंच होतें, त्यामुळे संभाजीचा रोष अधिकच वाढला. अकबराची बाजू सांभाळून मोंगलांशीं लढा देण्यासाठीं संभाजीला पश्चिम किनारा आपल्या ताब्यांत ठेवणें इष्ट वाटलें. आणि त्याप्रमाणें संभाजीने हुकूम केला की, कोणाचींहि लढाऊ किंवा व्यापारी जहाजें परवानगी-शिवाय पश्चिम समुद्रांतून वावरूं नयेत. यामुळे अर्थातच पोर्तुगीझांच्या स्वातंत्र्यास बाध येऊन ते लढण्यास तयार झाले. परवानगीविना हिंडणारीं जहाजें संभाजीनें पकडलीं; आणि थोडक्याच दिवसांत रायगडाजवळील चौल नांवाच्या पोर्तुगीझांच्या ठिकाणास संभाजीने वेढा दिला. आणि दोघांचा उघड असा संग्राम सुरू झाला. चौलच्या वेढ्यास संभाजीस अपयश आलें तरी पुढील फोंड्याच्या वेढ्यांत मात्र तो विजयी झाला. या वेळीं संभाजीला अनेकांशीं निकराचीं युद्धें करावीं लागलीं. पोर्तुगीझांचा पराभव होऊन तहहि झाला; पण युद्धखर्चाची रक्कम मागतांच पोर्तुगीझांनीं सावंताला पुढें करून संभाजीशीं पुन्हा युद्धाला सुरवात केली. परंतु संभाजी डगमगला नाहीं.

—२८ जुलै १६८२

**श्रावण शु. ५** **( १ ) नागपंचमीचें रहस्य !**

श्रावण शु. ५ हा दिवस नागपंचमीचा म्हणून प्रसिद्ध आहे.

भारताच्या बहुतेककरून सर्व भागांत या दिवशीं नागांची पूजा होत असते. पण या सणाच्या उत्पत्तीबद्दल मात्र मतभेद आहेत. 'सर्वाभूतीं भगवद्भाव' कल्पिणाऱ्या भारतीय संस्कृतीनें नागांपासून संरक्षण व्हावें म्हणून त्यांच्यांत देवत्व कल्पून त्यांची पूजा सुरू केली. वित्त-संपत्तीचा रक्षणकर्ता म्हणून नागाची ख्याति असून शिव, विष्णु, गणपति, इत्यादि देवांशीं आलेला त्याचा संबंध प्रसिद्धच आहे. बंगालमधील 'मणिपूर' गांवच्या कहाणींतून हाच विचार स्पष्ट होतो. तेथील लोक सर्पापासून संरक्षण व्हावें म्हणून 'मनसा' नांवाच्या देवीची पूजा करतात. ही मनसा म्हणजे शेषाची बहीण, तिच्या भक्तीनें विष बाधत नाहीं अशी समजूत असल्यामुळें तिला 'विषहरा' असेंहि नांव आहे. हिंदूंच्या धार्मिक वाङ्मयांतहि सर्प-नाग यांच्या कथा पुष्कळ आल्या आहेत. बायबलांत तर माणसाला ज्ञानप्राप्ति करून देणारा 'नाग'च आहे असें दर्शविलें आहे. आपल्याकडे भागवत, विष्णुपुराण, आदि पुराणांत नागकथा सांपडतात. दक्षिण हिंदुस्थानांत तर द्राविडी संस्कृतीने नागांचीं देवालयें बांधिलीं आहेत.

पण या नागपंचमीचे पाठीमागे थोडा सामाजिक इतिहासहि असावा. महाभारतकाळीं नाग नांवाची मनुष्यजात होती. आर्य आणि नाग यांचीं युद्धे वारंवार होत. नागांच्या तक्षक राजानें परीक्षित राजाचा खून केला. दोन जमातींत भयंकर संग्राम सुरू झाला. हा झगडा कोणीं मिटविला ? तर ज्याची आई नागकन्या असून पिता आर्य होता अशा आस्तिक ऋषींनीं ! नाग आणि आर्य यांच्या आंतरजातीय विवाहानें हा झगडा मिटण्यास मदत झाली. कलारसिक, नगररचना-कुशल आणि पौरोहित्याचें काम करण्याइतपत विद्वान अशी नागजाति आर्यांच्यामध्यें मिसळली. आणि त्यांच्या संतोषाप्रीत्यर्थ नागपंचमी सण आला असावा. महाराष्ट्रांतहि नागपंचमीचा सण पाळला जातो. घरोघर मातीच्या नागाची पूजा होत असते. गारुडी लोकांच्या जवळील नागांसहि दूध पाजून या देवाविषयींचा आदरभाव व्यक्त केला जातो.

## श्रावण शु. ५ (२) कालिया सर्पाचा पराभव !

श्रावण शु. ५ या दिवशी भगवान् श्रीकृष्णांनीं कालिया नांवाच्या नर-सर्पाचा पराभव केला !

गोकुळाच्या उत्तरेस एका कोसावर यमुनेच्या काठावर एका प्रचंड डोहाशेजारीं कालिया नांवाचा दुष्ट नर-सर्प राहत होता. व्रजवासीयांना त्रास देण्यासाठीं कालिया यमुनेच्या पाण्यांत विष कालवीत असे. त्यामुळे कोणताहि प्राणी त्या डोहाच्या आसपास फिरकत नसे. दुष्ट कालियास हांकलून द्यावे ; आणि यमुनेचे पाणी सर्वांना पिण्यास स्वच्छ करावें, या निश्चयाने श्रीकृष्ण एके दिवशीं एकटाच गाई घेऊन निघाला. डोहानजीक आल्यावर तेथील एका कदंब वृक्षावर चढून श्रीकृष्णाने दंड थोपटले आणि कालियास पाचारण केले. कालियाहि खवळून डोहापासून कृष्णाकडे आला. कालियाचे नेत्र रागाने लालभडक झाले. जणुं त्यांतून विषवृष्टि होत होती! नाकांतून विषारी फूत्कार बाहेर पडत होते. आपल्या प्रचंड शरिराने कालियाने श्रीकृष्णास विळखा घातला. श्रीकृष्ण सावध होताच. त्यानें आपल्या शक्तिशाली हातांनीं कालियाचे नरडे पकडले. कालिया-कृष्णाच्या या युद्धाची हकीगत सर्व गोकुळांत समजली, आणि नंद-यशोदेसह सर्व जण डोहाकडे धावून आले. कालियाच्या विळख्यांत कृष्ण सांपडलेला पाहून त्या सर्वांनीं एकच आकांत केला. इतक्यांत कृष्णाने कालियाचे नरडे जोराने दाबल्याबरोबर तो गतप्राण झाल्यासारखा होऊन त्याचे विळखे सैल पडले. त्यानंतर कृष्णाने त्याच्या डोक्यावरच प्रहार करण्यास सुरुवात केली. कालियाचे हे भयंकर दुःख पाहून त्याचीं बायकापोरें रडूं लागलीं. त्यांनीं कृष्णाची प्रार्थना करून कालियाच्या प्राणांची भिक्षा मागितली. आपल्या परिवारासह कालियाने येथून निघून जावें, आणि पुन्हां गोकुळांतील लोकांना कोणत्याहि प्रकारचा त्रास देऊं नये या अटीवर श्रीकृष्णानें कालियास जीव-दान दिले. कृष्णाच्या पकडींतून मुक्त झाल्यावर कालियानें त्याच्या पायावर डोके ठेविले आणि अनन्यभावानें स्तुति करून कालिया आपल्या गणगोतासह दूर निघून गेला. बाल वयांत श्रीकृष्णाने हा मोठाच विजय मिळविला होता.

● ● ●

## श्रावण शु. ६ रामकृष्ण परमहंसांची समाधि !

शके १७८८ च्या श्रावण शु. ६ रोजीं भारतांतील जगप्रसिद्ध सिद्ध पुरुष व वेदान्तप्रतिपादक रामकृष्ण परमहंस यांनीं समाधि घेतली.

भारतीय संस्कृतीचा प्रसार सर्व जगांत करणारे विख्यात स्वामी विवेकानंद हे रामकृष्ण परमहंसांचेच शिष्य. लहानपणींच कलकत्त्याच्या दक्षिणेश्वराच्या मंदिरांत कालीची उपासना करीत असतांना एक आध्यात्मिक संत म्हणून स्वामी रामकृष्णांचा लौकिक वाढूं लागला. नास्तिक्याकडे झुकलेल्या, गांगरलेल्या आणि स्वत्व विसरलेल्या भारताला यांचा संदेश नवचैतन्य देणारा ठरला. केवळ मतांच्या आणि मतांतरांच्या मागें लागूं नका. केवळ पंथांच्या आणि धर्मसमजुतींच्या मागें लागूं नका. त्यांना फारसे महत्त्व नाहीं. तुमच्या स्वतःच्या अंतर्यामीं जे सत्य वास करीत आहे, तेंच तुम्हीं अधिक प्रकाशमय केले, तर त्यापासून अधिक हिताची प्राप्ति होईल. याकरितां परक्यावर टीका करीत न बसतां आत्मसंशोधन करा. सर्व मतांत आणि सर्व धर्मांत सत्याचा कांहीं अंश असतोच. धर्म म्हणजे पोकळ शब्द नव्हत अथवा नुसता बाह्याचार हाहि धर्म नसून आत्मानुभव हा खरा धर्म आहे. हें स्वतःच्या आचरणानें तुम्ही सिद्ध करा. आत्मानुभवी असतील त्यांनाच या गोष्टींचा उमज पडेल. आत्मानुभव ज्यांना प्राप्त झाला असेल, तेच इतरांस तो देऊं शकतील. हेच पुरुष मानवजातीचे गुरु होऊं शकतील. प्रकाशाचें सामर्थ्य फक्त अशांनाच प्राप्त होईल. हा तो संदेश होता.

फ्रान्सचे मॉ. रोमाँ रोलॉ यांनीं रामकृष्ण परमहंसांविषयीं म्हटलें आहे :—

He was the crowning glory of the interior life of two thousand years in a people of three hundred millions. He spoke with a gentle tone, yet his almost silent musings penetrated deep into the heart of listeners without a rapture, and modelled many a life slowly but surely.

— १५ ऑगस्ट १८६६

## श्रावण शु. ७ संत तुलसीदासांचा जन्म !

शके १४५३ च्या श्रावण शु. ७ रोजीं हिन्दी भाषेंतील विख्यात रामभक्त महाकवि संत तुलसीदास यांचा जन्म झाला!

यांच्या आईचें नाव हुलसी व वडिलांचें नांव आत्माराम दुबे. हे जातीनें सनाढ्य ब्राह्मण असून यांचा जन्म एका अत्यंत गरीब अशा कुळांत झाला. असे सांगतात कीं, बारा महिने आईच्या गर्भांत राहिल्यानंतर यांचा जन्म झाल्यामुळे यांची अंगयष्टि बळकट होती. जन्मल्याबरोबर न रडतां यांच्या मुखांतून राम शब्द बाहेर आला. यांच्या जन्मावेळीं मूळ नक्षत्र होते; मुखांत दांत होते; अशा या विलक्षण मुलाला पाहून हुलसी चिंतित झाली; आणि शेवटीं अशुभ टाळण्याच्या निमित्तानें तिने आपल्या मुलाचा त्याग केला. चुनिया दासीने यांचे पालनपोषण भलेपणाने केले. पांच वर्षानंतर चुनियाचा पण देहान्त झाला; आणि तुलसी अनाथ होऊन दारोदार भटकूं लागला. या वेळीं रामशैल पर्वतावर श्रीअनन्तानन्दजींचे प्रिय शिष्य श्री नरहर्यानन्दजी रहात होते. त्यांनीं या अनाथ मुलाला आपल्याजवळ घेतले, आणि त्यांचें नांव 'रामबोला' असे ठेवले; न शिकवतांच रामबोला गायित्री मंत्र जपूं लागला! वैष्णवधर्मास अनुसरून संस्कार झाल्यावर तुलसीदास आयोध्येमध्यें राहून विद्याभ्यास करूं लागले. ज्ञानविद्या पूर्ण झाल्यानंतर दीनबंधु पाठक यांच्या सुंदर मुलीशीं यांचा विवाह झाला. एकदां त्यांची पत्नी रत्नावली आपल्या माहेरीं गेली असतां तुलसीदास तिच्या पाठीमागें गेले. पत्नीने त्यांचा धिक्कार केला आणि म्हटलें, "हाडामांसाच्या शरीरावर ऐवढें प्रेम करतां त्यापेक्षां परमेश्वरावर लक्ष द्या. तुमचे कल्याण होईल." पत्नीच्या या शब्दामुळ तुलसीदासांना मोठेंच वैराग्य निर्माण झाले. साधुवेष धारण करून तीर्थाटन करीत करीत ते काशीस येऊन पोंचले. तेथें ते रामकथा सांगूं लागले. हनुमानाच्या सूचनेवरून हे चित्रकूट पर्वतावर गेले व तेथें त्यांना रामदर्शन झाले. त्यांनीं तुलसीदासांना चंदनाचा टिळा लावला आणि रामचंद्र अंतर्धान पावले. त्यानंतर तुलसीदासांनीं अफाट वाङ्मय-संपत्ति निर्माण केली.

—२० जुलै १५३१

**श्रावण शु. ८** **जगन्नाथ शंकरशेट यांचें निधन!**

शके १७८७ च्या श्रावण शु. ८ रोजी मुंबई शहरांतील प्रसिद्ध धनिक, अव्वल इंग्रजींतील सार्वजनिक कार्यकर्ते आणि विख्यात दानशूर नागरिक जगन्नाथ उर्फ नाना शंकरशेट यांचें निधन झाले !

यांच्या घराण्यानें अनेक पिढ्या व्यापार केला होता. म्हैसूरच्या लढाईत टिपू ठार झाला; आणि इंग्रज विजयी झाले, या वेळीं शंकरशेटांना खूप नफा होऊन सोळा लाख रुपये रोख व एक लक्षाचें जवाहीर प्राप्त झालें. आपली आई भवानीबाई हिच्या स्मरणार्थ त्यांनीं मुंबईस गवालिया टॅकनजीक भवानीशंकराचे देऊळ बांधून एक धर्मशाळाहि बांधली आहे. कित्येक शिक्षणसंस्थांचे सूत्रधार म्हणून नाना शंकरशेटांचें नांव प्रसिद्ध आहे. बॉबे नेटिव्ह स्कूल बुक ॲंड स्कूल सोसायटी, ही शिक्षणप्रसार करणारी एतद्देशीयांची पहिली संस्था होती. तिचेंच रूपांतर पुढे बॉबे नेटिव्ह एज्युकेशन सोसायटीमध्ये झालें. एल्फिन्स्टन साहेबानें राजीनामा दिल्यावर मुंबईत उच्च शिक्षणाची सोय व्हावी म्हणून जवळजवळ साडेचार लक्षांचा फंड जमविण्यांत आला होता, त्याचे ट्रस्टी शंकरशेटच होते! यातूनच पुढें एल्फिन्स्टन कॉलेजची स्थापना झाली. याशिवाय स्टूडंटस् लिटररी ॲंड सायण्टिफिक सोसायटी, जगन्नाथ शंकरशेट मुलींची शाळा, धि जगन्नाथ शंकरशेट फर्स्ट ग्रेड ॲंग्लो-व्हन्र्याक्युलर स्कूल, इत्यादि संस्थांचे चालक हेच होते. यांखेरीज अनेक सार्वजनिक कार्यांत यांचा हात असे. धि बॉबे असोसिएशन या राजकीय संस्थेंतहि हे प्रमुखपणे काम पाहत असत. धि बॉबे ब्रॅंच ऑफ धि रॉयल एशियाटिक सोसायटीच्या मुंबई शाखेला यांनीं पांच हजार रुपये दिले. त्यामुळे 'जगन्नाथ शंकरशेट लायब्ररी' थाटण्यास त्या संस्थेला सुलभ झालें. मुंबई विद्यापीठांत मॅट्रिक परीक्षेत संस्कृत घेऊन पहिला व दुसरा येणाऱ्या विद्यार्थ्यास यांच्या नांवें शिष्यवृत्ति मिळत असते. मुंबईच्या कायदे कौन्सिलच्या पहिल्या सभासदांत जगन्नाथ शंकरशेट प्रमुख होते. यांचा पुतळा राणीच्या बागेंत उभारण्यासाठीं मुंबईत पंचवीस हजार रुपये जमा करण्यांत आले होते. जगन्नाथ शंकरशेट हे ॲग्रिहॉर्टिकल्चरल सोसायटी ऑफ वेस्टर्न इंडिया, आणि धि जिऑग्रॉफिकल सोसायटी यांचेहि अध्यक्ष होते.

— ३१ जुलै १८६५

## श्रावण शु. ९ ब्रह्मेंद्रस्वामींची समाधि !

शके १६६७ च्या श्रावण शु. ९ रोजी शाहूमहाराज, बाळाजी विश्वनाथ, थोरले बाजीरावसाहेब, इत्यादि थोर राजपुरुषांचे गुरु ब्रह्मेंद्रस्वामी यांनीं समाधि घेतली.

सन १७०० ते १७४५ पर्यंतच्या पंचेचाळीस वर्षांत जेवढ्या राजकीय घडामोडी झाल्या तेवढ्यांत ब्रह्मेंद्रस्वामींचे थोडें तरी अंग होतें. आंग्रे, प्रतिनिधि, शाहू, बाजीराव, चिमाजीआप्पा आणि या सर्वांच्या राण्या ब्रह्मेंद्रस्वामींच्या भजनीं लागल्या होत्या. या राजे लोकांना भिक्षावृत्तीवर सधन होऊन सावकारी करणाऱ्या ब्रह्मेंद्रस्वामींकडून कर्ज मिळत असे. दिल्लीकडील कारस्थानें, निजामाचें उच्चाटन, जंजिरा, वसई येथील मोहिमा अशा महत्त्वाच्या प्रसंगीं बाजीरावानें स्वामींचा सल्ला विचारला आहे.

ब्रह्मेंद्रस्वामी सामान्य साधूंपैकींच एक असून राष्ट्राची किंवा राजकारणाची व्यापक जाणीव त्यांना नव्हती. राजे-सरदारांचें हित चिंतून ते सधन झाले तरी त्यांत आपलपोटेपणा नसावा. मंदिरें बांधणें, विहिरी, तलाव, घाट, धर्मशाळा बांधणें, इत्यादि लोकोपयोगी कामें त्यांनीं केलीं. ही सारीं पुण्यकर्मे त्या वेळीं असत. तरी पण समग्र राष्ट्राचें शाश्वत कल्याण कशांत आहे याची जाणीव स्वामींना नसावी. पोर्तुगीझ, इंग्रज, हबशी यांचे कावे त्याना समजले नाहींत. राष्ट्राचें अकल्याण त्यांनी जाणूनबुजून केले नसलें तरी आपआपसांतील संशय व द्वेष वाढत असतां अधिकारवाणीने ते नाहींसे करणे ही गोष्ट स्वामींकडून झाली नाहीं. त्यांच्या सर्व पत्रांचा विषय बहुधा पैसा आणि कर्ज हाच असे. या स्वामींचें संस्थान ऐहिक ऐश्वर्यानें नटलेलें होते तरी त्यांचें स्वतःचे आचरण निष्कलंक होते. पैशाचा उपयोग वाईट मार्गाकडे केव्हांच झाला नाहीं.

शेवटच्या आयुष्यांत स्वामी धावडशी येथें राहत. सन १७४५ च्या श्रावणांत कृष्णातीरीं त्यांनीं वार्षिक समाधीचे अनुष्ठान चालविलें. नववे दिवशींच समाधि सोडून दर्भासनावर रामनामोच्चार करीत त्यांनीं शेवटची निद्रा केली.

— २६ जुलै १९५५

## श्रावण शु. १०  सुभाषचंद्र बोस यांचें निधन !

शके १८६७ च्या श्रावण शु. १० या दिवशीं भारताचे तेजस्वी क्रांतिवीर सुभासचंद्रं बोस विमानाच्या अपघातांत जखमी होऊन जपानी इस्पितळांत निधन पावले.

सुभाषचंद्र बोस अस्सल क्रांतिवीर होते. २६ जानेवारी १९४१ रोजीं सुभाषबाबू अकाल्पितपणें आपल्या घरांतून अदृश्य झाले. सुभाषचंद्र कोठें गेले ? सर्व भारताला आश्चर्याचा धक्का बसला. ,परदेशांत जाऊन सशस्त्र क्रांति करावी आणि भारताला दास्यमुक्त करावे हा त्यांचा हेतु होता. सन १९४२ मध्यें बर्लिन रेडिओवरून त्यांनीं 'भारता'ला उद्देशून एक भाषण केलें ! सुभाषचंद्र जर्मनींत आहेत म्हणजे शत्रुराष्ट्राला मिळून युद्धास आव्हान देण्याचा त्यांचा विचार आहे, असें समजून हिंदुस्थान सरकारनें त्यांना देशद्रोही ठरविलें. कित्येकांनीं 'क्विस्लिंग' हें हलकें विशेषण त्यांना लाविलें.

" सशस्त्र क्रांति करून ब्रिटिशांना भारतांतून हांकलून दिल्याशिवाय ते जाणार नाहींत असा सुभाषबाबूंचा विश्वास असल्यामुळे त्यांनीं 'आझाद हिंद सेना' स्थापन केली. 'स्वतंत्र हिंदुस्थानचे अध्यक्ष हिज् एक्स्लन्सी सुभाष' असा गौरव त्यांचा त्या वेळीं हिटलरने केला. पुरेसे लष्करी शिक्षण घेतल्यानंतर सुभाषबाबूंनीं जपानकडे प्रयाण केले. सिंगापूरच्या भारतीय सैन्याची नवीन संघटना तयार करून 'चलो दिल्ली' ची गर्जना केली. दरम्यान दुसरें महायुद्ध समाप्त झालें. 'आझाद हिंद सेना' व 'सुभाषचंद्र' यांचे काय होणार, हा प्रश्न सर्वांच्या पुढें उभा असतां विधिघटना निराळीच घडली —

जपानी सरकारशीं कांहीं बोलणीं करण्यासाठीं सुभाषबाबू टोकियोला निघाले होते. ताईहोकु विमानतळावर अपघात झाला. पेट्रोल टांकीनें पेट घेऊन एकदम भडका उडाला. नेताजींचा पेहराव सुती असल्यामुळें तो चटकन् पेटला. लागलीच इस्पितळांत नेऊन औषधोपचार सुरू झाले, परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. श्रावण शु. १० रोजीं रात्रीं नऊ वाजतां भारताचा 'चंद्र' मावळला !

— १८ ऑगस्ट १९४५

## श्रावण शु. ११ (१) विसोबा खेचरांची समाधि!

शके १२३१ च्या 'शुद्ध श्रावण मास एकादशी' या दिवशीं विख्यात संत विसोबा खेचर हे समाधिस्थ झाले.

हे सत्पुरुष ज्ञानदेव—नामदेवांच्या समकालीन असून नामदेवांच्या गुरुत्वाचा मान यांच्याकडे आहे. महाराष्ट्रांत कवि म्हणून जरी ते प्रसिद्ध नव्हते तरी भागवत धर्माचे प्रवर्तक म्हणून त्यांची योग्यता फार मोठी होती. हे मूळचे रहिवासी आळंदीचे असून बारा ज्योतिर्लिंगापैकीं औंढ्या नागनाथ या पुरातन शिवक्षेत्रीं हे राहत असत. हे यजुर्वेदी ब्राह्मण असून सराफीचा धंदा करीत. विसोबानीं आपल्या पूर्ववयांत ज्ञानदेवादि भावंडांचा बराच छळ केला. त्या वेळीं ज्ञानेश्वरानें आपल्या योगबलानें आपला जठराग्नि प्रदीप्त करून त्यावर मुक्ताबाईकरवीं मांडे भाजवून घेतले. हा चमत्कार पाहिल्यावर विसोबा ज्ञानदेवास शरण गेले, अशी कथा भक्तिविजयांत आहे. सोपानदेवांनीं योगाची खेचरी मुद्रा देऊन यांच्या मस्तकावर हस्त ठेविला तर योगांचीं आणखी रहस्यें सांगून अद्वैतबोध व भक्तिमार्ग यांचा उपदेश ज्ञानेश्वरांनीं केला. नामदेव जेव्हां यांचा उपदेश घेण्यास बार्शीस आले तेव्हां त्यांना लोकांनीं महादेवाच्या देवळांत जा असें सांगितलें, म्हणून नामदेव महादेवाच्या देवळीं जाऊन पाहतात तो तेलाने लडबडलेल्या नव्या वहाणा पायांत घातलेला असा एक वृद्ध पुरुष शंकराच्या पिंडीवर पाय ठेवून निजला आहे व त्याच्या अंगावरील जखमांतून पू वाहत आहे, सर्वांगावर माशा घोंगावत आहेत; ही आपल्या भावी गुरूची स्थिति पाहून नामदेवास आश्चर्य वाटलें. ते त्यांच्याजवळ जाऊन म्हणाले, "महाराज, जरा उठा व पिंडीवर पाय पडले आहेत तेवढे बाजूला घ्या." तेव्हां हे म्हणाले, 'बाबा रे, मी वृद्ध व पीडित आहे. तेव्हां तूंच माझे पाय तेवढे बाजूला कर.' नामदेवांनीं हळूच पाय उचलून बाजूला ठेवले व पाहतात तों तेथें दुसरे शिवलिंग. हा चमत्कार पाहून नामदेव विस्मित झाले व देवानें सांगितलेला हाच तो योग्य पुरुष असें समजून त्यांच्या चरणावर त्यानीं मस्तक ठेवलें. "नामा धरी चरण। अगाध तुमचें ज्ञान। आपुलें नाम कोण। सांगा स्वामी" "येरू म्हणे खेचर। विसा पै जाण। लौकिकीं मिरविणें। अरे नाम्या॥" अशीं त्यांचीं प्रश्नोत्तरें झालीं.

 —१९ जुलै १३०९

## श्रावण शु. ११ ( २ ) अरविंदबाबूंचा जन्मदिवस !

शके १७९४ च्या श्रावण शु. ११ रोजी भारतांतील विख्यात क्रांतिकारक, राजकारणी, इंग्रजी भाषेतील कसलेले लेखक, उत्कृष्ट कवि आणि एका अभिनव तत्त्वज्ञानाचे प्रवर्तक बाबू अरविंद घोष यांचा जन्म झाला.

ॲलोपथीचे डॉक्टर कृष्णधन घोष हे यांचे वडील. अरविंद बाबूंचें प्राथमिक शिक्षण दार्जिलिंग येथे झाल्यावर हे वयाच्या सातव्या वर्षी इंग्लंडमध्यें शिक्षणासाठीं गेले. तेथे भाषाविषयक अभ्यासक्रमांत यांनीं उच्च प्रकारचे यश संपादून नांवलौकिक मिळविला. आय्. सी. एस्. च्या परीक्षेतहि उच्च यश मिळून सुद्धां कांहीं इतर तात्रिक गोष्टींत कमतरता निर्माण झाली म्हणून यांना ती पदवी मिळाली नाहीं. भारतांत आल्यावर बडोदें सरकारकडे प्रथम यांनीं नोकरी स्वीकारली. तेथें क्रमाक्रमाने त्यांची प्रगति होत गेली. हिंदी भाषा, संस्कृति आणि धर्म यांकडे त्यांचें लक्ष होतेंच. हळूहळू त्यांच्यांत बदल होऊं लागला. मातृभूमीला स्वातंत्र्य मिळवून द्यावें, स्वदेशबांधवांना सुस्थिति प्राप्त करून द्यावी, आणि शेवटीं स्वतःला ईश्वरी साक्षात्कार घडावा असे विचार यांच्या मनांत घोळूं लागले. बडोद्यास असतांनाच यांनीं श्री. विष्णु भास्कर लेले नांवाच्या महाराष्ट्रीय गृहस्थाच्या साह्याने योगाच्या अभ्यासास सुरवात केली. पुढें वंगभंगाच्या वेळीं यांनीं ' वंदे मातरम् ' नांवाचे साप्ताहिक सुरू केलें. त्यांतील लेख स्वातंत्र्य-प्रेमाच्या जळजळीत भावनांनीं भरलेले असत. त्यांच्या राजकीय स्वातंत्र्याच्या घोषणेचीं दोन अंगें होतीं. एक पूर्ण स्वातंत्र्य आणि दुसरें आध्यात्मिक राष्ट्रीयत्व. पैकीं पहिले अंग बऱ्याच अंशीं पूर्ण झालें आहे. आता दुसऱ्या अंगाची पूर्णता होण्यासाठीं भारतीयांना यांचे मार्गदर्शन अत्यंत उपयुक्त ठरेल. राजकारणांतून संन्यास घेऊन पांडेचारीस योगाभ्यासास जातांना हे म्हणाले, " आमची चळवळ केवळ राजकीय नाहीं, तर ती धार्मिकहि आहे. सनातन धर्माचें पुनरुत्थान याच व्यापक अर्थानें ती चळवळ केली पाहिजे. " अरविंदबाबू इंग्रजी भाषेंतील उत्कृष्ट कवि आहेत. अत्यंत कल्पकता हा त्यांच्या काव्याचा विशेष आहे. यांच्या गीतेवरील ग्रंथांत यांचें अभिनव तत्त्वज्ञान विशद झाले आहे.

— १५ ऑगस्ट १८७२

## श्रावण शु. १२ परमहंस मंडळीची स्थापना !

शके १७७१ च्या श्रावण शु. १२ या दिवशीं मुंबई येथे सामाजिक व धार्मिक चर्चेसाठीं ' परमहंस मंडळी ' स्थापन झाली.

एकोणिसाव्या शतकाच्या सुरुवातीपासूनच मिशनरी लोकांच्या हिंदु धर्मावरील हल्ल्यामुळे हिंदुधर्मीयांना आत्मनिरीक्षणाची जाणीव निर्माण झाली. विष्णुबोवा ब्रह्मचारी विरोधकांना तोंड देण्याचे कार्य धडाडीनें करीत होतेच. परंतु अज्ञानजन्य आचारविचार, बालविवाह, विधवांची वाढती संख्या, इत्यादि गोष्टींचा विचार तत्कालीन मंडळी करूं लागली होती. दादोबा पांडुरंग, राम बाळकृष्ण (जयकर), डॉ. आत्माराम पांडुरंग, लक्ष्मणशास्त्री हळबे, इत्यादि शिक्षित मंडळींना हिंदु धर्मातील दोष काढून टाकण्याची जरूरी वाटत होती. याच सुमारास पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर मुंबईस आले, आणि त्यांच्या प्रेरणेमुळे ही ' परमहंस सभा ' स्थापन झाली. जातिभेदाचा उच्छेद, मूर्तिपूजेचा निषेध, एकेश्वरी मताचा पुरस्कार, मानवांचें बंधुत्व, इत्यादि उद्देश या सभेचे असत. ही सभा गुप्तपणें चालत असे. सभेचा दीक्षाविधि ठरलेला होता. सभेचे सूत्रधार दादोबा पाडुरंग यांनी ' पारमहंसिक ब्राह्मकर्म ' नांवाचा ओवीबद्ध ग्रंथ लिहिला. तो जणुं या सभेची ' स्मृति 'च असे. दादोबा आपल्या धर्मविवेचनांत म्हणतात, "नीतिविना ज्ञान केवळ शुष्क. नीति हें ज्ञानाचे मूल्य होय. तद्व्यतिरिक्त जें ज्ञान तो केवळ वरील झळझळाट व आडंबर मात्र. अनृत, लोभ, मत्सर, वैर, आलस्य, गर्व, क्रूरता, इत्यादि दुर्गुणांपासून अलिप्त असावे."

या मंडळीच्या शाखा पुणें, नगर, सातारा, बेळगांव, इत्यादि दूरच्या शहरींहि निघाल्या होत्या. अशा प्रकारे प्रसार होत असतां कोणी एका सभासदाने सभासदांच्या यादीचे पुस्तक लांबविलें. आणि यादी प्रगट होणार कीं काय या भीतीनेंच जणुं सन १८६० च्या सुमारास या सभेचे काम बंद पडले ; परंतु याच सभेंतील मंडळींच्या विचारांना पुढें केशवचंद्र सेन याच्याकडून चालना मिळाल्यावंर १८६७ मध्ये ' प्रार्थना समाजा 'ची स्थापना झाली आणि १८७० नंतर समाजाला रानडे, भांडारकर यांच्यासारखे बुद्धिमान पुरस्कर्ते मिळत गेले.

— ३१ जुलै १८४९

## श्रावण शु. १३ (१) ईश्वरचंद्र विद्यासागरांचें निधन !

शके १८२३ च्या श्रावण शु. १३ रोजीं विधवाविवाहाच्या कायद्याचे जनक व सुप्रसिद्ध संस्कृत पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर यांचे निधन झालें.

प्रारंभींच्या आयुष्यांत शिक्षकापासून प्राचार्यांच्या जागेपर्यंतची कामें केल्यावर हे 'एज्युकेशनल इन्स्पेक्टर' झाले. पण वरिष्ठांशीं मतभेद झाला म्हणून त्यांनीं ती नोकरी सोडली. वर्णपरिचय, कथामाला, वेताळपंचविशी, वगैरे शालेय पुस्तकांनीं त्यांना भरपूर अर्थसाहाय्य केले., बंगाल्यांतील भरभराटीस आलेली 'मेट्रापोलिटन इंन्स्टिटयूट' ही संस्था त्यांनींच स्थापन केली. विधवाविवाहाच्या समर्थनार्थ यांनीं एक पुस्तक लिहिले आणि, त्यामुळें ते एकदम लोकमान्य झाले. यांच्या मातृभक्तीविषयीं असे सांगतात कीं, आजारी आईच्या भेटीसाठीं मध्यरात्रीं पावसापाण्याची फिकीर न करतां दुथडी वाहणाऱ्या नदीच्या पुरांत उडी टाकून त्यांनीं पैलतीर गांठले आणि आजारी आईची भेट घेतली. त्यांच्याच दीर्घ प्रयत्नामुळे सन १८५६ मध्यें विधवाविवाहाचा कायदा झाला. कलकत्ता येथें भरलेल्या दरबारात राणीकडून बहुमानाची सनद आणि पुढें सन १८९० मध्यें सी. आय्. ई. पदवी यांना मिळाली होती.

कमालीची मातृभक्ति, साधेपणा, निर्भयता, आणि नीतिमत्ता यांमुळें यांची छाप सर्व समाजावर पडे. सुधारणेचीं तत्त्वे यांनीं आचरणांत आणली. आपल्या मुलींचीं लग्ने त्या चौदा वर्षांच्या झाल्यानंतरच केलीं. एका मुलाचें लग्न बालविधवेशीं केलें. आणि आपल्या खर्चानें गांवांत एक इंग्रजी शाळा व दवाखाना सुरू केला. शैक्षणिक क्षेत्रांतीलहि यांची कामगिरी महनीय अशीच आहे. जुन्या पाठशालांच्या पद्धतींत फरक करून त्यांत नवीन शिक्षणपद्धति सुरू केली. स्त्रीशिक्षणासाठीं मुलींच्या शाळा सुरू केल्या. यांनीं 'वेताळपंचविशी' नांवाचें एक पुस्तक मुलांसाठीं लिहिले आहे. उपक्रमणिका, कौमुदीचे तीन भाग, शाकुन्तलाचे बंगाली भाषांतर हीं यांचीं पुस्तके आहेत. शिवाय वर्णपरिचय, कथामाला, चरितावली, वगैरे शालेय पुस्तकेहि यांनीं लिहिलीं आहेत. या पुस्तकांचे मासिक उत्पन्न कांहीं काल पांच हजार रुपयांपर्यंत होई. विधवाविवाहाच्या पवित्र कार्यास आपल्या मातापित्यांचा आशीर्वाद यांनीं घेतला होता.

—२९ जुलै १९०१

## श्रावण शु. १३ (२) सखारामबापू बोकिलांचें निधन !

शके १७०३ च्या श्रावण शु. १३ रोजीं मराठेशाहींतील अत्यंत थोर राजकारणी पुरुष सखारामबापू बोकील यांचा अंत झाला.

बाबा पुरंदरे यांच्याकडे सखारामबापू प्रथम शिलेदार होते. बाजीरावाने आपणाकडे घेऊन यांना शनवारवाड्याच्या बांधकामावर नेमलें. पुढे नानासाहेब पेशवे यांचेबरोबर उत्तरेकडील स्वाऱ्यांत हे होतेच. पानपतच्या लढाईपर्यंत अनेक राजकारणांत याचा भाग असे. अहमदाबादचा किल्ला सर करणें, रोहिल्यांचा पाडाव करून दुआब जिकणे, कुंभेरीच्या वेढ्यांत शौर्य गाजवणें, दिल्लींत मराठ्यांचे वर्चस्व स्थापित करणें, इत्यादि कामीं यांची कामगिरी मोठी आहे. नानासाहेबांनीं आपल्या मृत्युसमयीं याना मुख्य कारभारी नेमलें. माधवरावानेंहि मरतेसमयीं नारायणरावाला यांचे हातीं देऊन विश्वास व्यक्त केला. राघोबाकडे यांचा कल असूनहि नारायणरावांच्या वधानंतर जे बारभाईचे कारस्थान रचलें गेलें त्यांत हा प्रमुख होता. गरोदर असणाऱ्या गंगाबाईची व्यवस्था यांनींच लावली. आणि राघोबा, निजाम, भोसले, होळकर, शिंदे, व इंग्रज यांची व्यवस्था लावून यांनीं मराठी राज्यांत स्थैर्य निर्माण केले. पुढील राजकारणांत नाना-बापू यांचे बरेच मतभेद होऊं लागले. बापू यांनीं फितुरी केली अशा अर्थाच्या दोन चिठ्ठया राघोबाने शिंद्यांना दाखवल्या. तेव्हां बापू कैद झाले. या वेळीं निजामची मदत घेण्यास सुचविलें. तेव्हां हे उद्गारले, "अंतःकलहांत परक्यास हात घालूं दिला तर राज्यनाश होतो." सिंहगड, प्रतापगड, रायगड, अशा ठिकाणीं बापू कैदेत होते. यांच्या सुटकेचे प्रयत्न झाल्यामुळें यांना बेडी घालण्यांत आली. कैदेत यांचे फार हाल झाले. शेवटीं अतिसाराच्या विकाराने या थोर पुरुषाचा अंत झाला. यांना 'राजकारणांतील विधि', 'प्रतिसृष्टि निर्माता', 'शहाणा' अशीं विशेषणें तत्कालीन पत्रांतून लावलेली सांपडतात. "राजकारणांतील शस्त्र व अस्त्र हा चांगलेंच जाणीत असे. हा अत्यंत बुद्धिमान व हातीं येईल तें काम पार पाडणारा होता." शिवाजीच्या वेळेपासून यांच्या घराण्यातील लोकांनीं राजकारणांत प्रामुख्याने भाग घेतला होता. पंताजी गोपीनाथ हे यांच्याच वंशांतील.

— २ ऑगस्ट १७८१

## श्रावण शु. १४ खुदिराम बोस फांसावर !

शके १८३० च्या श्रावण शु. १४ रोजीं बॉंब फेकून अत्याचार करणारे बंगाल्यांतील पहिले क्रान्तिकारक खुदिराम बोस यांना फांशीं देण्यांत आलें.

या काळांत भारतांत क्रान्तिकारकांचे पर्व सुरू झाले होते. बंगाल्यांतील क्रांतिकारकांनीं बॉंबचा उपयोग करण्याचे ठरविले. आधी कांहीं दिवस चंद्रनगरच्या मेयरच्या घरांत फेंकलेला बॉंब प्राणघातक ठरलेला नव्हता. परंतु मुझफरपूर येथील डि० जज्ज सि. किंग्जफोर्ड यांच्या गाडीवर टाकण्यांत आलेला बॉंब प्राणघातक ठरला व या नव्या साधनाकडे भारतीय क्रांतिकारकांचे लक्ष गेलें. रात्रीं साडेआठच्या सुमारास हा बॉंब फेकला. यामुळे मिसेस केनेडी व त्यांची मुलगी यांची हत्या झाली. बॉंबचा स्फोट झाल्यानंतर त्याचा आवाज तीन मैलपर्यंत ऐकूं गेला. मुझफरपूरपासून चोवीस मैल अंतरावर असलेल्या खुदिराम बोस यांना अटक करण्यांत आली. या तरुणाचे वय त्या वेळीं अठरा–एकोणीस वर्षांचे होतें. बॉंबस्फोटानंतर खुदिराम रातोरात चोवीस मैलांचे अंतर तोडून गेले होते. मुझफरपूर येथील प्रकारानंतर कलकत्ता येथील माणिकतोळा बागेतील चौतीस तरुणांना अटक झाली. बारींद्रकुमार घोष, उपेंद्रनाथ बानर्जी, हेमचंद्रदास, इंदुभूषणराय चौधरी, अरविंद घोष, इत्यादि मंडळीं त्यांत होती. झडतींत एक ग्रंथालय सांपडले. ज्वालाग्राही पदार्थ तयार करणाऱ्या कृतींचीं अनेक पुस्तकें तेथें होतीं.

खुदिराम बोस यांना झालेली फांशीची शिक्षा रद्द व्हावी म्हणून अनेक प्रयत्न झाले. पण यश आले नाहीं. शेवटीं श्रावण शु. १४ रोजी हा बंगाली तरुण धैर्यानें फांसावर चढला! भारतांतील या क्रान्तीच्या घटनेमुळे सर्व जगांत खळबळ उडाली. 'लंडन टाइम्स'ने लिहिलें–"बॉंब गोळे उडतात यामुळे भिऊन जाऊन सरकार भलत्याच सवलती व भलतेच अधिकार देणार नाहीं. सरहद्दीपाशीं शत्रु येऊन भिडला, आणि अराजक माजवूं पाहणाऱ्यांनीं देशांत कट केले तरी हिंदुस्थानभर राज्य करण्याचें व हिंदुस्थानचा विकास करण्याचें महत्कार्य नेटानें पुढें चालविलें पाहिजे.—"

— ११ ऑगस्ट १९०८

**श्रावण शु. १५** **( १ ) रक्षाबंधन आणि समुद्रपूजन !**

श्रावण शु. १५ ही पावती पौर्णिमा म्हणून प्रसिद्ध आहे.

पावतें धारण करण्याच्या शास्त्रोक्त विधीस पवित्रारोपण असें नांव आहे. उत्तर हिंदुस्थानांत या विधीस 'रक्षाबंधन' म्हणात. पूर्वी नागापासून इजा होऊं नये म्हणून श्रावणी नांवाच्या नागासाठीं पाकयज्ञ केला जात असे. त्याचेच रूपांतर शत्रूच्या 'विषारी' वागणुकीचा ताप होऊं नये म्हणून 'रक्षाबंधन' विधींत झाले. शत्रूच्या गोटांत जाऊन रजपूत स्त्रिया आपल्या पतीविरुद्ध लढणाऱ्या वीर बांधवांच्या हातांत रक्षा बांधीत असत. आणि त्यामुळें युद्धप्रसंग टळतहि असत. भारतीय समाजांतील ऐक्य व प्रेमभाव वाढून युद्धकुशल लोकांमध्यें परस्परांची मैत्री वाढावी म्हणून हा रक्षाबंधनाचा विधि रजपूत लोकांत विशेषत्वाने रूढ झाला.

हा दिवस नारळी पौर्णिमा म्हणूनहि प्रसिद्ध आहे. वरुण देवतेप्रीत्यर्थ समुद्राची पूजा करून त्यास नारळ अर्पण करण्याची चाल आहे. 'परदेशगमन निषिद्ध मानणाऱ्या भोळया' भारतीयांनीं पूर्वकालांत समुद्रमार्गानें सबंध विश्वांत संचार केला होता. त्यांच्या दृष्टीने या दिवसाला फार महत्त्व आहे. पावसाळ्याचा जोर कमी झालेला असल्यामुळे सागरावरील धोका कमी झालेला असतो; तेव्हां समुद्रावर सत्ता गाजविणारी वरुण देवाची पूजा केल्यावर कोणतीच भीति उरणार नाहीं अशी समजूत दर्यावर्दी भारतीयांची होती. रामायण, बृहत्संहिता, बौद्धजातके, रत्नावली, दशकुमार अशा भिन्न प्रकारच्या वाङ्मयावरून भारतीयांचा सागरविक्रम ध्यानांत येतो. उत्तरसमुद्रप्रवास त्याज्य मानण्यांत आला होता तरी वैदिक काळीं सर्व पृथ्वी वेदीप्रमाणे पवित्र मानण्यांत येई. नौकाबंधनाचा शास्त्रशुद्ध विचार 'युक्तिकल्पतरु' ग्रंथांत दिसून येतो. नौकाबंधनांत पटाईत असणाऱ्या भारतीयांकडून इंग्रज लोकहि आपलीं जहाजे बांधवून घेत.

ब्रह्मदेश, सयाम, मलाया, बोर्निओ, सुमात्रा, जावा आणि फिलिपाइन्स बेटें इत्यादि द्वीपसमूहांत व जपान, मांचुरिया, मंगोलिया, चीन इत्यादि पूर्वदेशांतून भारतीय संस्कृतीने आपला प्रचार केला आहे. आफ्रिका व अमेरिका खंडांत भारतीयांनीं प्रवास केल्याचे दाखले सांपडतात. त्या दृष्टीने हा दिवस पूर्वपराक्रमाची आठवण देणारा आहे.



## श्रावण शु. १५ (२) भारताच्या रवीन्द्राचा अस्त!

शके १८६३ च्या श्रावण शु. १५ रोजीं भारताचे कविसम्राट रवींद्रनाथ टागोर निधन पावले. कवि, तत्त्वज्ञ, राष्ट्रीय पुढारी म्हणूनच नव्हे तर भारतीय संस्कृतीचें एकमेव प्रतीक म्हणून त्याची कीर्ति त्रिखंडांत पसरलेली होती.

सन १८७५ सालीं 'हिंदु मेळावा' नांवाच्या सभेत त्यांनीं एक स्वतःची कविता म्हटली आणि तेव्हांपासून लोक त्यांना कवि म्हणून ओळखूं लागले. त्यानंतर त्यांनीं वडिलांच्याबरोबर जगभर प्रवास केला. सन १९१२ च्या दरम्यान बंगाली भाषेंत 'गीतांजलि' प्रसिद्ध झाली होती. तिच्या इंग्रजी अवताराचे कोडकौतुक यीट्स, ब्रॅडले, शॉ, एच्. जी. वेल्स आदि पाश्चात्य पंडितानीं मुक्तकंठानें केले आणि सन १९१३ मध्ये भारतांतील या कलाकृतीस नोबेल पारितोषिक मिळालें! रवींद्रनाथ महाकवि झाले. सदैव रणकुंडांत होरपळणाऱ्या असमाधानी पाश्चात्यांना 'गीतांजली'तील मधुर भक्तिसुधा चाखून शांति आणि समाधान मिळालें. नाटकें, काव्यें, कादंबऱ्या, गोष्टी, टीकालेख, इत्यादि वाङ्मयरूपानें रवीन्द्रनाथ अमर आहेत.

पूर्वायुष्यांत टागोर यांनीं राजकारणांतहि भाग घेतला होता. वंगभंगाच्या चळवळींत स्वदेशी, बहिष्कार व राष्ट्रीय शिक्षण यांच्यावर प्रभावी कवनें करून त्यांनीं जनमनाची पकड घेतली होती. सन १९२० च्यानंतर ते म. गांधींच्या राजकारणाशीं समरस झाले. कित्येक प्रसंगीं ते गांधींचे सल्लागारहि असत.

रवीन्द्रनाथ यांची शिक्षणविषयक कामगिरी फार मोठी आहे. राष्ट्रीय शिक्षणाची दिशा विस्तृतपणें 'शांतिनिकेतन' मध्यें अमलांत आणून काव्य, गायन, नृत्य, चित्रकला यांत भारताचें वैशिष्ट्य काय आहे हें त्यांनीं साऱ्या जगाला दाखविलें.

अशा प्रकारचा हा कविसम्राट, जगन्मान्य तत्त्ववेत्ता, मोठा साधु, त्रिखंडपंडित, श्रावण शु. १५ ला दिवंगत झाला. प्रत्यक्ष भारताचा 'रवीन्द्र'च भर दुपारीं बारा वाजतां अस्त पावला.

—७ ऑगस्ट १९४१

## श्रावण व. १ (१) शहाजी राजे यांची कैद !

शके १५७० च्या श्रावण व. १ या दिवशीं शहाजी राजे यांना विजापूरच्या पातशहानें मुस्तफाखान याच्याकरवीं कैद केले.

पुण्याच्या जहागिरीवर शिवाजी आणि दादाजी कोडदेव यांना नेमून शहाजी राजे वडील पुत्र संभाजी याच्यासह बंगलोरास गेले. शिवाजी स्वराज्य-संस्थापनेची तयारी तोरणा, चाकण, पुरंदर, रोहिडा, लोहगड, राजमाची, इत्यादि किल्ले घेऊन महाराष्ट्रांत करीत असतां शहाजींनीहि कर्नाटकांत मोठा पराक्रम केला होता. शिवाजीच्या 'पुंडाव्याला' शहाजीचें आंतून सहाय्य असावें अशी भीति आदिलशाहीला वाटूं लागली. पातशाही अधिकाऱ्याचा हुकूम शहाजीस सुटला: "शिवाजी राजे याने शहासी बेमानगी करून मावळे लोकांचा जमाव केला···तूं त्यात सामील होऊन वसूल देतोस...मगरुरीचे जबाब देतोस हें योग्य नाहीं. हुकूम पोचतांच अमीनाशीं रुजूं होणे. नाहीं तर शहा तुला विजापुरीं नेऊन गर्दन मारतील."

कर्नाटकांतील लहानमोठे पाळेगार शहाजीस मिळाल्यामुळें त्याच्या सामर्थ्याचें भय आदिलशहास जास्तच वाटूं लागलें. आणि त्याने शहाजीस दग्याने कैद करविलें. शहाजीच्या वडील मुलाने (संभाजीने) मुस्तफाखानास'जर्जर करून सोडलें. अदिलशहाकडून शिवाजीवर आलेल्या मुसेखान सरदाराचा पुरंदर येथें पराभव करून शिवाजीने त्याला ठार मारले आणि तह होऊन शहाजीची सुटका झाली. असें सांगतात कीं, पातशहाच्या सल्लागारांनी त्याला सुचविले कीं, मुलाच्या अपराधाबद्दल बापास शिक्षा देणें कुराणाविरुद्ध आहे. 'बाप करी बाप पावे। बेटा करी बेटा पावे.' त्यावरून शहाजीला शिक्षा न करितां कांहीं अटींवर सोडून देण्यांत आलें. शिवरायांनीं स्वराज्य स्थापन केलें तरी त्याची पूर्वतयारी शहाजीच्या कारकीर्दीतच हळूहळू होत होती. शहाजहान बादशहाशीं अविरतपणें टक्कर देणारा शहाजी अत्यंत शूर खराच. त्याचा पराक्रम आदिलशाहीचें रक्षण करण्यासाठीं खर्ची पडलेला दिसला तरी त्या काळांत त्याखेरीज दुसरा इलाज नव्हता.

— २५ जुलै १६४८

## श्रावण व. १ (२) महात्मा गांधींचें विलायतेस प्रयाण !

शके १८५३ च्या श्रावण व. १ रोजीं महात्मा गांधी दुसऱ्या गोलमेज परिषदेसाठीं विलायतेला जाण्यासाठीं निघाले.

सन १९३० ची त्यांची प्रसिद्ध दांडी–यात्रा संपून १९३१ मध्यें लॉर्ड आयर्विन यांच्याशीं तात्पुरता तह होऊन गोलमेज परिषदेच्या द्वितीय अधिवेशनास गांधींनीं जाण्याचें ठरलें. पहिल्या परिषदेत राष्ट्रसभेनें भाग न घेतल्यामुळे 'तें रामावांचून रामायण' झाले होतें. आणि आतां या वेळीं राष्ट्रसभेचे महत्त्व सहजच वाढूं लागले. परंतु मध्येंच लॉर्ड आयर्विनच्याऐवजीं लॉर्ड विलिंग्डन हे व्हाइसरॉय म्हणून आले. आणि आयर्विन सभेटाचीं आश्वासनें मोडण्याची संधि सरकारला आयतीच सांपडली. व्हाइसरॉय–गांधी यांचे बिनसत चाललें होतें, पण शेवटीं सरकारने नमतें घेतले. अगदीं शेवटच्या क्षणाला व्हाइसरॉयनीं तारेनें गांधींना सिमल्यास बोलाविले, बरोबर वल्लभभाई, जवाहरलाल आदि मंडळी होतीच. खूप वाटाघाटी होऊन सरकारनें जादा गाडी सोडून २७ ऑगस्टला सिमल्याहून गांधींना मुंबईला पोचते केले. २९ ऑगस्टला गांधी निघाले. निरोप देण्याच्या सभारंभांत ते बोलले– "राष्ट्रसभेनें नेमून दिलेलें कार्य मी प्रामाणिकपणें बजावीन."

म. गांधींच्याबरोबर चिरंजीव देवीदास, महादेवभाई देसाई, प्यारेलाल, मीराबेन इत्यादि लोक होते. गांधींनीं अगदीं थोडे सामान बरोबर घेतले होते. पण इंग्लंडमधील थंडीमुळें महात्माजीना त्रास होऊं नये म्हणून त्यांच्या एका धनिक भक्तानें सातशें रुपयांची शाल त्यांना नकळत ट्रंकेत घातली होती! पण अपरिग्रही महात्माजींनीं, अर्धनग्न अशा त्या दरिद्री नारायणाच्या सेवकानें, "महादेव, ती शाल तावडतोब मुंबईला परत पाठीव" असा हुकूम सोडला. परंतु तसे करण्यांत अडचण असल्यानें ती शाल सात हजार रुपयांस बोटीवर विकली गेली. वाटेंत एडन पोर्टसय्यद, मार्सेलिस, पॅरिस वगैरे ठिकाणीं स्वराज्याची शिष्टाई करण्यास निघालेल्या महात्म्याचा सत्कार करण्यांत आला. इंग्लंडमध्येंहि त्यांचा मोठा आदर झाला.

— २९ ऑगस्ट १९३१

## श्रावण व. २ सुरेन्द्रनाथ बानर्जींचें निधन !

शके १८४७ च्या श्रावण व. २ रोजीं बंगालमधील सुप्रसिद्ध राजकारणी पुरुष व विख्यात वक्ते सर सुरेन्द्रनाथ बानर्जी यांचे निधन झालें.

आय्. सीः एस्. होऊन भारतांत आल्यावर सिल्हटचे मॅजिस्ट्रेट व कलेक्टर म्हणून यांची नेमणूक झाली. पुढें सरकारी अधिकाऱ्यांशीं खटका उडाला म्हणून हे नोकरींतून निवृत्त झाले. देशांतील अन्यायजनक परिस्थितीचा विचार करून त्यांनीं कलकत्ता येथील 'मेट्रोलिटन इन्स्टिटयूट'मध्ये इंग्रजीचे प्राध्यापक म्हणून काम पत्करून ते आपले विचार विद्यार्थ्यांपुढें मांडू लागले. स्टुडंट्स असोसिएशनतर्फे यांनीं एक मोठा दौरा काढला. पुण्याच्या आणि अहमदाबादच्या राष्ट्रसभेचे अध्यक्षस्थान यांनाच देण्यात आले होतें. यांची लोकप्रियता बंगालच्या फाळणीच्या वेळीं खूपच वाढली. परंतु पुढें बंगाल-मधील तरुणांची वाढती अत्याचारी कृत्यें पाहून यांना आपली भाषा नरम करावी लागली. आणि शेवटीं सन १९०७ च्या सुरत येथील कॉंग्रेसमध्ये सुरेन्द्र-नाथ टिळकविरोधी पक्षांत सामील झाले.

सन १९१९ च्या गव्हर्नमेंट ऑफ इंडिया अॅक्टच्या जॉइंट पार्लमेंटरी कमिटी-करितां चार महिने हे इंग्लंडला जाऊन आले; आणि 'असहकारितेचा झाला एवढा पुकारा पुरे झाला' असें आपले मत जाहीर केले; व स्वतः असहकाराचे मोठे विरोधी बनले. सन १९२१ मध्ये १ जानेवारीस सरकारने यांना 'सर' केले आणि स्थानिक स्वराज्य व वैद्यकीय खाते याचे हे दिवाण बनले. डब्ल्यू. सी. बानर्जी यांच्यानंतर त्यांचे 'बंगाली' साप्ताहिक यांनी ताब्यांत घेऊन ते दैनिकाच्या स्वरूपांत सतरा वर्षे चालविलें. यांचे वक्तृत्व इतके परिणामकारक व भावनामय असे कीं, एखाद्या बंडाची उठावणी किंवा उपशम करणे हा याच्या हातचा मळ असे. म्हणूनच आपल्या मित्रमंडळींत हे 'सरेंडर नॉट' (अपराजित) या नांवानें प्रसिद्ध होते. भाषेवरील प्रभुत्व, उच्च भावनांनीं नटलेले कल्पना-वैपुल्य, सुंदर भाषाशैली व मर्दानी आवेश या गुणामुळे यांच्या भाषणांचे पडसाद सर्व जगांत उमटत. लॉर्ड मिंटो यांच्या कारकीर्दीत सभा उधळून लावतांना यांना लाठीचा प्रसाद मिळाला होता.

—६ ऑगस्ट १९२५

## श्रावण व. ३ इंग्रज आणि शिंदे-भोसले !

शके १७२५ च्या श्रावण व. ३ रोजीं इंग्रज अधिकारी जनरल वेलस्ली यानें शिंदे व भोसले यांच्याविरुद्ध लढाई पुकारली.

अठराव्या शतकाच्या अखेरीस मार्क्विस ऑफ वेलस्ली हा हिंदुस्थानचा गव्हर्नर जनरल म्हणून आला तेव्हां राजकीय परिस्थिति मोठी गंभीर होती. हिंदुस्थानांत फ्रेंचांची सत्ता बळावत होतीच; परंतु युरोपमध्यें नेपोलियनचा उदय झाल्यामुळें इंग्रजांना फार धास्ती वाटत होती. इंग्रजांच्या विरुद्ध टिपूनें सर्व मुसलमानांचा एक संघ निर्माण केला होता. आणि मराठ्यांच्यामध्येंहि अशीच एकजूट निर्माण झालेली होती. पेशवे, शिंदे, गायकवाड, भोसले, वगैरे अनेकांच्या मदतीने 'मराठा कॉन्फीडरसी' निर्माण झाली होती. या बिकट परिस्थितींतून धूर्त इंग्रजांनीं वाट काढली आणि या सर्वांवर विजय मिळविला. निजाम आणि मराठे यांच्या साह्याने इंग्रजांनीं टिपूचा पराभव केला आणि त्याचें श्रीरंगपट्टणचे राज्य काबीज केले, आणि त्यानंतर कांहीं कुरापत काढून निजामासहि हतवीर्य करून त्याच्याजवळील फ्रेंच सैन्य घालवून दिले. व आपली तैनाती फौज ठेवून दिली. आणि आतां इंग्रजांचें सारें लक्ष 'मराठा कॅान्फिडरसी' कडे लागले. मराठी राज्याचे दुर्दैव याच वेळीं आपली संधि साधीत होते. यशवंतराव होळकरांच्या भीतीनें बाजीराव सिंहगडाहून महाडास आणि तेथून वसईस गेला. आणि त्याने इंग्रजाशीं शाजिरवाणा तह केला! बाजीराव इंग्रजी कृपेमुळें परत गादीवर येणार होता. त्याच्या पदरीं इंग्रजी तैनाती फौज राहणार होती, त्यामुळे बाजीराव इंग्रजांच्या हातचें बाहुलें बनला. या वेळीं पुण्याच्या दरबारी महादजींचे दत्तक-पुत्र दौलतराव शिंदे यांचें वर्चस्व होतें. त्यांच्या पदरीं फ्रेंच फौज चांगलीच तयार झालेली होती. तेव्हां आतां शिंद्यांकडे लक्ष देणें इंग्रजांचें कर्तव्य होतें. सर्वत्र फंदफितुरी करून इंग्रजांनीं मोठींच कृष्णकारस्थानें रचलीं. त्यांनीं बाजीरावास गादीवर बसविलें. आणि दौलतराव शिंदे यांचे अजिंक्य लष्कर आणि जय्यत तोफा यांचा नाश करण्यास ते प्रवृत्त झाले. त्याप्रमाणें जनरल वेलस्ली यानें श्रावण व. ३ रोजीं लढाई पुकारली.

— ६ ऑगस्ट १८०३

## श्रावण व. ४ पार्वतीबाईचें निधन!

शके १७०५ च्या श्रावण व. ४ या दिवशीं पानिपतच्या संग्रामात धारातीर्थी पडलेले सदाशिवरावभाऊ पेशवे यांच्या पत्नी पार्वतीबाई निधन पावल्या.

पार्वतीबाई पेशवे यांनीं आपल्या पवित्र पतिप्रेमाने आपल्या घराण्याचे नांव उज्ज्वल केले आहे. या अति सरळ आणि सुस्वभावी होत्या. सवाई माधवरावाच्या बालपणांत त्यांची काळजी यांनींच उत्तम प्रकारे घेतली होती. त्यांच्या मृत्यूनंतर महादजी शिंदे उद्गार काढतात: "मातोश्री होती तोंपर्यंत श्रीमंत राजश्री रावसाहेब यांजविषयीं, घरांतील बंदोबस्ताविषयीं खातरजमा होती. सांप्रत बंदोबस्त खातरजमेचे कोणी दिसत नाहीं."

पार्वतीबाईचें उत्तरायुष्य करुणास्पद प्रसंगांनीं भरून गेलें आहे. पानिपतच्या युद्धांत सदाशिवरावभाऊ मरण पावल्यानंतर कांहीं वर्षांनीं एक कनोजा ब्राह्मण मीच 'भाऊसाहेब' म्हणून पुढे आला! माधवराव पेशव्यांनीं केलेल्या चौकशींत तो खोटा ठरला. त्यास दौलताबादेच्या किल्ल्यांत कैदेमध्यें ठेविलें. त्यानंतर त्याची रवानगी रत्नागिरीस झाली. सदर इसम 'तोतया' ठरला असूनहि हजारों माणसे त्याच्या भजनीं लागलीं. आणि खेदाची गोष्ट ही कीं, खुद्द पार्वतीबाई यांना या बैरागी तोतयाविषयीं ते भाऊसाहेबच असतील अशी शंका वाटे. आणि या आधारावर त्या सौभाग्यचिन्हें धारण करीत! "हे, अशीं बैरागीपणाचीं सोंगे घेऊन हिंडतात. काय करावे! नाना लक्ष देत नाहींत, चार दिवस मजवर दृष्ट देऊन येथेंच ठेवणें व आपली परलोकास जावयाची वाट झाली पाहिजे.–" अशी एकसारखी विवंचना क्षयाने आजारी झालेल्या या साध्वी बाईंना लागलेली होती. पण या दुःखी अबलेच्या यातनांची पर्वा निष्ठुर राजनीतीनें ठेविली नाहीं. शके १६९८ मध्यें तोतयाचा निकाल लावल्यानंतर थोड्याच अवधींत ही अभागी स्त्री मरण पावली. यांचे करुणरम्य चित्रण कै. तात्यासाहेब केळकर यांनीं 'तोतयाच्या बंडां'त कुशलतेनें रेखाटले आहे. भाऊसाहेब कधीं तरी परत येतील, किंवा कारभाऱ्यांनीं त्यांनाच कैदेत ठेविलें आहे, अशा समजुतीनें देवाला सांकडें घालणाऱ्या या एकनिष्ठ पतिव्रतेची मूर्ति मराठ्यांच्या इतिहासांत एकमेव अशीच आहे.

—१६ ऑगस्ट १७८३

## श्रावण व. ५ दिल्लीच्या तख्तावर घण !

शके १६८२ च्या श्रावण व. ५ या दिवशीं सदाशिवराव भाऊ यांनीं दिल्ली जिंकली !

अहमदशहा अब्दाली यास नजीबखान व सुजा उद्दौला मिळाले आणि यमुनेच्या तीरावर जें युद्ध झाले त्यांत दत्ताजी शिंदे पडले. ही बातमी दक्षिणेंत येतांच बळवंतराव मेहेंदळे, समशेरबहादुर, दमाजी गायकवाड, इत्यादींना बरोबर घेऊन सदाशिवरावभाऊ दिल्लीच्या रोखानें निघाले. आणि श्रावण व. ५ रोजीं त्यांनीं दिल्ली जिंकली. दिल्ली हस्तगत झाल्यावर सदाशिवरावभाऊंना फारच आनंद झाला. मराठ्यांच्या वैभवाची आणि पराक्रमाची साक्ष अब्दालीस पटली ! श्रीवर्धनच्या एका पोरानें भगवा झेंडा पांचशें वर्षांच्या मुसलमानी राजधानीवर रोविला !

......आणि थोड्याच अवधीत भाऊसाहेबांनीं दिल्लीच्या राजतख्तावर घण घातला ! या भव्य, प्रचंड, आणि अद्‌भुत घटनेनें सर्वांचे डोळे दिपून गेले. भाऊंच्या या कृत्यावर आक्षेप घेणारांना कै. शिवरामपंत पराजपे यांनीं उत्तर दिलें आहे. या घटनेतील 'राजकीय अर्थ' त्यांनीं स्पष्ट केला आहे. ते लिहितात : "बंगाल, बिहार, ओरिसा, लाहोर, अयोध्या, गुजराथ, वऱ्हाड, विजापूर, गोवळकोंडा आणि दौलताबाद या सर्व ठिकाणच्या हिंदु प्रजेला जखडून टाकण्यासाठीं गुलामगिरीच्या शृंखला येथेच घडविल्या जात होत्या. अखंड भारतांतील लोकांच्या अंतःकरणाला चावून चावून रात्रीं झोप येऊं न देणारे, साप आणि विंचू याच वारुळांतून बाहेर पडत होते ! असें हें तख्त म्हणजे मोंगलाई सत्तेची मूर्तिमंत प्रतिमा होती ! तिच्यावर आघात करून भाऊसाहेबांनीं महम्मद गिझनी, तैमूरलंग, नादिरशहा, अब्दाली,...... अशी वाढत जाणारी माळ तोडून टाकली, आणि दिल्लीचें तख्त नव्हे तर हिंदुस्थानच्या गुलामगिरीचें डोकेंच फोडून टाकले !–" भाऊसाहेब पेशवे यांनीं केलेला हा पराक्रम त्यांच्या चरित्रांत अत्यंत अद्‌भुत असाच आहे. त्यांच्या या कृत्यानें सर्वत्र दरारा बसून मराठ्यांचे नांव उत्तरेंत दुमदुमूं लागलें.

— १ ऑगस्ट १७६०

## श्रावण व. ६ प्रामाणिकपणाची चूक !

शके १८४७ च्या श्रावण व. ६ रोजीं प्रसिद्ध 'काकोरी' प्रकरणांतलि क्रांतिकारकांनीं लखनौजवळील काकोरी स्टेशनावर एक आगगाडी लुटली.

काकोरी कटाचे सूत्रधार शचींद्रनाथ संन्याल व योगेशचंद्र चतर्जी हे होते. शचींद्र संन्याल हे पूर्वी क्रांतिकारकांच्या खटल्याबद्दलच भीषण शिक्षा भोगून आलेले होते. त्यांना झालेली आजन्म काळ्या पाण्याची शिक्षा लाहोरच्या कटाचे वेळीं झाली होती. सन १९२० च्या सावत्रिक सुटकेमुळें त्यांचीहि सुटका झाली. आणि त्यानंतर त्यानीं पं. रामप्रसाद बिस्मल यांच्या साह्यानें 'हिदुस्थान रिपब्लिक संस्था' स्थापन केली; आणि हिच्या तर्फेच काकोरी कटाची निर्मिति झाली. पुनः त्यांनीं शस्त्रें जमवून दहाबारा राजकीय दरवडे घालून सरकारास हालवून सोडिलें. आणि सरकारी आगगाड्या थोपवून खजिने लुटले. कारण त्यांना सशस्त्र क्रांतीवांचून दुसरा उपाय सुचत नव्हता. चालत्या गाडीसच रोखून धरून त्यांनीं हल्ला केला. प्रवाशांना त्यांनीं कळविलें कीं, आम्ही फक्त खजिना लुटणार आहोंत, तुम्ही निर्भय असा. एकदोन प्रवासी विरोध करूं लागले, त्यांना मात्र गोळ्या खाव्या लागल्या. पुढें लौकरच खटल्यास सुरुवात झाली. अशाकाफउल्ला खां, चंद्रशेखर आझाद, मन्मथनाथ गुप्ता, इत्यादि चाळीस तरुण खटल्यांत होते. शेंकडों साक्षी होऊन न्यायाधीशाने सांगितले: "सशस्त्र क्रांति करून हिदुस्थानांत स्वातंत्र्य स्थापिण्याचा 'कट' आरोपींनीं केला. त्यासाठीं सरकारी अधिकाऱ्यांवर हल्ले केले, खजिने लुटले, स्फोटक साहित्य जमविले, दरवडे घातले." निर्णयांत राजेंद्रनाथ लाहिरी, रामप्रसादजी आणि रौशनसिंग यांना फांशीची शिक्षा सांगण्यांत आली. शचींद्र संन्यालांना जन्मठेप काळे पाणी, मन्मथनाथ गुप्तांना चौदा वर्षें, खत्री, खन्ना, इत्यादींना दहा दहा वर्षे अशा भयंकर शिक्षा ठोठावून न्यायमूर्ति म्हणाले, "ज्या मार्गानें तुम्ही स्वातंत्र्य संपादन करूं इच्छीत होतां तो मार्ग चुकला होता. पण ती चुकी प्रामाणिकपणाची होती. तुमच्या तत्त्वांनुसार तुम्ही प्रामाणिकपणें झुंजलांत. मी स्पष्टपणें सांगतों कीं, या सर्व खटाटोपांत स्वार्थाचा लवलेशहि तुम्हांस शिवला नव्हता. तुम्हीं जें जें केलेंत तें तें स्वदेशासाठींच केलेत."

—९ ऑगस्ट १९२५

## श्रावण व. ७ , ( १ ) श्रीकृष्णाचा जन्मदिवस !

श्रावण व. ७ हा दिवस कृष्णजयंतीचा म्हणून सर्व भरतखंडांत साजरा होत असतो.

श्रीकृष्णाच्या सर्व जीविताप्रमाणें त्याच्या जन्माची हकीकतहि अलौकिक अशी आहे. मथुरेचा वसुदेव व त्याची पत्नी देवकी हे कंसाच्या कारावासांत दिवस काढीत होते. शूरसेन राजा कंस हा देवकीचा बंधु. परंतु याच देवकीच्या मुलाकडून कंसाचा वध होणार या नारदाच्या भविष्यामुळें कंस भयभीत झाला. देवकीचीं सहा अपत्यें एकामागून एक अशीं त्यानें नाहींशीं केलीं. देवकी आठव्या खेपेस गर्भवती असतांना श्रावण महिन्यांत वद्य सप्तमीस प्रसूत झाली. या मुलास तरी वांचवावें म्हणून वसुदेवाने खटपट केली. बाहेर सोसाट्याचा पाऊस पडत असला तरी वसुदेव नूतन बालकाला घेऊन गाढ झोपेत असलेल्या पहारेकऱ्यांना चुकवून कैदेमधून बाहेर पडला. यमुना नदी ओलांडून तो गोकुळांत नंदाच्या घरीं आल्यावर तेथें त्यानें बालकास ठेविले. आणि नंदाच्या मुलीस घेऊन तो परत कारागृहीं आला. इकडे नंदगृहीं यशोदादेवीला पुत्र झाला म्हणून आनंदीआनंद झाला —!

भारतीय सस्कृतींत कृष्णचरित्राचा महिमा मोठा आहे. दुर्जनांचा नाश, साधूंचें संरक्षण आणि धर्माची संस्थापना हें कृष्णचरित्राचें सार आहे. गलितधैर्य अर्जुनाला युद्धास प्रवृत्त करण्यासाठीं — 'धर्म्याद्धि युद्धाच्छ्रेयोऽन्यत्क्षत्रियस्य न विद्यते, धर्मोचित युद्धाखेरीज क्षत्रियास श्रेयस्कर असे कांहीं नाहीं.—' असा उपदेश श्रीकृष्णांनीं केला आहे. आणि स्वतः कंस, जरासंध, नरकासुर, शिशुपाल, इत्यादि दुष्ट राजांचा वध करून कृष्णांनीं जनतेला सुखी केले. कृष्णाच्या वेळीं भारतीय धर्मास ग्लानि येत होती; त्या दृष्टीने श्रीकृष्णाचें धर्मस्थापनेचे कार्य विशेष महत्त्वाचें आहे. श्रीकृष्णासंबंधींच्या अद्भुत गोष्टी आणि विकृत कल्पना पुराणकालांत रूढ झाल्या तरी ऐतिहासिक दृष्टीने पाहतां हेंच स्पष्ट होतें कीं— " कृष्ण हा मनुष्याप्रमाणें जन्मला, वाढला, जगला व निवर्तला. परंतु त्याच्या हस्तें घडलेल्या महान् कार्यावरून त्याला देवत्व प्राप्त झालें— "

● ● ●

## श्रावण व. ७ (२) काकासाहेब खाडिलकरांचें निधन !

शके १८७० च्या श्रावण व. ७ रोजीं सुप्रसिद्ध नाटककार, 'नवाकाळ' दैनिकाचे संस्थापक व माजी संपादक, लो० टिळकांचे सहकारी श्री. कृष्णाजी प्रभाकर ऊर्फ काकासाहेब खाडिलकर यांचे निधन झालें.

काकासाहेबांचा जन्म शके १७९४ मध्यें सांगली येथे झाला. पुणें येथील फर्ग्युसन व डेक्कन कॉलेजांतील शिक्षण संपल्यानंतर काकासाहेब देशभक्तीनें प्रेरित होऊन टिळकांच्या सूचनेवरून 'केसरी' संस्थेंत उपसंपादक म्हणून काम पाहूं लागले. लोकमान्यांच्या सांगण्यावरून खाडिलकर नेपाळमध्ये गेले. आणि तेथें 'कौलांचा कारखाना' काढून गुप्त राजकारण त्यांनीं रंगविलें. तेथून आल्यानंतर 'केसरीं'तच प्रामुख्यानें ते काम पाहूं लागले. सन १८९७ च्या टिळकांना झालेल्या पहिल्या शिक्षेच्या वेळीं आणि सन १९०८ मध्यें लोकमान्यांना झालेल्या काळया पाण्याच्या शिक्षेच्या वेळीं कृष्णाजीपंत खाडिलकरच मुख्य संपादक होते. पुढें टिळकांच्या मृत्यूनंतर सन १९२१ मध्यें त्यांनीं मुंबईला 'लोकमान्य' दैनिकांत काम करण्यास सुरुवात केली. सन १९२३ मध्यें त्यांनीं आपलें स्वतःचें असे 'नवाकाळ' दैनिक काढलें. तेंहि थोड्याच अवधींत लोकप्रिय झालें. या पत्रांतील राजकीय लेखांमुळें खाडिलकरांना सन १९२९ सालीं एक वर्षाचा शिक्षाहि भोगावी लागली. परंतु पुढें दोनतीन वर्षांत पत्राला स्थैर्य प्राप्त होतांच हे निवृत्तीच्या मार्गाला लागले. सांगली येथें दत्तमंदिर बांधून तत्त्वज्ञान व धर्म या विषयांत ते रंगून गेले.

याखेरीज खाडिलकरांचीं मराठी नाटकें वैशिष्ट्यपूर्ण आहेत. 'कीचकवध', 'भाऊबंदकी', 'मानापमान', 'विद्याहरण', 'द्रौपदी', 'स्वयंवर', इत्यादि त्यांचीं नाटकें एके काळीं रंगभूमीवर चांगलींच गाजलेलीं होतीं. पौराणिक नाट्यकथेंतून प्रचलित राजकारणाचें रेखाटन अत्यंत प्रभावीपणानें खाडिलकरांची लेखणी करीत असे. काकासाहेबांना दोन वेळां नाट्यसंमेलनाच्या अध्यक्षपदाचा मान मिळालेला असून सन १९३३ मध्यें नागपूर येथील महाराष्ट्र साहित्य संमेलनाचे ते अध्यक्षहि झाले होते.

— २७ ऑगस्ट १९४८

## श्रावण व. ८ श्रीज्ञानदेवांचा जन्मदिवस !

शके ११९७ मध्यें श्रावण व. ८ ला मध्यरात्रीं मराठी भाषेंतील श्रेष्ठ तत्त्वज्ञ आणि प्रतिभासंपन्न कवि संत श्रीज्ञानेश्वर यांचा जन्म झाला.

हा दिवस कृष्णाष्टमी म्हणून प्रसिद्ध आहे. आणि ज्ञानदेवांना कृष्णाचा अवतार मानण्याची प्रथा आहे. 'महाविष्णूचा अवतार। सखा माझा ज्ञानेश्वर' अशा प्रकारचा गौरव बहुतेक संतांनीं केला आहे. धर्मसंस्थापनेचें कार्य श्रीकृष्णांनीं केलें; अर्जुनाला युद्धासाठीं प्रोत्साहन दिलें. परंतु हें सारें तत्त्वज्ञान संस्कृतांतच असल्यामुळें सर्व समाजाला त्याचा लाभ झालेला नव्हता. तो व्हावा म्हणूनच कीं काय श्रीकृष्णांनीं आपल्याच जन्मादिवशीं जणुं 'ज्ञानदेवां'चा अवतार घेतला. आणि श्रीकृष्णाचे तत्त्वज्ञान लोकभाषेत सांगून, "म्हणोनि यालागीं पाहीं। तुम्हां क्षत्रियां आणीक कांहीं। संग्रामावांचूनि नाहीं। उचित जाणे॥" असा उपदेश तत्कालीन जनतेला ज्ञानदेवांनीं केला.

श्रीकृष्णजन्माप्रमाणेंच ज्ञानदेवांची जन्मकथाहि अलौकिक आहे. ज्ञानदेवांच्या घराण्यांत विठ्ठलभक्ति जरी होती तरी गुरूपदेश मात्र नाथसंप्रदायांतील होता. विठ्ठलपंत हे ज्ञानदेवांचे वडील. ते 'वैराग्य डोळस मूर्तिमंत' असे होते. काशीस जाऊन त्यांनीं संन्यास घेतला, परंतु पुन्हा —

'स्वदेशा जाउनी करावा आश्रम। सुखरूप स्वधर्म चालवावा।' या गुरूच्या आज्ञेवरून ते पुनः गृहस्थाश्रमांत आले. आणि या 'संन्याशा'ला निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान, मुक्ताबाई अशीं दोन दोन वर्षांच्या अंतरानें चार मुलें झालीं. अर्थातच तत्कालीन समाजाने त्यांचा छळ केला. देहान्त प्रायश्चित्तासाठीं ज्ञानदेवांचे आई-वडील महास्वर्गस्थपंथाला निघून गेले आणि इकडे या चार पोरक्या पोरांनीं साऱ्या जगाला आपल्या दिव्य सामर्थ्यानें थक्क करून सोडलें.

ज्ञानदेवांच्या पूर्वीपासून भागवतधर्म प्रचलित होता. पण त्या धर्माला तत्त्वज्ञानाच्या बैठकीची जोड देऊन भागवतधर्मीयांची संघटना बनविणें हेच ज्ञानदेवांचें लोकोत्तर कार्य होतें. वेदांचा अर्थ स्त्रीशूद्रादिकांना सुलभ करून त्यांनीं एक प्रकारची क्रान्ति केली. त्यांचा अद्वितीय ग्रंथ 'ज्ञानेश्वरी' आजहि आपल्या तत्त्वज्ञानानें व काव्यसंपदेनें तळपत आहे.

— १६ ऑगस्ट १२७५

## श्रावण व. ९ अहमदनगरचा किल्ला व इंग्रज !

शके १७२५ च्या श्रावण व. ९ रोजीं इंग्लिश लोकांनीं अहमदनगरचा किल्ला लांच देऊन घेतला.

ख्रिस्ती शकाच्या एकोणिसाव्या शतकांतील पहिल्या दशकापासूनच मराठी राज्यास उतरती कळा लागून राहिली होती. धनी बाजीराव हातांशीं आल्यावर शिंदे–होळकर आदि मराठे सरदारांचा पराभव करण्याकडे इंग्रज वळले. अहमदनगरचा किल्ला शिंदे यांच्या ताब्यांत होता. इंग्रजांची राजनीति मोठी 'धूर्त'-पणाची होती. श्रावण व. ५ रोजीं वेढ्याचें काम सुरू झाल्याबरोबर जनरल वेलस्ली यानें एक जाहिरनामा प्रसिद्ध केला कीं, शिंदे–भोसले यांच्याविरुद्ध आमचा सामना होणार आहे, प्रजेविरुद्ध नाहीं., जणुं प्रजा आणि शिंदे–भोसले वेगवेगळेच होते ! दुसऱ्याच दिवशीं वेढ्याचे काम जोरांत सुरू झाले. किल्ल्यावर शिंदे यांच्याकडील पायदळांतील कांहीं लोक होते. थोडे घोडेस्वारहि असून किल्ल्याचें रक्षण करणारे नेहमींचे अरब शिपाई होते. या सर्वांनीं किल्ला सोडण्यास नकार दिल्यावर इंग्रजांनीं अहमदनगरच्या भोंवतीं असणाऱ्या तटालाच वेढा दिला. तट आणि बुरूज उंच असल्यानें शत्रूचें कांहीं चाललें नाहीं. परंतु निकराचा प्रयत्न करून आणि मराठ्यांच्या गोळीबारास तोंड देऊन इंग्रज भिंतीवरून शहरांत तर घुसलेच. अर्थातच शहरांतील लोक किल्ल्यावर गेले. आतां किल्ल्यावर हल्ला कोठून व कसा करावा याविषयीं विचार सुरू झाला. किल्ल्याच्या भिंती मजबूत होत्या. परंतु इंग्रजांजवळील तोफखाना त्या भिंतींना सहज पाडून टाकणारा होता. त्याचाहि फारसा उपयोग होईना. तेव्हां वेलस्ली यानें एक युक्ति योजिली. या युक्तीचा फायदा दुर्दैवानें इंग्रजांना अनेक वेळां मिळाला होता. अहमदनगरच्या मजबूत किल्ल्यावर यश मिळणार नाहीं असें पाहतांच जवळ असणाऱ्या भिंगारगांवच्या देशमुखाला इंग्रजांनीं वश करून घेतलें; आणि त्याला चार हजार रुपये लांच देऊं केली. त्याबरोबर हल्ला कोठें करावा याचें ज्ञान इंग्रजांना मिळालें. झाले. श्रावण व. ९ रोजीं सहजासहजीं नगरचा किल्ला शत्रूच्या हातांत पडला.

—११ ऑगस्ट १८०३

## श्रावण व. १० खंडोजी भोसले यांचें निधन !

शके १७११ च्या श्रावण व. १० रोजीं नागपूरकर मुधोजी भोसल्यांचे चिरंजीव खंडोजी उर्फ चिमणाजी भोसले याचें निधन झालें.

पेशवे यांच्या लष्कराबरोबर बदामीच्या स्वारीस हे गेले असतां तेथे यांनीं खूपच शौर्य गाजविलें. पहिल्या इंग्रज-मराठे युद्धांत पेशवे, निजाम व हैदर यांना मुधोजी मिळाला. आणि त्यानें दसऱ्याच्या मुहूर्तावर चाळीस हजार फौजेनिशीं खंडोजींस बिहार प्रांतावर पाठवून दिले. पण यांचे हातून ही कामगिरी नीट पार पडली नाहीं. हेस्टिंग्जनें बंगालमधून क. बेळी नांवाच्या सरदारास ससैन्य कटकहून मद्रासला पाठवलें, त्या वेळीं त्याला यांनींच मदत केली.

निव्वळ लढाऊ वीर म्हणून यांची ख्याति आहे. हे अतिशय धीट व शूर होते. "हे शरिरानें धिप्पाड असून त्या वेळीं यांच्याइतका सशक्त मनुष्य क्वचितच असेल. हे अत्यंत धाडसी व पराक्रमी होते. हे सशक्त व ऐन पचविशीच्या वयांत असल्यामुळें व आजारी नसतांना एकदम मरण पावल्यामुळें रघूजीने यांस जादूनें मारलें असा लोकप्रवाद त्या वेळीं उठला होता. हे रघूजीस आपली वांटणी मागत असत. त्यामुळे उभयतांचें मन शुद्ध नव्हते. यावरून रघूजी व त्याचा विश्वासू कारभारी महादजी लष्करी यांनीं मूठ मारून मारिले अशी बातमी उठली."

खंडोजींस रघूजीनें २१-४-१७७९ रोजीं दारव्हे, गिरोली महागांव, खडी, धामणी, माहूर भाम, वगैरे परगणे खाजगीचे सरंजाम दिले होते. १७६४ मध्यें जानोजीनें चिमणाजी बापूस ओरिसा प्रांताचे सुभेदार म्हणून पाठवलें, यांचेबरोबर भवानी काळू हाहि होता. खंडोजी भोसले यांनीं शिवभटाचा मोड करून त्याला प्रांतांतून हांकून दिलें. मुधोजीचा भाऊ बिबाजी यास पुत्र नसल्यामुळें त्यानें चिमणाजी बापूसच आपला पुत्र मानले होतें; व आपलें ठाणे रतनपूर येथील कारभार खंडोजीनें पाहावा असें ठरले होतें. बिबाजीची बायको आनंदीबाई ही वारल्यावर यांनींच त्या सुभ्याचा कारभार पाहिला; परंतु यांचें वास्तव्य रतनपुरास मात्र नसे.

— १६ ऑगस्ट १७८९

## श्रावण व. ११ — विठ्ठल शिवदेव यांचें निधन !

शके १६८९ च्या श्रावण व. ११ रोजीं पेशवाईतील पराक्रमी वीर विठ्ठल शिवदव विंचूरकर यांचे निधन झालें.

हे सासवडचे वतनदार असून यांचें उपनांव दाणी असें होतें. दाणी कुटुंबाच्या दोन शाखा झाल्या. थोरली शाखा मालेगांवास राजेबहादूर या नांवानें उदयास आली आणि धाकटीचा मूळपुरुष विठ्ठल शिवदेव याचे वंशाला विंचूरकर असे नामाभिधान प्राप्त झालें. शिवाजीपंत दाणी यांना शके १६८७ मध्ये जो मुलगा झाला त्याचेंच नांव विठ्ठल शिवदेव. लहानपणीं हे फार हूड असून त्यांना घोड्यावर बसण्याचा मोठाच शोक होता. बालपणींच्या उनाड वृत्तीस कंटाळून यांच्या वडिलांनीं यांना घरांतून हांकून दिल्यावर हे साताऱ्याजवळील मर्ढे गांवच्या अमृतस्वामींच्या सेवेत जाऊन राहिले. येथेंच शाहूमहाराजांच्या बक्षीशीं यांचा परिचय झाला आणि याना पागेन नोकरी मिळाली. शाहूमहाराज एकदां डुकराची शिकार करीत असतां विठ्ठल शिवदेवांनीं पळून जाणारा डुकर हातांनीं धरून आणिला. शाहूमहाराज प्रसन्न झाले. त्यांनीं यांना पागेंत दहा स्वारांची मनसबी दिली. सन १७२० मध्यें चिमाजीअप्पानें हबशांवर स्वारी केलीं तींत त्यांनीं मोठाच पराक्रम केला. सिद्दी साताचे घोडे पकडून आणून आपले शौर्य दाखविल्यावर शाहूनें यांना पेशव्यांच्या हाताखालीं नेमले. पुढे बाजीरावाबरोबर हे अनेक वेळां स्वाऱ्यांवर गेले होते. आपल्या हुकमतीखालीं फौज जमा करून दयाबहादूर व बंगश यांवरील स्वारींत मोठाच पराक्रम केला.

नृसिंह हें यांचें कुलदैवत होय; निरानरसिंगपूरचें मंदिर यांनींच बांधलें. सन १७३९ मधील वसईच्या मोहिमेंतहि विठ्ठल शिवदेवांनीं चांगलाच पराक्रम केला. सन १७४० च्या नासिरजंगावरील स्वारींत जी जहागिरी बाजीरावास प्राप्त झाली तिची वहिवाट त्याने विठ्ठल शिवदेवांस दिली. शेवटीं कर्नाटकांत हैदर नायकाशीं मराठ्यांचें जेव्हां युद्ध सुरू झालें तेव्हां विठ्ठल शिवदेव सावनूरचे बाजूस राहून हैदरची कुमक अडवीत होते. याहि लढाईंत दिसून आलेली सत्तर वर्षांच्या या वृद्ध शूराची तडफ व कामगिरी तरुणांसहि लाजविणारी आहे.

— २० ऑगस्ट १७६७

**श्रावण व. १२** **( १ ) " सेना बैसे समाधीसी ! "**

शके ११७० च्या सुमारास श्रावण व. १२ या दिवशीं प्रसिद्ध भगवद्भक्त सेना न्हावी यांनीं समाधि घेतली.

बाराव्या-तेराव्या शतकांत दरएक जातींत संत निर्माण होऊन परमार्थाच्या प्रांतांत जणुं लोकशाहीचें युग सुरू झालें होतें. ज्ञानदेवांच्यानंतर जरी सेना न्हावी यांचा काळ आहे तरी त्यांच्या अभंगांत ज्ञानेश्वरकालीन तत्त्वांचीच छाप विशेषें-करून आहे. सर्व अभंग साधे, प्रेमळ व रसाळ आहेत. नाभाजींनें भक्तमाला ग्रंथांत यांचें चरित्र दिलें आहे. कोणा एका राजाची स्मश्रु करीत असतांना कांहीं चमत्कार होऊन राजास पश्चात्ताप झाला, आणि त्याचे सर्व लक्ष भगवंताकडे वळलें.

करितां नित्यनेम । रायें बोलाविलें जाणा ॥ १ ॥
पांडुरंगें कृपा केली । राया उपरती झाली ॥ २ ॥
मुख पाहातां दर्पणीं । आंत दिसे चक्रपाणी ॥ ३ ॥
कैसी झाली नवलपरी । वाटीमाजी दिसे हरि ॥ ४ ॥
रखुमादेवीवर । सेना म्हणे मी पामर ॥ ५ ॥

सेनामहाराजांच्या घरांत विठ्ठलभक्ति परंपरेपासूनच आलेली होती. उच्चनीच-पणा धंद्यावर अवलंबून नसतो, तर कोणाहि व्यक्तीचे मन पवित्र झालें की तीस मोठेपणा प्राप्त होतो. आणि मनास येणारी पवित्रता परमेश्वराच्या चिंतनाने प्राप्त होते, असें सेनाच्या जीविताचें मर्म होतें. ' आम्ही वारीक वारीक । करूं हजामत बारीक ॥ ' हा यांचा रूपकात्मक अभंग प्रसिद्ध आहे. कृष्णभक्ति व संतप्रीति या दोन भावनांनीं यांची अभंगवाणी नटलेली आहे. यांनीं कळकळीनें सांगितले कीं, लोकांचा उद्धार आणि परोपकार हींच ध्येये संतांनीं आपल्या नजरेसमोर ठेवावींत. स्वजातीयांनाहि ' प्रतिपाळावें धर्मासी । व्यवहारासी न सांडावें ॥ ' असा उपदेश सेनामहाराजांनीं केला आहे. आपल्या समाधीविषयीं हे म्हणतात : ' श्रावण वद्य द्वादशीं । सेना बैसे समाधीसी ॥ " मोरोपंत कवींनीं यांच्याविषयीं म्हटलें आहे :

" जो भक्तिसरित्पूरीं षडरींची सर्व वाहवी सेना ।
रुचला मनास बहुताचि तो भगवद्भक्त नाहवी सेना ॥ "

— सन १४४८

## श्रावण व. १२ ( २ ) शिवरायांची आग्र्याहून सुटका !

शके १५८८ च्या श्रावण व. १२ रोजीं औरंगजेबाच्या आग्र्याच्या कैदेंतून श्रीशिवाजीमहाराज यांनीं सुटका करवून घेतली.

बादशहाच्या कपटी कैदेतून सुटका होण्यासाठी सर्व उपाय थकल्यावर श्रीशिवरायांनीं एका अद्‌भुत प्रयोगास सुरुवात केली. त्यांनीं आपले वर्तन साफ बदललें. ‘ बादशहा सांगतील तसें आपण वागूं ’ असे ते बोलू लागले. आपल्याबरोबरच्या मंडळींना बादशहाच्याच परवानगीने त्यांनीं दक्षिणेंत पाठवून दिलें. आणि आपण आजारी झाल्याची बतावणी सुरू केली. “ औषधांच्या व अनुष्ठानशांति वगैरेच्या निमित्तानें दररोज सायंकाळीं त्यांनीं ब्राह्मणांस व बैराग्यांस वांटण्याकरतां मिठाई पाठवण्याचा प्रघात सुरू केला. पाहिल्यापाहिल्यानें पहारेकरी कसून तपासणी करीत. पण पुढें ही नित्याचीच गोष्ट झाल्यावर त्याची फिकीर कोण करतो ? श्रावण व. १२ रोजीं शिवाजीच्या नोकरानें पहारेकऱ्यांना कळविलें : “ आज महाराजांस चिलकूल बरे वाटत नाहीं. गडबड करूं नका.–” मदारी मेहेत, हिरोजी फर्जंद हे विश्वासू इसम सेवाशुश्रूषा करीत होते. संध्याकाळीं हिरोजी फर्जंद शिवाजीच्या बिछान्यावर निजून राहिला. सोन्याचें कडे असलेला हात त्यानें पांघरुणाबाहेर ठेवला ; व शिवाजी आणि संभाजी कावडीच्या दोन टोपल्यांत बसले. कोणाहि पहारेकऱ्यास संशय आला नाहीं ; त्यांच्या कावडीबरोबर इतर कित्येक मिठाईच्या कावडी मागेपुढे होत्या. शहराबाहेर एकांतस्थलीं शिवाजीची कावड येऊन पोंचली. शिवाजी व संभाजी हे दोघे चालत चालतच सहा मैल दूर असणाऱ्या गांवास आले. तेथील रानांत निराजी रावजी, दत्ताजी त्रिंबक, रघुमित्र, आदि मंडळी घोडे सज्ज करून तयार होती ; चटकन् स्वार होऊन शिवाजी व संभाजी यांनीं उत्तरेकडे मथुरेस प्रयाण केलें.

दुसऱ्या दिवशी पहारेकऱ्यांनीं पांघरुणाबाहेरचा हात पाहिला ; नोकर पाय चेपताना दिसला ; त्यांना वाटलें, शिवाजी बीमार आहे. हिरोजी व नोकर या दोघांनीं पहारेकऱ्यांना सांगितले, “ महाराज झोंपले आहेत ; आम्ही बाहेरून येतों–” आणि तेहि निसटले. बराच वेळ झाला, कांहीं सामसूम दिसेना तेव्हां पहारेवाले आंत येऊन पाहतात तो काय, आंत कोणीच नाहीं !

— १७ ऑगस्ट १६६६

## श्रावण व. १३ (१) प्रतापसिंह भोसल्यांचें दुर्दैव !

शके १७६१ च्या श्रावण व. १३ रोजीं मराठ्यांचे शेवटचे छत्रपति प्रतापसिंह भोसले यांना मुंबईचा गव्हर्नर कॉर्नॅक यानें साताराच्या गादीवरून पदच्युत केलें.

इंग्रजांशीं बेइमानपणा केल्याचा आरोप प्रतापसिंहांवर होता, तरीहि इंग्रज 'दया' दाखविण्यास तयार होते, पण ती नाकारून प्रतापसिंहांनीं तहनाम्यावर सही केली नाहीं. अर्थात् त्याचा परिणाम अत्यंत विपरीत असाच झाला. इंग्रजांनीं मराठ्यांच्या या छत्रपतीला विश्वासघाताने कैद केलें. ही सर्व हकीगत मोठी रोमहर्षक आहे. आदल्या दिवशीं प्रतापसिंहमहाराज आणि त्यांचे सेनापति बाळासाहेब हे दोघे झोपीं गेले ते दुसऱ्या दिवशीं कैदेतच सावध झाले. इंग्रजी सैन्याच्या सहा तुकड्या पुण्याहून साताऱ्यास आल्या. कर्नल ओव्हान्स यांच्याकडे नेतृत्व होतें. मध्यरात्रीच्या सुमारास मोठमोठ्या आवाजांचे गोळीबार झाले आणि राजवाड्यास वेढा पडला. त्यांचे साथीदार प्रतापसिंहांचे बंधु अप्पासाहेब हे होते. बाळाजीपंत नातू यांचा हात या कारस्थानांत होताच. खाड्खाड् बूट वाजवीत ओव्हान्स सोजिरांसहित छत्रपतींच्या शयनमंदिराकडे आला आणि झटदिशीं पलंगाजवळ जाऊन त्यानें गाढ निद्रेंत असलेल्या प्रतापसिंहांच्या मनगटाला धरून खस्सकन् त्यांना खालीं ओढलें. 'टुम चलो हमारे साथ' म्हणून दटावणी सुरू झाली. अर्थातच छत्रपतींनीं कांहींहि प्रतिकार केला नाहीं. या वेळीं त्यांच्या अंगांत फक्त मांडचोळणा होता, दुसरें वस्त्रहि नव्हते. वाड्याबाहेर महाराजांना आणल्यानंतर त्यांना एका पालखींत बसविले, आणि पालखी मार्ग चालूं लागली. आपल्या अत्यंत आवडत्या छत्रपतीला उघड्याबोडक्या अवस्थेंत नेत आहेत हें पाहून सबंध सातारा हळहळला. महाराजांना लिंब येथें आणून गाईम्हशी बांधण्याच्या गोठ्यांत आणून ठेविण्यांत आलें. यानंतर प्रतापसिंहांची रवानगी काशी येथें झाली. वाटेंत त्यांचे अत्यंत हाल झाले. मध्येच खानदेशांत सेनापति बाळासाहेब यांची बायको एका झुडपाआड एखाद्या वडारणीप्रमाणें बाळंत झाली ! कोण हा प्रसंग !

—५ सप्टेंबर १८३९

## श्रावण व. १३ (२) स्वातंत्र्यमंदिराच्या दारांत !

शके १८६९ च्या श्रावण व. १३ या दिवशीं दिल्ली येथें भारताच्या सत्ता-संपादनासाठीं घटनासमितीचें अभूतपूर्व अधिवेशन रात्रीं अकरा वाजतां सुरू झालें.

सौ. सुचेता कृपलानी यांनीं 'वंदे मातरम्' गीत म्हटल्यानंतर नेहमींप्रमाणें मुस्लिम सदस्य घटनासमितींत आले. समितीचे अध्यक्ष बाबू राजेंद्रप्रसाद यांनीं "आजपर्यंत स्वातंत्र्यसंग्रामांत ज्या अज्ञात नरवीरांनीं आपलीं शिरकमलें मातृ-भूमीच्या चरणीं वाहिलीं, ज्यांनीं हंसतमुखानें शत्रूच्या गोळ्या आपल्या छातीवर झेलल्या, ज्यांनीं अंदमानच्या कोठडींत जिवंत मृत्यूला कवटाळलें" त्या सर्वांना श्रद्धांजलि अर्पण केली, आणि दोन मिनिटें स्तब्ध उभे राहून सर्व सदस्यांनीं त्यास अनुमति दिली.

त्यानंतर पंडित नेहरू यांनीं आजन्म देशसेवेचा प्रस्ताव सभेंत मांडला. "भारतीय जनतेच्या आत्मक्लेशानें व त्यागानें प्राप्त झालेल्या या स्वातंत्र्य-संपादनाच्या महत्क्षणीं मी भारत व भारतीय जनता यांच्या सेवेला वाहून घेण्याची, भारताला जगांत मानाचें स्थान प्राप्त करून देण्यासाठीं आणि जाग-तिक शांतता आणि मानवतेचें कल्याण यांच्या पूर्तीसाठीं आजीव, अहर्निश प्रयत्न करण्याची प्रतिज्ञा करतों." अशा आशयाची प्रतिज्ञा पंडित नेहरूंनीं केली. त्यानंतर अध्यक्षांनीं भारतानें सत्तासंपादन केल्याचें जाहीर करण्याचें ठरविलें आणि ही घटनासमिति राष्ट्राचें भवितव्य घडविणारी सार्वभौम लोकसभा झाली असल्याचें घोषित झालें. सौ. हंसा मेहता यांनीं भारतीय स्त्रियांच्या वतीनें तिरंगी ध्वज फडकविला !

शेवटीं सौ. कृपलानी यांनीं 'सारे जहाँसे अच्छा, हिंदोस्ताँ हमारा', आणि 'जनमनगण' हीं राष्ट्रगीतें म्हटलीं व नंतर अपूर्व असें हें अधिवेशन समाप्त झालें. दीडशें वर्षें इंग्रजांच्या मगरमिठींत सांपडलेलें भारतराष्ट्र स्वातंत्र्याच्या दारांत पाऊल टाकीत होतें. सर्व देशांत उत्साहाचें आणि आनंदाचें भरतें येऊं पाहत होतें.

—१४ ऑगस्ट १९४७

## श्रावण व. १४ ( १ ) अहल्याबाई होळकर यांचें निधन !

शके १७१७ च्या श्रावण व. १४ या दिवशीं पुण्यशील साध्वी राणी अहल्याबाई होळकर हिचा अंत झाला.

औदार्य, न्यायप्रियता, भूतदया, सदाचरण, इत्यादि भारतीय संस्कृतीच्या गुणांचें भूर्तिमंत प्रतीक म्हणून लोक अहल्याबाईकडे पाहतात. प्रसिद्ध मल्हारराव होळकरांची ही सून. पति खंडेराव व्यसनी निघाला म्हणून हिच्या मनाची उदासीनता वाढली. पुढें कुंभेरीच्या वेढ्यांत खंडेराव मयत झाल्यावर अहल्या सती जाण्यास निघाली असतां " तूं आम्हांकडे पाहून मागें राहिलीस तर खंडू राहिला व अहल्या गेली– " अशी विनवणी मल्हाररावानें केल्यामुळें सहगमन तहकूब करून संस्थानचा सर्व कारभार तिनें आपल्या हातांत घेतला. अहल्या बुद्धिमान व बाणेदार होती. संस्थानच्या कारभारांत ढवळाढवळ करण्याच्या इराद्यानें राघोबादादानें इंदूरवर चाल करण्याचा धाक घातला. तरी राणी डगमगली नाहीं. लढ्याची सिद्धता करून दादास कळविलें— " माझा पराभव झाला तरी मी अबलाच आहें. पण आपणांवर जर तो प्रसंग आला तर जग काय म्हणेल ? " राघोबा नरमून गेला.

बाईच्या धर्मशील आचरणामुळें तत्कालीन राजेराजवाड्यांचा हिच्यावर फार विश्वास होता. शिलकीच्या पैशाचा विनियोग अहल्याबाईनें सार्वजनिक कामांत केला. अन्नछत्रें, धर्मशाळा, विहिरी, घाट जागजागीं बांधले. कलकत्त्यापासून काशीपावेतों मोठा थोरला रस्ता बांधला. सोरटी सोमनाथाचें देवालय, नवीन बांधवून हिनेंच त्यांत मूर्तीची प्राणप्रतिष्ठा केली.

अशी ही अहल्या बीड तालुक्यांतील चौंढें गावच्या पाटलाची साधी मुलगी होळकरांची राणी झाली आणि आपल्या पुण्यशील वर्तणुकीनें व आदर्श राज्य-व्यवस्थेमुळे आपलें नांव भारतीयांना आदर्श म्हणून ठेवून अहल्याराणी शके १७१७ मध्यें श्रावण व. १४ या दिवशीं निधन पावली. अहल्याबाई दिसण्यांत सुंदर नसली तरी तिचा चेहरा अत्यंत तेजस्वी होता. वृत्ति शांत आणि गंभीर असे. या थोर स्त्रीच्या चारित्र्यामुळें मराठ्यांचा नैतिक दर्जा खूपच वाढला.

**१३ ऑगस्ट १७९५**

## श्रावण व. १४ (२) भरतखंड स्वतंत्र झालें !

शके १८६९ च्या श्रावण व. १४ रोजीं पंडित नेहरू यांनीं म्हटल्याप्रमाणें – 'मध्यरात्रीं बारा वाजतां सारे जग निद्रित असतां भारताने नवचैतन्यानें जागृत होऊन स्वातंत्र्य संपादन केलें. –'

दीडशे वर्षांच्या गुलामगिरीच्या शृंखला भारतमातेच्या पायांतून तुटून गेल्या. स्वातंत्र्याचा जयजयकार भरतखंडाच्या कानाकोपऱ्यांतून गर्जू लागला. 'मी आतां तुमच्यांतील एक' अशी घोषणा लॉर्ड माउंटबॅटन यांनीं केली. भारताच्या राजधानींत एकतीस तोफांची सलामी झाल्यावर घटनासमितीच्या इमारतीवरील 'युनियन जॅक' खालीं उतरून तेथे स्वतंत्र भारताचा नवा राष्ट्रध्वज फडकविण्यांत आला. आणि साऱ्या भारतांत आनंदाचे सोहाळे सुरू झाले.

या उत्साहाच्या सोहळ्याच्या वेळींच जबाबदार भारतीयांना दुःख वाटत होतें. उत्साहाच्या लाटेनें उसळी मारल्याबरोबर ती विरून जात होती. कारण अखंड भारत खंडित झाला होता. बाबू राजेंद्रप्रसादांनीं बोलूनच दाखविले, "आजचा दिवस आनंदाचा, उत्साहाचा आहे यांत शंकाच नाहीं, पण भरतखंड हें ईश्वरानें आणि निसर्गानें अखंड व एकजिनसी असें निर्मित केलें असतां आणि संस्कृति व परंपरा यांनीं एक असतां तें आज दुभंगलें आहे—" जगप्रसिद्ध योगी श्री. अरविंदबाबू यांनीं इषारा दिला कीं—"देशमातेचे देऊळ भंगलेलें आहे, ते एकसंध केल्याविना देशाचे भवितव्य ठीक नाहीं." वयोवृद्ध अपक्ष संपादक के. नटराजन् यांनीं आपल्या रुग्णशय्येवरून सूचित केले कीं, देशाचें अंतःकरण घायाळ असतां उत्सव करणें उचित नाहीं. अशा प्रकारची दुःखद जाणीव सर्वांच्या अंतःकरणांना बोचत होती. अखंड भारताचा अभिमान फार पूर्वीपासूनच भारतीयांना होता. "अटक नदीचे अलीकडे दक्षिणसमुद्रापावेतों हिंदूंचे स्थान–तुर्कस्थान नव्हे– हे आपली हद्द पांडवापासून विक्रमाजितापावेतो त्यांनीं राखून उपभोग केला" अशा प्रकारचीं वाक्यें इतिहासांतील मुत्सद्यांच्या पत्रांतून सांपडतात. तरी पण श्रावण व. १४ हा अपूर्व दिवस होता. फार मोठा टप्पा भारताने या दिवशीं गांठला आणि आपली मान अधिक उन्नत केली–!

— १५ ऑगस्ट १९४७

## श्रावण व. ३० सेखोजी आंग्रे यांचें निधन!

शके १६५५ च्या श्रावण व. ३० रोजीं मराठ्यांच्या आरमारावरील प्रसिद्ध अधिकारी सेखोजी ऊर्फ जयसिंगराव आंग्रे यांचे निधन झाले.

सेखोजी आंग्रे हे कान्होजीरावांचे चिरंजीव होत. हे मोठे राजनिष्ठ असून इमानी सेवक होते. हबशांचें प्राबल्य मोडून मराठी राज्याचा विस्तार करण्यासाठीं हे मनापासून झटत असत. "यांच्यांत भारदस्तपणा, शालीनता, कर्तृत्वाची आवड, व उत्तम धैर्य हे गुण विशेष होते. यांच्या वेळीं राजकोटच्या गाजीखानानें कोंकणांत लूट केली. त्याचें पारिपत्य यांनीं व चिमाजी अप्पांनींच केलें. यांच्याच वेळीं कोंकणपट्टीवरील मुसलमानांचा अमल पूर्णपणें नाहींसा झाला." सन १७६३ मध्यें यांनीं सिद्दीपासून थळ व रावळी हे दोन किल्ले हस्तगत केल्यावर मुंबईकर इंग्रजांस मोठीच चिंता पडली. 'रोझ' नांवाच्या जहाजाचा पाडाव केल्यावरून यांना इंग्रजाला दंड म्हणून ७,६०३ रुपये व जहाज परत करावें लागलें.

दंडाराजपुरीवरील स्वारींत सेखोजी गुंतले असतांनाच त्यांना ताप येऊं लागला. त्यामुळें स्वारी सोडून ते कुलाब्यास परत आले. आणि तेथेच "श्रावण व. ३०, आनंद संवत्सरीं सेखोजी आंगरे देवाज्ञा झाले." यांच्या आईस पेशव्यांनीं लिहिलें—"पुत्रशोक न करतां विचाराने दुःखाचें परिमार्जन करावें आणि लोकांचीं समाधाने करावीं.—" यावर बाईंनीं उत्तर केलें—"ईश्वराच्या इच्छेनें जो प्रसंग त्या समयीं यावयाचा तोच येत आहे. भवितव्यता कधींहि टळणार नाहीं.... दुःखाचें परिमार्जन करून आमच्या घराण्यानें जो पूर्वापार लौकिक संपादला आहे त्याचें रक्षण करणें हाच माझा स्वधर्म आहे, असें मी समजतें; आणि स्वामी कार्यावर नजर देऊन तें सिद्धीस नेणें यांतच सर्व कृतार्थता आहे. मजला माझ्या पुत्रापेक्षां स्वामीकार्याच्या यशःसिद्धीचें महत्त्व अधिक वाटतें. पुत्रशोकांत गुंतून मी सरदारीचा लौकिक कधींहि गमावणार नाहीं—"

सेखोजीची कामगिरी फारच मोठी आहे. हे स्वभावानें शांत असून सर्वांना ममतेने वागविणारे होते.

— ऑगस्ट १७३४




महात्मा गांधी. श्रीगणपति. राममोहन रॉय. कै. शि. म. परांजपे.
डॉ. भांडारकर. नानासाहेब. रंगो बापू गुप्ते. नारायणराव पेशवे.

## भाद्रपद शु. १ सदाशिवरावभाऊ यांचा जन्म !

शके १६५२ च्या भाद्रपद शु. १ या दिवशीं चिमाजीअप्पा यांचे पराक्रमी चिरंजीव सदाशिवरावभाऊ यांचा जन्म झाला. याच भाऊंनीं दिल्ली येथील मुसलमानी तख्तावर घण घालून इस्लामी आक्रमणास पायबंद घातला.

आयुष्याच्या प्रारंभींच्या काळांत दक्षिणेकडील लढायांमधून यांनीं मोठाच पराक्रम केला. उद्‌गीरच्या लढाईचें नेतृत्व यांचेकडेच होतें. नंतरच्या काळांत यांची उत्तरेकडील कामगिरी प्रसिद्ध आहे. अब्दालीनें शिंदे-होळकर यांचा पराभव केल्यानंतर यांची रवानगी दिल्लीकडे झाली. बऱ्हाणपूर, भोपाळ, सिरोंज, ओर्च्छा, नरवर, ग्वालेर, अशा मार्गांनीं यांनीं गंभीर नदी ओलांडली. आग्र्याजवळ मराठे येतांच यमुना नदीच्या दुसऱ्या तीरावरहि अब्दालीची फौज खडी झाली. मुचुकुंद तीर्थावर मराठ्यांचें सैन्य जमलें, पण यमुनेस उतार नसल्यामुळें भाऊ दिल्लीकडे गेला. त्यानें दिल्ली घेतली. परंतु अब्दालीपुढें मराठ्यांचा निभाव लागणें कठीणच होतें. दोनहि सेना समोरासमोर होत्या, रोज चकमकी चालू झाल्या. बळवंतराव मेहेंदळे व गोविंदपंत बुंदेले पडल्यावर मराठ्यांची बाजू लंगडी झाली. अब्दालीस रसद मिळे; पण मराठी सेनेची अन्नावांचून दुर्दशा झाली. तेव्हां चांदी, सोनें सर्व आटवून बादशहाच्या शिक्क्याचीं नाणीं पाडलीं आणि दुसऱ्या बाजूस भाऊशाही, जनकोजीशाही व मल्हारशाही या अर्थाचा भा. ज. म. अशीं अक्षरें घालून वेळ निभावून नेली; पण शेवटीं प्रसंग कठीण आला तेव्हां शत्रूची फळी फोडून जाण्याचें यांनीं ठरविलें. त्याप्रमाणें सकाळीं आठ वाजतां युद्ध सुरू झालें. दुपारीं तीनच्या सुमारास विश्वासराव पडल्यावर पळापळ सुरू झाली. अब्दालीच्या ताजा दमाच्या तुकडीपुढें मराठ्यांचा निभाव लागणें शक्य नव्हतें. विश्वासराव पडल्यावर देहभान नाहींसें होऊन हे सैन्यांत शिरले; त्या दिवशीं यांचा पत्ताच नव्हता. "सदाशिवराव शरिरानें उंच व मजबूत दिसे. तालीम व नमस्कारांच्या अभ्यासानें त्यांचें शरीर घटलेलें होतें. त्याच्यासारखा हुशार, सावध व चतुर मुत्सद्दी पेशव्यांच्या कुळांत कोणी जन्मलाच नाहीं. तो जितका हुशार तितकाच चलाख, शूर व साहसी होता. शिपायाचें व कारकुनीचें अशीं दोनहि कसबें त्याला अवगत होतीं.–"

— ३ ऑगस्ट १७३०

## भाद्रपद शु. २ चक्रधर–कृष्ण यांचा जन्म !

शके ११४३ च्या भाद्रपद शु. २ या दिवशीं महानुभाव पंथाचे आद्य संस्थापक श्री. चक्रधर कृष्ण यांचा जन्म झाला.

अनहिलवाड (पट्टण) चा राजा भोला भीमदेव यांच्याच कारकीर्दींत भडोच येथें मल्लदेव नांवाचा राजा राज्य करीत होता. त्यानें सिंधुराजाचा भाऊ सिंह यास दत्तक घेतले. हा सिंह सिंघणचा सेनापति खोलेश्वर याच्याकडून मारला गेला. हा सिंह लहान असतांच मल्लदेव वारला. मरते वेळीं राज्यसूत्रें आणि दत्तक पुत्र सिंह त्यानें प्रधान विशालदेवाच्या हातीं सोंपविला होता. विशालदेव जातीनें सामवेदी लाड ब्राह्मण होता. यालाहि बराच काळपर्यंत पुत्र नव्हता. शके १११६ मध्यें दत्तात्रेय प्रभूंच्या कृपेनें हरिपालदेव नांवाचा पुत्र याला झाला. हा मोठा पराक्रमी होता. वयाच्या बाविसाव्या वर्षी यानें यादवराजा सिंघणचा पराभव केला. त्यानंतर शके ११४१ मध्यें सिंघणानें अनहिलवाडवर स्वारी केली. याहि खेपेस हरिपालदेवानें युद्धांत भाग घेतला. त्यानंतर शके ११४३ वृषभनाम संवत्सर, भाद्रपद शुक्ल द्वितीया, शुक्रवार या दिवशीं हरिपालदेवाचें निधन झालें. त्याचें प्रेत स्मशानांत नेलें त्या वेळीं श्रीचांगदेव उर्फ श्रीचक्रपाणि (महानुभाव पंथाचे तिसरे अवतार) यांनीं द्वारकेंत कामाख्या नामक हठयोगिनीच्या दुराग्रहामुळें देहत्याग केला; व हरिपालदेवाच्या मृत शरिरांत प्रवेश केला. त्याबरोबर हरिपालदेव जीवंत झाले. पुढें रामटेक येथें जाऊन रामाचें दर्शन घेऊन यावें असें यांच्या मनांत आलें. पण प्रधानजी बोलले– "तो देश पारिखा! कैसा पाठवो? भंवति राजक: सेजा जाधव राज्य करिती असती" पण हरिपालदेवांचा हट्ट पाहून त्यांच्या आईनें युक्ति सुचविली, "जेऊ राउतें पाइके जाती ऐसा सडाचि पाठवावा : कां दुधारी रजपुताचेया परि पाठवावा : अन्यत्र लोक जाती तेसने यापरी हाही जाइल." शेवटीं हरिपालदेव यात्रेस निघाले. वाटेंत बरोबरच्या लोकांची चुकामूक झाली. व हे रामटेकचा रस्ता चुकून वऱ्हाडांतील ऋद्धिपूर येथें आल्यावर गोविंदप्रभूंच्याकडून यांनीं ज्ञानशक्ति स्वीकारली. गोविंदप्रभूंनींच यांचें नांव 'चक्रधर' असें ठेवलें.

— २० ऑगस्ट १२२१

## भाद्रपद शु. ३ भगवान् वराहांचा जन्म!

भाद्रपद शु. ३ या दिवशीं दशावतारांतील तिसरा अवतार, भगवान् वराह यांचा जन्म झाला.

या विष्णूच्या अवताराचें मूळ वेदांतहि सांपडतें. वराहाला इंद्रानें मारल्याचा उल्लेख ऋग्वेदांत आहे. पृथ्वी निर्माण होण्यापूर्वी सर्वत्र पाणी होतें. ब्रह्मदेव वायुरूपानें हिंडत असतां त्याला पाण्याच्या पोटांत पृथ्वी दिसली. ही पृथ्वी प्रजापतीनें वराहरूपानें वर काढली; व ती कोरडी करून मग त्यानें देव वगैरे निर्माण केले. पाण्यामध्यें कमलाच्या देंठाला असणारा चिखल ब्रह्मदेवानें वराहाच्या रूपानें वर आणला व तो कमळाच्या पानावर पसरला. तीच पृथ्वी होय. याखेरीज पुराणग्रंथांतून यासंबंधीं अनेक कथा सांपडतात. हिरण्याक्ष व हिरण्यकशिपु ही भावाभावांची जोडी प्रसिद्धच आहे. हे दोघे प्रथम वैकुंठामध्यें विष्णूच्या घरीं विजय आणि जय या नांवांनीं द्वारपाल होते. एकदां यांनीं ब्रह्मदेवाचे मानसपुत्र सनक, सनन्दन यांना दारांतच हटकून अपशब्द बोलण्यास सुरुवात केली, तेंव्हां या ऋषींनीं त्यांना शाप दिला. त्यामुळें या दोन्ही भावांना दैत्य होण्याची पाळी आली होती. हिरण्याक्ष दैत्य तर श्रीहरीचा अवतार जो वराह याच्याशींच लढण्यास तयार झाला. जलमग्न झालेली पृथ्वी वर कशी काढावी या चिंतेंत ब्रह्मदेव असतांनाच त्यांच्या नाकांतून अंगठ्याएवढा एक वराह बाहेर आला. आणि वाढत वाढत जाऊन त्याचा आकार हत्तीएवढा झाला ; आणि या वराहानें पृथ्वी बाहेर काढण्यासाठीं पाण्यांत मुसंडी मारिली. परंतु हिरण्याक्ष दैत्यानें पृथ्वी पाण्याबाहेर काढण्यास विरोध करून लढण्यास सुरुवात केली. परंतु भगवान् वराहांनीं आपल्या दांतावर पृथ्वी धारण केली आणि तिला पाण्याबाहेर काढून तिची स्थापना शेषाच्या मस्तकावर केली. या समयीं वराह आणि हिरण्याक्ष यांचा मोठाच संग्राम झाला. शेवटीं आपल्या सुदर्शन चक्रानें भगवानांनीं हिरण्याक्षाचा नाश केला. या वराहाचें वर्णन चतुर्बाहु, चतुष्पाद, चतुर्नेत्र व चतुर्मुख असें केलें जातें. ज्या ठिकाणीं यानें पृथ्वी वर आणिली त्या स्थानास वराहतीर्थ असें नांव असून हें ठिकाण बंगालमध्यें नाथपूरनजीक त्रिवेणी नदीजवळ आहे.

## भाद्रपद शु. ४ (१) "सुखकर्ता दुःखहर्ता" श्रीगणपति !

भाद्रपद शुद्ध ४ हा दिवस गणेश-चतुर्थी म्हणून प्रसिद्ध आहे. गणेश म्हणजे गुणेश. सत्त्व, रज, तम या त्रिगुणांचा अधिपति म्हणजे गणेश.

भारतीय संस्कृतीनें गणपतीला 'सुखकर्ता दुःखहर्ता' अशा स्वरूपाचें दैवत मानिलें आहे. सर्व शुभ संस्कारांत गणेशपूजा आरंभीं करण्याची चाल आहे. मुद्गलपुराण, गणेशपुराण, गणेशभागवत या संस्कृत आणि गणेशप्रताप, गणेश-लीलामृत, गणेशविजय, इत्यादि मराठी ग्रंथांतून गणपतीच्या उपपत्तीसंबंधानें अनेक कथा सांपडतात. खिस्ती शकाच्या चौथ्या शतकानंतर गणपतीची उपासना भारतांत रूढ झाली असें डॉ. भांडारकरांचें मत आहे. या देवतेची भक्ति करणारा पंथ 'गाणपत्य पंथ' या नांवाने ओळखला जातो. महाराष्ट्रांतहि या पंथाचा प्रसार झाला होता. चिंचवडचे श्रीमोरया देव महाभक्त होऊन गेले. थोरले माधवराव पेशवे गणपतीचे उपासक होते. प्रसिद्ध अष्टविनायकांची आठ स्थानें महाराष्ट्रांतच आहेत. ऐतिहासिक दृष्टीने पाहतां असे दिसते कीं, वेद-कालापूर्वी सुरासुरांत ज्या लढाया होत त्यांत गणपति हा सेनानायक असावा. कोणतींहि विघ्नें आलीं तरी गणपति आपल्या सामर्थ्यानें त्यांचा नाश करतो या कल्पनेमुळें त्याला, 'विघ्नराज', 'विघ्नहर्ता' अशीं नांवें प्राप्त झालीं आहेत. नंतरच्या काळांत त्याला दैवताचें स्वरूप प्राप्त होऊन सोळा विद्या व चौसष्ट कला यांनीं मंडित असणाऱ्या गणपतीला बुद्धि आणि विद्या यांचें स्वामित्व प्राप्त झालें.

'गणानां त्वा गणपति' हें ऋग्वेदांतील सूक्त गणपतीचे मानितात. गणपतीच्या जन्मकथांतून अनेक प्रकारचा अद्भुत रस मिसळलेला दृष्टीस पडतो. कांहीं अपराधावरून शंकरांनींच याचे मस्तक तोडून टाकिले, पण पार्वतीसाठीं इंद्राच्या हत्तीचें मस्तक आणून बसविण्यांत आलें. परशुरामाशीं गणपतीचें एकदां युद्ध झाले. त्या समयीं शंकराचा परशु परशुरामानें गणपतीवर फेंकिला, पण तो आपल्या वडिलांचा म्हणून गणपतीनें न स्वीकारतां आपल्या दांतावर झेलला. त्यामुळे गणपतीचा एक दांत मोडून गेला. 'गणपतीच्या बाललीलाहि प्रसिद्ध आहेत.

● ● ●

## भाद्रपद शु. ४ (२) रंगो बापूजींची स्वामिनिष्ठा !

शके १७६१ च्या भाद्रपद शु. ४ रोजीं सातारचे प्रतापसिंह भोसले यांचे एकनिष्ठ आणि करारी सेवक रंगो बापूजी गुप्ते हे आपल्या धन्यावरील अन्यायाची दाद मागण्यास इंग्लंडला निघाले.

रंगो बापूजी रोहिडखोरेंकर गुप्ते देशपांडे हे प्रतापसिंहांचे एकनिष्ठ सेवक होते. प्रतापसिंहांच्या पदच्युतीनंतर थोड्याच अवधींत रंगो बापूजी फरारी झाले. हे मोठे हरहुन्नरी होते. नाना प्रकारचे वेष धारण करून यांनीं उत्कृष्ट प्रकारें स्वामिसेवा केली आहे. लिंब येथें प्रतापसिंह इंग्रजांच्या कैदेंत असतांना 'धन्नकधारी कावडीवाल्याच्या' वेषांत रंगो बापूजी आपल्या धन्यास भेटले आणि थोडी मसलत करून पुनः बेपत्ता झाले. कॅप्टन कोगन यांच्या मदतीने रंगोबांनीं तीन अरब आपल्याबरोबर घेतले आणि अत्यंत गुप्तपणें वेषांतर करून खैबरघाट, अफगाणिस्तान, इराण, इराक या मार्गानें ते बैरूटच्या बंदरांतून माल्टा येथें आले. तेथें त्यांना चाळीस दिवस अडकून पडावें लागले. त्यानंतर विलायतेंत गेल्यावर रंगो बापूजी आपल्या धन्यासाठीं चौदा वर्षेपर्यंत झगडले. आपल्या जीविताची, प्रपंचाची तमा न धरतां रंगोबा पार्लमेंटमध्ये न्यायासाठीं लढत होते. सरावानें इंग्रजी चांगलें बोलतां येऊं लागल्यावर त्यांनीं व्याख्याने, पत्रके यांच्या द्वारां तुफानी प्रचार केला आणि सारे इंग्लंड हालवून सोडिलें. "काम फत्ते झाल्याशिवाय मी स्वदेशीं येणार नाहीं, सरकार स्वारी सन्मानाने सातारला परत येईपर्यंत मी तिकडे येणार नाहीं. माझ्या धन्याला न्याय मिळेपर्यंत मी येथेंच इंग्लंडांत राहीन" असा रंगोबांचा बाणा होता. दारिद्र्य, निराशा, हालअपेष्टा यांना ते डगमगले नाहींत. परंतु रंगोबांना यश मिळावयाचें नव्हतें. ज्याच्यासाठीं एवढी खटपट तो प्रतापसिंह धनीच शके १७६९ मध्यें अत्यंत हालांत निधन पावला. थोडा वेळ रंगोबा स्तब्ध झाले; आणि त्यांनीं पुन्हा आपल्या प्रयत्नांना सुरुवात केली. "राजा कैलासवासी झाला. परंतु इनसाफ मेला नाहीं. जिता आहे." अशी यांची विचारसरणी होती. खटल्याची सर्व हकीगत या विख्यात स्वामिभक्तानें मोडी लिपींत लिहून ठेविली आहे.

— १२ सप्टेंबर १८३९

## भाद्रपद शु. ५ (१) ऋषिवर्यांचें पुण्यस्मरण !

भाद्रपद शु. ५ हा दिवस ऋषिपंचमी म्हणून प्रसिद्ध आहे. विशेषतः स्त्रिया या दिवशीं ऋषींचे पूजन करीत असतात.

या पूजेच्या संबंधीं भविष्योत्तर पुराणांत ज्या एकदोन कथा आहेत त्या अगदींच पोरकट आहेत. स्त्रीनें आपल्या पावित्र्यासाठीं ऋषिपंचमीस ऋषिपूजन करावें म्हणजे रजस्वला असतांना तिच्या हातून कांहीं पातक घडल्यास दोषपरिमार्जन होते, असा संकेत आहे. बंगाल प्रांतांतहि अशीच समजूत आहे. तिकडे आषाढांत तीन दिवस पृथ्वी रजस्वला समजतात. या काळांत जमीन कोणी पेरीत नाहीं कीं खणीतहि नाहीं. या दिवसाचें खरे महत्त्व समजावून घेणें आवश्यक आहे.

सुमारें सातआठ हजार वर्षांपूर्वी भारताच्या वायव्येस राहणारे आर्य लोक पंजाबांत आले. आणि त्यांनीं आपणांस साह्य करणाऱ्या इंद्र, रुद्र, विष्णु, इत्यादि प्रसिद्ध शक्तींना देव मानून त्यांचें गुणगान सुरू केलें. या प्रार्थनापर स्तोत्रांसच वेद किंवा श्रुति अशी संज्ञा मिळाली. "वेदांतील सूक्तें ज्या महापुरुषांनीं रचिलीं व गायिलीं त्यांस ऋषि ही बहुमानार्थी संज्ञा देण्यांत आली.–" ऋषींनीं वेदरक्षण करून त्यांतील धर्माचा प्रसार केला. त्याच ऋषींचें आपण अनुयायी आहोंत. संध्यावंदनाचे वेळीं आपल्या गोत्राचा उच्चार करून आपला संबंध प्राचीन ऋषींशीं, आहे याची स्मृति आपण ताजी ठेवीत असतों. या प्राचीन ऋषींपैकीं जे महर्षि विशेष प्रसिद्धीस आले त्यांचीं नांवें चिरस्मरणीय व्हावींत म्हणून उत्तरेकडील ध्रुवाभोवतीं प्रदक्षिणा घालीत आहेत अशा भासणाऱ्या नक्षत्रपुंजांतील सात नक्षत्रांना ऋषींचीं व एकास एका ऋषिपत्नीचें, अशीं नांवें देण्यांत आलीं आहेत. त्यांना सप्तर्षि असें म्हणतात. त्यांचीं नांवें– कश्यप, भारद्वाजविश्वामित्र, गौतम, जमदग्नि वसिष्ठ व अत्रि हीं असून त्यांपैकीं वसिष्ठाच्या पत्नीचें नांव अरुंधती असे आहे. या ऋषींचें पुण्यस्मरण या दिवशीं करावयाचें असतें. अरविंदबाबू घोष यांनीं ऋषींच्याविषयीं म्हटलें आहे– "Rishi is not great by what he was himself; but by what he has expressed!"

• • •

भाद्रपद शु. ५ ( २ ) डॉ. भांडारकर यांचें निधन !

शके १८४७ च्या भाद्रपद शु. ५ या दिवशीं जगप्रसिद्ध 'महाराष्ट्रीय संस्कृत पंडित व प्राच्यविद्यासंशोधक 'डॉ. रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांचें निधन झालें.

मालवण, राजापूर व रत्नागिरी येथें प्रारंभींचें शिक्षण झाल्यावर भांडारकर मुंबईच्या एल्फिन्स्टन हायस्कूलमधून मॅट्रिक झाले; त्यानंतर मुंबई विद्यापिठाचे एम्. ए. झाल्यावर हे सिंध, हैद्राबाद येथें एका हायस्कूलचे हेडमास्तर होते. याच वेळीं यांनीं आपलीं संस्कृतचीं दोन पुस्तके प्रसिद्ध केलीं. नंतर मुंबई येथे एल्फिन्स्टन कॉलेजमध्ये भांडारकर संस्कृतचे प्रोफेसर झाले. पुढे डेक्कन कॉलेजमधील किलहॉर्न-नंतर संस्कृतची जागा यांना मिळाल्यावर हे तेथेंच कायम राहिले. इंडियन ॲण्टि-क्वेरींतून पतंजलीच्या कालासंबंधीं वेबरशीं केलेला वादविवाद म्हणजे यांचें प्रारंभींचे संशोधन होय. यानंतर यांची महत्त्वाची कामगिरी म्हणजे हे मुंबई सरकारच्या हस्तलिखित खात्याचे संपादक असतांना त्यांनीं केलेले संशोधन ही होय. प्राचीन वैष्णव पंथ, काश्मिरांतलि शैव सांप्रदाय आणि रामानुजांचें तत्त्वज्ञान यांसंबंधींचें यांनीं पुष्कळच संशोधन केलें. Early History of the Deccan, Outlines of Vaishnvism, Shavisim and minor Religious Sects इत्यादि ग्रंथांमुळे भांडारकरांना अखिल भारतीय व आंतरराष्ट्रीय कीर्ति प्राप्त झाली. मुंबईच्या विल्सन फायलॉलॉजिकल लेक्चर्सची पहिली व्याख्यानमाला यांनींच गुंफिली. ६ जुलै १९१७ रोजीं यांच्या नांवानें स्थापन झालेल्या पुण्याच्या भांडारकर ओरिएंटल रीसर्च इन्स्टिट्यूटचा उद्घाटनसमारंभ त्या वेळचे मुंबईचे गव्हर्नर लॉर्ड विलिंग्डन यांच्या हस्ते झाला. ओरिएंटल कॉन्फरन्सच्या पहिल्या अधिवेशनाचें अध्यक्षस्थान यांनींच विभूषित केलें होते. भारतासंबंधीं पाश्चात्य देशांत जे गैरसमज पसरलेले होते ते दूर होण्यास भांडारकरांचें कार्य मोठ्या प्रमाणावर कारणीभूत झालें. Age of Mahabharata, Allusions to Krishna in Patanjali's Mahabhashya, The Nasik Inscriptions इत्यादि यांचे प्रमुख निबंध आहेत. शैव, वैष्णव पंथांसंबंधींचा सुसंगत इतिहास यांच्याच ग्रंथांवरून ज्ञात झाला आहे.

— २४ ऑगस्ट १९२५

## भाद्रपद शु. ६ — जिंजीचा वेढा सुरू !

शके १६१२ च्या भाद्रपद शु. ६ रोजीं औरंगजेबाचा पराक्रमी सरदार झुल्फिकारखान यानें जिंजीस वेढा घातला.

झुल्फिकारखानाने मराठ्यांची राजधानी रायगड घेऊन आधींच पराक्रम केला होता. आणि बादशहाची मर्जी संपादन केली होती. राजमाता येसूबाई व शाहू हे मोंगलांच्या ताब्यांत आले होते तरी राजाराम हातचा निसटलेला होता. तेव्हां त्याचा पाडाव करण्यासाठीं राजारामाचे पाठीवर झुल्फिकारखान निघाला. रायचूर, कर्नूर, नंद्याळ, कडाप्पा या मार्गानें जात जात राजारामाचा पाडाव करण्यासाठी भाद्रपद शु. ६ रोजीं त्यानें जिंजीस वेढा घातला. या वेळपासून सातआठ वर्षेंपर्यंत वेढा चालू होता. मोठी शिकस्त करून शके १६२० मध्यें जिंजी हस्तगत झाली ; पण त्यापूर्वींच राजाराम तेथून निसटला होता. त्यामुळें झुल्फिकारखानाचे सारे श्रम व्यर्थ गेल्यासारखे होते. स्वतः झुल्फिकारखान, त्याचा बाप आसदखान, बादशहाचा पुत्र, नातू आणि मोठी फौज इतक्यांनीं फारच परिश्रम केले, पण त्या मानानें बादशहास कांहींच फायदा झाला नाहीं. जिंजीच्या किल्ल्याचा घेर फारच मोठा आहे. कारण तीन मोठे पर्वत मिळून तीन मैलांचा परिघ तयार झाला असून जिंजीचा किल्ला तयार झाला आहे. पश्चिमेकडे राजगिरी, उत्तरेस कृष्णगिरी व दक्षिणेस चांद्रायण दुर्ग अशीं पर्वतांचीं नांवें आहेत. या अवघड स्थळावर विजय मिळवणें कठीण होतें. झुल्फिकारखानाच्या हातीं फौज त्या मानानें कमी होती. बादशहा तरी आणखी फौज कोठून पाठविणार? खुद्द महाराष्ट्रांत संताजी-धनाजी या जोडीनें चालविलेल्या धुमाकुळीने औरंगजेब आधींच त्रस्त झाला होता. शेवटीं महाराष्ट्रांतील बंडाळी थांबविण्यास जिंजी अगोदर हस्तगत झाली पाहिजे असा विचार बादशहानें केला व त्यानें आपला मुलगा कामबक्ष यास मदत म्हणून जिंजीकडे पाठविलें. त्यामुळें झाले उलटेंच. आतां वेढ्याचें नायकत्व कामबक्षाकडे जाणार म्हणून झुल्फिकारखान, व त्याचा बाप आसदखान हे दोघे नाराज झाले ; आणि त्यामुळें वेढ्याचें काम रेंगाळतच चालू झालें.

## भाद्रपद शु. ७ "खांदेरी असें नांव ठेविलें!"

शके १६०० च्या भाद्रपद शु. ७ रोजीं श्रीशिवरायांनीं खांदेरी किल्ला बांधून पूर्ण केला!

नवीनच स्थापन केलेल्या स्वराज्याचें रक्षण करण्याच्या बाबतींत शिवाजीनें घेतलेली खबरदारी अपूर्व अशीच होती. 'संपूर्ण राज्याचें सार जे दुर्ग' त्यांच्या बाबतींत तर शिवाजीचें विशेष लक्ष असे. महाराष्ट्रांत, समुद्रकांठीं, देशावर व इतर ठिकाणीं आज भग्नावस्थेत दिसणाऱ्या किल्ल्यांशीं शिवरायांचा संबंध क्वचित आला होता. राज्यास बळकटी यावी म्हणून शिवाजीनें कांहीं किल्ले नवीन बांधले, कांहीं दुरुस्त केले. शिवाजीची बहुतेक अचाट कृत्यें या किल्ल्यांच्या योगानें तडीस गेलीं. नाना ठिकाणची लूट सुरक्षितपणें किल्ल्यांवर आणून ठेवतां आली...अनेक आणीबाणीचे प्रसंग शिवाजीवर आले, त्यांतून निभावून जाण्यास हेच किल्ले यांस उपयोगी पडले. अर्थातच शिवाजीला या किल्ल्यांचें फारच महत्त्व वाटे. "किल्ले बहुत झाले, विनाकारण पैका खर्च होतो." अशी तक्रार करणाऱ्यांना शिवाजीनें उत्तर केलें, "जैसा कुळंबी शेतास मळा घालून शेत राखितो, तसे किल्ले राज्यास रक्षण आहेत. तारवास खिळे मारून बळकट करितात, तशी राज्यास बळकटी किल्ल्यांची आहे. किल्ल्यांच्या योगानें औरंगशहासारख्याची उमर गुजरून जाईल.–" समुद्रकांठीं असणाऱ्या किल्ल्यांकडे तर शिवाजीचें फारच लक्ष असे. कारण जंजिऱ्याचा सिद्दी मराठी राज्य उंदराप्रमाणें पोखरीत असे. नाना प्रकारचा धार्मिक छळ करीत असे. या सिद्दीला तोंड देण्यासाठीं शिवाजीला आपलें आरमार समृद्ध करणें भाग पडलें. कोंकणांतील राजापुरी हें मराठेशाहींतील आरमाराचें मुख्य ठाणें होतें. कुलाबा व मुंबई यांच्या दरम्यान दोन अवघड बेटें आहेत, त्यांना खांदेरी व उंदेरी अशीं नांवें आहेत. यांची मालकी शिवाजीकडे असे. "फिरंगी फार प्रबल झाले असें पाहून छत्रपतींनीं समुद्रांतील चांगलीशी खडकाळ जागा पाहून तेथें किल्ला बांधावयास आरंभ केला. शके १६०० च्या भाद्रपद मासीं गौरीचे मुळावर किल्ला बांधून तो लढाईचे उपयोगी असल्याकारणानें खांदेरी असें नांव ठेविलें."

— १४ ऑगस्ट १६७८

## भाद्रपद शु. ८ तुकोजी होळकरांचें निधन !

शके १७१९ च्या भाद्रपद शु. ८ रोजीं प्रसिद्ध पुरुष तुकोजीराव होळकर यांचें निधन झाले.

होळकरांच्या घराण्यांतील जानोजीचे हे चिरंजीव. तुकोजी कागदोपत्रांत व शिक्क्यांत आपणा स्वतःस मल्हारराव होळकरांचा दत्तक पुत्र समजतो, परंतु प्रत्यक्ष दत्तविधान झालेले नव्हते. अहल्याबाईनें होळकरांच्या दौलतीचा बंदोबस्त पाहावा आणि तुकोजीने सेनापति होऊन मराठी राज्याची इतर कामगिरी पार पाडावी अशी व्यवस्था होती. सन १७६९ पासून तुकोजी महादजी शिंदे याच्याबरोबर दिल्लीकडे होता. पुढें पांच वर्षांनीं दक्षिणेंत येऊन यानें राघोबादादांचा पक्ष स्वीकारला. त्यानंतर मोरोबादादांना साह्य करण्यास हा तत्पर झालेला असतांना महादजींनीं याला नाना फडणीस यांचे बाजूस घेतलें. सन १७७८ मध्ये तुकोजी, हरिपंत फडके व महादजी शिंदे यांचे-बरोबर इंग्रजांशीं लढण्यास गेला होता. त्या वेळीं बोरघाटांत झालेल्या लढाईंत हा सेनापति म्हणून काम पहात होता. सन १७८६ मधील टिपूवरील लढाईंत तर तुकोजीनें चांगलाच पराक्रम केला. त्यानंतर शिंदे यांच्यावर ताण करण्यासाठीं ड्यूड्रनेक या फ्रेंच अधिकाऱ्याच्या हाताखालीं यानें कवायती फौज उभी केली; पुढें शिंदे-होळकरांचें वैमनस्य वाढतच जाऊन दोघांची लढाई लाखेरी येथें झाली. व तींत तुकोजीचा पराभव होऊन मराठेशाहीचा दर्जा खालावण्यास सुरवात झाली. शेवटीं याला अर्धांगवायु झाला, परंतु पेशव्यांच्या आग्रहावरून खर्ड्याच्या लढाईंत याला जावें लागलें. त्यानंतर भाद्रपद शु. ८ रोजीं तुकोजीचा अंत झाला. तुकोजी होळकराला स्वतंत्रपणें कारभार करण्याची संधि मिळाली नाहीं. आणि त्याला तें जमलेंहि नाहीं. तुकोजीचा वडील मुलगा काशीराव हा शरिरानें अधू होता व धाकटा मल्हारराव उनाड होता; यशवंतराव व विठोजी हे याचे दासीपुत्र होत. तुकोजीच्या निधनानंतरच्या पत्रांत "मोठा पुरुष गेला. ऐसा गरीबनवाज गरीबगुरिबांचें चालवणार पुरुष विरळा" असा मजकूर सांपडतो.

— २९ ऑगस्ट १७९७

## भाद्रपद शु. ९ मुनशी प्रेमचंद यांचें निधन !

शके १८५८ च्या भाद्रपद शु. ९ रोजीं हिंदी भाषेंतील सर्वश्रेष्ठ उपन्यासकार व लघुकथालेखक प्रेमचंद यांचें निधन झालें.

मुनशी धपतराय व आनन्दीदेवी या दाम्पत्याच्या पोटीं प्रेमचंदांचा जन्म बनारसजवळील लमही नांवाच्या गांवीं शके १८०२ सालीं झाला. प्रेमचंदांचें शिक्षण गोरखपूर, बनारस, अलाहाबाद, इत्यादि ठिकाणीं झालें. एम्. ए. पर्यंतचा अभ्यास झाल्यानंतर शाळेंत शिक्षक, मुख्याध्यापक, डेप्युटी इन्स्पेक्टर, इत्यादि विविध प्रकारचीं कामें करून असहकारितेच्या काळांत यांनीं सरकारी नोकरी सोडून दिली. सन १९०५ मध्यें यांची ‘ कृष्णा ’ ही पहिली कादंबरी प्रसिद्ध झाली. त्यानंतर उत्तरोत्तर त्यांचा लौकिक वाढतच गेला. हुबेहूब व्यक्ति चित्रण करण्यांत प्रेमचंद अत्यंत यशस्वी झाले. ‘ सेवासदन ’, ‘ निर्मला ’, ‘ गबन ’, ‘ प्रेमाश्रम ’, ‘ रंगभूमी ’, ‘ कायाकल्प ’, ‘ कर्मभूमि ’, ‘ गोदान ’ य त्यांच्या कलाकृति आहेत. यांखेरीज अनेक उत्कृष्ट लघुकथा यांनीं लिहिल्या आहेत.

“ प्रेमचंदांच्या कादंबऱ्यांतील सर्वांत मोटा गुण हा आहे कीं, त्या वाचकांच्या अंतःकरणाचा ठाव घेऊन त्याला विचाराची नवी दिशा दाखवितात. प्रचलित प्रश्न लघुकथेच्या द्वारां मांडून त्यावर नवा प्रकाश टाकण्याची त्यांच्या लेखणींत विलक्षण शक्ति आहे. जीवनांत नित्य अनुभवास येणाऱ्या सुखदुःखादि द्वंद्वाचें यथार्थ चित्रण करणारा यांच्यासारखा दुसरा लेखक विरळा. ” प्रेमचंदांच्या कलाकृतींचा अनुवाद इतर देशी भाषांतून झाला आहेच पण जपानी, इंग्रजी-वगैरे भाषांतूनहि यांच्या कथांचीं भाषांतरें झालीं आहेत. भारताच्या शेतकऱ्याचें जीवन यथार्थतेनें रंगविणारी यांची ‘ गोदान ’ कादंबरी अद्वितीय अशी आहे. त्यांतील नायक होरीराम आणि नायिका धनिया या व्यक्तिरेखा हिंदी उपन्यास-सृष्टींत अमर होऊन राहिल्या आहेत. प्रेमचंदांच्या पुनर्विवाहित पत्नी शिवरानी-देवी यांनीं ‘ प्रेमचंद : घरमें ’ नांवाचा ग्रंथ यांच्या मृत्यूनंतर लिहिला आहे. त्यांत प्रेमचंदांचें घरगुती जीवन चित्रित करण्यांत आलें आहे.

— २५ ऑगस्ट १९३६

## भाद्रपद शु. १० जतींद्रनाथांचा प्राणत्याग !

शके १८५१ च्या भाद्रपद शु. १० या दिवशीं लाहोरच्या कटांतील सुप्रसिद्ध आरोपी जतींद्रनाथ दास यांनीं तुरुंगांतील जुल्माचा निषेध करण्यासाठीं त्रेसष्ट दिवसांचें उपोषण करून प्राणत्याग केला.

जतींद्रांचा जन्म शके १८२६ मध्यें कलकत्त्यास झाला. मॅट्रिकची परीक्षा पास झाल्यानंतर यांनीं आशुतोष कॉलेजमध्यें प्रवेश केला. पण पुढे देशभक्तीनें प्रेरित होऊन यांनीं कॉलेज सोडून राजकारण करण्यास सुरुवात केली. कायदेभंगाबद्दल जतींद्रांना तीन वेळां शिक्षा झाली. त्यानंतर 'दक्षिण कलकत्ता तरुण समिति' काढून राजकीय कार्यास यांनीं आरंभ केला. तेव्हा बेंगॉल ऑर्डिनन्स कायद्यान्वयें यांना तुरुंगांत जाणें भाग पडलें. तेथें यांचा अत्यंत छळ झाला. त्याचा निषेध म्हणून यांनीं तेवीस दिवसांचें उपोषण केल्यावर यांची मुक्तता झाली. त्यानंतर सन १९२९ मध्यें लाहोर कटांत सामील असल्याचा आरोप यांच्यावर आला आणि त्यामुळें त्यांना पकडण्यांत आलें. हिंदी कैद्यांना तुरुंगांतील वागणूक अत्यंत वाईट मिळत असे. ती सुधारावी म्हणून यांनीं कांहीं उपाय योजण्याचें ठरविलें. यांचे सहकारी भगतसिंग व दत्त यांना तुरुंगांत हालअपेष्टा भोगाव्या लागत होत्या. त्यांना सहानुभूति दाखविण्यासाठीं जतींद्रांनीं अन्नसत्याग्रह सुरू केला. सक्तीनें अन्न घालण्याच्या प्रयत्नांत अधिकाऱ्यांना यश आलें नाहीं. आणि याच प्रायोपवेशनांत भाद्रपद शु. १० रोजीं जतींद्रांचा अंत झाला. या भीषण प्रकारामुळे स्वदेशीं आणि परदेशीं एकच खळबळ उडाली. प्रसिद्ध आयरिश देशभक्त टेरेन्स मॅक्स्विनीच्या पत्नींनें त्यास याच उपायाचा संदेश पाठविला होता. या प्रसंगाची स्मृति सर्वांना झाली. देशासाठीं प्राणपणानें लढणाऱ्या क्रांतिकारकांना सन्मानानें वागवावें, खुनी दरोडेखोरांप्रमाणें त्यांचा दर्जा ठेवूं नये, या तत्त्वासाठीं जो झगडा भगतसिंग आदि क्रांतिवीरांनीं केला, त्याचीच उज्ज्वल परंपरा जतींद्रदासांनीं राखली. स्वतःच्या प्राणत्यागानें क्रांतिकारकांना सहानुभूति दाखविणारा हा वीर त्या वेळीं लोकांना आदरणीयच वाटला.

— १३ सप्टेंबर १९२९

## भाद्रपद शु. ११ निजामशाहीची अखेर !

शके १८७० च्या भाद्रपद शु. ११ या दिवशीं हिंदुस्थान सरकारनें हैद्राबाद संस्थानांत तीनहि दिशांनीं आपल्या फौजा घुसविल्या.

१५ ऑगस्ट १९४७ या दिवशीं भारत देश स्वतंत्र झाला. वास्तविक पाहतां हैदराबादनें आतां हिंदी संघराज्याचा एक अवयव म्हणून वागणें योग्य होतें. परंतु २७ ऑगस्ट १९४७ रोजीं निजामानें आपलें स्वातंत्र्य घोषित केलें. हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याला आणि राष्ट्रध्वजाला मान्यता देण्याचें दूर राहून मोंगलाईत दडपशाहीच सुरू झाली. जातीयतेचें थैमान सुरू होऊन निजामसाहेब कासीम रझवी वगैरे अत्याचारी लोकांच्या हातांतील बाहुले बनले. हिंद सरकारशीं झालेल्या 'जैसे थे'च्या कराराचा भंग पदोपदीं होऊं लागला. त्यामुळें हिंद सरकारला स्वारी करण्याचा निर्णय घ्यावा लागला. आणि शेवटीं भाद्रपद शु. ११ ला हिंदी सैन्य निजामच्या राज्यांत घुसलें. या पोलिसी मोहिमेचा परिणाम अवघ्या पांचच दिवसांत दिसून आला. दि. १७ सप्टेंबर रोजींच निजामानें शरणागति जाहीर केली. याच दिवशीं दुपारी दीडच्या सुमारास हिंदी सैन्याच्या तुकड्या सोलापूरच्या बाजूनें तुफानी वेगांत शिकंदराबादपासून अवघ्या पंचवीस मैलांवर येऊन ठेपल्या होत्या. या मोहिमेचे सरसेनापति मे. ज..महाराज राजेंद्रसिंहजी यांनीं हैद्राबादच्या सेनापतीला अखेरचा निर्वाणीचा संदेश दिला. आणि दुपारीं पांच वाजतां नभोवाणीवरून हैदराबादचे निजाम आला हजरत यांनीं आपल्या शरणागतीचें निवेदन केले. हैदराबादची जनता क्लेशांतून मुक्त झाली. सर्व देशास विजयानंदाचें भरतें आलें. मराठेशाहींत निजाम एक शत्रुच होऊन बसला होता. अनेक वेळेला पराभव करूनहि त्याचें अस्तित्व भक्कमच राहिलें होतें. परंतु हिंद सरकारच्या या विजयामुळें निजामाला चांगलीच अद्दल घडली. संपत्तीच्या जोरावर निजाम अद्ययावत् यंत्रसामग्री गोळा करीत होता. रझाकार संघटणेचें सामर्थ्य लोकांना त्रासदायक होत होतें. अशा वेळीं निजामची सत्ता संपुष्टांत येणार म्हणून सर्व जनतेला संतोष वाटला. हिंदी सेनेचें आणि सेनानी राजेंद्रसिंहांचें सर्वत्र अभिनंदन करण्यात आलें.

—१३ सप्टेंबर १९४८

## भाद्रपद शु. १२ बटु वामनाचा अवतार!

भाद्रपद शु. १२ या दिवशीं दशावतारांतील पांचवा जो वामन याचा अवतार प्रगट झाला.

शतपथ ब्राह्मणांत या घडामोडीचें ऐतिहासिक स्वरूप दिलें आहे. देव आणि दैत्य यांच्या युद्धांत देवांचा पाडाव झाला. तेव्हां देवांच्या वतीने विष्णूनें 'वामन'रूप धारण करून असुरापाशीं थोडी जमीन मागितली. तत्कालीन बळिराजा सत्त्वशील असल्यामुळें त्यानें देवांना आपल्या राज्यांत आसरा दिला. पुढें विष्णूनें विराट रूप धारण करून सर्व विश्व व्यापून टाकिले तेव्हां सारा देशच देवांच्या ताब्यांत आला. विष्णूच्या या पराक्रमाचें गायन ऋग्वेदानें अभिमानपूर्वक केलें आहे. कालेंकरून विष्णु म्हणजे सूर्य आणि त्रिपाद म्हणजे उदय, मध्य व अस्त असा अर्थ होऊन विश्वांतील सर्व भुवने विष्णूच्या–सूर्याच्या 'तीन पावलां'तच मावतात अशी कल्पना रूढ झाली.

पौराणिक कथेचें बीज ऋग्वेदांतील विष्णूच्या वर्णनांत सांपडतें : "विष्णु म्हणजे सूर्यरूपी देवताच. तो जेव्हां उगवतो तेव्हां त्याचे पहिले पाऊल पडलें असे समजावयाचे ; तसेच तो मध्याह्नीं आकाशमंडळाच्या मध्यभागीं येतो तेव्हां त्याचें दुसरें पाऊल पडते व तो संध्याकाळीं मावळतो तेव्हां त्याचे तिसरें पाऊल पडतें असें समजावें. नित्य सूर्य मध्यान्हसमयीं आकाशाशिखरावर चढतो त्यालाच विद्वज्जन विष्णूचे परमपद (तद्विष्णोः परमं पदम्) म्हणतात." प्रसिद्ध सायणाचार्य पाहिलें पद पृथ्वी, दुसरें पद अंतरिक्ष व तिसरें पद द्युलोक असें मानतात.

वामनाने बळिराजाला सुतल नांवाच्या पाताळाचें राज्य दिले. यांतहि सांस्कृतिक पराक्रमाचा इतिहास आहे. अमेरिकेंतील पश्चिम किनाऱ्याला आपल्या पुराणग्रंथांतून पाताळ असे नांव आहे. तेव्हां त्या 'पातळां'त बळिराजानें भारतीय संस्कृतीचा विकास केला असावा. मध्य अमेरिका, मेक्सिको व पेरू हीं संस्कृतीचीं मोठीं केंद्रें होतीं. अमेरिकेचा 'शोध' लावण्याचें श्रेय भारतीयांचे आहे. इंद्र आणि गणेश हीं दैवतें आणि अनेक भारतीय चालीरीति अमेरिकेंत होत्या. त्यांचे पुरावे संशोधनखात्यानें दिले आहेत.



## नारायणराव पेशवे यांची हत्या !

भाद्रपद शु. १३ शके १६९५ या दिवशीं पुण्याच्या शनवारवाड्यांत नारायणराव शवे यांचा अमानुष खून झाला !

रघूजी आंग्रे यांना भेटून नारायणराव पेशवे भोजनासाठीं पर्वतीवर गेले होते. वण झाल्याबरोबर दोन प्रहरीं श्रीमंत, हरिपंत फडके यांचेसह शनिवारवाड्यांत त आले. आंत गारद्यांची कांहीं गडबड चालली होती; तिकडे लक्ष न देतां ावे वामकुक्षीसाठीं वाड्यांत आले. या हालचालीवर तुळ्या पवाराची दृष्टि तीच; त्यानें तयार असणाऱ्या गारद्यांना सूचना दिली. सुमेरसिंग व महंमद ाफ सातआठशें गारदी घेऊन वाड्यांत दाखल झाले. वाटेंत अडविणाऱ्या धसिंग जामदाराला त्यांनीं ठार केले. आबाजीपंत दरवाजा लावीत होता. तोहि र झाला. गाईमागें लपणाऱ्या इच्छाराम कारकुनास गाईसह मुकावें लागलें. ारायणराव भयभीत होऊन दिवाणखान्यांत काका–राघोबादादा–होते त्यांचेकडे ाऊन 'कांका मला वांचवा' म्हणून दादांच्या गळांमिठीं पडले. सुमेरसिंग जर झाला. "रावास सोडा, नाहीं तर दोघांचेही जीव जातील" असें त्यानें ाटल्यावर काकांनीं पुतण्यास लोटून दिलें. तुळ्या पवारानें नारायणरावांचा पाय रून ओढले, आणि सुमेरसिंगानें वार टाकिला. हुजऱ्या चापाजी टिळेकर व ाई नारोबा फाटक सोडविण्यास गेले त्यांच्यासह श्रीमंतांस कापून काढण्यांत ालें !

मराठ्यांच्या राजाचा असा भीषण वध झाला ! मराठ्यांचें भाग्य संपून त्यांच्या वास काळिमा लागला. मुसलमान राज्यकर्त्यांची या कामांतील प्रवीणता ाठ्यांत क्वचितच दिसून येते. नारायणरावांचा खून ही एक भीषण राज्यक्रांतिच य. येथून पुढें मराठी राज्यावर अनेक आपत्ति आल्या. अनेक संकटें आलीं. ांतून मराठी राज्य टिकूं शकलें नाहीं ! राघोबादादांचें नांवास मोठाच कलंक ागला. आम्हीं 'ध' चा 'मा' केला नाहीं असें आनंदीबाई वरचेवर म्हणत सली तरी सत्य गोष्ट सर्व महाराष्ट्रास विदित होती. राघोबादादाची सर्वच करणी ाठी राज्यास भोगावी लागली.

—३० ऑगस्ट १७७३

## भाद्रपद शु. १४ (१) पंधरा हजार स्त्रियांचा जोहार !

शके १२२५ च्या भाद्रपद शु. १४ या दिवशी चितोडगडावर पंधरा हजार रजपूत स्त्रियांनीं इस्लामी विटंबनेपासून मुक्त व्हावें यासाठीं जोहार करून आत्मबलिदान केलें.

चौदाव्या शतकाच्या सुरुवातीस आपल्या चुलत्याला कपटानें मारून अल्ला-उद्दिन दिल्लीच्या गादीवर बसला. या जुलमी आणि अत्याचारी सुलतानानें असंख्य भारतीय राजांचे मुकुट धुळीस मिळविले. मेवाडचा आदित्यध्वज मात्र चितोडगडावर गौरवाने तळपत होता. त्या देशाची स्वामिनी पद्मिनी आपल्या सौंदर्यानें शोभत होती. हें लावण्यकमल रुक्ष अशा राजस्थानांत असण्यापेक्षां दिल्लीच्या पातशाही वाड्यांत अधिक खुलून दिसेल, अशा उन्मादानें वेडावून अल्लाउद्दिनानें सन १३०३ मध्यें चितोडगडावर फार मोठा हल्ला केला. त्या वेळीं मेवाडचा अधिपति रत्नसिंह मारला गेला तेव्हां वृद्ध लक्ष्मणसिंह सेनापति झाला आणि आपल्या सातहि पुत्रांसहित त्यानें मातृभूमीच्या संरक्षणासाठीं सुरू असलेल्या यज्ञकुंडांत आपले बळी दिले.

शूरवीरांचें हें आत्मसमर्पण होण्यापूर्वी चितोडगडावर दुसरें एक दिव्य पार पडलें. चितोडचा सर्वनाश होण्यापूर्वी, या सर्व वीरांगनांनीं आपल्या पतींच्या आधीं स्वर्गाची वाट धरली. या प्रसंगाचें टॉडनें वर्णन केलें आहे : "पंधरा हजार राजपुतिनी चिडोडगडावर एकत्र जमल्या. पद्मिनीसह मंगल सुवासिनींचा पोषाख चढवून सर्व जणी तळघरांत शिरल्या. तेथें सर्व प्रकारचे ज्वालाग्राही पदार्थ भरलेले होते. सौंदर्यराणी पद्मिनीच्या सभोंवार बसून सौभाग्याची मंगल गीतें गाणाऱ्या त्या सर्व राजपुतिनींच्या शीलसंरक्षणार्थ राजपूत वीरांनीं स्वहस्तें त्या तळघरास अग्नि लाविला, आणि स्वतः एकलिंगजीचा जयघोष करीत ते सर्व यवनसैन्यावर तुटून पडले. थोड्याच वेळांत चितोड अल्लाउद्दिनाच्या स्वाधीन झाला. पण तेथें काय होतें ? चितोडचें एक कुत्रेंहि पारतंत्र्यांत राहावयास तयार नव्हतें. दगड, विटा व माती यांनीं भरलेला तो निर्जीव गड पाहून क्रूर अल्लाउद्दिनाचें काळीज थरारलें. पंधरा हजार स्त्रियांच्या जोहाराचें तें भयंकर दृश्य पाहून त्याची दृष्टि क्षणभर अंध झाली."

— २६ ऑगस्ट १३०३

## भाद्रपद शु. १४ (२) राममोहन रॉय यांचें निधन !

शके १७५५ च्या भाद्रपद शु. १४ या दिवशीं भारतांतील पहिले समाज-सुधारक, ब्राह्म समाजाचे संस्थापक, राजकारणी मुत्सद्दी व नवयुगप्रवर्तक, राजा राममोहन रॉय यांचें निधन झालें.

हुगळी जिल्ह्यांतील राधानगर या गांवीं शके १६९४ सालीं यांचा जन्म झाला. यांच्या पित्याचें नांव रमाकान्त असून आईचें नांव तारिणीदेवी असें होतें. राममोहनांनीं पाटणा येथें राहून अरबी व फारसी भाषाचा चांगला अभ्यास केला. त्यामुळें यांच्यावर सूफी मताचा परिणाम होऊन यांचे विचार मूर्तिपूजेच्या विरुद्ध बनूं लागले. यांच्या सुधारकी मतांमुळें अनेक वेळां यांना घराबाहेर पडण्याचे प्रसंग आले. घराबाहेर पडल्यानंतर बौद्ध धर्माचा अभ्यास करण्यासाठीं हे हिमालयांतून पायीं तिबेटमध्यें गेले. पण तेथें तर मूर्तिपूजेचें विकृत दर्शनच त्यांना झालें. तेथून परत आल्यावर काशी येथें राहून यांनीं धर्मशास्त्र व संस्कृत विद्या यांच्या अध्ययनांत बरेच दिवस खर्च केले. त्यानंतरत्यांचा ' तुहफत-उल्-मुवाहउद्दीन ' ( एकेश्वरीवाद्यास देणगी ) हा ग्रंथ प्रसिद्ध झाला. पुढें हे कलकत्ता येथें आले आणि सन १८१५ मध्यें आत्मीय सभा स्थापन करून त्यांनीं धर्म-चर्चा सुरू केली; आणि त्यासाठीं उपनिषदांचीं भाषांतरें बंगाली, इंग्रजी व हिंदी या भाषांतून यांनींच प्रसिद्ध केलीं. सन १८१८ मध्यें सती जाण्याविरुद्ध चळवळ करून तसा कायदा करण्यास यांनीं मोठीच मदत केली. नवविचारांनीं भारलेल्या राममोहनांनीं स्वतः पैसा खर्च करून एक हिंदु कॉलेज काढून भौतिक ज्ञानाच्या प्रतिपादनाचा पुरस्कार केला. जुन्या तत्त्वज्ञानाच्या अभ्यासासाठीं यांचें एक वेदान्त कॉलेजहि निघालें. सन १८२८ मध्ये शिक्षण, सुधारणा, मूर्तिपूजाविरोध, एकेश्वरवाद या सर्वांवर आधारलेला व हिंदु संस्कृतीचा पुरस्कार करणारा ब्राह्म समाज यांनीं काढला. कांहीं राजकीय कामासाठीं हे सन १८३१ मध्यें इंग्लंडला गेले. तिकडेच ब्रिस्टल येथें युरोपियन स्त्रीपुरुषांच्या सहवासांत यांचा अंत झाला. अनेक प्रकारचीं नियतकालिकें चालवून यांनीं सुधारणा केली. बंगाली गद्याचे आद्य प्रवर्तक म्हणून यांचें नांव विख्यात आहे.

— २७ सप्टेंबर १८३३

## भाद्रपद शु. १५ — गोवध-बंदीचें फर्मान !

शके १७११ च्या भाद्रपद शु. १५ रोजीं मराठेशाहींतील प्रसिद्ध शूर, मुत्सद्दी महादजी शिंदे यांनीं समग्र हिंदुस्थानांत गोवध मनाई करण्यासंबंधींचें फर्मान बादशहापासून मिळविलें.

मराठी साम्राज्याचा विस्तार धर्म व संस्कृति यांच्या रक्षणासाठींच होता. यावनी आक्रमणांत भ्रष्ट झालेलीं देवस्थाने सोडाविणें हें एक कर्तव्यकर्म मराठ्यांना होऊन बसलें होतें. काशी, प्रयाग, मथुरा, अयोध्या हीं पवित्र स्थानें स्वतःच्या ताब्यांत असावींत, इस्लामी शत्रूचा उपद्रव यांना मुळींच होऊं नये यासाठीं मराठे नेहमीं दक्ष असत. मथुरा शहरीं महादजी शिंद्यांचा सात वर्षांचा काळ गेल्यामुळें त्यांचें तें आवडते शहर झालें होतें. खुद्द महादजी हेहि धार्मिक मनोवृत्तीचे होते. त्यामुळें मथुरा आपल्या ताब्यांत असावी अशी खटपट त्यांची होतीच. 'मथुरा-वृंदावन' हीं दोनहि स्थळें सरकारचे नांवें पातशहाकडून करून घ्यावींत असा आग्रह दक्षिणेतून नाना फडणीसहि धरीत होते. पुढें महादजींनीं मोठा प्रयत्न करून शके १७१२ मध्ये बादशहापासून मथुरा-वृंदावनच्या सनदा मिळविल्या. त्यापूर्वींच शिंदे यांनीं गोवधबंदीचें फर्मानहि बादशहापासून भाद्रपद शु. १५ ला मिळविलें होतें. गोवधाविरुद्ध शिवाजीमहाराज किती कष्ट करीत होते हें प्रसिद्धच आहे. गाय हा हिंदूंचा मानबिंदु समजला जातो. पैगंबरानेसुद्धां चार पापकर्मांत गोवध हें प्रमुख पापकर्म म्हणून सांगितलें आहे. महादजींच्या आग्रहावरून बादशहानें गोवधबंदीचा हुकूम काढला., त्याचा सारांश याप्रमाणें आहेः "पशु सुद्धां विधात्याच्या सृष्टींतील जीव असून ते निरुपयोगी होत असें समजूं नये. त्यांतहि विशेषतः बैल व गाय हे प्राणी अगणित लाभ देणारे आहेत ...... जनतेचा संसार व निर्वाह चालण्यास गाईची अत्यंत जरूरी आहे आणि गाईवरच मनुष्यांचें व पशूंचें जीवन अवलंबून आहे ... म्हणून आम्ही आपल्या उदार अंतःकरणानें व हर्षपूर्ण दृष्टीनें आमच्या समस्त राज्यभूमीमध्यें गोकुशाचा म्हणजे गोहत्येचा परिपाठ सर्वथैव मना करीत आहोंत."

— ४ सप्टेंबर १७८९

## भाद्रपद व. १ बाजीराव पेशव्यांचा जन्म !

शके १६२२ भाद्रपद व. १ ह्या दिवशीं 'हिंदुपदपातशाही' स्थापन करणारे प्रतापी पेशवे श्रीमंत बाजीरावसाहेब यांचा जन्म झाला !

पहिले बाजीराव म्हणजे पराक्रमाचा मूर्तिमंत पुतळाच. त्याचें संबंध जीवितच मराठी राज्याचा विस्तार करण्यांत गेलें. 'निजाम, नबाब, इत्यादि लहान लहान सत्ताधीशांशीं भांडत बसण्यांत अर्थ नाहीं. एकदम दिल्लीचाच रोख धरिला पाहिजे. कारण मूळ उपटले कीं फांद्या खालीं येतील.' अशी बाजीरावाची धमक होती. आणि म्हणूनच उत्तरेच्या राज्यकारभाराकडे त्यांनीं अधिक लक्ष पुरविलें. भोपाळ, पालखेड साखरखेडले, मंगीशेगांव, इत्यादि अनेक ठिकाणांवर बाजीरावानें वेळोवेळीं निजामाचा पराभव केला आहे आणि उत्तर हिंदचें राजकारणहि त्यानें सांभाळलें होतें. बाजीराव जर उत्तरेंत घुसला नसता तर? –"पुनश्च एखादा अल्लाउद्दीन खिलजी, अकबर किंवा औरंगजेब उत्तरेकडची प्रचंड सेना घेऊन दक्षिणेंत उतरला असता. बाजीरावानें आपल्या अद्भुत पराक्रमाने ही आपत्ति दूर केली. बाजीरावाने भीमथडीचीं तट्टे नर्मदापार नेल्यापासून उत्तरेकडचे काबुली घोडे दक्षिणेंत यावयाचे कायमचे बंद झाले. —"

निजामाला बाजीरावाचा दरारा फारच वाटे. रजपूत वकील दीपसिंह निजामाच्या भेटीस गेला होता. तो नुकताच पेशव्यांना भेटून आल्यामुळें निजामानें विचारले, "— पेशव्यांच्या दरबारांत मातबर असें कोण आहे ? "त्यावर दीपसिंगजींनीं उत्तर दिल्हे जे सिवाये बाजीराउजी आणिक कोन्ही सत्यवचनी अगर प्रामाणिक अगर पोख्तकारी अगर चलनसाहेब फौज (मोठी फौज उभी करूं शकेल असा) दुसरा दिसत नाहीं. —" अशा या सैनिक पेशव्याचें निधन त्याला साजेल असेंच लष्करी छावणींत रावेर येथें झालें. बाजीरावाच्याच पराक्रमामुळें हिंदुपदपातशाहीची स्थापना झाली. नंतरच्या काळांत मराठ्यांचा भगवा झेंडा सर्व उत्तर हिंदुस्थानांत फडकला आणि मराठेशाहीचा प्रभाव सर्व भारतांत पडूं लागला याचें बरेंचसें श्रेय पहिले बाजीराव यांनाच द्यावें लागेल.



— १८ ऑगस्ट १७००

## भाद्रपद व. २ धारवाडास मराठ्यांचा वेढा !

शके १६७६ च्या भाद्रपद व. २ रोजीं माधवराव पेशवे यांनीं हैदरविरुद्ध पुकारलेल्या युद्धांतील मुख्य ठाणें धारवाड यास वेढा दिला !

माधवरावांचे लक्ष उत्तरेकडे फारसें नव्हतें. दक्षिण देशाचें राजकाण मात्र त्यांनीं चांगलेंच केलें. त्यांच्या एकंदर पांच स्वाऱ्या कर्नाटकांत झाल्या. त्यांपैकीं पहिल्या चारांत तो स्वतः हजर होता. पहिल्या स्वारींत धारवाडपासून तुंगभद्रे-पर्यंत तो फक्त खंडण्या घेऊन आला. दुसऱ्या या स्वारींत तुंगभद्रेपर्यंतचा प्रदेश मराठ्यांना मिळाला. सावनूर, धारवाड, रट्टेहळ्ळी, हावेरी, अनवडी येथे प्रचंड संग्राम झाले. मराठ्यांचा पानपतवर नुकताच मोठा संहार झालेला पाहून मराठ्यांच्या शत्रूंचे चांगलेंच फावले. कृष्णा नदीच्या दक्षिणेकडील मराठ्यांचा सर्व अमल हैदरअल्लीने उठवून लावला. शिरे, होसल, कोटें, बाळापूर, इत्यादि मराठ्यांचे मुख्य प्रांत त्यानें बळकावले. रामदुर्ग, हरपनहळ्ळी व चित्रदुर्ग येथील मराठ्यांच्या मांडलिकांना जिंकिलें. मराठ्यांना हैदरचे प्रताप समजत होते; आणि राक्षसभुवनाचा संग्राम संपल्याबरोबर माधवरावानें कर्नाटकाचेंच काम हातीं घेतले. पंधरा हजार हुजरात व इतर जहागिरदारांची फौज मिळून एकंदर चाळीस हजार सैन्य खडें झालें. सावनूरकर नबाब व गुत्तीचा मुरारराव घोरपडे हे येऊन मिळाल्यावर ती फौज सत्तर हजारांपर्यंत वाढली. तुंगभद्रेअलीकडचीं सर्व ठाणीं माधवरावानें सोडवलीं. चित्रदुर्ग, हरपनहळ्ळी येथून खंडणी वसूल केली. रट्टेहळ्ळीजवळ हैदरचा प्रचंड पराभव केला. धारवाड हें हैदरचें मुख्य ठाणें होतें; त्यालाच भाद्रपद व. २ रोजीं माधवरावानें वेढा घातला. "किल्ला मातबर. दुहेरी कट, दोन खंदक, आंत दारू व गोळी नाहींशी झाली; त्यामुळें तहास आले आणि सलुखावर घातले. अबरूने पार करून देणें, म्हणून गोपाळराव पटवर्धनास आणून त्याच्यामार्फत किल्ला खालीं करविला. हत्यार व वस्तभावसुद्धां बाहेर काढून दिले. नारो त्रिंबक एकबोटे यांनीं विशेष पराक्रम केल्यामुळें त्यांस श्रीमंतांनीं पालखी दिली." याप्रमाणें दोनअडीच महिने काम चालून कार्तिक शु. १२ रोजीं धारवाड मराठ्यांच्या हातांत आलें.

— १७ सप्टेंबर १७६४

## भाद्रपद व. ३ "मुलुक-इ-मैदान"

शके १५५४ च्या भाद्रपद्र व. ३ रोजीं मुरार जगदेव यानें मोंगलांचा पराभव करून परिंडा किल्ल्यावरील मुलुक-इ-मैदान तोफ विजापूर येथें आणली.

मुरार जगदेव हा विजापूरच्या आदिलशाहींत मुख्य वजिराचा कारभारी होते. याच वेळीं मोंगली फौज दक्षिण देशाचा एक एक प्रांत जिकीत चालली होती. तेचें लक्ष विजापूरवर गेले. शहाजहान बादशहाने परिंडा किल्ल्यावर स्वारी केली. त्या वेळीं मुरार जगदेव यासच सरलस्कर करून पाठवण्यांत आलें. त्यानें मोठाच पराक्रम करून परिंडा सोडवला. याच किल्ल्यावर विख्यात अशी मुल्क-इ-मैदान ( रणभूमीचा राजा ) या नांवाची तोफ होती. "-पूर्वी हा किल्ला निजामशहाचे ताब्यांत असतांना ही तोफ चलीबीरूमीखांनें निजामशहाचे सांगण्यावरून ·अहंमदनगरपासून एक कोसावर ओतली होती. तालीकोटच्या लढाईत रामरायावर चाल करण्याचे प्रसंगीं निजामशहानें हिला बरोबर घेतली होती. ही तोफ अष्टधातूंची ओतली असून तिचें वजन साठ खंडी आहे. लांबी चौदा फूट व परिघ तितकाच आहे. तोंडाच्या पोकळीचा व्यास बरोबर दोन फूट चार इंच आणि जाडी एक फूट आहे. हिच्या तोंडास सिंहाच्या जबड्याचा आकार आहे; आणि त्यानें तोडांत हत्ती धरला आहे असें दृश्य आहे. भाविक लोक हिची अजून पूजा करतात. लोकांनीं वारंवार हात फिरवल्यामुळें ती साफ चकचकीत झाली आहे. महंमदशहानें सांगितल्यावरून मुरार जगदेवाकडून ही तोफ परिंड्याहून विजापूरला आणली. दुसरी एक कडक बिजली म्हणून तोफ होती, ती आणण्यासहि यास हुकूम झाला होता, पण आणीत असतां ती कृष्णा नदींत बुडाली. ती अद्यापि तेथें दिसते."

या पराक्रमी मुरार जगदेवाचा अंत मोठ्या हृदयद्रावक रीतीनें झाला. महंमदशहानें वजीर दौलतखान ऊर्फ खवासखान यास सिद्दी रेहानकरवीं ठार मारलें व मुरार जगदेवास पकडून कैद केलें. निराशेच्या भरांत हा अद्वातद्वा बोलूं लागला, तेव्हां याची जीभ कापून, गाढवावरून धिंड काढण्यांत आली आणि याचे तुकडे करून यास ठार करण्यांत आलें.

— २२ ऑगस्ट १६३२

भाद्रपद व. ४ **परशुरामभाऊ पटवर्धनांचें निधन !**

शके १७२१ च्या भाद्रपद व. ४ रोजीं माधवराव पेशवे यांच्या कारकीर्दी-तील मराठी सेनापति परशुरामभाऊ पटवर्धन यांचें निधन झालें.

शके १६६१ मध्यें परशुरामभाऊ पटवर्धन याचा जन्म झाला. यांचे वडील रामचंद्रपंत पटवर्धन पेशव्यांकडे फडणीस म्हणून असत. वडिलांचेंच पथक परशुरामभाऊंकडे आल्यावर सावनूरच्या मोहिमेंत हे प्रथम लढाईवर गेले. हैदरा-वरील युद्धांत यांचीं एकामागून एक अशीं तीन घोडीं मरून गेलीं. तरीसुद्धां यांनीं मोठा पराक्रम गाजवून हैदरचा पराभव केला. तेव्हां पेशवे यांनीं परशुरामभाऊ यांना वीस हजारांची तैनात दिली. सन १७८१ मध्यें इंग्रज सेनापतीशीं यांनीं एक लढा दिला. सेनापति गॉडर्ड हा बोरघाट काबीज करून खोपोली येथें येऊन राहिला होता. या वेळीं परशुरामभाऊ कोंकणांत उतरून गॉडर्डच्या फौजेस अतिशय त्रास देऊं लागले. शेवटीं इंग्रजांचें मुंबईशीं असलेलें दळणवळण बंद पाडून त्यांनीं गॉडर्डचा पुरता मोड केला. खर्ड्याच्या प्रसिद्ध लढाईत हेच मुख्य सेनापति होते. " मराठेशाहींत व विशेषतः पेशवे यांच्या कारभाराचें हृद्गत ओळखून आत्मिक भावनेने तिचा पुरस्कार करणारा भाऊसारखा दुसरा इसम झाला नाहीं. हा कांहींसा ठेंगणा, सावळ्या वर्णाचा व पुष्ट होता. शौर्याबद्दल याची विशेष ख्याति होती. याचे काळेभोर डोळे व उत्साह-पूर्ण चर्या पाहतांच याच्या शौर्यादि गुणांची एकदम ओळख पटे. कार-स्थानापेक्षां लढवय्या म्हणवून घेण्याची याला विशेष हौस असे. टिपूच्या विरुद्ध मराठ्यांच्या बाजूनें यानें बरीच कामगिरी केली. परशुरामभाऊ व हरिपंत हे दोघे वाटेल त्या संकटांत नानाकडे धांवत येऊन त्याची कामगिरी जिवास जीव देऊन तावडतोब उठवीत; म्हणूनच नानाचा कारभार उरके–" यांच्याविषयीं बाजीरावाचा अभिप्राय असा आहे :—

"भाऊंस नानांनीं मजकडे जुन्नरास पाठविलें तेव्हां त्यांस पाहून बहुत संतोष झाला, आधीं भाऊ वृद्ध, त्यांतून एकवचनी, जितेंद्रिय, कुटुंबवत्सल आणि प्रसन्नवदन पाहोन त्यांचे पायावर मस्तक ठेवला आणि वडिलांचे जागीं त्यांस मानून मी व चिमण्या असे त्यांजबरोबर खडकीचे मुक्कामास आलों."

— १७ सप्टेंबर १७९९

## भाद्रपद व. ५ — दक्षिणेंतील स्वातंत्र्य-समराचा अस्त !

शके १७७९ च्या भाद्रपद व. ५ रोजीं सत्तावनच्या क्रांतियुद्धांत भाग घेणाऱ्या दक्षिण महाराष्ट्रांतील अठरा जणांना सातारा येथील गेंड्यांच्या माळावर फांशीं देण्यांत आलें. त्यांत रंगो बापूजींचा मुलगा सीताराम व इतर नातेवाईकहि होते.

सन १८५७ मध्यें उत्तर हिंदुस्थानांत स्वातंत्र्ययुद्धाच्या भयंकर ज्वाला भडकल्या होत्या. त्याची झळ महाराष्ट्रालाहि लागल्यावांचून राहिली नाहीं. साताराचे राजे प्रतापसिंह हालअपेष्टांत मृत्यु पावले, त्याच्या बंधूंचा अंत होतांच साताराचें राज्यहि खालसा झालें, चौदा वर्षे इंग्लंडमध्यें धन्यास न्याय मिळावा म्हणून जीव तोडून श्रम करणाऱ्या रंगो बापूजींस न्याय मिळण्याच्या बाबतींत अपयश येऊन ते महाराष्ट्रांत आले होते. या परिस्थितींत सर्वत्र असंतोष धुमसत होता. रंगोबांनीं पुन्हा बरीच हालचाल केली. उत्तर हिंदुस्थानांत जाऊन त्यांनीं नानासाहेबांची गांठ घेतली. “माझ्याजवळचे हजार गडी नि माझे दोन पुतणे तुमचा निरोप येतांच इकडे रवाना करतों, उत्तरेकडे पंचारतीचा गजर झालेला ऐकूं येतांच, दक्षिणेंत मी नौबदीवर टिपरी हाणतो” असें आश्वासन रंगोबांनीं नानासाहेबांना दिलें. दक्षिणेंतील साऱ्या उठावाची जबाबदारी त्यांनीं आपल्या शिरावर घेतली. ३१ जुलैला पेटलेली क्रांतीची ज्योत धूर्त इंग्रजानें ताबडतोब विझविली. फंदफितुरीचा सुळसुळाट झाला होता. रंगो बापूजी रत्नागिरीच्या किल्ल्यांत अडकले गेले. त्यांचा मुलगा सीताराम व इतर आप्तगण इंग्रजांच्या हातीं आले. प्रचंड उत्थानाचा पुरावा उघडकीस आला. भाद्रपद व. ५ रोजीं सीताराम गुप्ते (रंगोबांचे चिरंजीव), बेळगांवच्या शिपायांचा पुढारी ठाकुरसिंग, मुनशी, सावंतवाडीचा रामजी शिरसाळ, इत्यादि अठरा पुढाऱ्यांना सातारा येथें इंग्रजी राजसत्तेनें फांशीं दिलें. हा ‘समारंभ’ पाहण्यासाठीं खेड्यापाड्यांतून हजारों लोकांना मुद्दाम आणले होतें. कटवाल्यांचे पुढारी रंगो बापूजी वस्ताद होते. त्यांनीं तुरुंगांतून पोबारा केला. इंग्रजांनीं शोधाची शर्थ केली पण बहादुर सांपडला नाहीं. त्यांचा मृत्यु कोठें झाला, कशानें झाला, हें एक गूढच आहे.

— ८ सप्टेंबर १८५७

## भाद्रपद व. ६ "गीता-ज्ञानेश्वरी प्रति शुद्ध केली!"

शके १५०६ च्या भाद्रपद व. ६ रोजीं प्रसिद्ध संत एकनाथ यांनीं श्री. ज्ञानदेवांच्या सूचनेवरून 'ज्ञानेश्वरी'ची प्रत शुद्ध करून तिचा प्रसार सुलभ केला.

पारमार्थिक ज्ञान अत्यंत सुलभ करून तें लोकभाषेंत सांगण्यास ज्ञानदेवांनीं जेव्हां सुरुवात केली तेव्हां महाराष्ट्रांत एक क्रांतिच होऊं लागली. कृपण असणाऱ्या वेदांचें सार मराठी भाषेंत आल्यामुळे आबालवृद्धांना आणि स्त्रीशूद्रादिकांनाहि परमार्थज्ञान होऊं लागले. 'ब्रह्मविद्येचा सुकाळ' सर्व महाराष्ट्रांत झाला. भागवत धर्माच्या संघटनेचा पाया याच ज्ञानदेवीच्या आधारें घालण्यांत आला. शके १२१२ मध्ये या ग्रंथाचा जन्म झाला. आणि या सारस्वताच्या झाडाखालीं अनेक जीवांनीं विश्रांति घेतली. परंतु ज्ञानदेवांची अवतारसमाप्ति झाल्यानंतर थोड्याच दिवसांत महाराष्ट्राचें स्वराज्य नाहींसे होऊन जिकडे तिकडे इस्लामी संस्कृतीचा चांद झळकूं लागला. बहुजनसमाजापासून ज्ञानदेवी ग्रंथ दूर झाल्यामुळे सौख्याचा ठेवाच हरपल्याप्रमाणें होऊन गेले. सोळाव्या शतकांत एकनाथांचा प्रभाव महाराष्ट्रांत पडूं लागल्यावर ज्ञानदेवीचा उद्धार करण्याचें काम सहजच त्यांच्याकडे आले. यासंबंधीं नाथ एका अभंगांत म्हणतात :—

"श्रीज्ञानदेवे येऊनी स्वप्नांत। सांगितली मात मजलागीं
अजान वृक्षाची मुळी कंठास लागली। येऊन आळंदी काढ वेगी॥"

याप्रमाणे ज्ञानदेवांचा संदेश एकनाथांना मिळाला. 'अजान वृक्ष' म्हणजे रूपकानें अज्ञान-वृक्ष असण्याचा संभव आहे. आदेशाप्रमाणे एकनाथांनीं आळंदीस येऊन समाधीचे दार उघडलें, आणि त्यांनीं ज्ञानदेवांपुढील प्रत घेतली व पैठणास आल्यावर तिचे शुद्धीकरण केलें. त्यासंबंधींच्या ओव्या महत्त्वाच्या आहेत :—

"श्री शके पंधराशें साहोत्तरीं। तारणनाम संवत्सरीं॥
एकाजनार्दनें अत्यादरीं। गीता-ज्ञानेश्वरी प्रति शुद्ध केली॥
बहुकाळ पर्वणी गोमटी। भाद्रपद मास कपिलाषष्ठी।
प्रतिष्ठानीं गोदातटीं। लेखनकामाटी संपूर्ण जाली॥"

— १५ सप्टेंबर १८५४

## भाद्रपद व. ७ धोंडोजी वाघाचा मृत्यु !

शके १७२२ च्या भाद्रपद व. ७ रोजीं प्रसिद्ध पुरुष धोंडोजी वाघ हा इंग्रजांकडून ठार झाला.

मराठेशाहीच्या पडत्या काळांत दक्षिणेंत धोंडोजी वाघाचें मोठेंच प्रस्थ होतें. याचें मूळचें आडनांव पवार असे असून सिधोजी व बहिरजी पवार हे दोघे बंधु आदिलशाहीच्या नोकरीस होते. अनागोंदीजवळ कृष्णाकांठच्या रानांतून यांनीं वाघिणीचें दूध आणून दिल्याबद्दल सुलतानानें त्यांस 'वाघ' हा किताब दिला. धोंडोजी वाघ हा प्रथम कांहीं दिवस पटवर्धन व करवीरकर यांच्या फौजेत चाकरीस होता. टिपू व मराठे यांच्या मुलखांत धोंडोजीने अनेक प्रसंगीं दंगेधोपे करून लुटालूट केली. शेवटीं टिपूनें याला कैदेंत ठेविलें. टिपू मेल्यानंतर त्याचें राज्य इंग्रजांकडे आलें. त्या वेळीं सर्व कैद्यांना मुक्त करण्यांत आलें. त्यांत धोंडोजी वाघहि सुटला; लागलीच जमवाजमव करून इंग्रजांनाहि उपद्रव देण्यास यानें सुरुवात केली. जनरल आर्थर वेलस्ली हा टिपूच्या राज्याचा बंदोबस्त पाहत होता. तुंगभद्रेच्या दक्षिणेस पुंडाई करणाऱ्या धोंडोजीचें पारिपत्य करण्याचें इंग्रजांनीं ठरविलें. पटवर्धन, इंग्रज व व धोंडोपंत गोखले यांच्या फौजा एकत्र झाल्या. परंतु वाघानें मोठ्या धोरणानिशीं गोखल्यांच्या फौजेचा पराभव केला. धोंडोजीची प्रतिष्ठा फारच वाढली. वाघाचें शिर आणून देणारास हजार रुपयांचें बक्षीस जाहीर झालें! इंग्रज आणि पटवर्धन यांनीं मोठी योजना आंखून चोहो बाजूंनीं वाघास कोंडण्याचा विचार केला. हें वृत्त धोंडोजीस समजलेंच. लागलीच तो मलप्रभेचा कांठ सोडून पूर्वे दिशेस कृष्णा-तुंगभद्रा यांच्या दरम्यान रायचूरच्या दुआबांत शिरला. मागून त्याचा पाठलाग होत होता. शेवटीं कोठेंहि जाण्यास अवकाश राहिला नाहीं तेव्हां भाद्रपद व. ७ रोजीं धोंडोजी वाघ ठार झाला. "वाघ रात्रीसच पळून जातो कीं काय या धसक्यामुळें इंग्रजांना चैन नव्हते...पहांटेस कूच करून वस्लीनें सूर्योदयास भन्नूर येथें वाघास गांठलें. तो लगेच तयार होऊन लढाईस उभा राहिला. लढाईत तीन गोळ्या लागून वाघ ठार झाला. फौज उधळून गेली."

— १० सप्टेंबर १८००

## भाद्रपद व. ८ कवि दासोपंत यांचा जन्म !

शके १४७३ च्या भाद्रपद व. ८ रोजीं मराठीमध्यें अफाट कवितासमुद्र निर्माण करणारे कवि दासोपंत देशपांडे यांचा जन्म झाला.

बिदरच्या बहामनी पातशाहींतील नारायणगांवी राहणाऱ्या दिगंबरपंत देशपांड्यांचे दासोपंत हे चिरंजीव. यांची परंपरा नाथसंप्रदायी असली तरी उपासना मात्र दत्ताची होती. संस्कृत आणि प्राकृत या दोनहि भाषांमध्यें यांचें पांडित्य दिसून येई. गीतेवरील यांचा 'गीतार्णव' नांवाचा अति प्रचंड ग्रंथ आहे. 'दासोपंती केला गीतार्णव मानवा सवालाख' असे त्यासंबंधीं मोरोपंतांनीं म्हटलें आहे. तत्कालीन यवन राजसत्तेस न जुमानतां मोठ्या अभिमानानें स्वत्व सांभाळून दासोपंतांनीं साठसत्तर ग्रंथांची रचना मराठींत केली आहे. 'गीतार्थबोध', 'ग्रंथराज', 'पंचीकरण', 'दत्तात्रेयमाहात्म्य', 'अवधूतगीता', 'शिवस्तोत्र', 'भक्तिराजकवच', आदि किती तरी ग्रंथ यांचे प्रसिद्ध आहेत. असें सांगतात कीं, यांना रोज एक ढब्बू पैशाची शाई लागत असे. यांच्या प्रसिद्ध अशा गीतार्णवाबद्दल कै. ल. रा. पांगारकर लिहितात, "याच्या पहिल्या अध्यायाच्या ओव्या ३१३३ असून दुसऱ्या अध्यायाच्या ओव्या ५६५५ आहेत. सव्वा लाख ओवींपैकीं सुमारें तेरा हजार ओवी छापली गेली आहे.... हा ग्रंथ असा अफाट असला तरी अगदीं सुबोध, शुद्ध मराठींत लिहिलेला व चटकदार आहे. पाण्याच्या ओघाबरोबरच फूल जसें सर्कन् वाहून जातें त्याप्रमाणें वाचक एकदां वाचायला लागला कीं ग्रंथाच्या ओघाबरोबरच सहजरीत्या वाहवला जातो. ग्रंथकार अत्यंत विद्वान् व वेदान्तवेत्ते होते यांत शंका नाहीं पण त्यांनीं गीतेचा विषयहि शास्त्रीय परिपाठी बाजूला ठेवून निव्वळ मराठी माणसाला वाचतां वाचतां सहज समजावा इतका सुबोध केला आहे.... नाथांच्या वेळचा कोणताच ग्रंथ इतका बालबोध नाहीं." यांच्या 'ग्रंथराज' ग्रंथांत अध्यात्मविषय खुलासेवार सांगितला आहे. याशिवाय दासोपंतांचीं स्फुट पदेहि अत्यंत मधुर अशींच आहेत. त्यांच्या निर्मल अंतःकरणाचें प्रतिबिंब त्यांच्या पदांत स्पष्ट पडलें आहे.

—२४ सप्टेंबर १५५१

## भाद्रपद व. ९ — शि. म. परांजपे यांचें निधन !

शके १८५१ च्या भाद्रपद व. ९ रोजीं शुद्ध स्वातंत्र्याचे पहिले उपासक, मराठींतील प्रतिभाशाली लेखक आणि वक्ते, ध्येयवादी पत्रकार शि. म. परांजपे यांचे निधन झालें.

'महाराष्ट्र कॉलेजां'त संस्कृत शिकवणाऱ्या या पंडितानें १८९८ सारख्या बिकट काळांत 'काळ' पत्र काढले आणि साऱ्या तरुण महाराष्ट्राला आपल्या प्रभावी लेखनशैलीनें शुद्ध स्वातंत्र्याचें मूर्तिमंत दर्शन घडविलें. प्रो. परांजपे यांनीं नाटकें लिहिलीं, कादंबऱ्या लिहिल्या, तर्कशास्त्र, अर्थशास्त्र यावर ग्रंथ लिहिले, परंतु 'काळ' पत्रांतलि वाङ्मय आपल्या तेजस्वितेने चमकत आहे. त्यांतील ध्येयवादाची भरारी नंतरच्या त्यांच्या वाङ्मयांत ओतरली.

सन १९२८ सालीं बेळगांवच्या मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष म्हणून भाषण करीत असतांनाच शिवरामपंत दुखण्यानें भारावले होते. तेथून परत आल्यावर २४ सप्टेंबरला ते 'मीराबाई' नाटकांतील प्रवेश लिहीत होते आणि त्याच वेळीं दुर्दैव त्यांच्या जीवित-नाटकाचा शेवटचा प्रवेश घडवीत होते. २५ सप्टेंबरपासून परांजपे बेशुद्धच होते. निरनिराळे डॉक्टरी इलाज चालू होते. परंतु सारे मानवी इलाज थकले-" दि. २७ सप्टेंबर रोजीं, सकाळीं सात वाजतां धुगधुगी राहिलेल्या पार्थिव शरिरांतील चैतन्याची ज्योतहि निघून गेली! 'काळ' पत्र चालू असतांना दर शुक्रवारी सकाळीं त्यांच्या वाड्यांतून 'काळ' बाहेर पडत होता, पण अखेर 'काळा'नें दावा साधून शुक्रवारीं दि. २७ ला सकाळीं त्यांनाच बाहेर काढलें.-"

गांवांत बातमी पोहोंचल्यावर हजारों लोक अण्णासाहेबांच्या दर्शनार्थ आले. सकाळीं अकरा वाजतां दिंड्या-भजनें यासह स्मशानयात्रा निघाली. वाटेंत शेंकडों पुष्पहार अर्पण होत होते. तीन तासांनीं यात्रा स्मशानांत पोंचली आणि गुण-गौरवपर भाषणें होऊन अण्णासाहेबांच्या देहाला अग्निसंस्कार देण्यांत आला. स्वातंत्र्याचें मूर्तिमंत दर्शन घडविणारा ध्येयनिष्ठ माणूस गेल्यामुळें सर्व देशाला हळहळ वाटली. आता शिवरामपंत 'काळांतील निवडक निबंधां'च्या रूपानें अमर आहेत.

—२७ सप्टेंबर १९२९

## भाद्रपद व. १० (१) इंग्रज-मराठ्यांचें पहिलें नाविक युद्ध!

शके १६०१ च्या भाद्रपद व. १० रोजीं इंग्रज-मराठे यांचे पहिलें नाविक-युद्ध झाले.

व्यापार करण्याच्या मिषानें हिंदुस्थानांत आलेले इंग्रज हळूहळू आपले हात-पाय पसरीत होते. मोगल व मराठे याच्याशीं त्यांना युद्धप्रसंग करावे लागले. सतराव्या शतकांत शिवरायांचा उदय झाला. आरमाराचें महत्त्व शिवरायांनीं चांगलेंच ओळखलें होतें. शिवाजीचा वाढता पराक्रम पाहून इंग्रज वचकून वागत. जंजिऱ्याचा सिद्दी तर प्रथमपासून 'घरांत जैसा उंदीर' तैसा मराठी राज्यास होता. हा सिद्दी शिवाजीस वारंवार उपद्रव देई. इंग्रज कधीं कधीं सिद्दीस आश्रय देत; अर्थातच इंग्रजांचें व शिवाजीचें वांकडें येई. खांदेरी-उंदेरी किल्ले शिवाजीने मुद्दाम बांधून घेतले. "फिरंगी फार प्रबळ झाले असें पाहून छत्रपतींनीं चांगलीशी खडकाळ जागा समुद्रांत पाहून तेथे किल्ला बांधण्यास आरंभ केला. शके १६०० भाद्रपद मासीं गौरीच्या मुळावर किल्ला बांधून तो लढाईचे फार उपयोगी असल्याकारणाने खांदेरी असें नांव ठेविलें." हा खांदेरी किल्ला या वेळीं इंग्रजांच्या ताब्यांत होता. सिद्दीस साह्य करणाऱ्या इंग्रजांस चांगलीच अद्दल घडावी म्हणून शिवाजीनें भर पावसाळ्यांत भाद्रपद व. १० रोजीं स्वारी करून खांदेरी किल्ला आपल्या ताब्यांत घेतला; आणि तेथें तटबंदी केली. यामुळें शिवाजीचा वचक इंग्रज व सिद्दी या दोघांनाहि बसला. शिवाजीच्या आरमारी सामर्थ्याबद्दल इंग्रजांना सदैव धास्ती वाटून राही. "शिवाजी स्वतः खलाशी नव्हता म्हणून बरें; नाहीं तर त्यानें जमिनीचा पृष्ठभाग साफ करून टाकिला त्याप्रमाणें समुद्राचांहि टाकिला असता." असें इंग्रज म्हणत. शिवाजीचा दरारा त्यांना फारच वाटे. सन १६८० मध्यें झालेल्या शिवरायांच्या निधनावर कलकत्ताकर इंग्रज विश्वास न ठेवतां लिहितात, "शिवाजी इतक्या वेळां मेला आहे कीं, तो अजून अमरच आहे. आजपर्यंत यास जिकडे तिकडे विजयच मिळत गेले आहेत. ...मराठ्यांच्या तावडींतून सुटल्याचा प्रत्यक्ष अनुभव आम्हांस जेव्हां येईल तेव्हांच शिवाजी खरोखर मेला असें आम्ही समजूं..."

— १९ सप्टेंबर १६७९

## भाद्रपद व. १० (२) कुतुबशाहीची समाप्ति !

शके १६०९ च्या भाद्रपद व. १० रोजीं गोवळकोंड्याची कुतुबशाही समाप्त झाली.

सन १३४७ मध्ये कलबुर्ग्यास बहामनीशाहीची स्थापना झाली. तिचें अस्तित्व १४९० पर्यंत टिकून १४९३ सालीं तिचीं पांच शकले झालीं. त्यांपैकीं कुतुबशाहीची स्थापना १५१२ मध्ये कुलि कुत्बशहा याने केली. या शाहीचा तेलंगणाशीं मुख्य संबंध होता. कमामेतचा राजा सीतापति, कंडापिलाचा राजा रामचंद्रदेव, ओढ्या प्रांतांतील बिडियाद्रि व हरिश्चंद्र, विजयनगरचा अधिपति कृष्णराय, इत्यादि हिंदु राजांशीं युद्ध करून कुतुबशाहीची स्थापना झाली होती. महंमद कुलि कुत्बशहा यानें १५८९ मध्यें मुशी नदीच्या कांठी एक शहर स्थापून आपल्या आवडत्या पत्नीचे-भागावतीचें-नांव त्या शहराला ठेविले. हेंच तें भागानगर. नंतर मुलाच्या–हैदरच्या-नांवावरून हें शहर हैदराबाद म्हणून प्रसिद्धीस आलें. शेवटचा अधिपति अबू हसन कुतुब हा १६५८ मध्ये गादीवर आला. याचा वजीर मदनपंत नांवाचा ब्राह्मण होता. १६८३ मध्ये औरंगजेबाची क्रूर दृष्टि दख्खनमध्ये थैमान घालीत होती. त्याने आपला मुलगा मुअज्जम व खानजहान यांचेबरोबर फौज देऊन त्यांना गोवळकोंड्यास पाठविलें. शहरांत गडबड माजली आणि त्यांत मदनपंत मारला गेला ! अबू हसनला औरंगजेबानें कळविले, – "तुम्ही ब्राह्मण दिवाण नेमलात, परधर्मी संभाजी राजे यांशीं दोस्ती केलीत, लढाईला तयार व्हा –" आणि गोवळकोंड्यास वेढा घातला. विश्वासघातानें अबू हसनला पदच्युत करून २१ सप्टेंबर १६८७ रोजीं गोवळकोंड्याचें राज्य आपल्या पदरीं औरंगजेबानें घेतलें.

कुतुबशाहींत जगदेवराव व रामराव या दोन सरदारांचे वर्चस्व बरेंच होतें. त्यामुळे कित्येक काळपर्यंत सबंध कुतुबशाही हिंदुमयच झाली होती. अर्थात् या राज्याचा संबंध महाराष्ट्राशीं विशेषेंकरून नव्हताच. तेलंगणांतील लहानसान राज्येंच कुतुबशहाच्या अमलाखालीं आलेलीं होतीं.

— २१ सप्टेंबर १६८७

## भाद्रपद व. ११ किल्ल्यांच्या नांवांचें शुद्धीकरण !

शके १५७८ च्या भाद्रपद व. ११ रोजीं श्रीशिवाजीमहाराज यांनीं आपल्या पुष्कळशा किल्ल्यांचीं जुनीं नांवें बदलून नवीन संस्कृत वळणावर सुंदर नांवे ठेवलीं.

या क्षुल्लक दिसणाऱ्या गोष्टीला मोठा राजकीय व सांस्कृतिक अर्थ आहे. निरर्थक किंवा फारसी शब्दांनीं निगडित झालेलीं नांवें असण्यापेक्षां संस्कृत भाषेंतील नांवें किल्ल्यांना असणें ही स्वाभिमानाला पोषक अशी गोष्ट होती. मायभाषेंतूनहि फारसी भाषेचें वर्चस्व कमी व्हावें म्हणून शिवाजीमहाराजांनीं 'राज्यव्यवहारकोश' तयार करवून विदेशी शब्दांना संस्कृत प्रतिशब्द निवडून काढण्याचा प्रयत्न केला होता. तेव्हां 'संपूर्ण राज्याचे सार तें दुर्ग' असें महत्त्व ज्या गडांचें होते, त्यांच्यासंबंधीं शिवाजीमहाराजांनीं त्यांच्या नांवांमध्यें सुद्धां लक्षपूर्वक व्यवस्था करावी हें उचित आहे. रायगड, सिंहगड, प्रतापगड, विशाळगड, इत्यादि नांवें उच्चारल्याबरोबर तत्कालीन मराठ्यांनीं केलेल्या पराक्रमाचा चित्रपट डोळ्यांपुढें उभा राहतो. आज किल्ल्यांचें महत्त्व कमी झालें असले तरी शिवकालीं त्यांचें महत्त्व मोठें होतें. "किल्ले बहुत झाले, विनाकारण पैका खर्च होतो" असें शिवाजीस कोणीं सुचविले तेव्हां त्यांनीं सांगितलें, "जैसा कुळंबी शेतास माळा घालून शेत राखतो तसे किल्ले राज्यास रक्षण आहेत. तारवास खिळे मारून बळकट करतात तशी राज्यास बळकटी किल्ल्यांची आहे.... आपण धर्मस्थापना व राज्यसंपादन करणें, सर्वांस अन्न लावून, शत्रुप्रवेश न होय, तें किल्ल्यांमुळें होतें... दिल्लींद्रासारखा शत्रु उरावर आहे, तो आला तरी नवे-जुने तीनशेसाठ किल्ले हजरतीस आहेत. एक एक किल्ला वर्ष वर्ष लढला तरी तीनशेंसाठ वर्षें पाहिजेत." अशा या किल्ल्यांवर मधून मधून मुसलमानांचे अधिकार चालत असत तेव्हां ते किल्ल्यांना फारसी-ऊर्दू भाषांतील भ्रष्ट नांवें देत असत. अर्थात् स्वसंस्कृतीचे पुरस्कर्ते शिवराय यांना ही गोष्ट मान्य झाली नाहीं. त्यांनीं सर्व गडांच्या नांवांचें शुद्धीकरण करून घेतलें.

—४ सप्टेंबर १६५६

## भाद्रपद व. १२ महात्मा गांधींचा जन्मदिवस!

शके १७९१ च्या भाद्रपद व. १२ ला गुजराथमधील पोरबंदर या गांवीं करमचंद गांधी यांना शेवटचें अपत्य झालें, त्याचें नांव मोहनदास. हेच पुढें महात्मा गांधी म्हणून प्रसिद्धीस आले.

गुजराथची भूमि मूळचीच मऊ व प्रेमळ आहे. श्रीकृष्णाची द्वारका गुजराथमध्येच आहे. या कृष्णाचीं प्रेमगीतें गाणारी मिराबाई, प्रसिद्ध 'वैष्णवजन' नरसी मेहता, आदि भक्तांच्या वास्तव्यानें पवित्र बनलेल्या गुजराथमध्ये महात्मा गांधींचा जन्म झाला. मोहनदासांचे वडील करमचंद वर्णानें वैश्य व पंथानें वैष्णव होते. गांधींची आई पुतळीबाई साध्वी, भाविक, व्यवहारकुशल आणि व्रतवैकल्य करणारी होती. अशा या थोर आईबापांच्या पोटीं मोहनदास गांधीजी जन्मास आले.

महात्मा गांधींचें नांव भारतांतच नव्हे तर सर्व जगाच्या कानाकोपऱ्यांतून दुमदुमून राहिले आहे. सत्य, अहिंसा, अपरिग्रह, त्याग, शांति, सच्चारित्र्य, क्षमा, आदि विसाव्या शतकांत पोरक्या झालेल्या दैवी गुणांनीं आपल्यासाठीं निवासस्थान म्हणून 'महात्मा गांधी' या महापुरुषाच्या विशाल हृदयाची निवड केली होती. आपल्या अभिनव अशा राजकीय तत्त्वज्ञानाने गांधींनीं सर्व जगाचे डोळे दिपवून टाकले! त्यांचें तत्त्वज्ञान अंतराळांत भराऱ्या मारणारें नसून तें दरिद्री माणसाच्या झोपडींतून जन्मास आलें असल्यामुळें तें 'दरिद्रीनारायणा'च्या मालकीचें आहे. कविवर्य रवीन्द्रनाथ टागोरांना एका पत्रांत महात्माजी लिहितात.—"कविराज, तुम्ही म्हणतां, प्रातःकालच्या समयीं पक्षी घरट्यांतून बाहेर पडून आकाशांत उंच उंच भराऱ्या मारतो आणि भराऱ्या मारतां मारतां परमेश्वराचें गुणगान करतो त्याकडे पहा...पण माझ्या डोळ्यापुढे हिंदुस्थानांतील हे क्रोडो पक्षी दिसत आहेत. त्यांना अन्न नाहीं म्हणून उडण्याची शक्तिहि नाहीं. दिवसभर थकून रात्रीं जेव्हां हे पक्षी निजतात, त्यापेक्षां अधिक थकवा ते दुसऱ्या दिवशीं उठतात तेव्हां त्यांच्या अंगीं असतो!—" स्वतःच्या मायभूमीसाठीं गांधीजी जगले आणि तिच्या अभ्युदयासाठींच आपल्या जीवनाचें त्यांनीं बलिदान केलें.

— २ ऑक्टोबर १८६९.

## भाद्रपद व. १३ मंडालेच्या तुरुंगांतील संत !

शके १८३० च्या भाद्रपद व. १३ रोजीं लोकमान्य टिळक सहा वर्षांची काळ्या पाण्याची शिक्षा भोगण्यासाठीं मंडालेच्या तुरुंगांत येऊन पोंचले.

प्रारंभींचे दीड-दोन महिने टिळक साबरमतीच्या तुरुंगांतच होते. टिळकांना ही भयंकर शिक्षा उतार वयांत झाल्यामुळें सर्वत्र हळहळ व्यक्त केली जात होती. त्या वेळीं त्यांचे फारच हाल झाले. आठदहा दिवसांतच दहा पौंड वजन कमी झालें. १३ सप्टेंबर रोजीं त्यांना साबरमतीच्या तुरुंगांतून बाहेर काढण्यांत आलें. तुरुंगाच्या दारांत गाडी उभी होती. दारें-खिडक्या लावून अंधारांतच प्रवास सुरू झाला. दुसऱ्या दिवशीं 'हार्डिज' बोटींत लोकमान्यांना चढविलें. तळ-मजल्यावरील एका खोलींत टिळकांना कोंडून ठेवण्यांत आलें. आठनऊ दिवस बोटीचा प्रवास झाल्यानंतर बोट रंगून येथे आली. शेकडो लोक टिळकांना पाहण्यासाठीं आले होते. दुसऱ्या दिवशीं म्हणजे भाद्रपद व. १३ या दिवशीं टिळक मंडाले येथें येऊन पोंचले. टिळकांच्या खऱ्या शिक्षेला प्रारंभ झाला. एखाद्या ऋषिवर्याप्रमाणें जीवनक्रम ते घालवूं लागले. सर्वांवर त्यांची छाप बसली. त्यांच्या संगतीचे वर्णन एका वृद्ध मुसलमान पहारेकऱ्याने केलें आहे : "ऐसा कैदी मेरे देखनेमें इतनी उमरतक नहीं आया! ये दरखत जो आप सामने देख रहे हैं ये सब आज मुरझाये दीखते हैं... उनपर तजेला नहीं आता। वे अवलिया यहाँ आनेके पेशतर भी ये झाडोंका यही हाल था। लेकिन जब वे महात्मा यहाँ आये तो एक महिनेमें ये सब झाड ताजे ताजे दीखने लगे और फूल-फलोंसे भी भर गये। ऐसा हाल जबतक वे महात्मा यहाँ थे तबतक हमेशा चल रहा था। लेकिन जब वे यहाँसे चले गये तबसे ये झाडोंको ना फूल ना फल आता है। और सबके सब जैसा कोई उनका रिश्तेदार मर गया हो ऐसे दिखांई देते है। सब बिचारे मुरझा गये हैं।" या संत पुरुषाचा लोभ तेथील पशुपक्ष्यांनाहि लागून राहिला. "तेथील चिमण्या इतक्या धीट झाल्या कीं, त्या टिळकांच्या खोलींत येत; बुकांटेबलावर बसत व महाराज जेवण्यास बसले म्हणजे ताटासभोंवतीं जमत. फार काय पण चिंवचिंव करीत त्या त्यांच्या अंगावरहि चढत."

— २३ सप्टेंबर १९०८

## भाद्रपद व. १४ क्रांतिवीर नानासाहेब यांचें निधन!

शके १७८० च्या भाद्रपद व. १४ रोजीं सत्तावनच्या स्वातंत्र्ययुद्धांत चमकणारे 'बंडवाले' नानासाहेब पेशवे यांचा मृत्यु झाला.

सन १८५७ च्या डिसेंबरांत कानपूरची लढाई होऊन बंडवाल्यांचा पराभव झाला. आणि नानासाहेबांस लखनौच्या बेगमेच्या आश्रयाने रहावें लागलें. नंतर तेथूनहि पेशवे मंडळींना नेपाळांत जाण्याचा प्रसंग आला. या कष्टदायक प्रवासांत त्यांचे फारच हाल झाले. इंग्रजांना शरण जाण्यास नाना तयार नव्हते.— "पुणें व सातारा ही जहागिरी परत मिळाल्याशिवाय शस्त्रें खालीं ठेवणार नाहीं. हिंदुस्थानचें राज्य गिळंकृत करून उलट मलाच बंडखोर ठरविण्याचा अधिकार इंग्रजांना काय आहे?—" अशी धमक अजूनहि त्यांच्या अंगीं होती. पण नानासाहेब प्रकृतीनें फार हैराण झाले होते. एके दिवशीं मनास अति वाईट वाटून त्यांनीं कालीमातेला आपल्या करांगुलीचा होम केला; आणि अभीष्टसिद्धयर्थ प्रार्थना केली. जंगलांतील हवेमुळे नानासाहेबांस दोषी ताप येऊं लागला; व अखेर भाद्रपद व. १४ रोजीं वनवास भोगीत असतांच देवखरी येथील रानांत एका निर्झराच्या कांठीं नानासाहेब हिंवतापानें मृत्यु पावले!

नानासाहेबासंबंधीं स्वातंत्र्यवीर सावरकरांनीं लिहिलें आहे: "नाना म्हणजे हिंदभूचा साक्षात् क्रोधच. नाना म्हणजे या भूमीचा नरसिंहमंत्रच. जणुं कांहीं या एका गुणामुळेंच, ज्याचें बल भीमासारखें आहे, ज्याच्या डोक्यावर मुकुट शोभतो आहे, ज्याचे तेजस्वी नी तल्लख डोळे, दुखावलेल्या स्वाभिमानामुळें आरक्त झाले आहेत, ज्याच्या कमरेला तीन लाख रुपये किंमतीची म्यानांतून बाहेर पडण्यास आसुसलेली तरवार लटकत आहे आणि ज्याचा सबंध देह क्रोधानें, आणि स्वराज्य नि स्वधर्म यांचा सूड घेण्याच्या तीव्र आकांक्षेनें खदिरांगार झाला आहे, त्या नानाची भव्य नि आकर्षक मूर्ति आपल्या डोळ्यांपुढें उभी राहते." नानासाहेब पेशव्यांनीं क्रांतिकारकांना मिळून बरीच मोठी कामगिरी केली, परंतु दुर्दैवानें त्यांना यश आलें नाहीं.

— ६ ऑक्टोबर १८५८

## भाद्रपद व. ३० मुरार जगदेवांची सुवर्णतुला !

शके १५५५ च्या भाद्रपद व. ३० रोजीं 'महाराज राजाधिराज मुरारपंडित' उर्फ मुरार जगदेव यांनीं सूर्यग्रहणानिमित्त तुळापूर येथे सुवर्णतुला करून गांव अग्रहार दिला.

या वेळीं शहाजी राजे तिसऱ्या मूर्तझा निजामच्या नांवानें राज्यकारभार पाहत होते. विजापूरचा सरदार जगदेव शहाजीला मान्यता देण्यासाठीं विजापूरकरांची फौज शहाजीच्या मदतीस ठेवून हा परत विजापुरास निघाला. मध्येच भीमा-इंद्रायणीच्या संगमावर शहाजी व मुरारजी यांचा मुक्काम पडला. त्या दिवशीं सूर्यग्रहण होते. हा उत्तम पर्वकाळ साधावा म्हणून मुरार जगदेवांनीं आपली सुवर्णतुला दान केली. या प्रसंगीं हत्तीची तुला कशी करावी, हा प्रश्न निर्माण झाला. कोणाचीहि बुद्धि चालेना. शेवटीं शहाजी राजांनीं युक्ति सुचविली. हत्ती नावेंत घालावा; व नांव बुडेल तेथें खूण करावी. नंतर हत्ती काढून त्या नावेंत द्रव्य घालावें, आणि त्या खुणेपर्यंत नांव बुडली म्हणजे हत्तीची तुला झाली. राजांच्या या कल्पनेवर मुरार जगदेव खुष झाले.

मुरारजींनीं आपली सुवर्णतुला केल्यानंतर त्या गांवचें मूळचें नांव नागरगांव बदलून तुळापूर असें ठेविले व तीनशें होनांची जमीन सोळा ब्राह्मणांना अग्रहार दिली. या प्रसंगाचें दान-पत्र प्रसिद्ध असून त्यांत सोळा ब्राह्मणांचीं नांवेंहि दिलीं आहेत. या दानपत्रांत मुरार जगदेवासबंधीं असें म्हटलें आहे : "संसारतापतप्तविबुधजनः धर्मावताररराजाधिराजः महाराजः राजश्रीः पंडितः मुररिः जगदेकप्रभुः सार्वभौमप्रतिनिधिः।" यावरून मुरार जगदेवाचा त्या वेळचा दर्जा ध्यानांत येतो. मुरारजी हे ब्राह्मण असून आदिलशाहींतील मुख्य वजिराचे कारभारी होते. परकीयांची चाकरी करण्यांतच यांचें सारें आयुष्य गेलें. त्या कालीं तेंच मोठेपणाचें गमक असे. यांनीं "पुणें कसबावसती जाळून तेथें गाढवांचा नांगर फिरविला, पुण्याचा कोट पाडून शहाजीचे वाडे जाळले व लूट केली आणि भुलेश्वरावर 'दौलत मंगल' किल्ला बांधून तेथून पुणें प्रांतावर आदिलशाहीचा अमल सुरू केला."

— २३ सप्टेंबर १६३३




दयानंद सरस्वती. भगवान् बुद्ध. स्वामी रामतीर्थ. न. चिं. केळकर.
फेरोजशहा मेथा. रामानंद चतर्जी. प्रतापसिंह भोंसले. विठ्ठलभाई पटेल.

## आश्विन शु. १ (१) संत बहिणाबाईची समाधि !

शके १६७२ च्या आश्विन शु. १ या दिवशीं संत तुकोबा यांची विख्यात शिष्या बहिणाबाई यांचे निधन झाले.

यांचा जन्म शके १५५० मध्यें झाला असून यांचे माहेर वेरूळच्या पश्चिमेस देवगांवीं होतें. आऊदेव कुलकर्णी व जानकी या दांपत्याच्या पोटीं बहिणाबाई जन्मास आल्या. लहानपणापासून भगवद्भक्तीची आवड यांच्यांत होती. यांचे यजमान शिवापूरचे ज्योतिषी असून त्यांना घर सोडून भिक्षा मागत हिंडावे लागलें. पंढरपूर, शिंगणापूर, रहिमतपूर आणि कोल्हापूर या ठिकाणीं बहिणाबाईसह त्यांनीं प्रवास केला. याच वेळी जयराम गोसावी यांची कीर्तने बाईनीं ऐकिलीं. तुकोबांची अभंगवाणी ऐकून बहिणाबाईना तुकारामांच्या दर्शनाची उत्कंठा लागली. पतीस हा ध्यास मान्य नसतांहि देहूस जाऊन यांनीं तुकोबांचे दर्शन घेतले लौकरच तुकोबांनीं यांना येऊन स्वप्नांत अनुग्रह केला; आणि बहिणाबाईस अलौकिक योग्यता प्राप्त झाली. " तुकोबांच्या शिष्यमंडळींत बहिणाबाईचे महत्त्व विशेष आहे. यांनी आपल्या आयुष्याचीं कांहीं वर्षें देहूस तुकोबांच्या संगतींत घालविलीं, त्यांचीं कीर्तने ऐकिलीं, व तुकोबांच्या कृपेने स्वानुभवसंपन्न होऊन आत्मचरित्रपर व उपदेशपर अभंगहि लिहिले. तुकोबांच्या गोष्टी व त्यांचें वर्णन-स्तवन त्यांनीं तुकोबांना पाहून व त्यांच्या संगतीचा आनंद स्वतः भोगून अधिकारवाणीने केले आहे." यांचे आत्मचरित्र अत्यंत रसाळ असून त्यांत पूर्वीच्या बारा जन्मांची हकीगत नमूद केली आहे. भक्ति, वैराग्य, विठ्ठल, पंढरी, संत, सद्गुरु या विषयांवरील यांची अभंगवाणी अत्यंत प्रासादिक अशीच आहे. तुकारामांवर यांची फारच निष्ठा होती, याचा प्रत्यय कित्येक अभंगांतून येतो :—

" मत्स्य जैसा जळावांचुनी चरफडी। तैसी ते आवडी तुकोबांची ॥
अंतरींची साक्ष असेल जो प्राणी। अनुभवे मनीं जाणेल तो.
संचितासी दग्ध करी ऐसा कोणे। सद्गुरुवांचून जाण मना ॥
बहेणी म्हणे माझा जाऊं पाहे जीव। कां बा नये कींव तुकोबा रे!"



## आश्विन शु. १ (२) बेझंटबाई यांचें निधन !

शके १८५५ च्या आश्विन शु. १ या दिवशीं जगांतील सुप्रसिद्ध तत्त्ववेत्त्या, वक्त्या व थिऑसॉफिकल सोसायटीच्या अध्यक्ष डॉ. ॲनी बेझंट यांचें निधन झाले.

पूर्वायुष्यांत इंग्लंडमधील प्रसिद्ध अज्ञेयवादी चार्लस ब्रॅडला यांच्या साहचर्यानें बेझंटबाई यांनीं अभ्यास केला. सन १८९३ मध्यें त्या भारतांत आल्या. धर्म-शिक्षणाचा प्रवेश अभ्यासक्रमांत व्हावा म्हणून बनारस येथें सेण्ट्रल हिंदु कॉलेज स्थापन केले. आणि नंतर गीता, उपनिषदें, रामायण, महाभारत, आदि ग्रंथांवर भाषणें देऊन यांनीं तीं पुस्तकरूपानें प्रसिद्ध केलीं. सन १९०९ सालीं बाईंनीं पृथ्वीपर्यटणास निघून जगद्गुरूंच्या आगमनाची घोषणा केली. आणि जे. कृष्णमूर्ति हे जगद्गुरूंच्या अवताराचें अधिष्ठान होणार असल्याचें प्रसिद्ध केलें. १९१३ मध्यें बाईंनीं भारतीय राजकारणांत प्रवेश केला, आणि त्यांच्या कार्यांचे फल म्हणजे १९१७ मध्यें कलकत्ता राष्ट्रसभेच्या त्या अध्यक्षहि झाल्या. परंतु त्या राजकारणांत अप्रिय होऊं लागल्या.

थिऑसॉफिकल सोसायटीचे आद्य पीठ अड्यार येथील आश्रमाचें संवर्धन त्यांनींच केले. १९३३ च्या सप्टेंबर २० ला अड्यार येथेच त्यांचें देहावसान झालें. द्वारकानाथपंत तेलंग यांनीं त्यांच्या अस्थि काशीस नेऊन गंगेंत विसर्जित केल्या. धर्म, समाज व तत्त्वज्ञान यांकडे पाहण्याच्या अभिनव दृष्टीमुळे बेझंट बाईबद्दल लोकांना फार आदर वाटे. कार्याची प्रचंडता, संघटनाचातुर्य, निग्रह, इत्यादि गुणांमुळे बाईंची योग्यता फार मोठी आहे. यांच्या आस्तिक्य-बुद्धींत मूलगामी संशोधनाची दृष्टि असे. आणि बेझंटबाई आधुनिक शास्त्रांच्या साह्यानें जुन्या आचारविचारांचा सुगमपणे उलगडा करीत; यामुळें लोकांची त्यांच्यावर एक प्रकारची श्रद्धा निर्माण झाली होती. चिकित्सा आणि भाविकता यांचा चमत्कारिक मिलाफ यांच्यांत असल्यामुळें जगांतील सर्व भागांतील लोक यांच्याकडे आकर्षिले गेले होते. यांच्या निधनानंतर यांची रक्षा अड्यार येथील आश्रमांत 'गार्डन ऑफ रिमेम्ब्रन्स' या पद्माकृति उद्यानांत ठेविली आहे.

— २० सप्टेंबर १९३३

## आश्विन शु. १ ( ३ ) रामानंद चतर्जींचें निधन !

शके १८६५ च्या आश्विन शु. १ रोजीं भारतांतील जगप्रसिद्ध संपादक व राष्ट्रीय वृत्तीचे पुरुष रामानंद चतर्जी यांचा अंत झाला.

बंगाल्यांतील सुप्रसिद्ध चटोपाध्याय घराण्यांत यांचा जन्म झाला. कॉलेजांत शिक्षण चालू असतांनाच हे 'दासी' या नियतकालिकाचे संपादक म्हणून काम करूं लागले. शिक्षण पूर्ण होतांच प्रयाग येथील कायस्थ कॉलेजांत कांहीं दिवस प्राध्यापकाचें काम केल्यावर हे अलाहाबाद विद्यापीठांत फेलोहि झाले. त्यानंतर 'इंडियन मेसेंजर' या पात्राच्या संपादकत्वाचे काम थोडे दिवस करून यांनीं 'प्रदीप' नांवाचें स्वतःचें नियतकालिक काढले. यांच्याच नेतृत्वाखालीं 'प्रवासी' मासिक निघूं लागले. सन १९०७ मध्यें सुप्रसिद्ध इंग्रजी मासिक 'मॉडर्न रिव्ह्यू' निघूं लागले. 'प्रवासी' व 'मॉडर्न रिव्ह्यू' या दोन नियतकालिकांनीं वृत्तपत्र-सृष्टींत चांगलेंच नांव कमाविलें. रामानंद चतर्जी ब्राह्मो समाजाचे अनुयायी होते. 'Towards Homerule' नांवाची ग्रंथमाला लिहून यांनीं टिळकांच्या चळवळीस चांगलेंच साह्य केलें. यांची अधिक महत्त्वाची कामगिरी म्हणजे संडरलण्ड यांचें 'इंडिया इन बॉंडेज' हें पुस्तक यांनीं प्रकाशित केले आणि ब्रिटिशांच्या राजनीतीवर विदारक प्रकाश पाडला. चतर्जींना राष्ट्रसभेचें मुसलमानविषयक धोरण नापसंत झालें म्हणून ते हिंदुसभेत दाखल झाले. सन १९२९ च्या हिंदुमहासभेचें हे अध्यक्षहि होते. बंगालच्या राजकारणांतहि हे आत्मीयतेनें पाहत असत. दुय्यम शिक्षणाचा कायदा, कलकत्ता विद्यापीठांतील श्री-कमल या पवित्र चिन्हांचे उच्चाटन, दंगे, हिंदु स्त्रियांचे अपहरण, आदि प्रकारांविरुद्ध रामानंद चतर्जींनी मोठाच प्रचार केला. यांची विचारसरणी स्पष्ट व निर्भीड असल्यामुळें 'मॉडर्न रिव्ह्यू' ला उच्च दर्जा प्राप्त झालेला होता. त्या मासिकाचा नियमितपणा, त्याची छपाई, त्यांतील चित्रें आणि आंतील उच्च दर्जाचा मजकूर या गुणांमुळें हें मासिक चांगलेंच नांवा-रूपाला आलें. रवीन्द्रनाथ टागोरांचा परिचय पाश्चात्यांना 'मॉडर्न रिव्ह्यू' तर्फेच झाला. या मासिकांतील Notes या नांवाखालीं प्रसिद्ध होणारा मजकूर अत्यंत लोकप्रिय झालेला आहे.

—३० सप्टेंबर १९४३

## आश्विन शु. २ 'सत्यशोधक' समाजाची स्थापना !

शके १७९५ च्या आश्विन शुद्ध २ रोजीं प्रसिद्ध समाजसुधारक आणि दलितांचे कैवारी ज्योतिबा फुले यांनीं 'सत्यशोधक समाजा'ची स्थापना केली.

ईश्वर सर्वव्यापी, निर्विकार, निर्गुण व सत्यस्वरूपी आहे, त्याची भक्ति करण्याचा अधिकार त्याच्या सर्व लेकराना सारखाच आहे, त्यासाठीं 'भट' दलालाची आवश्यकता नाहीं, मनुष्य जातीनें श्रेष्ठ ठरत नसून तो गुणांनीं श्रेष्ठ ठरत असतो, अशीं या समाजाचीं प्रमुख तत्त्वें होतीं. समाजाच्या स्थापनेचा उद्देश पुढीलप्रमाणें होता.—

"ब्राह्मण, भट, जोशी, उपाध्ये, इत्यादि लोकांच्या दास्यापासून शूद्र लोकांस मुक्त करण्यासाठी व आपल्या मतलबी ग्रंथाच्या आधारें आज हजारो वर्षें ते शूद्र लोकांस नीच मानून गफलतीने लुटीत आले आहेत, यास्तव सदुपदेश व विद्याधारें त्यांस त्यांचे वास्तविक अधिकार समजावून देण्याकरितां कांहीं सुज्ञ मंडळींनीं हा समाज स्थापन केला आहे. यांत राजकीय विषयांवर बोलणे अजी वर्ज्य आहे"

सत्यशोधक समाजाची ही चळवळ कांहीं वर्षें मर्यादित होती, कारण त्या विचारांचें आकलन करून घेण्याइतका दलितवर्ग सुबुद्ध झालेला नव्हता. कालांतरानें बहुजनसमाज जागृत झाल्यानंतर कोल्हापूरचे महाराज शाहू छत्रपति यांच्याकरवीं समाजाला संघटित स्वरूप प्राप्त होऊन त्याचा विस्तारहि वाढला. वास्तविक धर्मापासून बहुजनसमाज दूर अज्ञानांत कोठें तरी वावरत होता; त्याला सत्यज्ञान व खरा धर्म यांची जाणीव करून द्यावी असाच हेतु या समाजाच्या बुडाशीं होता. "अधर्म आणि असत्य यांनीं बरबटलेल्या वातावरणांत गोष्टीचें सत्य स्वरूप काय आहे तें हुडकून काढणे आणि त्याप्रमाणें वागावयाचें", हा या समाजाचा उद्देश होता. महात्मा फुले यांचें सांगणें नेहमीं असें होतें कीं, तत्त्व आणि कृति यांचो फारकत होऊं नये... खरा सत्यशोधक सत्य तेवढे सांगून स्वस्थ बसत नाहीं, तर त्याप्रमाणें कृतिहि करतो. या समाजामुळें धर्मज्ञानाचें खरें स्वरूप गरिबाच्या झोपडीपर्यंतहि सुलभतेने पोहोंचतें झालें.

—२३ सप्टेंबर १९७३

## आश्विन शु. ३ थिऑसॉफिकल सोसायटीची स्थापना !

शके १८०१ च्या आश्विन शु. ३ रोजीं हिंदुस्थानांतील पहिली थिऑसॉफिकल संस्था मुंबईस स्थापन झाली.

सन १८७५ मध्ये सदर संस्था अमेरिकेंत स्थापन झाल्यावर चार वर्षांनंतर तिचे संस्थापक ऑल्कॉट व ब्लॅव्हॅटस्की मुंबईस आले; आणि त्यांनीं ही संस्था स्थापन केली. या संस्थेत श्री. मावळणकर, लोकहितदवादी, तुकाराम तात्या, अण्णा मोरेश्वर कुंटे, डॉ. भाटवडेकर, इत्यादि मंडळी प्रमुख होती. या पंथाच्या प्रेरणेचें थोडक्यांत रूप असें होतें की, विश्वबंधुत्वाची भावना वाढवून संकुचित श्रद्धेचा आग्रह न धरतां आधुनिक चिकित्सक विचारपद्धतीला जुळेल अशा पद्धतीनें देहात्मवाद, आत्म्याची स्थिति, गति, पुनर्जन्म, इत्यादि प्रश्नांची सयुक्तिक, समर्पक व सदाचारप्रवर्तक मीमांसा करणे, आणि तिच्यावर श्रद्धा ठेवून सत्यशोधनाचा प्रयत्न करणें हा प्रमुख हेतु होता.

भारतांत पुढें अनेक शाखा निघून या संस्थेची उन्नति होत गेली. डॉ. बेझंटबाईसारखी व्यासंगी, कळकळीची, उदार मनोवृत्तीची गुणवान् बाई संस्थेस लाभल्यावर राजकीय बाबतींत मतभेद झाला तरी निष्ठेनें त्यांनीं काम करून थिऑसॉफीचें स्थान बळकट केले. —

" थिऑसॉफी हा प्रार्थनासमाजाप्रमाणें ख्रिस्ती टीकाकारांच्या टीकेमुळे व त्यांच्या अनुकरणामुळे निघालेला किंवा आर्यसमाजाप्रमाणे आत्मनिरीक्षणामुळें व पूर्वाभिमानामुळे निघालेला पंथ नव्हे. एका विशिष्ट पद्धतीने विश्वबंधुत्वाचें नातें फैलावणाऱ्या पंथाचा तो सत्यशोधनार्थ एक प्रयत्न होय... आचार, विचार व व्यवहार या तिहेरी बंधांत थिऑसॉफीनें धार्मिक, शैक्षणिक, सामाजिक, राजकीय अशा विविध विषयांचा समावेश केला आहे... व्यापक ध्येय, संग्राहक वृत्ति व उदार बुद्धि यांमुळे मतविरोधाबद्दल असहिष्णुता थिऑसॉफीच्या अनुयायांना वाटत नाहीं.... बौद्ध, हिंदु, ख्रिस्ती, मुसलमान, पारशी, या सर्व धर्मांना पोटांत घेणारी शिकवण या संस्थेची असल्यामुळें तींत समाजांतील विचारवंतांचा समावेश झाला.–"

— १८ ऑक्टोबर १८७९

## आश्विन शु. ४ शिंदे होळकरांचा लाखेरीचा संग्राम !

शके १७१४ च्या आश्विन शु. ४ रोजीं शिंदे-होळकर यांच्यांत लाखेरी येथें प्रचंड सामना होऊन होळकरांचा पराभव झाला.

या सुमारास महादजी शिंदे पुण्यास येऊन दौलतीची व्यवस्था पाहण्यांत गुंतले होते. तेव्हां उत्तरेंत एक विपरीत प्रसंग घडून आला. महादजी पुण्यास आले त्या वेळीं त्यांनीं सर्व कारभार गोपाळरावभाऊ, आबाजी रघुनाथ, जिवबा बक्षी, आदींच्या ताब्यांत दिला होता. याच वेळीं होळकरांच्या मनांत शिंद्यांचा मोड करावा असें होतेंच. तुकोजी होळकर व त्यांचे मुलगे मल्हारराव आणि यशवंतराव यांच्या मनांत हा विचार फार दिवसांपासूनचा होता. त्याप्रमाणें होळकरांची तीस हजार फौज लाखेरीच्या खिंडींत तयार झाली असतांना शिंद्यांच्या वतीनें डी बॉयननें त्यांवर चाल केली. डी बॉयनजवळ नऊ हजारांचा पायदळ कंपू व तोफखाना होता. "खिंडीच्या टोंकावर डयू ड्रनेकच्या अडतीस तोफा मोक्यार्चे स्थळ पकडून तयार होत्या. दोनहि उतरणींवर दाट जंगल व खालील मैदान पावसानें अद्याप ओलें होतें. दोनहि बाजूंस प्रवीण सेनापतींनी पाश्चात्य युद्धपद्धतीचा अवलंब केलेला. हिंदुस्थानच्या इतिहासांतील हा पहिलाच एतद्देशीय सामना होता.–" डी बॉयनच्या तोफा बैलांच्याकडून खिंडींत आणल्या जात असतांनाच त्याच्या दारूच्या कोठ्यांत होळकरांकडील डयू ड्रनेकचे गोळे येऊन पडले आणि मोठाच भडका उडाला. आणि होळकरांच्या सैन्यानें जोराचा हल्ला केला. परंतु बाजूच्या झाडींत डी बॉयनचें कसलेले पायदळ व तोफखाना लपलेला होता, त्यांनीं पुढें येऊन होळकरांवर मोठाच हल्ला केला. त्यापुढे डयू ड्रनेकचें कांहीं चालले नाहीं. या संग्रामांत त्याचे पंधराशें लोक मात्र थोडक्या अवधींत कामास आले. डी बॉयनच्या ताब्यांत खिंड येऊन होळकरांकडील अडतीस तोफा त्यास मिळाल्या. या लढाईत विजय मिळाला म्हणून शिंद्यांनीं मोठाच उत्सव केला. डी बॉयन लिहितो : "मी शिंद्याकरितां अनेक रणसंग्राम केले, पण लाखेरीसारखा निकराचा व अत्यंत चिंतेचा असा दुसरा कोणताच संग्राम झाला नाहीं."

—२० सप्टेंबर १७९२

## आश्विन शु. ५ ( १ ) खंडो बल्लाळ चिटणिसांचें निधन !

शके १६४८ च्या आश्विन शु. ५ ला स्वामिनिष्ठ खंडो बल्लाळ चिटणीस यांचें निधन झालें.

खंडो बल्लाळ हा बाळाजी आवजीचा वडील मुलगा. संभाजी गादीवर येतांच त्यानें बाळाजी आवजीस हत्तीच्या पायीं दिलें आणि खंडो व निळो या बंधूंना वाघाच्या तोंडीं देण्याचे ठरविलें. पण येसूबाईच्या दूरदृष्टीमुळें हा विपरीत प्रसंग झाला नाहीं. खंडो बल्लाळ लेखणीबरोबर तलवारहि चालवीत असे. हा मोठा स्वामिभक्त होता. एकदां राजपत्नी येसूबाई मोंगलांच्या हातांत सांपडण्याचा प्रसंग आला असतां याने आपली मावसबहीण संतूबाई हिला येसूबाईऐवजीं पालखींत बसवून मोगलांच्या छाप्यांतून निसटण्याचा प्रयत्न केला. संतूबाईस येसूबाई समजून मोंगल घेऊन गेलेच. पुढें संतूबाईनें हिरकणी खाऊन प्राण दिला.

राजारामाबरोबर प्रल्हाद निराजी, संताजी घोरपडे, धनाजी जाधव, आदि निवडक मंडळी असून ते सर्व जिजीकडे निघाले होते. त्यांत खंडो बल्लाळ प्रमुख होता. सर्वांनीं लिंगायत यात्रेकरूंचा वेष घेतला होता. मुसलमान अधिकाऱ्यांना त्यांचा संशय आल्याचे समजल्याबरोबर खंडो बल्लाळानें सर्वांना मोठ्या शिताफीनें दूर पाठवून दिलें आणि आपण स्वतः संकटास तोंड देण्यास राहिला. त्याला पकडून मोंगलांनीं चांगलाच मार दिला. चारपांच दिवस अन्नपाण्यावांचून अंधारकोठडींत ठेवून दिलें. शेवटीं राखेचे तोबरेसुद्धां दिले. तरी पण स्वामिभक्त खंडो बल्लाळ म्हणे, 'आम्ही जंगम कापडी आहोंत' नंतर त्याची सुटका झाली.

एकदां मुसलमानांच्या कैदेतून गुप्तपणें निसटतांना त्याला तटावरून उडी टाकण्याचा प्रसंग आला. त्यांत त्याचा पाय दुखावून तो कायमचा लंगडा झाला. शाहूला एका जिवावरच्या संकटांतून खंडो बल्लाळानेंच वांचविलें. शेवटीं याचें वतन आंग्र्यांच्या ताब्यांत गेल्यामुळें या स्वामिनिष्ठ, मानी, पण कर्तबगार पुरुषास शेवटचे दिवस हालांत काढावे लागले.

— १९ सप्टेंबर १७२६

## आश्विन शु. ५ ( २ ) प्रतापसिंह भोंसले यांचें निधन !

शके १७६९ च्या आश्विन शु. ५ रोजीं सातारचे शेवटचे छत्रपति श्रीमंत प्रतापसिह भोसले यांचा अत्यंत हालअपेष्टांत मृत्यु झाला.

प्रतापसिह हे सातारच्या छत्रपति घराण्यांतील धाकट्या शाहूचे वडील पुत्र. पेशव्यांच्या ताब्यांतून सुटण्यासाठीं त्यांनीं व त्यांच्या मातोश्रीने इंग्रजांची मदत मागितली आणि मदत देण्याचे एल्फिन्टनने आनंदानें कबूल केलें. या वेळीं इंग्रज व पेशवे यांची लढाई चालू होती. बापू गोखल्याचा पाडाव झाला. संकेतानुसार प्रतापसिह लष्कराच्या मागें उगाच राहिले होते, त्याना स्मिथनें ताब्यांत घेऊन त्यांची रवानगी एल्फिन्स्टनकडे केली. तत्पूर्वीच सातारा इंग्रजांनीं घेतला होता. इंग्रज आपल्याला कांहींच विचारीत नाहींत, आपणांवर अपमानास्पद अटी लादतात असे प्रतापसिहांना समजल्यावर त्यांनीं इंग्रजांविरुद्ध खटपट सुरू केली आणि बेबनाव होऊन छत्रपतींना पदच्युत व्हावें लागलें. त्यांच्यावर बंडाचा आरोप ठेवून त्यांना कराचीस ठेवण्यांत आलें. राज्य परत मिळविण्यासाठी विलायतेंत माणसे पाठवून त्यांनीं खूप प्रयत्न केला. पण त्यांना यश न येऊन त्यांचे दुःखद परिस्थितींत निधन झाले.

प्रतापसिह सत्याचे मोठे पुरस्कर्ते असून स्वभावानें करारी आणि निश्चयी होते. पदच्युत करणाऱ्या कारन्याकला यांनीं तोंडावर जबाब दिला, "राज्य जाईल अशी धमकी देता कशाला? मीं कधींच राज्याची हांव धरलेली नाहीं. उघड चौकशीशिवाय केलेले आरोप मुकाट्याने मान्य करून राज्यावर राहण्याची माझी इच्छा नाहीं. लक्षांत ठेवा, प्रतापसिहाची मान रेसभरसुद्धां वांकणार नाहीं. फायद्याचा किंवा स्वार्थाचा लोभ धरून मी आपले चारित्र्य कलंकित करून घेणारा नव्हें. तुमच्या चिठोऱ्यावर मी नाहीं सही करीत जा." परंतु दुर्दैव हें कीं, हा बाणेदार राजा इंग्रजांच्या कपटनीतीला बळी पडला.

याच प्रतापसिंहांनीं सन १८२२ मध्यें सातारला नवीन राजवाडा-जलमंदिर-राजवाडा बांधला; आणि यवतेश्वराहून सातारा शहरांत पाणी खेळविलें.

— १४ ऑक्टोबर १८४७

## आश्विन शु. ५ (३) दादोबा पांडुरंगांचें निधन!

शके १८०४ च्या आश्विन शु. ५ रोजीं मराठी भाषेचे व्याकरणकार, कवि, ग्रंथलेखक व विख्यात समाजसुधारक दादोबा पांडुरंग तर्खडकर याचें निधन झाले!

दादोबांचा जन्म शके १७३६ च्या वैशाख वद्य ४ रोजीं मुंबईजवळील खेतवाडींत झाला. यांचें मूळचे घराणे वसईजवळील तर्खडचें. पांडुरंगराव भाविक वारकरी असल्यामुळें दादोबांस बालपणापासूनच मराठी काव्याची गोडी लागली. 'बॉंबे नेटिव्ह एज्युकेशन सोसायटी'च्या शाळेत शिक्षण पूर्ण झाल्यावर यांनीं जावरा संस्थानचे नबाब यांचे येथें व एल्फिन्स्टन इन्स्टिटयूट येथें शिक्षकाचें काम केले. त्यानंतर हे डेप्युटी कलेक्टर झाले. सन १८५७ सालीं झालेले भिल्लांचे बंड यांनीं मोडलें म्हणून सरकारने यांना रावबहादुर ही पदवी दिली. पुढे एज्युकेशनल ट्रान्सेलटरच्या जागेवर काम करून कांहीं दिवस बडोदें संस्थानच्या दिवाणाच्या मदतनिसाचें कामहि यांनीं केले. यांची सर्वांत महत्त्वाची कामगिरी म्हणजे यांनीं मराठी भाषेला पद्धतशीर असा व्याकरणग्रंथ निर्माण करून दिला. मराठी भाषा सहासात शतकांपासून चांगलीच जोपासली गेली होती; पण त्या भाषेला व्याकरण लाभले नव्हते! महानुभावीय वाङ्मयांत कांहीं तुरळक प्रयत्न झाले होते, परंतु त्याचा प्रसार मात्र सर्वत्र होणे शक्य नव्हतें. इंग्रज लोकांचा परिचय आपणांस झाल्यानंतर मिशनरी लोकांनीं कांहीं संवादात्मक व्याकरणाचे विभाग तयार केले होते, पण ही सारी तुटपुंजी व्यवस्था होती. व्यवस्थित असे व्याकरण दादोबांनींच मराठी भाषेला दिले. याशिवाय 'केकावली' या अप्रतिम स्तोत्रकाव्यावर स्वतःच्या आईवडिलांच्या नांवाने यांनीं केलेली 'यशोदा-पांडुरंगी' ही अत्यंत रसाळ गद्यटीका प्रसिद्ध आहे. दादोबांनीं लिहिलेलें 'आत्मचरित्र' आणि त्यांचे समग्र चरित्र श्री. प्रियोळकर यांनीं संपादित केले आहे. 'पारमहंसिक ब्रह्मधर्म', 'शिशुबोध', 'धर्मविवेचन', इत्यादि ग्रंथ दादोबाच्या धर्मसुधारणेच्या कळकळीची साक्ष देतात. असा हा श्रेष्ठ समाजसुधारक, आणि मराठी भाषेचा त्राता आश्विन शु. ५ रोजीं सकाळीं साडेआठ वाजतां परब्रह्मांत विलीन झाला!

— १७ ऑक्टोबर १८८२

## आश्विन शु. ६ — कुंजपुऱ्याचें वस्त्रहरण !

शके १६८२ च्या आश्विन शु. ६ रोजीं मराठ्यांचा फौजेनें कुंजपुरा या महत्त्वाच्या ठिकाणावर चाल केली.

मराठ्यांच्या इतिहासात हें पानिपतचें प्रकरण मोठें रोमहर्षक आहे. सदाशिवरावभाऊंनीं दिल्ली काबीज केलीच होती. आतां अब्दालीचे पारिपत्य करणें याकडे सर्वांचें लक्ष लागलें. कुंजपुरा हें स्थळ फार मजबूत व नाकेबंदीचें असें होतें. तेथें समदखान नांवाचा अब्दालीचा सरदार पांच हजार फौजेनिशीं तयार होता. मराठ्यांना आपण अंगावर घ्यावें, पळ काढण्याचें नाटक करावें, व मागून अब्दालीने अचानकपणें मराठ्यांवर हल्ला करावा अशी समदखानाची योजना होती. ती हाणून पाडण्याची कामगिरी जनकोजी शिंदे व बळवंतराव मेहेंदळे यांनीं स्वीकारली आणि आश्विन शु. ६ ला कुंजपुऱ्यावर हल्ला केला. सदाशिवरावभाऊ मध्यें असून मागे तोफखाना व पिछाडीस दमाजी गायकवाड होते. मराठ्यांच्या फौजेचे आक्रमण पाहून अब्दाली गडबडला. मराठ्यांनीं मोठ्या निकराने संग्राम केला. शिंदे दत्ताजीच्या मरणाचा सूड घेण्याच्या विचारांत होते. दमाजी गायकवाड यांनीं मोठ्या शौर्यानिशीं तोफांनीं पडलेल्या भगदाडांतून घोडे घातले. लागलीच शहर व किल्ला मराठ्यांच्या हातांत आला. हातीं आलेल्या शत्रूस मराठे सहसा दुखवीत नसत. परंतु या वेळीं मात्र सदाशिवरावभाऊ सूडाने संतप्त झाले होते. इतर कोणाचेंहि न ऐकतां केवळ शत्रूला दहशत बसावी म्हणून त्यांनीं कुत्बशहा व समदखान यांना ठार केले. “उपरांत कुंजपुऱ्याचें वस्त्रहरण केलें. लूटहि बेमुबलक सांपडली, कामाठी व बेलदार लावून कुंजपुऱ्याचा किल्ला व शहर पुन्हा ढांसळून टाकिला. सर्वांना यशःप्राप्तीचा संतोष झाला. कुंजपुऱ्यावर पांचसात हजार फौज व पांचसात हजार प्यादा लुटला. त्यामुळें अब्दालीचे लष्करांत दहशत पडली. कित्येक लोक उठून जातात–” अशी परिस्थिति निर्माण झाली. या वेळीं लुटींत घडलेली महत्त्वाची घटना म्हणजे शिंद्यांचा हत्ती जव्हेरगज आठदहा महिन्यांपूर्वी पाडाव करून नेला होता तो शिंदे यांना परत मिळाला.

**— १५ ऑक्टोबर १७६०**

## आश्विन शु. ७ (१) शारदादेवीचें स्वागत !

आश्विन शु. ७ हा दिवस सरस्वती–पूजनाचा म्हणून भारतीय लोक पाळतात. सरस्वती किंवा शारदा ही विद्येची देवता मानली आहे. आश्विन शु. ७ हा दिवस अत्यंत शुभ, सुभग आणि कल्याणकारी मानला गेला आहे. धरणीमातेला 'सुजला सुफला' असें स्वरूप देणारा वर्षाऋतु संपून सर्वत्र शांति, निर्मलता आणि प्रसन्नता नांदत असते. यांतच देवांना शारदेचे दर्शन झाले असावें.— "सज्जन हृदयासारख्या सरोवरांत विहार करणारीं प्रसन्न कमळे आणि आकाशांत अनंत काव्याचे फवारे सोडणारा रसस्वामी चंद्र हे दोन्ही जेव्हां परस्परांचे ध्यान धरीत होते, तेव्हां देवांनीं शारदेचे आवाहान केले. शारदा आली आणि पृथ्वीच्या वदनकमलावर सुहास्य पसरलें. शारदा आली आणि वनश्रीचे वैभव विकसले. शारदा आली आणि घरोघर समृद्धि वाढली. शारदा आली आणि वीणेचा झणत्कार सुरू झाला; संगीत आणि नृत्य सर्वत्र पसरले."

ज्या सरस्वतीचे पूजन आजपासून सुरू होत असतें, त्या देवीचे स्वरूप कसें आहे? ती मंजुलहासिनी बाला नाहीं, मनोमोहिनी मुग्धा नाहीं, विलासचतुरा प्रौढा नाहीं, तर ती नित्ययौवना पण स्तन्यदायिनी माता आहे. ती विश्वमाउली आहे. वेदमाता, ब्रह्मसुता, मूलमाया, अशी श्रीशारदादेवी सकल चराचर सृष्टीची आदिजननी आहे. ती अतिसूक्ष्म, निर्विकल्प, शब्दातीत व स्फूर्तिरूप आहे. ब्रह्मनिष्ठ संत तिच्या स्वरूपीं समाधिसुख भोगतात. निर्गुण, निराकार परब्रह्माच्या ठिकाणीं 'एकाकी न रमते एकोऽहं बहुस्याम्।' असे जे आदिस्फुरण झालें तेच शारदेचे मूलस्वरूप आहे. या मूलस्फूर्तीच्या ठिकाणीं जाणीव व वायु अशीं दोन अतिसूक्ष्म रूपें झालीं. त्यांनाच पुरुष-प्रकृति, शिव-शक्ति, गणेश-शारदा अशीं नांवें आहेत. एकत्व नष्ट न होतां हीं दोन रूपे झालीं. याच शारदेला समर्थांनीं—"आतां वदीन वेदमाता। श्रीशारदा ब्रह्मसुता। शब्दमूळ वाग्देवता। महामाया—" या शब्दांत नमन केलें आहे. श्रीज्ञानदेवांनींहि हिचें स्वागत पुढीलप्रमाणें केले आहे, "आतां अभिनव वाग्विलासिनी। जे चातुर्यार्थं कलाकामिनी। ते श्रीशारदा विश्वमोहिनी। नमिली मियां।"

● ● ●

## आश्विन शु. ७ ( २ ) रामचंद्र हरींचें निधन !

शके १६६१ च्या आश्विन शु. ७ रोजीं वसईच्या संग्रामांत रामचंद्र हरि पटवर्धन यास गोळी लागल्यामुळे मृत्यु आला.

पेशव्यांच्या अमदानींत जीं घराणीं प्रसिद्धीस आलीं त्यांत हरभट पटवर्धनांचे घराणें प्रमुख आहे. यांचींच मुलें गोविंदपंत नाना, रामचंद्रपंत व भास्करपंत हीं पुण्यास येऊन बाजीरावाजवळ राहून पराक्रम गाजवूं लागलीं. पश्चिम किनाऱ्यावर पोर्तुगीझांचा धार्मिक जुलूम वाढत चालला होता. त्याला आळा घालण्याचे काम चिमाजीअप्पानें केलें. मराठ्यांच्या इतिहासांत राष्ट्रप्रेम, शौर्य, संघशक्ति, इत्यादि उदात्त गुणांचे दर्शन घडविणारे जे कांहीं थोडे प्रसंग आहेत त्यांत वसईच्या युद्धाची गणना प्रामुख्यानें होत असते. या संग्रामांतील मोहीम १७३७ च्या मार्चे–जूनमध्यें होऊन ठाणें व साष्टी काबीज झाली. या लढाईत रामचंद्र पटवर्धन प्रमुखांपैकीं एक होता. आतां पोर्तुगीझांच्या लढ्यास चांगलें रूप येणार होतें. बाजीरावानें रामचंद्र हरीस लिहिलें, "साडेबत्तीसशें माणूस केळवे माहिमच्या कार्यभागास तुम्हांकडे नेमिले आहे. ... फिरंग्यांच्या लोकांनीं वारें घेतले आहे. तुम्हांवरही तोंड टाकतील, त्यांस जपून एकवेळ कापून काढणें."

यानंतर १७३८ मध्यें रामचंद्र हरि याने माहिमास मोर्चे लावले, आणि केळव्याकडे सातआठशें माणूस घेऊन रामचंद्रपंत चालून गेला. "रामचंद्रपंतांनीं खुद्द दोघे ठार केले आणि गनिम फिरवला. ते समयीं रामचंद्रपंतांचे उजव्या हातास गोळी लागली. हातची तलवार सुटून गुढघ्यास लागली ऐसे होतांच मशारनिल्हे फिरले त्याबरोबर गनिमानें मोर्चे काबीज केले, आमचे लोकांचा धीर सुटोन निघाले, महादजी केशव व धोंडोपंत, वाघोजी खानविलकर, राजबाराव बुरुडकर, चितो शिवदेव, वगैरे लोक मोर्च्यांत होते त्यांस निघावयास फुरसत न होऊन तेथेंच झुंजोन कामास आले. अजमासें दोनशें माणूस कामास आलें व जखमी शंभरापर्यंत." या लढाईंत झालेल्या जखमेमुळेंच रामचंद्र हरीचें आश्विन शु. ७ रोजीं निधन झालें.

— २८ सप्टेंबर १७३९

## आश्विन शु. ७ ( ३ ) इंग्रज-मराठे यांची असईची लढाई!

शके १७२५ च्या आश्विन शु. ७ या दिवशीं इंग्रज-मराठे यांची असई येथें तुंबळ लढाई झाली.

एकोणिसाव्या शतकापासूनच इंग्रज आपला 'पांढरा पाय' मराठी राज्यांत रोवीत होते. धनी बाजीराव नालायक निघाल्यामुळे मराठे सरदारांत फुटिर वृत्ति माजून इंग्रजांना चांगली संधि साधत होती. इंग्रज सेनानी स्टीव्हन्सन् आणि वस्ली हे दोघे नगर, औरंगाबाद, पैठण, वगैरे ठिकाणे काबीज करून पुण्याकडे येण्याच्या धोरणांत होते. सदर ठिकाणे शिंदे-भोसले यांच्या ताब्यांत होतीं. गनिमी काव्याने लढाई करावी हा भोसल्यांचा विचार; उलट समोरासमोर लढून इंग्रजांस नरम करावे असा शिंद्यांचा बेत होता. वस्लीसारखा धूर्त सेनानायक मराठ्यांकडे नव्हता. दि. २३ ला नवलनी येथें वस्लीच्या फौजेचा मुक्काम होता. तेथून सहा मैलावर केळणा नदीच्या आश्रयास शिंदे-भोसल्यांचा तळ होता. आश्विन शु. ७ सप्टेंबरला तुंबळ युद्ध झाले. तीच ही असईची लढाई होय. "दीड प्रहरपर्यंत मारगीर बहुत झाली. शिंद्यांच्या पलटणींनीं वस्लीचा काट चालो दिला नाहीं....लढाईत टोपीकराचे हजारबाराशें माणूस ठार व जखमी झाले. हिंदूचे शेपन्नास माणूस जाया व जखमी झालें. वस्ली चित्तांत खिन्न आहेत—" अशा प्रकारचें वर्णन मराठी कागदपत्रांत सांपडतें. इंग्रज लेखक या संग्रामाचा मोठा बडेजाव करीत असले तरी दोघांची बरोबरी झाली, असें फार झाल्यास म्हणतां येईल. असावध स्थितींत शिंदे असतांना वस्लीने एकाएकीं छापा घातल्यामुळे—शिंद्यांकडील यादव भास्कर पडले. आणि शेंपन्नास माणूस जाग्यावर ठार झालें. नंतर लढाई बिघडली—मराठ्यांचें यश हिरावलें गेलें! या काळांत फितुरीमुळे मराठ्यांचें फारच नुकसान झालेलें दिसतें. ही फितुरी नसती तर शिस्त आणि शस्त्रास्त्रें यांच्या दृष्टीनें असईच्या रणांगणावर शिंद्यांच्या शिपायांना विजय सहज मिळाला असता. पण नुसत्या तोफा आणि नुसता दारूगोळा यांमुळें जय कसा मिळणार? त्याच्या पाठीमागचीं माणसेंहि तितकींच खंबीर असावीं लागतात.

— २३ सप्टेंबर १८०३

## आश्विन शु. ७ (४) विठ्ठलभाई पटेल यांचें निधन !

शके १८५५ च्या आश्विन शु. ७ रोजीं गुजराथमधील सुप्रसिद्ध राष्ट्रसभा-कार्यकर्ते व वादविवादपटु, मुत्सद्दी विठ्ठलभाई जव्हेरभाई पटेल यांचें निधन झाले. यांचेच धाकटे बंधु म्हणजे भारताचे पोलादी पुरुष वल्लभभाई होत.

विठ्ठलभाई यांनीं करमसद व नाडियाद येथें आपलें शालेय शिक्षण संपविल्या-नंतर हे इंग्लंडला गेले व तेथून बॅरिस्टर होऊन आल्यावर वकिली करण्यास यांनीं सुरुवात केली. थोड्याच दिवसांत यांच्या सार्वजनिक कार्याला आरंभ झाला. मुंबई कॉर्पोरेशन, मुंबई लेजिस्लेटिव्ह असेंब्ली व राष्ट्रसभा या अनेक ठिकाणीं त्यांनीं कामगिरी केली असली, तरी स्पीकर म्हणून यांची प्रसिद्धि विशेष होती. २४ ऑगस्ट १९२५ या दिवशीं यांना पहिल्यांदां मध्यवर्ती कायदे मंडळाचे पहिले लोकनियुक्त स्पीकर–अध्यक्ष–म्हणून निवडण्यांत आले. 'अति बडबड्या माणूस' अशी पदवी मॉटेग्यूंच्या हस्तें मिळवणारा हा हिंदी गृहस्थ मूक बनून असेंब्लीचे काम पाहूं लागला. "असेंब्लीची इभ्रत व देशाचे वैभव यापुढे साऱ्या जगाचे राज्य तृणवत् मानणाऱ्या अध्यक्षाचा यांनीं ठेवलेला आदर्श खरोखरच स्पृहणीय आहे." सन १९३० सालच्या लढ्यांत यांनीं आपले कर्तव्य बरोबर ओळखून म्हटलें कीं, "स्वातंत्र्याच्या या लढ्यांत माझें योग्य स्थान असेंब्लीच्या खुर्चीत नाहीं, लोकांच्या खांद्याला खांदा लावून लढण्यांत आहे." याप्रमाणे बेकायदा ठरलेल्या कॉंग्रेसमध्ये यांनीं भाग घेतल्या-मुळे यांना सहा महिने सश्रम कारावासाची शिक्षाहि झाली. पुढें यांनीं केलेल्या अमेरिकेच्या दौऱ्यांतील अति श्रमामुळे यांची प्रकृति खालावली. व जिनेव्हा-मधील एका रुग्णालयांत यांचे निधन झालें. साध्या शेतकऱ्यापासून असेंब्लीच्या अध्यक्षापर्यंत यांनीं चढलेल्या यशाच्या पायऱ्या यांच्या तेजस्वी व्यक्तिमत्त्वाच्या द्योतक आहेत. आवाजाच्या नुसत्या हुंकाराने असेंब्लींत माजलेलीं वादळे शांत करण्याबद्दल यांची ख्याति असे. यांची त्यागवृत्तिहि मोठीच होती. आपल्या पगारापैकीं दरमहा १६५६ रुपये महात्मा गांधींच्या हवालीं हे करीत असत. 'यांच्या मृत्यूमुळें एक खंदा वीर गेला', असे उद्गार म. गांधींनीं काढले.

— २२ ऑक्टोबर १९३३

## आश्विन शु. ८ दुर्गादेवीचें स्वागत !

आश्विन शु. ८ हा दिवस भारतांत दुर्गा अष्टमी म्हणून पाळण्यांत येतो.

जगांत जेव्हां आसुरी संपत्ति प्रबळ होते तेव्हां आदिशक्ति देवीरूपानें अवतीर्ण होऊन असुरांचा संहार करते, असा भारतीय जनतेचा विश्वास आहे. या विश्व-व्यापक आदिमायेनें अनेक अवतार घेतले असल्यामुळें तिला अनेक नांवें प्राप्त झालीं आहेत. महिष नांवाचा असुराचा वध करणारी महिषासुरमर्दिनी, चण्डमुण्ड राक्षसांना मारणारी चामुण्डा, दुर्गम नांवाच्या दैत्यांना मारणारी दुर्गा, इत्यादि देवीचीं रूपें दिसून येतात. याच देवीची महाकाली, महालक्ष्मी, महासरस्वती अशीं तीन स्वरूपें आहेत. भारतीयांची अशी श्रद्धा आहे कीं, याच आदिमायेनें मत्स्यकूर्मादि दशावतार घेतले, रामरूपानें रावण-कुंभकर्णास मारलें, कृष्णरूपानें कंसशिशुपालादिकांचा नाश केला. बिभीषण, मारुति, अर्जुन या वीरभक्तांच्या अंगांत हिनेंच प्रवेश केला. व्यक्तींत किंवा समाजांत दुर्गुण व दुर्व्यसनें संचरलीं, कामक्रोधादिकांचें बंड माजलें म्हणजे हीच अव्यक्तांतून प्रकट होऊन दुष्टदमन व सुष्टसंरक्षण करते.

ही परमेश्वरी शक्तिच विश्वाचा उद्धार करते. महाराष्ट्रांत ही माहूर, सप्तशृंगी, तुळजापूर, औंध, कोल्हापूर या ठिकाणीं प्रकट झाली असून महाराष्ट्राची ती कुलदेवता आहे. निंबाळकर, भोसले हीं प्राचीन क्षत्रिय घराणीं भवानीच्या उपासकांचीं आहेत. याच 'जगदात्मा जगदीश्वरी'ला, 'रामवरदायिनी माते'ला समर्थांनीं शिवरायासाठीं प्रार्थना केली होती–

—"येकची मागणें आतां, द्यावें तें मजकारणें ।
तुझा तूं वाढवी राजा, शीघ्र आम्हांचि देखता ॥"

आणि या देवीचें स्वरूप त्यांनीं असे वर्णन केलें आहे :—

"प्रसन्नमूख सुंदरा । तुझेनि हे वसुंधरा ॥
तुझेंच नांवरूप हो । दिसे तुझें स्वरूप हो ॥
तुझेनि सर्व बोलणें । तुझेनि सर्व चालणें ॥
तुझेनि योगधारणें । तुझेनि राजकारणें ॥"

## आश्विन शु. ९ वासुदेव बळवंतांचें " सीमोल्लंघन " !

शके १८०२ च्या आश्विन शु. ९ रोजीं भारतांतील पहिले क्रांतिकारक वासुदेव बळवंत फडके यांनीं एडन येथील तुरुंगांतून सुटण्याचा धाडसी प्रयत्न केला.

अत्युच्च ध्येय उराशीं बाळगणारा हा खंदा वीर एडनच्या तुरुंगांत काळ्या पाण्याची जन्मठेप भोगीत खितपत पडला होता. परंतु मुक्त असणारा आत्मा सारखी तडफड करी. हातांतील शृंखला तोडाव्यात, खोलीच्या भिंती पाडाव्यात, तुरंगाचे तट ओलांडावेत, असे विचार त्यांच्या मनांत वारंवार येत. आणि आश्विन शु. ९ या दिवशीं त्यांच्या या इच्छाशक्तीनें साकार रूप धारण केलें. दुर्धर रोगाकडे लक्ष न देतां वासुदेव बळवंतांनीं आपल्या अचाट शक्ति-सामर्थ्यानें हातांतील शृंखला खळ्कन् तोडिल्या. बंदिवान् गरुड आतां मुक्त झाला होता. त्याच्या भरारीची झेप आतां अत्यंत मोठी अशीच असणार. कोठडीच्या दाराशीं आल्यावर त्यांना आढळून आलें कीं, भक्कम अशा लोखंडी गजांच्या दारांना मोठें थोरले कुलूप आहे ! तें पाहून या मुक्त सिंहाला जास्तच चेव आला. त्यांचे बाहु स्फुरण पावूं लागले. लागलीच त्यांनीं दोनहि हातांनीं तीं दारें उखडून काढिलीं ; आणि तीं तशीच घेऊन ते तटापर्यंत आले. तटावरून उतरण्या-साठीं शिडी पाहिजे होती ना ! या उखडलेल्या दाराची शिडी झाली. वासुदेव बळवंतांनीं ताड्कन् तटावरून उडी झोकली. रोगग्रस्त झालेल्या मुखावर स्वातंत्र्य-प्राप्तीचा आनंद विलसत होता. सुटलों या यमयातनेंतून, असा श्वास टाकून त्यांनीं धांवण्यास सुरुवात केली. अविरतपणें धांवतां धांवतां यांना दम लागला ; आणि दुर्दैवानें पहारेकऱ्यांना ही गोष्ट समजली. सरकारी घोडेस्वार त्यांचा पाठलाग करूं लागले. त्यांची आणि फडके यांची लहानशी चकमक झाली. परंतु एकटे फडके कोठवर प्रतिकार करणार ? पुनः त्यांना पोलिसांच्या स्वाधीन व्हावें लागलें. त्यांचें दिव्य स्वप्न क्षणार्धांत नाहींसें होऊन त्यांना कठोर अशा सरकारी यंत्रांत जखडून घ्यावें लागलें. आतां तर पहिल्यापेक्षां जास्त त्रास होणार होता. आणि फडके सर्व भोग भोगण्यास तयार होतेच.

— १२ ऑक्टोबर १८८०

## आश्विन शु. १० (१) विजयादशमीचें रहस्य !

आश्विन शु. १० हा दिवस सर्व भारतांत ' विजयादशमी ' म्हणून साजरा केला जातो.

भारतीयांच्या मूर्तिमंत पराक्रमाचा इतिहासच ' विजयादशमी 'त दिसून येतो. हिंदु समाजांतील चारहि वर्णांच्या दृष्टीने या दिवसाला महत्त्व आहे. विद्येची आराधना आणि जोपासना करणारा ब्राह्मण-वर्ग याच दिवशीं सरस्वतीची पूजा करून ज्ञानाचे पाठ घेत असतो. आपल्या अद्वितीय बाहुबलानें पराक्रम करणारे क्षत्रिय वीर विजयादशमीलाच आपल्या शस्त्रास्त्रांचें पूजन करून देशरक्षणासाठीं, शत्रूंचा निःपात करण्यासाठीं सीमोल्लंघन करीत असतात. नवीन धन निर्माण करणें हें ज्या वैश्यांचें कार्य त्यांच्याकडून याच वेळीं शेतांतून नवीन नवीन धान्यें निर्माण झालेलीं असल्यामुळे सृष्टीस ' सुजला सुफला ' असें स्वरूप प्राप्त झालेले असतें.

शत्रुपक्षाचा पराभव करून आणलेली धनदौलत स्वकीयांना या दिवशीं वांटण्याची प्रथा आहे. याचा उगम रामायणाच्या पांचव्य[1] सर्गात सांपडतो. आपल्या गुरूस चौदा कोटी सुवर्ण-मुद्रांची दक्षिणा देतां यावी म्हणून कौत्स नांवाचा ब्राह्मण-पुत्र रघुराजाकडे आला. त्याच वेळीं रघुराजानें नुकताच विश्वजित् यज्ञ केलेला असल्यामुळें तो दरिद्री झाला होता. पण आलेल्या याचकास विन्मुख न पाठवितां रघूनें कुबेरावर स्वारी करून त्याच्याकडे सुवर्ण-मुद्रांची मागणी केली. बिचाऱ्या कुबेराने भयभीत होऊन अयोध्या नगराबाहेर एका शमीच्या वृक्षावर सुवर्णवृष्टि केली. त्यांतील चौदा कोटी सुवर्णमुद्रा कौत्सास मिळाल्या. उरलेलें सुवर्ण रघुराजाने नागरिकांना वांटून टाकिलें. हा दिवस सुद्धां आश्विन शु. १० हाच होता. या वेळपासून सोने लुटण्याची प्रथा रूढ झाली असावी. असे सांगतात कीं, याच दिवशीं प्रभु रामचंद्रांनीं रावणाचा नाश करण्यासाठीं लंकेवर स्वारी केली. अशा प्रकारें हा दिवस पराक्रमाचा, विद्यार्जनाचा, म्हणून भारतीयांना अत्यंत उत्साहदायक वाटतो. तीनचार महिने पावसाळ्यांत विश्रांति घेतल्यानंतर मराठयांच्या फौजा याच दिवशीं शत्रूचा पराभव करण्यासाठीं ' सीमोल्लंघन ' करीत असत.

● ● ●

## आश्विन शु. १० ( २ ) भगवान् गौतम बुद्धांचा जन्म !

आश्विन शु. १० या दिवशीं भारतीयांनीं मानिलेला नववा अवतार भगवान् बुद्धदेव यांचा जन्म झाला.

कपिलवस्तु येथील राजा शुद्धोदन यांचा पुत्र म्हणजे भगवान् बुद्धदेव. त्याची आई मायादेवी मुलाला जन्म देऊन स्वर्गवासी झाल्यावर शुद्धोदनाच्या दुसऱ्या राणीनें–महाप्रजावतीनें बुद्धाचें पालनपोषण केलें. याला सिद्धार्थ अथवा गौतम असेंहि म्हणत. लहानपणापासूनच याच्या अंगीं विरक्ति बाणलेली होती; विद्याभ्यासाबरोबर तिची वाढच झाली. तेव्हां गौतमाला संसारांत जखडण्यासाठीं यशोधरा ऊर्फ गोपा नांवाच्या राजकुमारीशीं त्याचा विवाह करण्यांत आला. आपल्या मुलासाठीं शुद्धोदननें ऐषआराम आणि सुखविलास यांनीं समृद्ध असा राजवाडा निर्माण केला. परंतु गौतमाचा अवतार काय यासाठींच होता! त्यांचें मन या सुखोपभोगांत कधींच रमले नाहीं.

एके दिवशीं गौतमानें एक रोगी पाहिला, दुसऱ्या दिवशीं एक वृद्ध पाहिला, तिसऱ्या दिवशीं त्यानें एक प्रेत पाहिलें. लागलीच त्याला उपरति झाली. सर्व जग दुःखमय असून क्षणिक आहे, असा विश्वास त्यास वाटूं लागला; आणि मनास खरी शांति लाभावी म्हणून सिद्धि साधण्यासाठीं त्यानें सर्वसंगपरित्याग केला, आणि तो संन्यासवृत्ति धारण करून निरंजना नदीकाठीं तपस्या करूं लागला. एके दिवशीं नदीच्या पलीकडे त्याला एक अश्वत्थ वृक्ष दिसला. याच वृक्षाखालीं त्याने तपश्चर्येस पुन्हा सुरवात केल्यावर एके दिवशीं त्याला बोधप्राप्ति झाली. तो स्वतः मुक्त झाला. आतां इतरांच्या मुक्तीसंबंधीं त्याला काळजी वाटूं लागली. गौतम बुद्धानें आपल्या अभिनव तत्त्वज्ञानाच्या प्रसारास सुरवात करून क्रांतिकारक विचारांना चालना दिली. धर्माची आणि मानवतेची अधिक व्यापक कल्पना भारतांत अभिनव पद्धतीनें गौतम बुद्धानें सुरू केली. हिंसामय कर्मकांडांत मग्न झालेल्या भारतीयाना अहिंसेचा दिव्य मंत्र बुद्धानें दिला. गौतम बुद्ध हा सर्व जगांतील धर्मसंस्थापकांत प्रथम श्रेणींतील धर्मसंस्थापक होऊन गेला.



## आश्विन शु. १० ( ३ ) रा. स्वं. संघाचा जन्म !

शके १८४७ च्या आश्विन शु. १० या दिवशीं नागपूर येथील मोहित्यांच्या वाड्यांत, भारतांत विख्यात असलेल्या 'राष्ट्रीय स्वयंसेवक संघ' या संघटनेचा जन्म झाला.

विजयादशमीला सीमोल्लंघन करावयाचें असतें. आत्मविस्मृतीच्या सीमा ओलांडून स्वाभिमानाकडे मोहरा वळवावयाचा असतो. या दृष्टीनें शके १८४७ मधील आश्विन शु. १० हा दिवस भारतीयांच्या इतिहासांत अनेक दृष्टींनीं महत्त्वाचा आहे. या दिवशीं नागपूर येथें डॉ० हेडगेवार यांनीं 'राष्ट्रीय स्वयंसेवक संघ' या संघटनेची स्थापना केली. भ्रांत मार्गावर असणाऱ्या हिंदु समाजाला संजीवनी देण्यासाठीं काय करावें याचा विचार डॉक्टर अनेक दिवस करीत होते. शेवटीं एका विचारानें, एका ध्येयानें, एका मनानें, सर्व हिंदु समाज संघटित झाल्याशिवाय तरणोपाय नाहीं असें निश्चित वाटल्यावर डॉक्टरांनीं मोठ्या धडाडीनें कार्यास आरंभ केला. पैसा गोळा करण्याअगोदर त्यांनीं माणसांचीं मने गोळा केलीं. पहिल्या दिवशीं मोहित्यांच्या पडक्या वाड्यांत अवघे पांचच स्वयंसेवक उपस्थित होते. परंतु थोड्याच अवधींत या मोहरीएवढ्या बीजाचा मोठा वटवृक्ष निर्माण झाला. लक्षावधि तरुण या पवित्र कार्यांत आपण होऊन सामील झाले. त्याग, शिस्त, चारित्र्य यांचे धडे तरुणांना याच संघटनेंत मिळूं लागले. अनेक प्रकारच्या संकटांतून संघाने मार्ग काढिला. "राष्ट्राचें खरें चैतन्य व बल ध्येयनिष्ठ तरुणांच्या प्रभावी संघटनेंत असतें हें त्रिकालाबाधित सत्य डॉक्टरांनीं पुन्हा एकदां प्रत्ययास आणून दिलें. हिंदु समाजांतील सर्व अव्यक्त व निद्रित शक्तींना व्यक्त व जागृत करण्याची महनीय कामगिरी त्यांनीं पार पाडली." या विख्यात संघटनेच्या शाखा भराभर साऱ्या भारतांत निघाल्या. कानाकोपऱ्यांतून संघाचें नांव दुमदुमूं लागलें. प्रसिद्धीची विशेष चाड न धरितां पंचवीस वर्षांच्या अवधींत संघानें मोठीच कामगिरी केली. म. गांधींच्या भीषण हत्येनंतर कांहीं काळ संघाला वनवास भोगावा लागला होता; परंतु लवकरच संघाचें कार्य पुन्हा पहिल्याच जोमानें सुरू झालें.

— २७ सप्टेंबर १९२५

## आश्विन शु. ११ बाजीरावाची निजामाविरुद्ध मोहीम !

शके १६४९ च्या आश्विन शु. ११ रोजी पराक्रमी पेशवे पहिले बाजीराव यांनीं निजामावर मोहीम सुरू केली.

या सुमारास बाजीराव कर्नाटकाचे स्वारीवर होता. इकडे कोल्हापूरच्या संभाजीनें चंद्रसेन जाधवाच्या द्वारे निजामाशीं संधान लावले. सर्व फौज घेऊन तो निजामास मिळाला. तेव्हां निजामाने उचल खाल्ली. त्याचे उग्र स्वरूप शाहूच्या नजरेस आले ! बाजीरावास शाहूनें दक्षिणेंतून बोलावून घेतलें. शाहूच्या जमवाजमवीस उशीर झाल्यामुळे निजामाने उठविलेला दंगा सर्वत्र पेट घेत होता. मराठ्यांत दुही माजावी म्हणून निजाम आटोकाट प्रयत्न करीत होता. कोल्हापूरकर संभाजी, रावरंभा निंबाळकर, चंद्रसेन जाधव, आदि मंडळी हाताशीं होतींच.

शाहूकडील लोक ज्या वेळीं निजामच्या राज्यांतील चौथाई व सरदेशमुखीच्या हक्कांची वसुली करण्यास गेले त्या वेळी त्यांना हांकून देण्यांत आले. "तुमचे लोक वसूल करण्यास येतात आणि कोल्हापूरकर संभाजी राजाचेहि येतात. या तुम्हां दोघांपैकीं खरा वारस कोण ते आगोदर ठरवा, आणि मग वसुलीस या" असा मग्रूरीचा निरोप निजामाचा होता. यामुळे शाहूस अत्यंत क्रोध आला. बाजीराव कर्नाटकाचे स्वारीवर होता, तरी त्यानें कळविले : 'निजाम गर्वाने चढून गेला आहे. मला आज्ञा द्या ; मी त्याचा मोड करतों.' शाहूकडून परवानगी मिळाल्यावर बाजीराव फौज जमविण्याच्या उद्योगास लागण्यासाठीं सन १७२७ च्या एप्रिलास साताऱ्यास येऊन दाखल झाला. निजामानें अगदीं भीमेपर्यंतची सत्ता काबीज केली होती. तेव्हां त्यास गनिमी काव्यानें हरण करण्याचे बाजीरावाने ठरविले. आणि सर्व जमवाजमव करून आश्विन शु. ११ ला मोहीम सुरू केली.

सन १७२८ च्या फेब्रुवारींत पालखेड येथे निजामाचा पराभव होऊन ही मोहीम संपली. बाजीरावाच्या कर्तृत्वाची छाप सर्व भारतांत पडली. 'मराठी राज्याचा विस्तार बाजीरावच करील' अशी खात्री शाहूची झाली.

—१३ सप्टेंबर १७२७

## आश्विन शु. १२ दामोदरपंत चाफेकरांचा जबाब !

शके १८१९ च्या आश्विन शु. १२ रोजीं जुलमी इंग्रज अधिकारी रॅण्ड यांचा खून करणारे दामोदरपंत चाफेकर यांनीं प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेट मि. हॅमिल्टन यांचेपुढें अत्यंत विस्तृत आणि विलक्षण अशी जबानी दिली.

गुन्हेगाराचा तपास इंग्रज सरकार मोठ्या नेकीनें करीत होतें. पुण्याच्या ब्राह्मणांविरुद्ध सरकारचा फारच रोष होता. परंतु सप्टेंबरच्या महिन्यांत द्रविड-बंधूंच्या मार्फत चाफेकर बंधूंचीं नांवें पोलिसांना समजलीं; आणि पहिल्यानें दामोदरपंत चाफेकर यांस अटक झाली. आश्विन शु. १२ रोजीं झालेल्या जबानींत त्यांनीं सांगितलें, " वासुदेवराव पटवर्धन, दामुअण्णा कुलकर्णी वगैरे सुधारक यांना आणि थोरात, वेलिंगकर, वगैरे धर्मांतर केलेल्या हिंदूंना मीच ठोक दिला. मुंबईतील राणीच्या पुतळ्यावर मींच डांबर ओतले व पुतळ्याच्या गळ्यांत जोडयांची माळ मींच घातली; युनिव्हर्सिटीचा मंडप मींच जाळला. पुण्यांत प्लेगच्या अमदानींत सोजीर लोकांनीं केलेले अत्याचार पाहून मला त्वेष आला व त्यांचा मुख्य अधिकारी रॅंडसाहेब याला मारून सूड उगविण्याचा मीं निश्चय केला. बंदुकी अमुक ठिकाणाहून चोरल्या, दारूगोळा अमुक ठिकाणीं मिळवला, पिस्तुलें व तरवारी अमुक ठिकाणाहून घेतल्या, रॅंडसाहेबाला मारण्याचे प्रयत्न कसे फसले, शेवटीं ज्युबिलीच्या दिवशीं दिवसभर ईश्वरप्रार्थना करून व हत्यारें बरोबर घेऊन मी व माझा भाऊ बाळकृष्ण असे गणेशखिड रस्त्यावर गेलों. मीं रॅंडसाहेबाला गोळी घातली व बाळकृष्णानें ले. आयर्स्ट याला मारिले. हत्यारें नाल्यांतील पुलाखालीं छपवून ठेवून आम्ही कालव्याच्या रस्त्यानें परत आलों; दुसरे दिवशीं लोंढे यांच्या विहिरींत हत्यारें टाकून देऊन ता. २४ जून रोजीं मुंबईस निघून आलो व फिरून कीर्तनें करूं लागलों; पुढें टिळकांच्यावर खटला झाला; नातूंना पकडलें, इतरांना त्रास झाला म्हणून मी पोलिसांच्या स्वाधीन झालों." थोड्याच दिवसांनंतर खटल्याचा निकाल लागला आणि दामोदरपंतांना फांशीची शिक्षा झाली; आणि ती त्यांनीं अत्यंत समाधानानें स्वीकारली.

—८ ऑक्टोबर १८९७

## आश्विन शु. १३ बाळाजी आवजींचा सन्मान !

शके १५९५ च्या अश्विन शु. १३ रोजीं श्रीशिवाजीमहाराज यांनीं आपला दूरदर्शी आणि चाणाक्ष सेवक बाळाजी आवजी चिटणीस यांना पालखी देऊन त्यांचा सन्मान केला.

यांचें घराणें जंजिऱ्याकडील होय. आवजी हरि चित्रे मुजूमदार हे एक प्रभु इसम जंजिऱ्याच्या सिद्दीजवळ दिवाण होते. परंतु सिद्दीची कांहीं कारणांवरून यांच्यावर गैरमर्जी होऊन त्यानें हुकूम केला कीं, आवजी हरींना पोत्यांत घालून समुद्रांत टाकावें किंवा गुलाम म्हणून तरी विकावे. आवजीची पत्नी गुलबाई ही मोठी धूर्त होती. तिने अधिकाऱ्यांचें मन वळविलें. आणि नंतर हें दांपत्य राजापुरास येऊन राहिले. बाळाजी हा आवजीपंतांचा वडील मुलगा होता. बाळाजीचा मामा विसाजी याने बाळाजीचें व त्याच्या दोन भावंडांचें शिक्षण उत्तम प्रकारें केलें. हबशी सरकारची भीति या कुटुंबास अजूनहि होतीच. याच वेळीं शिवाजी नांवाचा कोणी पराक्रमी पुरुष महाराष्ट्रांतील पुणे प्रांतीं अवतरला आहे, तो हिंदूंचा वाली आहे, इत्यादि हकीगत बाळाजीस समजल्यावर त्यास अत्यंत आनंद झाला. लागलीच त्याने आपल्या दैन्यावस्थेचें एक पत्र शिवरायांना लिहिलें. पुढें शिवाजीनें राजापुराची मोहीम काढली ; त्या वेळीं बाळाजीचें लेखनकौशल्य त्याच्या ध्यानांत होतेंच. शिवाजीनें बाळाजीस आणि त्याच्या सर्व कुटुंबास आश्रय दिला. आणि बाळाजीची हुशारी पाहून त्याला स्वतःच्या चिटणिसाचें काम दिलें. बाळाजीवर पुढे राजकीय दप्तराची मुख्य जबाबदारी आली होती तरी नाजूक वकिलातीचींहि कामे तो सफाईनें पार पाडीत असे. याची लेखनशैली अत्यंत साधी, स्पष्ट व पूर्ण असे. राज्याभिषेकाच्या वेळीं भोसले कुलाची पूर्वपीठिका आणण्याचे काम याच स्वामिनिष्ठ इसमाने केलें. याची बुद्धिमत्ता व स्मरणशक्ति अत्यंत तीव्र होती. परंतु खेदाची गोष्ट ही कीं, या चाणाक्ष माणसाचा उपयोग संभाजी राजांना करून घेतां आला नाहीं. आपल्याविरुद्ध होणाऱ्या कारस्थानाबद्दल क्रोधायमान होऊन संभाजीनें सन १६८१ च्या ऑगस्ट महिन्यांत बाळाजी आवजी याला परळीखालीं कैद करून मारिलें.

**—१३ ऑक्टोबर १६७३**

## आश्विन शु. १४ " इथुनि आतां प्रारंभ..... प्रळयाला "

शके १७१७ च्या आश्विन शु. १४ ला मराठ्यांचे दुर्दैवी पेशवे सवाई माधवराव यांचें निधन झाले; आणि त्याबरोबरच मराठेशाहीचें भाग्य संपलें!

सवाई माधवराव पेशवे म्हणजे महाराष्ट्राचा आत्मा होता. यांच्या कारकीर्दीत इंग्रजांशीं युद्ध, टिपूवरील मोहिमा, महादजी शिंद्यांचे दिल्लीकडील पराक्रम, खर्ड्यांचा अपूर्व विजय, अशा श्रेणीनें मराठ्यांचें भाग्य चढत्या क्रमांत होतें आणि या वैभवाच्या समयीं सवाई माधवरावांचा हृदयद्रावक रीतीने अंत झाला. रघुनाथरावांचे पुत्र बाजीराव यांजवर माधवरावाचा लोभ होता. या बाबतींत त्यांचा आणि नाना फडणिसांचा मतभेद होऊं लागला. तरुण पेशव्याचा मनस्ताप वाढत गेला. मनाच्या या खिन्न स्थितींतच माधवरावांस गणेश चतुर्थीपासून ताप येऊं लागला; प्रकृति क्षीण झाली. विजयादशमीच्या दिवशीं अभ्यंगस्नान, फौजांची सलामी, दरबार, भेटी, इत्यादि गोष्टी करतांना श्रीमंत थकून गेले.

"द्वादशीचे दिवशीं श्रीमंतांस ज्वराशांत वायु झाला. प्रातःकाळीं शनिवारवाड्यांतील गणपतीचे दिवाणखान्यांत निद्रेचें स्थान आहे, तेथें गेले. पलंगावर बसले होते. मनास काय वाटलें न कळे, पलंगावरून उठून दक्षिणेकडील खिडकींत उभे राहिले. खिजमतगार यांनीं शालेस हात लाविला कीं, येथें उभें राहणें ठीक नाहीं. तों एकाएकीं तेथून उडी टाकिली. खालीं दीड भाला खोल कारंजी हौद आहे, तेथें कांठावर पडून आंत पडले. उजवी मांडी मोडून हाड बाहेर निघालें. दांतांची कवळी पडली, तेथून उचलून नानांनीं ऐने महालांत नेलें. तबीब आणून हाड बसवून, टाके देऊन, शेक केला, कांहीं वेळ भ्रंश होऊन बोलत." याच अवस्थेंत आश्विन शुद्ध १४ ला श्रीमंत कैलासवासी झाले! सवाई माधवरावांच्या मृत्यूनें महाराष्ट्रलक्ष्मी फिकी पडली! आणि महाराष्ट्राचें भवितव्य शाहिरांनीं ठरविलें कीं,—

" रवि मावळतां वरी मरण झडकरी आलें सखयाला।
इथुनि आतां प्रारंभ दिसंदिस अद्भुत प्रळयाला—"

— २७ ऑक्टोबर १७९५

## आश्विन शु. १५ (१) डोंगरीच्या तुरुंगांतील एकशें एक दिवस!

शके १८०४ च्या आश्विन शु. १५ या दिवशीं डोंगरीच्या तुरुंगांतील एकशें एक दिवसांची शिक्षा भोगल्यानंतर टिळक आणि आगरकर यांची मुक्तता झाली.

कोल्हापूर प्रकरणाबाबत 'केसरी' आणि 'मराठा' या वर्तमानपत्रांतील लेखांबद्दल टिळक व आगरकर यांना चार महिन्यांची शिक्षा झाली होती. पण दोघांचें वर्तन 'चांगले' राहिल्यामुळें सरकारनें 'दयावंत' होऊन १९ दिवसांची सूट दिली आणि आश्विन शु. १५ ला दोघांना मुक्त केलें. या दोन थोर देशभक्तांच्या सत्कारासाठीं दोन हजार लोक स्टेशनवर जमले होते. मुरारजी गोकुळदास बंगला, 'दिनबंधु' कचेरी, युनियन क्लब, इत्यादि ठिकाणीं सत्कार झाला. खडकी स्टेशनवर डेक्कन कॉलेजांतील विद्यार्थ्यांनीं त्यांचे स्वागत केलें. सायंकाळीं मोरोबादादांच्या वाड्यांत सार्वजनिक सभेतर्फे पानसुपारीचा समारंभ झाला.

लोकसेवेंत शारीरिक दुःख व सन्मानसुख यांचा जो सजोड साक्षात्कार घडतो तो घेण्यांत त्यांचें पुढचें सारें आयुष्य जाणार होते, दोघांनाहि तुरुंगवास मानवला नाहीं. उपासमार फार झाल्यामुळे टिळकांचे वजन चोवीस पौंडांनीं आणि आगरकरांचें सोळा पौंडांनीं कमी झाले होतें. तेरा फुटांच्या चौरस खोलींत अहोरात्र वास्तव्य, कांदाभाकर हें खाणें, अन्नांत मिरच्या व लसूण, निजण्याच्या घोंगडींत सुरवंट, भिंतीत ढेकूण अशा स्थितींत सुख कोठून मिळणार? देशांतील भाव वाढवणारा आरामशीर तुरुंग तेव्हां थोडाच होता? टिळक आणि आगरकर यांची मुक्तता झाली तेव्हां त्यांचे स्वागत कसें झालें याची मोठी मनोरंजक हकीगत प्रसिद्ध आहे. "तुरुंगाजवळ सुमारें शंभरसव्वाशें गाड्या आलेल्या असून लोकसमाज सुमारें दोन हजार जमला होता. कोणी एक जुन्नरचा उपदेशक पहांटे चार वाजतांच मोठी दोन घोड्यांची गाडी, टिळक-आगरकरांस पागोटें, शालजोडी, पोशाख घेऊन तुरुंगाच्या दारापाशीं आला. बरोबर तो एक न्हावी घेऊनहि गेला होता. सुपरिंटेंडेंटचे परवानगीने उभयतांची श्मश्रु, स्नान, पोशाख, वगैरे करवून त्यानें त्यांस आपल्या गाडींत आणून बसविले होतें. सूर्योदयास मिरवणूक चालू झाली."

— २६ ऑक्टोबर १८८२

## आश्विन शु. १५ (२) राजा रविवर्मा यांचें निधन !

शके १८२८ च्या आश्विन शु. १५ रोजीं भारतांतील जगप्रसिद्ध चित्रकार राजा रविवर्मा यांचें निधन झालें.

लहानपणापासून त्रावणकोरच्या महाराजांच्या संगतींत ते असल्यामुळें त्यांच्या चित्रकलेच्या नादाला उत्तेजन मिळत गेले. सन १८७३ मध्ये मद्रास येथील चित्रकलेच्या प्रदर्शनांत त्यांच्या एका चित्राला सुवर्णपदक मिळून त्यांची वाहवा झाली. बडोदें, भावनगर, म्हैसूर, इत्यादि संस्थानिकांशीं त्यांचा संबंध येऊं लागला. रामायण-महाभारतांतील चित्रे त्यांनीं बडोदें सरकारच्या राजवाड्यांत काढिलीं. त्या चित्रांच्या मुद्रणासाठीं रविवर्मा प्रेस काढण्यांत आला. भारतांतील कानाकोपऱ्यांत यांचीं चित्रे जाऊन पोंचलीं आहेत. वैचित्र्य, समप्रमाणत्व, साधेपणा, व्यवस्थितपणा, आकृतीची मृदुता, पावित्र्य, उज्ज्वलता, आदि गुण यांच्या चित्रांतून प्रामुख्यानें दिसून येतात. रविवर्मा स्वतः मल्याळी असून त्यांच्या सर्व चित्रांतील व्यक्तींना महाराष्ट्रीय पोषाक असे. "चित्रास इतका योग्य पोषाख दुसऱ्या प्रांतांत नाहीं, महाराष्ट्रांतलि स्त्रियांच्या लुगडें नेसण्याच्या विशेष पद्धतीमुळे त्यांचें सौंदर्य जास्त आकर्षक दिसतें" असें रविवर्माचें म्हणणें असे.

रविवर्माचें जन्मस्थान विलिमनूर ( त्रावणकोर संस्थान ) हे असून यांची जात मल्याळी क्षत्रियाची होती. लष्करी पेशांतलि कामगिरीमुळे यांच्या घराण्याला विलिमनूर गांव इनाम मिळालें होतें. यांचें घराणे अत्यंत सुसंस्कृत असें होतें. यांच्या चित्रांची ख्याति सर्व जगांत होत असते. हिंदुस्थानच्या प्रत्येक राजवाड्यांत व प्रत्येक घरात यांचीं चित्रें जाऊन त्यांनीं लोकांचा आदर संपादन केला आहे. यांनीं काढलेलीं स्त्रियांचीं चित्रें कांहीं अंशीं इंग्रजी वळणावर असलीं तरी त्यांच्या चेहऱ्यांत भावदर्शन उत्कटपणें साधलेलें असल्यामुळें तीं सर्व चित्रें उत्कृष्ट म्हणूनच गणलीं गेलेलीं आहेत. अनेक सूक्ष्म भावना हळुवारपणें चित्रांत दर्शीत करण्यांत यांचा हातखंडा असे. मानवी स्वभावाच्या विविध छटा 'कृष्ण-शिष्टाई' या त्यांच्या विख्यात चित्रांत स्पष्टपणें खुलून दिसतात.

—२ ऑक्टोबर १९०६.

## आश्विन व. १ बालमुकुंदांना फांशी !

शके १८३६ च्या आश्विन व. १ रोजीं पंजाबमधलि क्रांतिकारकांनीं केलेल्या दिल्ली-कटाच्या खटल्याचा निकाल लागून अमीरचंद, अवध बिहारी, बालमुकुंद प्रभृतींना फांशीची शिक्षा सुनावण्यांत आली.

पंजाबमधील आधुनिक इतिहासांतील हा अत्यंत हृदयस्पर्शी प्रसंग आहे. बालमुकुद हे भाई परमानंदांचे चुलत भाऊ. औरंगजेब बादशहानें त्यांचे पूर्वज भाई मतिदास यांना करवतीनें कापून परलोकास पाठविलें होतें ! त्याच ठिकाणीं भाई बालमुकुंद हे फांसावर चढले. या क्रांतिकारकांनीं मोठेंच धाडस केलेलें होतें. लॉर्ड हार्डिंज हे त्या वेळीं व्हाइसरॉय होते. मोठ्या थाटामाटांत दिल्ली राजधानींत प्रवेश करण्याची योजना सिद्ध झालेली होती. राजरस्त्यांतून मिरवणूक अति थाटाने निघालेली होती, तों एकदम एक मोठा स्फोट झाला. आणि एक भयंकर बॉंब व्हाइसरॉय हार्डिंज यांच्या अंगावर येऊन पडला. त्यांच्या अंगांतून रक्ताच्या धारा वाहूं लागल्या. माहूत तर जागच्या जागीं ठार झाला. धावपळ सुरू झाली. मिरवणूक उधळली गेली. आणि गुन्हेगाराला शोधण्याच्या धडपडी सुरू झाल्या. अनेक तरुणांना पकडण्यांत आलें, त्यांत बालमुकुंद, अमीरचंद, आदि प्रमुख होते. बालमुकुंदांनींच बॉंब फेकला होता. हिंदुस्थानला स्वातंत्र्य मिळावें, भारतमातेच्या पायांतील शृंखला तुटून जाव्यात, या ध्येयासाठीं अनेक देशभक्तांनीं अनेक प्रकारांनीं प्रयत्न केले त्यांत क्रांतिकारकांचा मार्ग विशेष प्रकारानें नांवारूपास आला आहे. दुसऱ्या कोणत्याहि सनदशीर मार्गाचा उपयोग होत नाहीं, असें ठरल्यामुळें त्यांना हा हिंसामय क्रांतीचा वा दहशतवादाचा मार्ग स्वीकारावा लागला. या मार्गांतील धोके आणि संकटें यांची जाणीव त्यांना होतीच. परंतु क्रांतिकारकांनीं कशाचीच पर्वा न करतां एके काळीं सबंध हिंदुस्थान आणि इंग्रज सरकार हादरून सोडिले होतें. बालमुकुंदांच्या मृत्यूनंतर त्यांची नवविवाहित पत्नी पंधरा दिवसांतच त्यांना भेटावयास गेली. त्यांच्या पत्नीचें नांव रामरखी उर्फ लज्जावती असें होतें. तिनें अन्नपाणी न घेतां स्वेच्छेनें मृत्यूला कवटाळिलें !

—५ ऑक्टोबर १९१४

## आश्विन व. २ आदिलशाहीची समाप्ति !

शके १६०८ च्या आश्विन व. २ रोजीं विजापूरची अदिलशाही समाप्त झाली.

तुर्कस्तानांतील एका सुलतानाचा पुत्र अबुल मुज्फर युसूफ आदिलशहा यानें सन १४८९ सालीं विजापूरला आदिलशाहीची स्थापना केली. याची पत्नी बुबूजीखान मराठा सरदाराची मुलगी होती. ही जात्याच फार शूर आणि मुत्सद्दी होती. आदिलशाहींत इस्माइल, इब्राहिम, महंमदअली आदि पातशहा होऊन गेले. यांच्या कारकीर्दींत विजापूरचे वैभव वाढून शाही अत्यंत संपन्न झाली होती. महमंद आदिलशहाच्या वेळेला मराठ्यांच्या अंगांत स्वातंत्र्याचें वारें खेळूं लागलें होतें. बंकापूर येथील कदमराव राजा बंडखोर ठरून शहाकडून मारला गेला. मुराररावानें मोठ्या पराक्रमानें मोंगलांपासून विजापूरचें संरक्षण केलें. याच वेळीं परिंड्याच्या किल्ल्यावरील अजस्त्र तोफ मुल्क-इ-मैदान ( रणभूमीचा राजा ) हिला मुराररावानें विजापुरास आणलें.

दुसरा आदिलशहा अली हा १६५६ मध्यें गादीवर आला. त्या वेळीं औरंगजेब दक्षिणेंत आला होता. याच वेळीं राजे शिवाजी भोसले हेहि विजापूरचे 'शत्रु' म्हणून उदयास आले होते. अफजलखान, सिद्दी जोहार आणि स्वतः आदिलशहा यांनीं शिवाजीचा नायनाट करण्याचा अतोनात प्रयत्न केला, पण हा 'डोंगरी राजा' त्यांच्या हातीं लागला नाहीं.

१६८६ मध्यें औरंगजेबानें शेवटचा आदिलशहा यास विषप्रयोग करून ठार मारिलें आणि पातशाही आपल्या पदरीं आणली. असें सांगतात कीं, आदीलशहाला "एवढें अफाट, श्रीमान्, बलाढ्य, मजबूत व शोभिवंत राज्य गमावून पदरीं असलेलें द्रव्य व जडजवाहीर खंदकांत ओतीत व दानधर्म करीत औरंगजेबाच्या तंबूंत जावें लागलें–" आदिलशहाचें संगोपन अनेक मराठे सरदारांकडूनच झालेलें होतें. या कारकीर्दींत अनेक नामांकित इमारती व मशिदी बांधल्या गेल्या. सोलापूर, परिंडा, मिरज, इत्यादि भक्कम किल्ले बांधण्यांत आले. घाटगे, निंबाळकर, डफळे, माने, सावंत, भोसले, आदि नामांकित मराठे वीर याच काळांत उदयास आले.

— २३ सप्टेंबर १६८६

## आश्विन व. ३ श्रीपंतमहाराज यांची समाधि !

शके १८२७ च्या आश्विन व. ३ रोजीं बेळगांवशेजारील बाळेकुंद्री येथील प्रसिद्ध सत्पुरुष श्रीपंतमहाराज यांनीं समाधि घेतली.

रामचंद्रपंत आणि गोदूबाई (सीताबाई) या सत्त्वशील दांपत्याच्या पोटीं शके १७७७ च्या श्रावण व. ८ रोजीं श्रीपंतमहाराज यांचा जन्म झाला. यांनीं आपला प्राथमिक विद्याभ्यास आपल्या आजोळींच केला. त्यानंतर बेळगांव येथें इंग्रजी शिक्षण संपूर्ण केल्यावर तेथील एका इंग्रजी शाळेत हे शिक्षक म्हणून काम करूं लागले. आरंभींपासूनच याचें लक्ष नीतिमत्ता, नियमितपणा व सद्-वर्तन यांकडे असे. पंतांच्या पितृकुलांतील सर्वच माणसे सत्यप्रतिज्ञ, ईश्वरनिष्ठ व अढळ अशा सात्त्विक धैर्याचीं होतीं. या सर्वांची दत्तावर अत्यंत निष्ठा असे. दड्डी या आजोळच्या गांवीं निसर्गाचें सौंदर्य अनुपम असल्यामुळें श्रीपंताना एकांतवासाची आवड लहानपणापासूनच लागली. पारमार्थिक विषयांचे चिंतन आणि तत्त्वविवेचनाची हौस यांमुळें त्यांची मानसिक भूमिका फारच उंच झाली. बाळेकुंद्रीजवळील कर्डीगुद्दीच्या डोंगरांत वास्तव्यास राहिलेल्या एका शुद्धद्वैत-मार्गाच्या महायोग्यानें शके १७९७ मध्यें श्रीपंतांना अनुग्रह केला. त्यानंतर पंतांनी कांहीं दिवस योगाचा अभ्यास केला. त्यांना मराठी, कानडी, इंग्रजी, हिंदी, संस्कृत, आदि भाषा चांगल्याच अवगत होत्या. आध्यात्मिक ग्रंथांच्या परिशीलनांत व वेदान्तचर्चा करण्यांत यांचा बराचसा काळ जाऊं लागल्यावर शेकडों शास्त्री, पंडित यांच्याभोंवतीं जमूं लागले. यांचा शिष्यसमुदायहि बऱ्याच मोठ्या प्रमाणावर जमला. पंतांची राहणी अत्यंत साधी असून ते प्रेमळ व निःस्पृह होते. त्यानीं आपल्या प्रेमानें व सौजन्यानें संसार आनंदमय बनवून आपलें अवतारकार्य वयाच्या ५१ व्या वर्षी, म्हणजे आश्विन व. ३, शके १८२७ या दिवशीं संपविलें. बेळगांवीं यांचे निधन झाल्यावर यांच्या हजारो शिष्यांनीं मोठ्या समारंभानें यांचा देह बाळेकुंद्री येथे नेला; व त्यांच्या आंबराईत त्याला अग्निनारायणाच्या स्वाधीन करून त्या ठिकाणीं एक औदुंबर वृक्ष लाविला. या ठिकाणीं यांच्या भक्तांकडून दरवर्षी मोठ्या प्रमाणावर यांचा उत्सव होत असतो.

—१६ ऑक्टोबर १९०५

## आश्विन व. ४ 'लोकहितवादी' यांचें निधन !

शके १८१४ च्या आश्विन व. ४ रोजीं महाराष्ट्रांतील सर्वांगीण सुधारणेचे आद्य प्रवर्तक, नव्या मूलग्राही विचारांचे प्रतिपादक, ज्ञानसंग्राहक लोकसेवक आणि कळकळीचे लेखक, सरदार गोपाळ हरि देशमुख ऊर्फ लोकहितवादी यांचें निधन झालें.

लोकहितवादींचे वडील प्रसिद्ध बापु गोखले यांचे फडणीस होते. त्यांना एल्फिन्स्टन साहेबाने भेटीस बोलाविलें पण हे गेले नाहींत म्हणून यांची जहागीर जप्त झाली. गोपाळराव देशमुख यांनीं प्रथम पुण्याच्या न्यायाधीश कचेरींत उमेदवारी स्वीकारिली. पण इंग्रजी शिक्षण नसल्यामुळे नडलें म्हणून हे इंग्रजी शिकले. इंग्रजी व इतिहास या विषयांत प्रावीण्य मिळवून पुण्यास सरदारांच्या एजंटांच्या कचेरींत यांनीं नोकरीहि मिळाविली. हे मोठे समाजसुधारक होते. 'प्रभाकर' पत्रांतून यांनीं लिहिलेलीं 'शतपत्रें' मराठी वाङ्मयांतच नव्हे तर समाजसुधारणेच्या इतिहासांत अत्यंत महत्त्वाचीं आहेत. हिंदु समाज व त्याच्या चालीरीती यांतील दोष काढून त्यांनीं लोकांना सद्धर्माचा व न्यायाचा मार्ग दाखविला. महाराष्ट्रांतील एक नामवंत द्रष्टे म्हणून यांचा लौकिक मोठा आहे. हिंदुस्थान देशांत पार्लमेंट स्थापन होऊन लोकशाहीचा कारभार सुरू व्हावा अशा प्रकारची पहिली घोषणा याच गृहस्थांनीं शंभर वर्षांपूर्वी केली; आणि सुदैवानें आज तीच फलद्रूप होत आहे. 'लोकहितवादी' हें यांचें टोपण नांव होतें. पुढें सरकारी नोकरींत यांची बरीच प्रगति झाली. आणि यांचा मानसन्मानहि वाढला. यांनीं अनेक प्रकारच्या सुधारणा केल्या. लेखनाचा हव्यास मोठा असून यांच्या लिखाणांत ज्ञानसंग्रह आणि कळकळ यांचा उत्कृष्ट मिलाफ झालेला असे. ब्राह्मणी संस्कृतीचे सदोष अंतरंग यांनीं निर्भीडपणें स्पष्ट केलें. यांची वाङ्मयसंपत्तिहि अफाट अशीच आहे. लक्ष्मीज्ञान, स्थानिक स्वराज्यव्यवस्था, भरतखंड पर्व, पानिपतची लढाई, ऐतिहासिक गोष्टी, गुजरात देशाचा इतिहास, लंकेचा इतिहास, सुराष्ट्र देशाचा इतिहास, उदेपूरचा इतिहास, स्वामी श्रीमदयानंद, इत्यादि विविध प्रकारचें साहित्य यांनीं निर्माण केलें आहे.

—९ ऑक्टोबर १८९२

## आश्विन व. ५ — टिपूविरुद्ध इंग्रज व मराठे !

शके १७२० च्या आश्विन व. ५ रोजीं टिपू सुलतानाविरुद्ध लढाई करण्याच्या धोरणासंबंधीं वाटाघाटी करण्यासाठीं मराठ्यांच्या पुणें दरबारी इंग्रजी रेसिडेंट कर्नल पामर हा येऊन दाखल झाला.

निजाम, मराठे, टिपू या सर्वांनाच बुडवावें हा हेतु इंग्रजांचा होता. परंतु त्याच्याविरुद्ध टिपूनें जंगी मोहीम काढली होती; आणि हिंदुस्थानांतील फ्रेंच सत्ता वाढीस लागते कीं काय याची धास्ती इंग्रजांना होतीच. गव्हर्नर जनरल वेलस्ली हिंदुस्थानांत आला त्याच वेळीं निजामाकडील फ्रेंच अधिकारी रेमंड मृत्यु पावला, आणि इंग्रजांचें काम सोपें झालें. लागलीच निजामशीं नवा करार होऊन त्याच्या पदरीं इंग्रजी तैनाती फौज राहूं लागली. आतां मराठयांच्या राज्याकडे लक्ष देऊन बाजीरावाच्या पदरींहि ही फौज ठेवावी अशी इच्छा इंग्रजांची होती. टिपूविरुद्ध इंग्रज प्रथमपासूनच जोराच्या तयारींत होते. यासंबंधीं वाटाघाटी करून मराठ्यांच्या मदतीची निश्चिति करण्यासाठीं कर्नल पामर नाना फडणिसांकडे आले आणि बोलले, "टिपूच्या मसलत-प्रकरणीं तीन महिने श्रीमंतांशीं बोलत आहोत. घरचे गोंधळामुळें आपणांकडून निर्णय होत नाहीं. टिपूस फरासीस सामील झाल्यावर, मसलत भारी पडेल याचा विचार काय?" त्यावर नानांनीं उत्तर केलें "तिन्ही सरकारानीं मिळून टिपूस पत्र लिहून उत्तर काय येतें; त्याची वाट पहावी." यानंतर कर्नलांचे म्हणणें असें पडलें कीं, टिपूस जनरलांनीं लिहिलें, उत्तर येत नाहीं; तेव्हां सर्वांनीं तयारीस लागावें हें उत्तम. समर्पक उत्तर न आल्यास, मग तयारीस लागणें ठीक नाहीं. याशिवाय पामरची दुसरी तक्रार महत्त्वाची आहे. तो म्हणाला, "शिंदे यांच्या पलटणींत फरासीस बहुत आहेत; त्यांत ते हिंदुस्थानांत दूर असते तर चिंता नव्हती. याच कारणास्तव निजामांनींहि आपले फ्रेंच अधिकारी जवळ असलेले काढून टाकले. टिपूशीं लढाई झाल्यास हे फ्रेन्च अधिकारी कामाचे नाहींत." यानंतर पामरनें बाजीरावाची भेट घेतली तेव्हां त्यानें सांगितलें, "टिपूवर आम्ही पंचवीस हजार फौज रवाना करतों."

— २८ ऑक्टोबर १७९८

## आश्विन व. ६ काशीबाई पेशवे यांचें निधन !

शके १६७५ च्या आश्विन व. ६ रोजीं श्रीमंत बाजीराव पेशवे यांच्या पत्नी व नानासाहेब पेशवे यांच्या मातुःश्री काशीबाई यांचे निधन झालें.

ही चासकर जोशी यांच्या घराण्यांतील महादजीपंत यांची मुलगी. हिचें लग्न सन १७११ च्या सुमारास झाले. हिचे माहेरचें नांव लाडूबाई असें होतें. बाजीरावानंतर वैधव्याच्या दशेत राहणें हिला जड वाटूं लागलें. आणि नेहमीं प्रकृतिहि ठीक नसल्यामुळें बाईनें घराबाहेर यात्रेंतच आपले आयुष्य कंठिलें. सन १७४२ मध्यें रामेश्वराच्या यात्रेहून अल्यानंतर काशीबाई लगेच काशीयात्रेस निघाली. पुत्राशीं भांडून बाई काशीस राहावयास आली आहे असा एक प्रवाद उठला होता. "सफदरजंगाचे दरबारीं वर्तमान आलें कीं, मातुश्री पुत्राशीं अजुर्दा आहेत ; म्हणून वाराणसीसच राहूं म्हणतात. हें गोष्ट नबाबांनीं आम्हांस पुसली. आम्हीं विनंति केली, गोष्ट फटकळ आहे. हे स्थळ ऐसी आहेत कीं, हिंदु होऊन क्षेत्र सोडावें ऐसा हेत होत नाहीं." काशीबाईची यात्रा बरीच गाजलेली दिसते. अनेक पत्रांतून हिच्यासंबंधी उल्लेख सांपडतो. "गयेस जाऊन यात्रा तीसचाळीस हजार जमा झाली. सर्वांचे गयावर्जन होऊन प्रयागास येतो. मातुश्रींनीं विचार केला आहे कीं, एक वर्षपर्यंत आपण श्रीमध्यें राहावें. मातुश्रीस बहुता प्रकारें आम्ही सांगतों परंतु चित्तांत येत नाहीं, इलाज करून प्रयागापावेतों आली तरी घेऊन येतों. तेथून देशास येतीलसे दिसत नाहीं." असा मजकूर एका पत्रांत आहे. दुसऱ्या एका पत्रांत स्वतः बाईच म्हणते, "मला संकट पडलें आहे, माझ्या चित्तांत काशींत दोनचार महिने राहावें, परंतु हे उभयतां मला बळेंच ओढून काढतात. तरी माझें जाणें काशीस होय ती गोष्ट करणें." अशा प्रकारें काशीबाईला यात्रेत सुख वाटत असल्याचें दिसून येतें. पुढे हिच्या पायास कांहीं दुखणें झालें. "मातुश्रीस पायाच्या व्यथेनें फार बरें वाटत नाहीं" असा मजकूर एका पत्रांत आहे. हें पायाचें दुखणें फार दिवस टिकलें. शेवटीं बाई आश्विन व. ६ रोजीं पुण्यास येऊन निधन पावली ! बाई पतिनिष्ठ असून गरीब व शांत स्वभावाची होती.

दि. ...१८ — १८ ऑक्टोबर १७५३

## आश्विन व. ७ भारताच्या स्वातंत्र्याची प्रभात !

शके १८६५ च्या आश्विन व. ७ रोजीं स्वातंत्र्यसेनानी सुभाषचंद्र बोस यांनीं सिंगापूर येथे स्वतंत्र हिंदुस्थानचें सरकार स्थापन करून भारत स्वतंत्र झाल्याची जाहीर घोषणा केली !

सुभाषबाबूंच्या अद्भुतरम्य जीवनांतील हा दिवस सुवर्णाक्षरांनीं लिहिण्यासारखा आहे. ५ जुलै १९४३ रोजीं आझाद हिंद सेनेची स्थापना झाल्यावर सुभाषचंद्रांनीं 'चलो दिल्ली' असा आदेश आपल्या सैनिकांना दिला. २५ ऑगस्टला त्यांनीं या सेनेचें नेतृत्व स्वीकारलें आणि २१ ऑक्टोबरला (आश्विन व. ७ ला) स्वतंत्र सरकारची स्थापना करून या स्वतंत्र भारताच्या मंत्रिमंडळानें ब्रिटन-अमेरिकेविरुद्ध युद्धहि पुकारलें. सर्वच घटना अत्यंत रोमहर्षक अशा होत्या. भारताच्या स्वतंत्र सरकारची स्थापना ज्या दिवशीं झाली तो दिवस अत्यंत हर्षदायक असाच होता. उच्चासनावर सुभाषबाबू व त्यांचे सेनानी व मंत्रिमंडळ होतें,... राष्ट्रीय निशाण आकाशांत डौलानें फडकत होतें, सरसेनापतींच्या वेषांत सुभाषबाबूंनीं चतुरंग सेनादलाची सलामी घेतली. स्वातंत्र्याचा जयजयकार झाला आणि सुभाषबाबूंनीं खड्या आवाजांत स्वातंत्र्याचा जाहीरनामा वाचला ! याच्या अगोदर शपथविधीचा कार्यक्रम झाला. सुभाषचंद्र शपथेचा कागद हातीं घेऊन म्हणाले, "हिंदुस्थान आणि अडतीस कोटी हिंदी प्रजा यांस स्वतंत्र करण्याकरितां मी हें स्वातंत्र्ययुद्ध माझ्या आयुष्याच्या अखेरपर्यंत चालू ठेवीन. मी सदासर्वकाळ भारतभूमीचा सेवक राहून अडतीस कोटी बंधुभगिनींचें हित साधणें हेच मी माझें कर्तव्य समजेन." या स्वतंत्र भारतास मान्यता देण्यास पूर्वेकडील सर्व राष्ट्रें तयार झालींच. परंतु ८ नोव्हेंबरला आयर्लंडचे अध्यक्ष डी. व्हॅलेरा यांनीं संदेश पाठवून जे अभिनंदन केलें तें अत्यंत महत्त्वाचें आहे. त्यांत ते म्हणतात, "हिंदी स्वतंत्र सरकार स्थापिलेंत याबद्दल अत्यानंद वाटला. अभिनंदन. या दिनानिमित्त आम्हांला आमच्या स्वतंत्र सरकाराच्या स्थापनेची आठवण झाली. तुम्ही आज ज्या आणीबाणीच्या परिस्थितींत आहांत त्याच परिस्थितींत त्या वेळीं आम्ही होतो. मी तुम्हांस सुयश चिंतितों–"

— २१ ऑक्टोबर १९४३

## आश्विन व. ८ राजाराम पन्हाळ्याहून जिंजीस !

शके १६११ च्या आश्विन व. ८ रोजीं शिवाजीमहाराज यांचे चिरंजीव राजाराममहाराज हे जिंजीस जाण्यासाठीं पन्हाळ्याहून निघाले.

बादशहाच्या हातीं संभाजी सांपडल्यावर त्याला जास्तच चेव आल्यासारखें झाले होतें. रायगड घेण्यासाठीं झुल्फिकारखानाची रवानगी झाली होतीच. अशा वेळीं कांहीं व्यवस्था करून राजाराम रायगडावरून प्रतापगडास आला होता. रायगड किल्ला हातीं आल्यावर राजारामास पकडण्यासाठीं बादशहाची धांवपळ सुरू झाली. त्या फौजांनीं प्रतापगडास सुद्धां वेढा दिला; तेव्हां राजारामाला आपला मुक्काम पन्हाळगडावर करावा लागला. बादशहाच्या फौजेस तोड देण्याचें कार्य मराठे लोक अत्यंत नेटानें करीत होते. संभाजीचा वध ज्या ठिकाणीं झाला त्याच ठिकाणीं संताजी घोरपडे यानें रायगडास वेढा घालणाऱ्या इतिकदखानावर छापा घालून त्याचे पांच हत्ती आणून पन्हाळ्यावर राजारामास सादर केल्यावर राजारामास मोठा संतोष वाटला. आणि त्यानें संताजीस 'ममल्कत मदार' [ देशाचा आधार ] असा किताब दिला. परंतु बादशहाचा जोरहि कांहीं कमी नव्हता. त्यानें शेख निजाम या सरदारास पन्हाळा काबीज करण्यासाठीं पाठविलें. परंतु फौज थोडी असल्यामुळे निजामास यश आलें नाहीं ; आणि राजारामाचा निभाव लागणें शक्य झालें. परंतु पुढे मोठ्या तयारीनिशीं बादशहानें रुहुल्लाखान यास ताबडतोब पन्हाळ्यावर पाठविलें. त्या वेळीं मात्र राजारामास पन्हाळा सोडण्याखेरीज गत्यंतर नव्हतें. "निघण्यापूर्वी त्याने देवीच्या नवरात्राचा उत्सव साजरा केला. आणि आश्विन व. ८ रोजीं तो बाहेर पडला, तेव्हा वेढा घालणारें प्रचंड सैन्य प्रथमच त्याच्या दृष्टीस पडले." राजाराम प्रथम रांगण्यास गेला. तेथून सुमारे एक महिन्यानंतर वेलोर येथें जाऊन पोचला आणि पुढें नोव्हेंबर महिन्यांत तो जिंजीस आला. या त्याच्या दीर्घ प्रवासांत लोकांचे अत्यंत हाल झाले. नाना प्रकारचीं संकटें सोसावीं लागलीं. राजारामाच्या सुरक्षेचें श्रेय प्रल्हाद निराजी, खंडो बल्लाळ, रूपाजी भोसले, इत्यादि एकनिष्ठ सेवकांनाच आहे.

—२६ सप्टेंबर १६८९

## आश्विन व. ९ इंग्रज-मराठ्यांचें दुसरें नाविक युद्ध !

शके १६०१ च्या आश्विन व. ९ रोजीं इंग्रज-मराठे यांचें दुसरें नाविक युद्ध झालें.

जंजिऱ्याचा सिद्दी समुद्रकिनाऱ्यावर राहून फारच मग्रूर झालेला होता. शिवाजीच्या राज्यांतील लोकांचा धार्मिक छळ त्याच्याकडून अतोनात होत असे. त्यामुळें त्याचा समाचार घेणे हें शिवरायांचें कर्तव्यच होतें. परंतु कधीं कधीं या सिद्दीला इंग्रजांकडून मदत होत राही, त्यामुळें इंग्रजाबरोबरहि युद्धप्रसंग करण्याशिवाय शिवाजीपुढें मार्ग नव्हता. शके १६०१ च्या पावसाळ्यांत स्वारी करून शिवाजीनें खांदेरी बेटावरील किल्ला घेतला. त्यामुळें इंग्रजांना फारच वैषम्य वाटलें. पोर्तुगीझ लोकांनीं मुंबईबरोबरच हीं बेटें आपणांस दिलीं आहेत असा दावा इंग्रजांचा होता. ताबडतोब इंग्रजांनीं सिद्दीशीं सख्य केलें आणि खांदेरीस शिवाजीचे आरमार होतें त्यावर त्यांनीं हल्ला केला. शिवरायांच्या सैनिकांनीं सर्व शत्रूला शांतपणें बेटावर येऊं दिलें आणि मग सर्वांचा निःपात केला. त्यानंतर इंग्रज लोक जास्तच खवळले; आणि त्यांनीं 'रिव्हेंज' नांवाचे पंधरा तोफांचें जहाज दोनशें सैनिकांसह खांदेरी बेटावर पाठविलें. कॅप्टन मिंचिन व केग्विन हे दोघे जहाजावरील प्रमुख होते. इंग्रज आणि मराठे यांच्यांत निकराचें युद्ध होऊन दोहोंकडील प्राणहानी बरीच झाली. परंतु खांदेरी बेट मात्र इंग्रजांस मिळालें नाहीं. त्यामुळें त्यांना मनस्वी दुःख वाटलें. शिवाजीशीं पुन्हा युद्ध करून हें बेट घ्यावें म्हणून त्यांनीं कोर्ट ऑफ डायरेक्टराकडे अनेकवार तक्रारी केल्या. परंतु कोर्टाकडून तशी परवानगी मिळाली नाहीं.

अत्यंत निराशेच्या मनःस्थितींत इंग्रजांनीं विलायतेंत लिहून पाठविलें– "येथील लोक आम्हांस हिणवतात कीं, तुम्ही इंग्रज लोक येवढी बढाई कशास मारता? तुम्ही कोणते विजय संपादिले आहेत? तुमच्या तरवारीनें कोणतें महत्कृत्य केलें आहे? तुमचा हुकूम कोणीं मानला आहे?... तुमची सर्व लोक टर उडवितात. मुंबई तरी तुम्हीं जिंकून थोडीच घेतली आहे? व ती तरी राखण्याचें सामर्थ्य तुमच्यांत कोठें आहे? असें असून तुम्ही उगाचच डौल मारतां व आमच्या राजांची बरोबरी करतां ती काय म्हणून?–"

— १८ ऑक्टोबर १६७९.

## आश्विन व. १० 'यवनांस थोर भय जाहलें आहे!'

शके १६८२ च्या आश्विन व. १० रोजीं मराठ्यांच्या सैन्यानें पानिपतच्या भूमीवर तळ देऊन अब्दालीचा एक पराजय केला.

दिल्ली आणि कुंजपुरा हीं दोन स्थानें मराठ्यांच्या हातीं आल्यामुळें एक नवाच हुरूप त्यांना आलेला होता. कुंजपुऱ्यावर साजरी झालेली विजयादशमी म्हणजे सदाशिवराव भाऊंच्या भाग्याचा दिवस होता. आतां त्यांची चाल पानिपतच्या रोखानें होती. अब्दालीसुद्धां बागपतावरून यमुना उतरत होता. नदींत छातीइतकें पाणी असतांहि त्यानें पर्वा केली नाहीं. चांदीच्या पत्र्यावर कुराणांतील कांहीं वाक्यें लिहून तें पत्र त्यानें यमुनेंत सोडलें, आणि नदींत हत्ती उभे करून त्यांजवरून जड सामान व तोफा पलीकडे नेण्याचा त्यानें हुकूम केला. अशा या धाडसाच्या उपक्रमानें तीनचार दिवसांत फौज नदीपार झाली. एक लाखपर्यंत फौज जमलेली पाहून अब्दालीस धन्यता वाटली. मराठ्यांना ही बातमी होतीच. सदाशिवरावभाऊ लिहितात, "अब्दाली यमुना बागपताजवळ उतरला व गणोरास आला. खासा स्वारी कुंजपुऱ्याहून पानपतास आली. त्याजवर तीन दिवस गणोरास होते. तेथून संभाळकियास ( मागें ) आले, तेथून दोन-अडीच आजी आले. फार अवळून चालतात ... दाणा दोनअडीच शेर गिलच्यांचे लष्करांत आहे. ... त्यास लढाई लवकरच होऊन येईल. तुम्ही जलदी यमुने-पलीकडे येऊन बागपतपर्यंत धुमामा चालवून, त्यास रसद न पोचे, फौजेस शह पडे तें करावें." अब्दाली पानपतावर उतरत असतांना सदाशिवराव गणोरा-पर्यंत त्याचे अंगावर चालून गेला, परंतु अब्दालीचें सामर्थ्य हें केवढें आहे याची जाणीव भाऊला या वेळीं झाली. पानपतावरून दक्षिणेत वर्तमान आले, "अब्दाली बागपतापाशीं यमुना पायाब उतरून सोनपतास आला. हें वर्तमान श्रीमंतीं ऐकतांच माघारें फिरोन यवनाचे सन्मुख पाणिपथास आले. नित्य थोडें थोडें युद्ध होत आहे. श्रीमंतांहीं चोहोंकडे तोफखाना पसरला आहे. यवनांस थोर भय जाहले आहे. पुढें येववत नाहीं; आमचे सैनिक यवनाचे समक्ष उभे राहून, नित्य शेंपन्नास यवन मारून, उंट, घोडीं आणितात, यवनाच्या सैन्यांत रसद बंद झाली आहे. ... आणखी दोनचार दिवसांत यवन चालोन तोफावरीं येईल तर क्षणमात्र बुडेल. —"

— २ नोव्हेंबर १७६०

## आश्विन व. ११ खडकी येथील इंग्रज-मराठे युद्ध !

शके १७३९ च्या आश्विन व. ११ रोजीं दुसरे बाजीराव पेशवे आणि इंग्रज यांच्यांत प्रसिद्ध अशी खडकीची लढाई झाली.

याच काळांत पुण्याच्या पेशवाईस ग्रहण लागलें होतें. बाजीरावाच्या नाकर्तेपणामुळें आणि इतरत्र वाढत असलेल्या फंदफितुरीमुळें मराठी राज्य उतरत्या अवस्थेस लागलेलें होतें. बाजीराव इंग्रजांच्या ताब्यांत गेलाच होता. परंतु धूर्त इंग्रजांचा कावेबाजपणा त्याला पटूं लागल्यावर बाजीरावानें इंग्रजांशीं युद्ध करण्याची तयारी जोरांत चालू केली. "पुण्यांत तमाम सरदार जमा झाले. निपाणकर, भोसले, निंबाळकर, घोरपडे, जाधव, पटवर्धन, पुरंदरे, मिळून फौज एकत्र झाली. लाख सवा लाख घोडे मिळाले." या सर्व सैन्याचें आधिपत्य बापू गोखले यांच्याकडे होतें. इंग्रजांची तयारी जोरांत होती. आश्विन व. ११ रोजी मराठ्यांच्या लष्करानें खडकीच्या इंग्रजी लष्करावर भारा केला. या वेळीं बाजीरावसाहेब बायकामुलांसह पर्वतीस जाऊन तेथील खिडकींतून लढाई पहात बसले! मराठी लष्कर बाहेर पडलें. तों जरीपटक्याची काठी मोडून अपशकुनच झाला.

"दिवस पांच घटका राहिला, तेव्हां यांची त्यांची लढाई अंधार पडेपर्यंत चालली. इंग्रज आपले ठिकाणीं शिकस्त झाले. दोन्हीकडील मिळून दोन हजार माणूस कामास आले." इंग्रजी फौजेची फळी फोडून आंत घुसत असतांना बापू गोखल्यांच्या घोड्यास जखमा झाल्यामुळें त्यास मागें फिरावे लागलें. याप्रमाणें मराठ्यांचा इंग्रजांवरील या पहिल्या हल्ल्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. दुसऱ्या दिवशीं लढाई झालीच नाहीं. कारण बाजीरावाचें धोरण पडखाऊ होतें. पहिल्याच दिवशीं युद्ध सुरू झाल्यावर, "इंग्रजांचें बोलणें श्रीमंतांकडे आलें कीं, एल्फिन्स्टनसाहेब घाबरले. त्यावरून श्रीमंतांची बोलावणीं बापू गोखले यास गेलीं. परंतु बापू गोखले माघारीं न फिरत. त्यांचा लढाईचा आग्रह मोठा. खावंदांचे मनांत इंग्रज मोडावयाचा नाहीं. शेवटी-निदान श्रीमंतांनीं सांगून पाठविले तेव्हां गोखले शह सोडून माघारे आले."

— ५ नोव्हेंबर १८१७

## आश्विन व. १२ श्रीपाद श्रीवल्लभांची समाधि !

आश्विन व. १२ या दिवशीं चौदाव्या शतकांतील प्रसिद्ध दत्तावतार श्रीपाद श्रीवल्लभ यांनीं समाधि घेतली.

महाराष्ट्राच्या संस्कृतीचा बनाव होत असतांना ज्या धर्म-सांप्रदायांनीं विशेष प्रकारची कामगिरी केली त्यांत दत्त सांप्रदायाचे वैशिष्टय फार मोठे आहे. या पंथाचे मुख्य प्रणेते नृसिहसरस्वती असून याचा आधारभूत ग्रंथ गुरुचरित्र हा आहे. महाराष्ट्रांत त्या काळीं हिंदु प्रजेला इस्लामी धर्मांचा फार जाच सहन करावा लागत होता, अशा समयीं आचारधर्मांचा योग्य उपदेश करणाऱ्या 'गुरुचरित्रा'वर सर्व जण वेदाइतकी भाक्ति ठेवीत असत. श्रीपाद श्रीवल्लभांचें चरित्र याच ग्रंथांत पांचव्या व नवव्या अध्यायांत वर्णिलेले आहे. श्रीपाद श्रीवल्लभ हे दत्तात्रेयांचे अवतार म्हणून प्रसिद्ध आहेत. "पिठापूर पूर्वदेशीं । होता ब्राह्मण उत्तमवंशी, । आपस्तंब शाखेसी । नाम आपळ राजा जाण । तयाची भार्या सुमता । असे आचारपतिव्रता । अतिथि आणि अभ्यागता । पूजा करी भाक्तिभावे" या दांपत्याच्या पोटीं श्रीपाद श्रीवल्लभांचा जन्म झाला. लहानपणींच हे सर्वज्ञ होते. मुंजीच्या प्रसंगीं यांनीं चारहि वेद मुखानें म्हणून दाखविले. 'आचार व्यवहार प्रायश्चित। समस्तांसी आपण बोलत । वेदान्तभाष्य वेदार्थ। सांगतसे द्विजवरांसी ॥" अशी यांची अलौकिक बुद्धिमत्ता होती. यांनीं लग्न करण्याचे नाकारले. कारण आधींच यांचें लग्न विरक्तीशीं झालें होतें. तेव्हां 'न म्हणावें पुत्र यासी । हा अवतार पुरुष तापसी ॥' असें म्हणून यांचे आईबाप स्वस्थ राहिले. यांनीं अनेक ठिकाणीं तीर्थयात्रा केली. काशी, बद्रीनारायण, गोकर्ण हीं ठिकाणें झाल्यावर हे निजामाच्या राज्यांत कुरवपूर ( कुरगड्डी ) येथे आले. तेथे एका स्त्रीस आशीर्वाद दिला कीं, पुढील जन्मीं तुला अलौकिक असा पुत्र होईल; त्याप्रमाणें ती स्त्री पुढल्या जन्मीं करंज नगरीं जन्मास आली आणि तिच्या पोटीं विख्यात अशा श्रीनृसिंह सरस्वतींचा जन्म झाला. श्रीपाद श्रीवल्लभांचाच हा अवतार असे मानण्यांत येतें. पहिल्या जन्मांतील अवतारकार्य संपल्यावर श्रीपाद श्रीविल्लभ 'आश्विन वद्य द्वादशीसी । नक्षत्र मृगराज परियेसी । श्रीगुरु बैसले निजानंदेसी । अदृश्य झाले गंगेंत ॥"

● ● ●

## आश्विन व. १३ मुंबईचा 'सिंह' गेला !

शके १८३७ च्या आश्विन व. १३ रोजीं 'मुंबईचे सिंह' या नांवानें प्रसिद्धीस पावलेले तडफदार हिंदी पुढारी व राष्ट्रसभेचे अध्यक्ष सर फिरोजशहा मेरबानजी मेथा यांचे निधन झालें.

एम्. ए. झाल्यानंतर बॅरिस्टर होण्यासाठीं हे इंग्लंडला गेले. तेथें जमशेटजी टाटा, बद्रुद्दिन तय्यबजी, उमेशचंद्र बानर्जी, इत्यादि त्यांचे मित्र होते. दादाभाई नवरोजींच्या सहवासाचा फिरोजशहांना फारच उपयोग झाला. सन १८६८ मध्ये बॅरिस्टर झाल्यावर हे मायभूमीस येऊन मुंबईला आपला जम बनवूं लागले. लौकरच यांची कीर्ति वाढली. मुंबई कॉर्पोरेशनमध्यें केलेल्या चाळीस वर्षांच्या कामगिरीमुळें यांचें नांव सर्वतोमुखीं झालें. चार वेळां मेयरपदाचा मान यांना मिळाला होता. १८७४ सालीं झालेल्या पारशी-मुसलमानांच्या दंग्यांत यांनीं निर्भयपणें कामगिरी केली. गव्हर्नर फिलिफ वुडहाउस याच्या बेजबाबदारपणाविरुद्ध यांनीं खूपच चळवळ केली. यामुळें फिरोजशहा मेथा लोकांचे आवडते पुढारी झाले. यांनीं आपल्या प्रचारासाठीं बॉबे प्रेसिडेन्सी असोसिएशन काढली व सन १८८८ मध्ये 'ॲडव्होकेट ऑफ इंडिया' हें पत्र जहांगीर मर्झबान यांच्या भागीने विकत घेऊन त्यांच्या साह्यानें यांनीं मतप्रचाराचे काम सुरू केलें. १८९२ मध्यें कार्पोरेशनचे प्रतिनिधि म्हणून कायदेमंडळांत व पुढील वर्षी इंपीरियल कौन्सिलमध्ये हे प्रविष्ट झाले. या दोनहि ठिकाणीं कठोर टीका करून यांनीं उत्कृष्ट प्रकारचे कार्य केलें. राष्ट्रसभेच्या कार्यांत हे प्रारंभापासूनच लक्ष देत असत. सन १९१० सालीं हे मुंबई विश्वविद्यालयाचे व्हाइस चान्सेलर होऊन यांना डॉक्टर ऑफ् लॉज् ही पदवी मिळाली. पुढें दोनतीन वर्षांतच यांनीं 'बॉंबे क्रॉनिकल' हें वर्तमान पत्र काढलें. मुंबई कार्पोरेशन व कायदेमंडळ या सर्व ठिकाणीं यांचा दरारा विलक्षण असे. यांच्या धडाडीला व दणकेबाज वक्तृत्वाला लोक व सरकार भिऊन वागत असे. हे अत्यंत स्वाभिमानी व कर्तव्यदक्ष असे असल्यामुळें विरोधकांच्या चळवळीस यश येत नसे. मुंबई कार्पोरेशनपुढे ऐशीं हजार रुपये खर्चून त्यांचा पुतळा उभारण्यांत आला आहे.

— ५ नोव्हेंबर १९१५

## आश्विन व. १४ नरकासुरास प्रायश्चित्त !

आश्विन व. १४ या दिवशीं श्रीकृष्णाने मदोन्मत्त अशा नरकासुराचा वध करून 'परित्राणाय साधूनां, विनाशाय च दुष्कृताम्' हें आपलें जीवितरहस्य सिद्ध केलें.

नरकासुर हा प्राग्ज्योतिषपूरचा राजा असून फार दुष्ट होता. देव-दानव यांना अतिशय पीडा देऊन त्यांच्या सोळा हजार कन्या आणून यानें अलका-नगरीनजीक असलेल्या मणिपर्वतावर ठेविल्या होत्या. परदेशीं गुलाम म्हणून त्यांना विकावें असा नीच उद्देश नरकासुराचा असावा. दुःखितांचा वाली श्रीकृष्ण यास ही हकीगत समजल्यावर त्याने नरकासुराचा नाश करण्याचें ठर-विलें. तो लागलींच सत्यभामेसह प्राग्ज्योतिषपुरास आला. आणि त्यानें कित्येक विरोधक दैत्यांस ठार केलें. निसुंद, हयग्रीव, विरूपाक्ष, आदि प्रतापी वीरांचे पारिपत्य केल्यानंतर पांचजन्य शंख वाजवून श्रीकृष्णानें नरकासुरास आव्हान दिले. नरकासुरास फारच क्रोध आला, आणि लागलींच रथारूढ होऊन तो कृष्णावर चाल करून आला. त्याचा रथ मोठा असून मौल्यवान् व विस्तृत होता. रथाला हजार घोडे जुंपलेले होते. त्याचें आणि श्रीकृष्णाचें तुमुल युद्ध झालें. त्यांत श्रीकृष्णाने आपल्या सुदर्शन चक्राच्या साह्यानें नरकासुराचें शिर उडविलें. त्यानतर कृष्णाने त्या सोळा सहस्र बंदिवासिनी स्त्रियांना मुक्त केलें ! श्रीकृष्णाची ही कामगिरी अलौकिक अशी होती. स्त्रीदास्यविमोचक म्हणून त्याचा मोठाच महिमा आहे. मुक्त झालेल्या सोळा हजार स्त्रियांनीं आपल्याला मुक्त करणाऱ्या श्रीकृष्णाला कृतज्ञतापूर्वक आपला धनीच मानिले. पुढें कालांतरानें यांत विपरीत अर्थ भरण्यांत आला !

नरकासुराच्या वधामुळे जिकडे तिकडे आनंद झाला. शत्रूच्या रक्ताचा टिळा लावून श्रीकृष्ण घरीं येतांच त्यास मंगलस्नान घालण्यांत आलें. स्त्रियांनीं दिवे ओवाळून आपला संतोष व्यक्त केला. या विजयाचें स्मारक म्हणून आश्विन वद्य १४ हा दिवस सर्व भारतीय लोक नरकचतुर्दशी म्हणून साजरा करीत असतात.



## आश्विन व. ३० ( १ ) दयानंद सरस्वतींचें निधन !

शके १८०५ च्या आश्विन व. ३० रोजीं आर्य समाजाचे सुप्रसिद्ध संस्थापक, आक्रमक नि निर्भय धर्मसुधारक, कुशल संघटक स्वामी दयानंद सरस्वती यांचें निधन झालें.

काठेवाडमधील मोरवी संस्थानांतील अंबाशंकर नांवाच्या औदीच्य ब्राह्मणाचे हे पुत्र. यांच्या घराण्यांत शिवाची उपासना कडक अशी होती. एके दिवशीं शिवरात्रीस मध्यरात्रीं मंदिरांत शिवपूजा चालू होती. दयानंद एकनिष्ठपणें बसलेलें असतांना शेजारच्या बिळांतून एक उंदीर बाहेर आला आणि देवाच्या अंगावरील अक्षदा वगैरे खाऊं लागला. देवाने कांहींहि प्रतिकार केला नाहीं ! या वेळपासून यांची मूर्तिपूजेवरील श्रद्धा नाहींशी झाली. घरांतून निघून जाऊन यांनीं ब्रह्मचर्य व्रताची दीक्षा घेतली आणि योगाच्या अभ्यासास सुरुवात केली. त्यानंतर पूर्णानंद नांवाच्या महाराष्ट्रीय संन्याशापासून यांनीं संन्यासदीक्षा घेतली. अभ्यास करतां करतां यांना आढळून आले कीं, महाभारतापूर्वीच्या ऋषिमुनींच्या वाङ्मयाचा, वेदांचा अभ्यास करणें आवश्यक आहे. तेव्हां वैदिक धर्माच्या प्रचारार्थ हे बाहेर पडले आणि यांनीं आर्य समाजाची स्थापना केली. वेदांतील तत्त्वज्ञानाचें यथार्थ ज्ञान व्हावें म्हणून यांनीं 'सत्यार्थप्रकाश' नांवाचा ग्रंथ संस्कृत व हिंदी भाषांतून लिहिला. त्यांतील आक्रमक पद्धतीमुळें सर्वांचें लक्ष या पुस्तकाकडे ओढलें गेलें. यांच्या आर्य समाजाच्या अनेक शाखा भारतांत निघून त्यांनीं पुष्कळच जागृतीचे कार्य केलें आहे. यांचे शारीरिक, मानसिक व वाचिक सामर्थ्य अलौकिक होतें. 'मूर्तिपूजा सिद्ध करा, नाहीं तर काशीविश्वेश्वर फोडून टाका' या आव्हानावर हे वादविवाद करीत असत. वाद करतांना दयानंद हजरजबाबी असून शास्त्राचा आधार देण्यांत अत्यंत कुशल असे होते. यांच्या फटकळ व बोंचणाऱ्या प्रचारामुळे यांना उघड उघड असे पुष्कळ शत्रु निर्माण झाले. शेवटीं आश्विन व. ३० रोजीं जोधपूर येथें विषप्रयोग होऊन यांचा अंत झाला ! आपल्या कार्याच्या प्रचारासाठीं यांनीं 'वेदभाष्य', 'संस्कारविधि', 'पंचमहायज्ञाविधि', 'गोकरुणानिधि' इत्यादि ग्रंथ लिहिले.

— ३० ऑक्टोबर १८८३

## आश्विन व. ३० (२) स्वामी रामतीर्थांची जलसमाधि !

शके १८२८ च्या आश्विन व. ३० रोजी आंतरराष्ट्रीय कीर्तीचे हिंदी साक्षात्कारी पुरुष, विख्यात तत्त्वज्ञानी व कवि स्वामी रामतीर्थ यांनीं समाधि घेतली.

पंजाब प्रांतांतील गुजराणवाला जिल्ह्यांतील मुरलीवाला या गांवीं गोस्वामी हिरानंद यांच्या पोटीं शके १७९५ मध्ये यांचा जन्म झाला. संत तुलसीदासांच्या अव्वल वंशांतील म्हणून यांच्या घराण्याची ख्याति होती. गुजराणवाला हायस्कूल, लाहोर फॉर्मन ख्रिश्चन कॉलेज व गव्हर्नमेंट कॉलेज, लाहोर, येथील आपले शिक्षण संपवून रामतीर्थ गणिताचे एम्. ए. झाले. त्यानंतर यांनीं कांहीं दिवस गणिताच्या प्राध्यापकाचें काम केले. परंतु पहिल्यापासूनच असलेल्या आध्यात्मिक प्रवृत्तीला ही नोकरी न सोसल्यामुळें यांनीं ती सोडून दिली. स्वामी विवेकानंदांच्या व्याख्यानांचा परिणामहि यांच्या मनावर बराच झाला. सर्वसंगपरित्याग करून रामतीर्थ हिमालयांत गेले व तेथें त्यांनीं संन्यास घेतला. टोकियोला जी आंतरराष्ट्रीय धर्मपरिषद भरणार होती तिला हजर राहण्यासाठीं स्वामीजी जपानला गेले. परंतु परिषदेची बातमी खोटी ठरली. तरी रामतीर्थांच्या आयुष्याला निराळेंच वळण लागले. उर्दू-फारसी व इंग्रजी या भाषांचा व्यासंग आणि उच्च प्रकारचें कावित्व यांच्या जोरावर रामतीर्थांच्या वेदांतप्रतिपादनाला दिव्य तेज चढूं लागलें. या वेळीं थांची पुण्याचे वासुकाका जोशी यांच्याशीं गांठ पडली. त्यांच्यासह स्वामी अमेरिकेला गेले. विवेकानंदांप्रमाणेंच त्यांचे स्वागत सर्व अमेरिकेंत झालें. हिंदुस्थानांत आल्यावर त्यांनी आपल्या उपदेशाला सुरवात केली. आश्विन व. ३० या दिवशीं गंगेवर स्नानास हे गेले त्या वेळीं पाय घसरून हे पाण्यांत बुडाले व तेथेंच त्यांनीं समाधि घेतली. दुसऱ्याच दिवशीं यांचा तेहतिसावा वाढदिवस होता ! याच्याच अगोदर मृत्यूला यांनीं निर्भयपणें आमंत्रण दिलेलें काव्य म्हणजे यांच्या कवित्वशक्तीचा उत्कृष्ट नमुना आहे. त्यांत ते म्हणतात, " माझें शरीर तूं खुशाल घेऊन जा. चंद्रकिरणांच्या रूपानें, पहाडी नदी-निर्झरांच्या वेषाने, समुद्रांच्या लाटांच्या मिषानें मी जगांत वावरूं शकेन — "

— १७ ऑक्टोबर १९०६

## आश्विन व. ३०  (३) साहित्य-सम्राटांचें निधन !

शके १८६९ च्या आश्विन व. ३० रोजीं मराठीचे साहित्य-सम्राट् नरसिंह चिंतामण ऊर्फ तात्यासाहेब केळकर यांचे निधन झालें.

शिक्षण पूर्ण झाल्यावर तात्यासाहेबांनीं साताऱ्यास वकिलीला सुरुवात केली. परंतु थोड्याच दिवसांत लो. टिळक यांच्या सांगण्यावरून ते त्यांचे साहाय्यक बनले. लॉ क्लासमध्यें शिकवणें व 'मराठा' पत्राची व्यवस्था पाहणे ही कामगिरी केळकरांच्याकडे आली. टिळकांच्या अनुपस्थितींत अनेक वर्षें केळकरांनीं 'केसरी' आणि 'मराठा' हीं पत्रे उत्कृष्टपणें चालविलीं. याशिवाय अनेक सार्वजनिक संस्थांशीं केळकरांचें नातें होतेंच. तात्यासाहेबांच्या राजकीय कामगिरीपेक्षां त्याचें साहित्यवैभव फार मोठें आहे. काव्य, शास्त्र, विनोद, नाटक, कादंबरी, इतिहास-सशोधन, निबंध, लघुकथा, इत्यादि साहित्यप्रकारांतून त्यांची लेखणी अत्यंत कुशलतेनें संचार करीत असे. कोणताहि विषय साधकबाधक प्रमाणांनीं समतोलपणें मांडण्यांत केळकर कुशल होते. भावनेच्या आहारीं न जातां व्यावहारिक बुद्धीनें सुवर्णमध्य काढणें हें त्यांच्या जीविताचे सार होतें. "बिनीवर जाऊन चार हात करणाऱ्या योद्धयापेक्षां सौम्यपणाने मुद्दा न सोडतां कार्य साधणाऱ्या मुत्सद्याची यांची प्रकृति." तात्यासाहेबांचा स्वभाव मन-मिळाऊ असून सहृदयता, कामाचा उरक, आणि जबाबदारीची जाणीव या गुणांमुळें हे अनेक सभासंमेलनांचे अध्यक्ष असत. मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदाचा मान यांना दोनदां मिळाला होता. यांची वाङ्मयसंपत्ति अत्यंत विपुल असून ती विविध प्रकारच्या गुणांनीं नटलेली आहे. यांचें समग्र वाङ्मय जें प्रसिद्ध आहे तेंच जवळजवळ पंधरा हजार पृष्ठांपर्यंत आहे. याशिवाय शेवटच्या दिवसापर्यंत यांचें लेखन चालू होतेंच. 'हास्यविनोदमीमांसा', 'मराठे आणि इंग्रज', 'टिळकचरित्र', 'ज्ञानेश्वरी सर्वस्व', इत्यादि यांचे महत्त्वाचे ग्रंथ आहेत. तात्यासाहेबांनीं मरणाच्या आदल्याच दिवशी मृत्यूस आव्हानासंबधीं कविता लिहिली होती. आश्विन व. ३० या दिवशीं यांच्या निधनाची बातमी लोकांना धक्का देणारी वाटली. यांची शवयात्रा अत्यंत मोठी निघालेली होती. सवे प्रकारच्या लोकांनीं तींत भाग घेतला होता.

— १४ ऑक्टोबर १९४७




गुरु गोविंदसिंग. कन्हय्यालाल दत्त. महात्मा फुले. जगदीशचंद्र बोस.

## कार्तिक शु. १ — गोवर्धनगिरिधारी श्रीकृष्ण !

कार्तिक शु. १ या दिवशीं श्रीकृष्णानें गोवर्धन पर्वत उचलून धरून इंद्राच्या कोपापासून व्रजवासियांचें रक्षण केलें.

एकदां शरद् ऋतु सुरू झाला असतांना गोकुळांतील सर्व लोकांनीं इंद्राचा उत्सव करण्यास सुरुवात केली. इंद्र हा मेघांचा राजा असून त्याच्याच कृपेमुळें सर्व पृथ्वी, सुजला सुफला असे रूप धारण करते, ही व्रजवासियांची कल्पना होती. पण श्रीकृष्णानें या वेळीं सांगितले, " मेघवृष्टि होऊन पृथ्वी धनधान्यांनीं समृद्ध होते यासाठीं इंद्राचा उत्सव करणें योग्य नाहीं. येथून दिसणारीं हीं जंगलें आणि हा गोवर्धन पर्वत यांपासूनच आपली उपजीविका होते. तेव्हां या पर्वताचें पूजन करणें इष्ट असल्यानें तुम्ही गिरियज्ञ करण्यास प्रारंभ करा. " कृष्णाचें हे म्हणणें सर्वांना पटल्यावर सर्व गोपांनीं गोवर्धन पर्वताचे पूजन केले, मोठया उल्हासानें त्या पर्वताचाच उत्सव केला. अर्थात् इंद्रास फारच राग आला. त्यानें गोकुळा-वर मुसळधार पावसाची वृष्टि करण्यास प्रारंभ केला. हत्तीच्या सोंडेप्रमाणें पावसाची वृष्टि होऊं लागली. सर्व माणसें, पशु, पक्षी गांगरून गेले. दोन दिवस गेले तरी पावसाचा मारा कमी होईना, तेव्हां व्रजांतील सर्व गोपाळ कृष्णाकडे आले : ' कृष्णा तूंच आमचें आतां रक्षण कर. ' कृष्णानें सर्व म्हणणे ऐकून घेतलें आणि गोवर्धन पर्वतच वर उचलला तेव्हां त्याचे खालीं सर्व गोकुळ सुर-क्षितपणें वांचलें. कृष्णानें आपल्या करांगुलीवर पर्वत उचलिला यांतील अतिश-योक्ति समजावून घेण्यासारखी आहे. गोवर्धन पर्वताचें सामर्थ्य गोपाळांना ठाऊकच नव्हतें. परंतु श्रीकृष्णानें पर्वताच्या आश्रयानें सर्व गोकुळाची व्यवस्था लाविली. गोवर्धन पर्वतावरील गुहांतून आणि विश्रामस्थानांतून व्रजवासीय जनता आनंदाने कालक्रमणा करूं लागली. थोडा सुद्धां त्रास त्यांना झाला नाहीं. आपला अन्नदाता आणि रक्षणकर्ता गोवर्धन पर्वतच आहे याची खात्री सर्वांना पटली आणि त्यांची कृष्णावरील भक्तिहि वाढली. शेवटीं इंद्र थकला आणि त्यानें वृष्टि बंद केली. पुन्हा सर्व लोक गोकुळांत आले. त्या सर्वांनीं कृष्णाला म्हटलें, " कृष्णा, तूं उपेंद्र आहेस. "

● ● ●

## कार्तिक शु. २ — यमद्वितीयेचें रहस्य!

कार्तिक शुद्ध २ हा दिवस यमाद्वितीया या नांवानें भारतवर्षांत प्रसिद्ध आहे.

पुराणांत अशी कथा आहे कीं, या दिवशीं मृत्युदेव यम यानें आपली बहीण यमी किंवा यमुना हिच्या घरीं जाऊन तिला वस्त्रालंकार देऊन तेथे मोठ्या आनंदानें भोजन केले. शास्त्रकारांनीं या कौटुंबिक विधीस धर्माची जोड देऊन हा दिवस भाऊबीज म्हणून पाळणें हें बंधुभगिनींचें श्रेष्ठ कर्तव्य आहे असें ठरवून टाकलें. वेदांमध्यें यम व यमी या प्रसिद्ध जोडीचा उल्लेख काव्यमय भाषेंत रूपकाच्या आश्रयानें केला आहे. "यम मृत्यु पावला त्या वेळीं यमीच्या डोळ्यांतलि अश्रु कांहीं केल्याने थांबेनात. कोणाहि देवाकडून तिचे सांत्वन होईना. शेवटीं देवांनीं रात्र निर्माण केली. रात्र झाल्यावर यमी भावाच्या मरणाचें दुःख थोडेसें विसरली. या रात्रीनंतर आज आणि काल असा भेद सुरू झाला. त्यापूर्वी नेहमीं आजच असे!"

भारतांत सर्वत्र हा दिवस मोठ्या उत्साहाने साजरा केला जातो. या दिवशीं बहीण आपल्या भावास घरीं बोलावून त्याला मंगलस्नान वगैरे घालते. सुग्रास भोजन करून जेवावयास वाढते; आणि आपला संतोष प्रगट करते. भाऊहि संध्याकाळीं तिला ओवाळणी घालीत असतो. भाऊ गरीब असो, श्रीमंत असो, त्यास घरीं बोलावून त्याला गोड करून खायला घालावे, त्याच्या संगतींत आनंद मानावा, हा बहिणीचा हेतु असतो; आणि बहीण गरीब असो, श्रीमंत असो, तिची विचारपूस करावी, तिच्या घरीं जावें, तिचीं सुखदुखें समजावून घ्यावींत, असें भावास वाटत असतें. असा हा भाऊबीजेचा दिवस आहे. बंधुभगिनीच्या उदात्त प्रेमाची साक्ष याच दिवशीं सर्वत्र पटत असते. एऱ्हवीं व्यवहारांत थोडाफार मतभेद झाल्यामुळें रागलोभाचे प्रसंग येतहि असतील, पण या दिवशीं मात्र त्या सर्व किल्मिषांचा लोप होऊन एका आनंदाचेंच साम्राज्य बंधुभगिनींच्या प्रेमांत असतें. ज्यांना सख्खी बहीण नसते ते चुलत, आते, मामेबहिणीकडून ओवाळून घेऊन भाऊबीज साजरी करितात.

● ● ●

## कार्तिक शु. ३ — रामशास्त्री प्रभुणे यांचें निधन !

शके १७११ च्या कार्तिक शु. ३ रोजीं पेशवाईतील सुप्रसिद्ध न्यायाधीश रामशास्त्री प्रभुणे यांचें निधन झालें.

हे सातारा जिल्ह्यांतील माहुली येथील राहणारे असून जातीनें देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण होत. वयाच्या वीस वर्षांपर्यंत यांना विद्येचा गंधहि नव्हता. हे प्रथम सातारा येथील सावकार अनगळ यांच्या घरी शागीर्द होते. परंतु एकदां सावकारानें अपमानकारक शब्द बोलून यांचा पाणउतारा केला म्हणून हे काशीस गेले. तेथें प्रौढपणींहि यांनीं अत्यंत श्रम घेऊन विद्या मिळविली. थोड्याच दिवसांत यांची धर्मशास्त्री म्हणून ख्याति झाली. नानासाहेब पेशव्यांच्या कारकीर्दीत सन १७५१ सालीं दरबारांत धर्मखात्यांत यांनीं नोकरी धरली. आणि नंतर आठ नऊ वर्षांतच हे मुख्य न्यायाधीश बनले. हे अत्यंत निःस्पृह आणि न्यायदानांत फार प्रसिद्ध होते. नारायणरावाच्या मृत्यूनंतर तपास करून यांनींच राघोबादादास देहान्तशासनाचें प्रायश्चित्त सांगितलें. "स्पष्टवक्तेपणा, निःस्पृहता, धार्मिक व्यवहारांत कालमान व परिस्थिति ओळखण्याचें मनोधैर्य व मराठी राज्याविषयीं अनुपम निष्ठा यांच्या योगानें ते केवळ अद्वितीय न्यायाधीश झाले; एवढेंच नव्हे तर ती मराठेशाहींतील एक प्रचंड शक्तिच होती. सारस्वत ब्राह्मणांना इतर ब्राह्मणांप्रमाणें वागविणे, माधवराव पेशव्यांस कर्मनिष्ठेपासून निवृत्त करणे, प्रभूंच्या तक्रारी उदार वृत्तीनें सोडविणें, विधवापुनर्विवाहास उत्तेजन देणें, निरक्षर ब्राह्मणांची तरफदारी न करणें, आणि न्याय व राजकारण यांचा योग्य मिलाफ कायम ठेविणें, या त्याच्या गोष्टी ध्यानांत ठेविल्या असतां त्या अवनतीच्या काळांत रामशास्त्री हे एक अलौकिक व कालदेश जाणणारे सुधारकहि होते हें ध्यानांत ठेवणें जरूर आहे." रामशास्त्रींना दरमहा सुमारें १२० रुपये पगार मिळत असे. यांच्या चाळीस वर्षांच्या नोकरींत अनेक बाबतींत मिळून ५५९६८ रुपये यांच्या नांवावर खर्च पडलेले पेशवे दप्तरांत नमूद आहेत. वयाच्या साठपासष्टाव्या वर्षी रामशास्त्री कार्तिक शु. ३ या दिवशीं दिवंगत झाले. त्यांच्या उत्तरकार्यास पेशवे सरकारनें ३२०० रुपये खर्च केले.

— २१ ऑक्टोबर १७८९

## कार्तिक शु. ४ "याला म्हणतात सती जाणें!"

शके १८३६ च्या कार्तिक शु. ४ रोजीं दिल्ली-कटामुळे फांशीं गेलेले बालमुकुंद यांची पत्नी रामरखी हिने पतिदेवाला भेटण्यासाठीं स्वर्गारोहण केलें.

विख्यात देशभक्त भाई परमानंद यांचे चुलतबंधु म्हणजे बालमुकुंद. यांचें घराणेच हुतात्म्यांचें होतें. परमानंदांच्या घराण्यानें मोठाच अलौकिक त्याग केला आहे. त्यांचे पूर्वज भाई मतिदास औरंगजेबाच्या क्रोधाला बळी पडून डोक्यापासून खालपर्यंत करवतीनें कापले गेले होते! दिल्लीच्या कटांत सामील झाल्यामुळे बालमुकुंदांना फांशीची शिक्षा आली. एक वर्षापूर्वींच त्यांचे लग्न एका सुंदर मुलीशीं झाले होतें. त्या मुलीचें नांव रामरखी असून विवाहानंतर तिला सासरीं लज्ज्वावती म्हणूं लागले. बालमुकुंदांच्या शेवटच्या सहवासाचे हिनें अत्यंत करुणरम्य असें सांगितलेलें निवेदन प्रसिद्ध आहे. खटला चालला असतांना निर्णयाकडे डोळे लावून ही नवविवाहिता बसली होती. बालमुकुंदांना फांशीची शिक्षा झाली! अंतिम दर्शनाच्या वेळीं बालमुकुंद आपल्या पत्नीस बोलले, "प्राणप्रिये, जो प्राणी जन्माला आला त्याला केव्हां ना केव्हां तरी मरण आहेच; मी देशहिताकरितां आहुति देत आहें हें तुझे भाग्यच समज." आश्विन व. १ रोजीं बालमुकुंद फांशीं गेले. त्यांचें प्रेत अधिकाऱ्यांनीं आप्तांच्या ताब्यांत दिले नाहीं. पंधरा दिवस रामरखी व्रतस्थ होती. अन्नाचा कण कीं पाण्याचा थेंब तोडांत गेलेला नव्हता. "–एका स्थलावर बसून ज्या मूर्तीचें ध्यान ती करीत होती त्या मूर्तींत तिचें मन स्थिरावूं लागलें. तिनें तपस्या पूर्ण केली. अंतिम दिवशीं सूर्यबिंब पूर्ण तेजानें प्रकाशत होतें. लज्ज्वावतीनें स्वच्छ पाण्याने स्नान केलें. शुभ्र वस्त्र परिधान केलें. आणि ध्यानस्थानीं अंग टाकून ती बोलली, 'प्रिया, मी आतां तुमच्या भेटीस येणारच.' यानंतर प्राण खेचून घेऊन तिनें देहत्याग केला. इच्छापूर्वक देह सोडला. साध्वी लज्ज्वावतीनें देशभक्त हुतात्मा पति बालमुकुंदांशीं एकरूप होण्यासाठीं परलोकचें देवद्वार स्वेच्छाबलानें उघडून स्वर्गात प्रवेश केला. याला म्हणतात सती जाणें–"

**— २२ ऑक्टोबर १९१४**

## कार्तिक शु. ५ (१) गुरु गोविंदसिंगांचें निधन !

शके १६३० च्या कार्तिक शु. ५ रोजीं विचारक्रांतीनें राज्यक्रांति घडविणारा थोर पुरुष, शीखांचा दहावा गुरु गुरु गोविंदसिंह यांचें प्राणघातक हल्लयामुळें जीवन असह्य होऊन निधन झालें.

"एके काळीं हे हिंदुधर्माचे ढालीप्रमाणे संरक्षक होते. हिंदु जातीचें आणि हिंदु धर्माचें रक्षण करण्यासाठीं यांनीं वीरजात निर्माण केली. हे विद्वानांचें आदरातिथ्य चांगल्या प्रकारे करीत. हे स्वतः मेधावी, देशकालज्ञ, आणि रण-निपुण असे होते." यांनीं चांगल्या प्रकारचीं हिंदी कवनेहि केलीं आहेत. जाप, सुनीतिप्रकाश, ज्ञानप्रबोध, प्रेमसुमार्ग, बुद्धिसागर, विचित्रनाटक आणि ग्रंथसाहेबांतील कांहीं भाग असें यांचें वाङ्मयीन कार्य आहे. हे मोठे मुत्सद्दी आणि चलाख असल्यामुळे यांच्यापासून शीख पंथांत नवीन मन्वंतर सुरू झालें. लष्करी शिस्तीचे महत्त्व यांनीं चांगलेच ओळखिलें होतें. केस, लोखंडी कडें, कंगवा, कच्छ (चोळणा) व कट्यार असे पांच पदार्थ धारण करावेत हा नियमहि यांनींच अमलांत आणिला. गोवधबंदी करून हिंदूंची सहानुभूति मिळविण्याचा प्रयत्नहि यांनीं केला. मुसलमानांनीं यांच्या वडिलांचा छळ करून शिरच्छेद केला होता. हें ध्यानांत घेऊन गुरु गोविंदसिंह आपलें सामर्थ्य वाढविण्यास तत्पर झाले. सर्वांना यांनीं वीरवृत्तीचाच उपदेश देऊन तलवार, घोडे, वगैरे युद्धसाहित्यच गुरूला भेट देण्याविषयीं यांनीं प्रथा पाडली. राम, भरत, भीष्म, अर्जुन, आणि भीम यांचा आदर्श डोळ्यांपुढें ठेवण्याविषयीं हे नेहमीं सांगत. पुढें मुसलमानांशीं शीखांचीं युद्धें सुरू झाल्यावर यांचीं दोन मुलें युद्ध करतांना मारलीं गेलीं. दुसरीं दोन चिणून ठार झालीं. या दुःखानें यांची माता गुजरी हिनें तुरुंगाच्या खिडकींतून उडी टाकून प्राण दिला. गुरु गोविंदसिंह आपल्या जीवितांतील शेवटचे दिवस दक्षिणेंत नांदेड येथें घालवीत असतां एके रात्रीं हे झोंपेंत असतांना अताउल्ला व गूलखाँ या दोन पठाणांनीं यांच्या पोटांत कट्यार खुपसली; यांना झालेल्या जखमा असह्य असल्यामुळें कार्तिक शु. ५ रोजीं याच अवस्थेंत गोविंदसिंहांचें निधन झालें.

—७ ऑक्टोबर १७०८

**कार्तिक शु. ५** **(२) लाला लजपतरायांचें निधन!**

शके १८५० च्या कार्तिक शु. ५ ला पंजाबांतील सुप्रसिद्ध राजकारणी मुत्सद्दी, वर्तमानपत्रकार, लेखक, वक्ते व सार्वजनिक कार्यकर्ते लाला लजपतराय यांचे निधन झालें.

पंजाबांतील जगराण या गांवीं यांचा जन्म शके १७८७ मध्यें झाला. सन १८८५ मध्ये कायद्याची परीक्षा दिल्यावर वयाच्या विसाव्या वर्षाच्या आंतच लजपतराय वकिली करूं लागले. स्वामी दयानंदांचे हे निष्ठावंत अनुयायी होते. लाहोरला स्थापन झालेल्या दयानंद ॲंग्लो-वैदिक कॉलेजला यांनीं पांच लाख रुपये मिळवून दिले. राष्ट्रसभेत भाग घेतल्यानंतर असामान्य वक्ते व राष्ट्रीय मताचे पुरस्कर्ते म्हणून सर्व भरतखंडांत यांची किर्ति झाली. सन १९०५ मध्यें प्रचारासाठीं राष्ट्रसभेनें यांना विलायतेस धाडले होतें. तेथून परत आल्यानंतर शेतकऱ्यांना चिथावणी देतात या आरोपावरून सरकारनें लाला लजपतराय यांना मंडालें येथें हद्दपार केलें. पुढें लौकरच यांची सुटका झाली. तरी गुप्त पोलिसांच्या त्रासांतून मुक्त होण्यासाठीं यांनीं अमेरिकेंत वास्तव्य केले व तेथे 'यंग इंडिया' हें पत्र सुरू करून यांनीं प्रचारास प्रारंभ केला. यानंतर आठ वर्षांनीं हे मातृभूमीस परत आले. त्या वेळीं असहकारितेचें युग सुरू झालें होतें. कलकत्ता राष्ट्रसभेचें अध्यक्षस्थान यांनाच मिळालें आणि असहकारितेचा ठराव यांच्या अध्यक्षतेखालीं पास झाला; परंतु यांनीं मात्र ठरावास आपलें मत दिलें नाहीं. ही चळवळ यांना मनापासून पसंत नव्हती; तरी सर्व राष्ट्राबरोबर लजपतराय चळवळींत सामील झाले व तुरुंगांतहि गेले. 'पीपल' हें इंग्रजी पत्र, पीपल असोसिएशन, टिळक स्कूल ऑफ पॉलिटिक्स या आपल्या संस्थांना यांनीं सर्वस्व अर्पण केलें. लाला लजपतराय हिंदु धर्माचे कट्टे पुरस्कर्ते होते. मॅझिनी, गॅरिबाल्डी, श्रीकृष्ण, शिवाजी इत्यादींचीं स्फूर्तिदायक चरित्रें यांनीं लिहिलीं असून यांचें आत्मचरित्रहि प्रसिद्ध आहे. सन १९२८ मध्यें सायमन कमिशन लाहोर येथें आलें असतां यांच्या नेतृत्वाखालीं हजारों तरुण काळीं निशाणें दाखवीत असतां यांना पोलिसांकडून मार बसला. छातीस तीन इंच लांबरुंद जखम होऊन त्यामुळेंच कार्तिक शु. ५ या दिवशीं या पंजाबच्या सिंहाचें निधन झालें.

— १७ नोव्हेंबर १९२८

## कार्तिक शु. ६ महाराजा रणजितसिंगांचा जन्म !

शके १७०२ च्या कार्तिक शु. ६ ला महापराक्रमी राणा रणजितसिंग यांचा जन्म झाला.

पंजाबांतील शीख लोकांचा हा राजा होता. महासिंगानंतर वयाच्या तेराव्या वर्षी हा गादीवर आला. याच्या शौर्यामुळे सर्व शीख राजांचें आधिपत्य याच्याकडे आले व १८०२ सालीं अमृतसर जिंकून यमुनेपर्यंत विस्तार व्हावा म्हणून यानें खटपट चालविली. इंग्रजांसही याची भीति वाटूं लागली. चाळीस वर्षे अतोनात श्रम करून राणा रणजितसिंगाने शीख लोकांत लष्करी सामर्थ्य निर्माण केलें. तो फार शूर व युद्धशास्त्रांतील चांगला जाणता होता. त्यानें शीख सैनिकांमध्यें उत्तम पायदळ, सुव्यवस्थित घोडदळ व चांगला तोफखाना यांची भर घातली. वेंचुरा, अलार्ड, व ॲव्हिटेबिलो हे याचे तीन सेनापति प्रसिद्ध नेपोलियनच्या हाताखालीं शिक्षण घेतलेले होते. रणजितसिंगाने सर्व अफगाणिस्थान जिंकलें होतें.

रणजितसिंग स्वतः निरक्षर असला तरी निरनिराळ्या भाषांतील उत्तमोत्तम काव्यग्रंथ ऐकण्याचा नाद त्याला चांगलाच होता. त्यायोगे त्याचा बुद्धिविकास चांगला झाला. प्रत्येक गोष्टींत तो अत्यंत बारीकपणानें लक्ष ठेवीत असे. त्याची स्मरणशक्ति तीव्र असल्यामुळें आयुष्यांतील सर्व घटना तो बिनचूक रीतीनें तारीखवार सांगत असे. रणजितसिंह मोठा महत्त्वाकांक्षी व प्रयत्नवादी होता. त्याला फौजेबद्दल फारच अभिमान वाटे. इंग्रजांच्या तोडीची ती व्हावी म्हणून त्यानें फारच प्रयत्न केला.

"रणजितसिंगाची एकंदर कामगिरी या देशाच्या राजनैतिक इतिहासांत बरीच महत्त्वाची ठरते. शीखांचे दहा गुरु अथवा बंदाबहादूर यांना जें साधलें नाहीं तें रणजितसिंगानें करून दाखविले. शीख राज्याचा संस्थापक, महत्त्वाकांक्षी, युद्धप्रिय, उत्कृष्ट सेनानी, अशा या धाडसी वीराचा "पंजाबकेसरी महाराजा रणजितसिंग" या नांवानें सर्वत्र उल्लेख केलेला आढळतो.

— २ नोव्हेंबर १७८०

## कार्तिक शु. ७ गुजराथ प्रांताचा बंदोबस्त !

शके १६५१ च्या कार्तिक शु. ७ रोजीं थोरले बाजीराव पेशवे यांनीं गुजराथची व्यवस्था करून गायकवाड व भिल्ल प्रांतास उपद्रव देऊं लागले तर त्यांचा बंदोबस्त करण्याची हमी घेतली.

बाळाजी विश्वनाथानें आरंभलेला उद्योग बाजीरावाने पुढें चालविला. पहिलीं कांहीं वर्षें निजामचें पारिपत्य करण्यांतच बाजीरावानें घालविली. गुजराथ व माळवा या प्रांतांत आतां मराठ्यांचा शिरकाव होणार होता. शिवाजीनें सुरत लुटली त्या वेळेस मराठ्यांचें पहिलें पाऊल गुजराथेंत पडले. त्यानंतर खंडेराव दाभाडे मधून मधून गुजराथवर स्वाऱ्या करीतच होते. निजामुल्मुल्क दक्षिणेत स्वतंत्र झाला हे दिल्लीच्या बादशहास न आवडून त्यानें निजामचा गुजराथचा सुभा सरबुलंदखान या आपल्या विश्वासू सरदारास दिला. परंतु त्याच्याकडून गुजराथची व्यवस्था नीट होईना. दाभाडे आणि बांडे हे वरचेवर स्वाऱ्या करून त्यास त्रास देऊं लागले. ‘ मला मदत करा ’ असा आग्रह बुलंदखानाने दिल्लीच्या बादशहाकडे सारखा धरला होता. पण महमंदशहा कांहींच उत्तर देत नव्हता. तेव्हां खान अगदीं बेजार झाला. राज्याचा बंदोबस्त कसा करावा याचा उलगडा त्याला होत नव्हता. बाजीरावानें ही संधि साधली. त्यानें आपला वकील श्यामराव याच्याबरोबर बुलंदखानास निरोप पाठविला, “ आम्हांस गुजराथची चौथाई वसूल करण्याचा हक्क द्या म्हणजे आम्ही प्रांताचा बंदोबस्त करूं–” याच वेळीं चिमाजीअप्पा हे गुजराथेंत उतरून आपला पराक्रम गाजवूं लागले होते. त्यांनीं पटेलाद शहराची खंडणी वसूल केली व ढोलका प्रांत उध्वस्त करून टाकला. दिल्लीकडून मदत येण्याची खानाची आशा संपली होती. आणि प्रांताची व्यवस्था तर होणें जरूरीचें होतें. शेवटीं बुलंदखान बाजीरावाशीं तह करण्यास कबूल झाला. गुजराथ प्रांताचे चौथाई-सरदेशमुखीचे हक्क मराठ्यांना मिळून पंचवीसशें घोडे-स्वार मराठ्यांनीं गुजराथच्या बंदोबस्तासाठीं ठेविले. याप्रमाणें मराठी राज्यास गुजराथ प्रांत येऊन मिळाला.

– १७ ऑक्टोबर १७२९

## कार्तिक शु. ८ " दौलत खराब झाली ! "

शके १७३९ च्या कार्तिक शु. ८ रोजीं इंग्रज आणि मराठे यांची प्रसिद्ध अशी येरवड्याची लढाई झाली.

थोड्याच दिवसापूर्वी खडकीच्या लढाईत इंग्रज-मराठयांना एकमेकांचा अंदाज समजला होता. पेशवाईचा धनी बाजीराव कमकुवत असल्यामुळें बापु गोखल्यासारख्या सेनानीला सुद्धां यश प्राप्त झालें नाहीं. मराठेशाहीला या वेळीं उतार लागला होता. तिला सांवरून धरण्याचें सामर्थ्य कोणाच्याहि अंगांत नव्हते. एल्फिन्स्टनच्या सांगण्यावरून जनरल स्मिथ येरवडा येथील टेकडीच्या पश्चिमेस तळ देऊन राहिला. त्याला अडविण्याचा प्रयत्न अक्कलकोटकरांच्या फौजेनें व नारोपंत आपटेने केला, पण उपयोग झाला नाहीं. मराठयांची फौज १६ नोव्हेंबर रोजीं येरवड्यापाशीं येऊन धडकली आणि युद्धास सुरुवात झाली. " रविवार कार्तिक शु. ८ रोजीं दोन प्रहरापासून लढाईची तोफ चालती झाली. घोरपडीजवळ खंडेरावाची टेकडी आहे, त्याजवर इंग्रजांनीं दोन तोफा लागू करून मोर्चा कायम केला. त्याजवर अरब व गोसावी पायदळ नदीपुढें जाऊन गोळी चालली. ती मध्यान्ह रात्र पावेतों. गोखले, पुरंदरे, रास्ते, आपटे व पटवर्धन वगैरे मंडळी तोफांजवळ उभी होती. घोरपडीकडून एक पलटण आली; म्हणून गोखले वगैरे तिकडे लढत गेले. संगमावर विंचूरकरांनीं घोडा घातला नाहीं व तोफ लावली नाहीं. ... इंग्रजांच्या लोकांनीं सरकारांच्याच तोफा त्याजवर लागू केल्या. ... प्रथम रात्रीं श्रीमंत लष्करांतून पळून गेले. त्यामुळे सरकारचा अपजय झाला. दौलत खराब झाली. " या रीतीने या लढाईनें पेशव्याच्या राज्याचा शेवट झाला. फंदफितुरीचें साम्राज्य सगळीकडे पसरलेलेंच होते. या येरवड्याच्या लढाईचें वर्णन शाहीर असे करतात-

" फसले शके सत्राशें एकुणचाळीसांत रणभूमीस ।
ईश्वर संवत्सरांत कार्तिक शुक्ल अष्टमीस,
जलदी करून साहेबांनीं लाविलें निशाण पुणियाला ।
खेंचून वाड्याबाहेर काढिलें कदिम शिपायाला "

१६ नोव्हेंबर १८१७

## कार्तिक शु. ९ (१) शनिवारवाड्यावर इंग्रजी निशाण!

शके १७३९ च्या कार्तिक शु. ९ रोजीं पुण्याच्या शनिवारवाड्यावर इंग्रजांचें निशाण लागलें.

आदल्याच दिवशींच्या येरवड्याच्या लढाईत मराठ्यांचे मालक बाजीरावसाहेब पुण्यातून आपण होऊन निघून गेले होते. बाळाजीपंत नातू इंग्रजांना सामील झाले होते. झेंडा वाड्यावर कोणीं लावावा याची चर्चा चालू होती. जनरल स्मिथनें एल्फिन्स्टनला सांगितलें, "आम्ही शहरांत जाऊन झेंडा लावतों, परंतु फौजेस लूट मिळाली पाहिजे. तेव्हां जवळ बाळाजीपंत नातू होते त्यांनीं विनंति केली की, शत्रु तर पळून गेले, आतां गरीब रयतेस लुटण्याचें प्रयोजन काय? सर्व लोक इंग्रजी अमल होण्याचीच वाट पहात आहेत." ज. स्मिथ बोलले, "दादा, तुम्ही निशाण लावतां काय?" नातू म्हणाले, "मजबरोबर पंचवीस स्वार द्या. म्हणजे मी झेंडा चढवून येतों" मराठ्यांच्या राजधानींत शनिवारवाड्यावर निशाण लावणारा आपल्यापैकींच एक माणूस निघावा यापेक्षां दुर्दैव कोणतें? त्या वेळीं पुण्याची स्थिति अशी होती. "शु. ९ सोमवार रोजीं ऊन पडतांच तोफांचे दोन गोळे शहरावर टाकले आणि बुधवारचे रस्त्यानें हजार स्वार पळत गेला. फिरंगे यांनीं सरकारचे तळावरील डेरे येऊन जाळले, गावांत आईस लेकरूं पुसेनासे झालें. रस्त्यांत वाट मिळेनाशी झाली. कोणी पर्वतीचे डोंगरांत, कोणी कोणीकडे अशीं गेलीं. नवरा एकीकडे, बायको एकीकडे अशी अवस्था झाली. गावांत बातमी, आतां पुणें जाळतो. इतक्यांत गोसावीपुऱ्यांतील बंगला जळला. त्यानें लोकांची फार हवालदील झाली.... साहेब व बाळाजीपंत नातू तीनशें कुडतीवाले घेऊन शहरांत शनिवारवाड्यापाशीं येऊन किल्ल्या आणून दरवाजे उघडले. उभयतांनीं आंत जाऊन गादीस कुर्निसात केल्या; आणि आकाशदिव्याचे काठीस निशाण लावलें." याप्रमाणें पेशवाईची इतिश्री झाली. ज्या भगव्या झेंड्यानें शिवरायांच्या काळापासून स्फूर्तिदायक असा मराठ्यांचा इतिहास घडविला, त्याच भगव्या झेंड्याला या दिवशीं खालीं यावें लागलें. कार्तिक शु. ९ हा दुर्दैवी दिवस. याच दिवशीं पेशव्यांच्या वाड्यावर युनियन जॅक झळकूं लागलें.

—१७ नोव्हेंबर १८१७

## कार्तिक शु. ९ (२) विष्णु गणेश पिंगळे यांना फांशी !

शके १८३७ च्या कार्तिक शु. ९ रोजीं लाहोरच्या कटांत भाग घेणारे सुप्रसिद्ध क्रांतिकारक विष्णु गणेश पिंगळे यांना फांशीं देण्यांत आलें !

पिंगळे हे मूळचे पुणें जिल्ह्यांतील तळेगांव ढमढेरे येथील राहणारे; गदर पार्टीच्या इतर सभासदांबरोबर ते अमेरिकेहून परत आले व बंगालमध्यें उतरले. लाला हरदयाळ यांच्या गदर पार्टीचा मुख्य उद्देश म्हणजे शीखांना क्रांतीसाठीं हिंदुस्थानांत पाठविणे हा असे. बॉबविद्या शिकविण्याची कामगिरी घेऊन ते पंजाबमध्यें आले. रासबिहारी बोस यांच्या नेतृत्वाखालीं अमृतसर येथें प्रयोग सुरू झाले. तिथिनिश्चयहि होऊन चुकला होता; ठिकठिकाणच्या सैन्यांच्या उठावण्या, बॉब व बंदुका यांचा संग्रह, खेडुतांची संघटना, इत्यादि कार्यक्रम ठरले. परतु ऐन वेळीं सरकारला कटाचा सुगावा लागला व रासबिहारी बोस यांच्या निवासस्थानावर छापा घालून सात लोकांना अटक करण्यांत येऊन खटला भरण्यांत आला. आणि शेवटीं कार्तिक शु. ९ रोजीं कर्तारसिंग, जगतसिंग, पिंगळे प्रभृति सात जणांना लाहोरच्या सेंट्रल जेलमध्ये फांशीं देण्यांत आलें ! भाई परमानंदजींनाहि याच वेळीं फांशीची शिक्षा सांगण्यांत आली होती ! पण पं. मालवीय आदि पुढाऱ्यांच्या खटपटीमुळे त्यांची फांशीची शिक्षा रद्द होऊन त्यांना काळ्या पाण्यावर पाठविण्याचें ठरलें.

देशवीर विष्णु गणेश पिंगळे हे सन १९०९ मध्यें महाराष्ट्रांतील 'अभिनव भारतीय' क्रांतिकारकांच्या संगतींत वाढलेले होते. नंतर अमेरिकेंत गेल्यावर हरदयाळप्रभृति कार्यकर्त्यांनीं काढलेल्या 'गदर' (बंड) या संस्थेंत ते शिरले. ह्या काळ म्हणजे सन १९१४ च्या महायुद्धाचा होता. याच वेळीं हरप्रयत्नांनीं मातृभूमीस स्वतंत्र करावें ही लाट क्रांतिकारकांच्या मनांतून उद्भवली होती. आधुनिक शस्त्रास्त्रें मायदेशीं पाठवून एकच भडका उडवावा, आणि बंडाची उठावणी करावी असा हेतु होता. लाहोरच्या कटांत कर्तारसिंग व पिंगळे हे दोघे सांपडले. त्या दोघांनींहि ब्रिटिशांची सत्ता व त्यांचा न्यायालयीन अधिकार नाकारला व हंसत हंसत दोघेहि फांशीं गेले.

— १५ नोव्हेंबर १९१५

## कार्तिक शु. १० "तर मात्र आश्चर्य आहे!"

कार्तिक शु. १० या दिवशीं सीतेच्या शोधासाठीं रामाला मदत करण्यास सुग्रीवाचे सर्व सैन्य सिद्ध झालें.

वाली-वध झाल्यानंतर किष्किधाचे राज्य सुग्रीवास परत मिळालें. रामरायांना मदत करण्याचें अभिवचन सुग्रीवाने दिलें होतें. परंतु बरेच दिवस झाले तरी सुग्रीवानें कांहींच खबर घेतली नाहीं तेव्हां राम चिंताग्रस्त झाले. ते लक्ष्मणास म्हणाले, " सुग्रीवास राज्य मिळालें, भार्याहि मिळाली. तो माझी आठवण कशाला काढील? तूं सुग्रीवाची भेट घे." याप्रमाणें लक्ष्मण किष्किधा नगरींत आला; आणि सुग्रीवापुढें जाऊन म्हणाला, " सत्त्ववान्, जितेंद्रिय, दयाशील, कृतज्ञ व सत्यवादी असा पुरुष जगतांत लोकादरास पात्र होतो. परंतु कृतघ्नाला प्रायःश्चित्त नाहीं." सुग्रीवास आपली चूक समजून आली. हात जोडून तो म्हणाला, " लक्ष्मणा, गेलेली स्त्री आणि हे कपिराज्य रामाच्याच कृपेनें मला मिळालें आहे... राम आपल्या तेजानें सीतेला परत आणून रावणाचा नाश करील. मी केवळ साहाय्य केल्याचा अधिकारी आहें. युद्धाची समग्र तयारी आतांच करतों." याप्रमाणें बोलून सुग्रीवानें सैन्य जमविण्यास हनुमानास आज्ञा दिली.

त्याप्रमाणें लागलीच चारहि दिशांना दूत पाठवून तीन कोटी वानरसेना सज्ज करण्यांत आली. आणि सुग्रीव या प्रचंड सेनेसह रामापुढें येऊन उभा राहिला. आणि बोलला, " रामा, तुझ्या प्रसादानें मला हीं सर्व संपत्ति व हें राज्य मिळालें आहे. उपकार फेडण्यास जो तयार होत नाहीं तो अधम पुरुष होय. विंध्य, हिम, मन्दर, मेरु, इत्यादि दूरदूरच्या ठिकाणांहून वानरसेना सज्ज आहे. हे सर्व तुमच्या कार्यासाठीं येतील. आणि त्या राक्षसाधमाचा विध्वंस करतील." हें ऐकून रामाला फारच संतोष झाला; रामानें म्हटलें, " इंद्र पर्जन्याचा वर्षाव करतो, किंवा सूर्य तमाचा नाश करतो यांत आश्चर्य नाहीं; तुझ्यासारखे उत्तम मित्र उपकार न करतील तर मात्र आश्चर्य आहे!" यातंतर सीतेचा शोध करून रावणासारख्या दुष्ट राजाचा पराभव करण्यासाठीं सर्वांचे प्रयत्न सुरू झाले.



## कार्तिक शु. ११ यशवंतराव होळकरांचें निधन!

शके १७३३ च्या कार्तिक शु. ११ रोजीं इंग्रजांना मोठया शौर्यानें सामना देणारे मराठेशाहींतील प्रसिद्ध वीर यशवंतराव होळकर यांचें निधन झालें.

मराठेशाहीच्या पडत्या काळांत इंग्रजांशीं ज्या ज्या वीरांनीं मोठया शौर्यानें लढाया दिल्या, त्या शूर वीरांत यशवंतराव होळकरांची योग्यता मोठी आहे. दौलतराव शिंदे व बाजीराव पेशवे यांनीं होळकरांची दौलत बुडविली होती, ती प्रचंड लढाया जिंकून यशवंतरावाने परत मिळविली. या दोघांप्रमाणें यशवंतराव इंग्रजांपुढे नमला नाहीं, तर त्याच्याशीं निधड्या छातीनें युद्ध करून मॉन्सनसारख्या सेनापतीवरहि यांनीं मात केली. उत्कृष्ट सेनापति म्हणून यांचें नांव मराठयांच्या इतिहासांत कायम राहील. मराठयांच्या लढाऊ वृत्तीचें दिव्य सामर्थ्य सर्व जगाला पुन्हा एकदां यांनीच दाखविलें. थॉर्नने प्रत्यक्ष पाहून यांचें वर्णन केलें आहे, " यशवंतराव सुस्वरूप व तरतरीत होता. एक डोळा गेल्यानें थोडे वैगुण्य आले तरी चेहरा प्रसन्न व प्रफुल्ल दिसे. बोलण्याचालण्यांत तो इतका उदार व कनवाळू असे कीं, त्याच्या हातून अत्यंत क्रूर कृत्ये घडलीं असें मनांत सुद्धां येणार नाहीं. तो केव्हां हिरेमोत्यांचे बहुमोल अलंकार व भपकेदार पोशाख चढवून मुद्दाम आपलें वैभव प्रगट करी, तर अन्य क्षणीं नुसती टिचभर लंगोटी लावून उघड्या पाठीच्या घोड्यावरून दौड करी. " यशवंतराव होळकरांच्यासंबंधीं डफ लिहितो, " मराठी व फारसी लेखन त्यास करतां येत असे. त्याचा बांधा ठेंगू, पण हाडापेराने मजबूत व काटक असा होता. रंग काळा असून चेहऱ्यावर शौर्य, धाडस व लहर यांची झांक चांगलीच मारत होती. " इंग्रजांना संपूर्णपणें पराभूत करण्याची यांची इच्छा पूर्ण झाली नाहीं. शत्रूवर मात करण्यासाठीं तोफा ओतण्याचे काम हे स्वतः करीत असत. शेवटपर्यंत यांच्या सामर्थ्याचा दरारा एवढा होता कीं, त्यांच्या वाटे जाण्याचे साहस कोणींहि केलें नाहीं. आयुष्याच्या शेवटीं यशवंतरावांना चित्तभ्रम झाला. शेवटीं यांनीं महिपतबाबा गोसावी ढालीबावा यांचा उपदेश घेतला. आणि भानापूर येथें कार्तिक शु. ११ रोजीं यांचा अंत झाला.

— २८ ऑक्टोबर १८११

## कार्तिक शु. १२ "ताराबाई रामराणी" हिचें निधन !

शके १६८३ च्या कार्तिक शु. १२ रोजीं मराठेशाहीतील प्रसिद्ध राजकारणी बाई, छत्रपति राजाराम यांची स्त्री ताराबाई भोसले यांचे निधन झालें !

राजारामाच्यानंतर ताराबाईनें रामचंद्रपंत अमात्य, शंकराजी नारायण, धनाजी जाधव, इत्यादींच्या मदतीनें आपल्या मुलास-शिवाजीस गादीवर बसविलें. व राजसबाईस कैदेंत टाकलें. पुढें शाहूची मुक्तता झाल्यावर आपापसांतील वैर अधिकच वाढलें. मराठे सरदारांत फूट पडली. सत्ता कायम टिकविण्यासाठीं तिने अनेक कारस्थानें केलीं. शौर्य आणि मुत्सद्देगिरी यांविषयीं परकीयहि ताराबाईची वाखाणणी करतात. "नवऱ्याच्या मागें औरंगजेबाला तोंड देण्याचें कार्य हिनें अधिकच तडफेने पार पाडले. मोंगली मुलखावर हल्ले चढवून मराठ्यांचा आर्थिक प्रश्न सोडविण्याचे काम हिच्याच कारकीर्दींत सुरू झाले. मराठेशाहींतील अव्वल दर्जाच्या मुत्सद्यांची जूट हिनें शेवटपर्यंत टिकविली होती; आणि पराक्रमांत हिनें केव्हांच हार खाल्ली नाहीं." ताराबाईचा पराक्रम एका तत्कालीन कवीनें एका पद्यांत वर्णन केला आहे.

"दिल्ली झाली दीनवाणी। दिल्लीशाचे गेलें पाणी।  
ताराबाई रामराणी। भद्रकाली कोपली ॥  
रामराणी भद्रकाली। रणरंगी क्रुद्ध झाली।  
प्रलयाची वेळ आली। मुगल हो सांभाळा ॥  
वसे रत्न सिंहासनीं। भोसल्यांचा शिरोमणी।  
शिवराज चितामणी। दिनमणि उदयें-"

परकीय मुसलमानांनींहि ताराबाईची वाखाणणी केली. आहे. तिनें होतकरू मराठे सरदारांना उत्तेजन देऊन त्यांना नर्मदेच्या उत्तरेस मोंगली मुलखांत पाठविलें आणि पुढील राज्यविस्ताराचा पाया घातला. खुद्द ताराबाई एकाच किल्ल्यावर राहत नसे, तर ठिकठिकाणीं हिडून ती बादशहाच्या हालचाली पहात असे आणि त्या अनुरोधानें आपलें युद्धविषयक धोरण ठरवीत असे. पुढें रामराजा गादीवर आला, तेव्हां हिला कैदेत पडावें लागलें, आणि याच अवस्थेंत या शूर आणि धोरणी स्त्रीचा कार्तिक शु. १२ रोजीं अंत झाला !

— ६ नोव्हेंबर १७६१

## कार्तिक शु. १३ अकबर आणि संभाजी यांची भेट !

शके १६०३ च्या कार्तिक शु. १३ रोजीं संभाजी राजे यांनीं औरंगजेबाचा मुलगा अकबर याची पाली (पातशहापूर) येथें भेट घेतली.

अकबर हा औरंगजेबाचा चौथा मुलगा. संभाजी व अकबर यांत चार महिन्यांचेंच अंतर होतें. अनुभवी सेनापतीच्या हातीं शिक्षण घेऊन शहाजादा अकबर युद्धकलेंत चांगलाच निपुण झाला होता. बापाचा विश्वास संपादन करून त्याने रजपुतांवर स्वारी केली होती. परंतु अकबराचें धोरण औरंगजेबास पसंत नव्हतें. संपूर्णपणें हिंदूंचा नायनाट करावा हे बापाचें कर्तव्य होते. तें त्याच्या पुत्रास पसंत पडले नाहीं. दोघांच्या मनांत तेढ निर्माण झाली. औरंगजेबाने 'भ्याड', 'नामर्द' म्हणून अकबराची हेटाळणी केली. मानी अकबर चिडून गेला. रजपुतांनीं त्याला भर दिली, "तुम्ही त्या थोर अकबराचे वंशज आहांत. या सोन्यासारख्या संधीचा फायदा घ्या. आम्ही तुम्हांस मदत करतों." दुर्गादास याने पुढाकार घेऊन अकबरास सिंहासनावर बसवून औरंगजेबास कैद करण्याचा प्रयत्न सुरू केला. औरंगजेब मनांतून घाबरला. पण कपटाविद्येनें त्यानें वेळ निभावून नेली. रजपूत लोकांना पातशहाची कपटबुद्धि न उमगून ते अकबराविरुद्ध बिथरले व त्यांनीं युद्ध चालू केलें. अकबराचा पराभव झाल्यावर दाक्षिणेस संभाजीस त्यानें पत्र लिहिलें, "राज्य करूं लागल्यापासून हिंदूंस बुडवावें, असा औरंगजेबाचा निश्चय आहे.... सर्व लोक ईश्वराचीं लेकरें आहेत, राजा हा त्यांचा संरक्षक आहे, म्हणून लोकांचा उच्छेद करणें बादशहास योग्य नाहीं. औरंगजेबाचीं कृत्यें मर्यादेबाहेर गेलीं.... मी तुमच्याकडे येत आहें, दुर्गादास राठोड मजबरोबर आहेत. मजबद्दल आपलें मन निःशंक असू द्यावे. आपण दोघांनीं मिळून पातशहाचा पाडाव करूं –" संभाजीस मनांत धास्ती थोडी होतीच. नेताजी पालकर व हिरोजी फर्जंद यांना संभाजीनें अकबराकडे पाठविलें; आणि आपण स्वतः कार्तिक शु. १३ रोजीं पालीस जाऊन संभाजीनें अकबराची भेट घेतली. 'समागमे सेना समुदाय हशम देखील होते. शहाजाद्याबरोबर दुर्गादास होते. बहुत सन्मान केला."

— १३ नोव्हेंबर १६८१

## कार्तिक शु. १४ हरिहरांचें मीलन !

कार्तिक शु. १४ हा दिवस वैकुंठ चतुर्दशी या नांवानें प्रसिद्ध आहे. या दिवशीं श्रीविष्णु आणि श्रीशंकर यांची भेट झाल्याचे पुराणग्रंथांत नमूद आहे.

सनत्कुमार संहितेंत अशी कथा आहे कीं, वैकुंठाहून श्रीविष्णु काशीक्षेत्रीं आला, आणि मणिकर्णिकेंत स्नान करून त्यानें काशीविश्वेश्वरास हजार कमलें वाहण्याचा संकल्प केला; पूजा सुरू असतां शंकरानें एक कमल दूर लोटून दिलें तेव्हां संकल्प पुरा करण्यासाठीं विष्णूनें त्या फुलाऐवजीं आपलें नेत्रकमलच अर्पण केलें ! विष्णूच्या भक्तीने शंकर प्रसन्न झाला.

या कथेतील मर्म ध्यानीं धरणें आवश्यक आहे. भारतांत ऐतिहासिक कालापासून शिव आणि विष्णु या दैवतांच्या उपासकांमध्ये मतभेद निर्माण होऊन द्वेष, मत्सर, आदि दोषांचीं पुटें त्यावरून चढूं लागलीं. नंतरच्या काळांत तर वीरशैव वीरवैष्णव, लिंगायत, गाणपत्य, नाथपंथी, महानुभाव, जैन, रामदासी, कापाळी, गोसावी, रामानंदी, इत्यादि अनेक संप्रदाय निर्माण होऊन सर्वांच्या मुळाशीं असलेला भारतीय संस्कृतीचा धागा लोक विसरून जात होते. या सर्व पंथांचें स्वरूप बाह्य दृष्टीनें भिन्न असलें तरी एकजिनसी असणाऱ्या आपल्याच संस्कृतीचीं हीं भिन्न अंगें आहेत, असें पटवून देण्याचे जे कांहीं उपक्रम झाले, त्यांत वैकुंठ-चतुर्दशीचें स्थान मोठें आहे. हरि–हरांत फक्त एका वेलांटीचा फरक आहे असाच उपदेश तुकोबांचा आहे.

उत्तरेंत वा दक्षिणेंत शैव व वैष्णव यांचीं भांडणें असलीं तरी महाराष्ट्रांत मात्र त्याचें नांवहि दिसून येत नाहीं. याचें श्रेय येथें रूढ झालेल्या भागवत धर्मास द्यावयास पाहिजे. या भागवत धर्मानें वारकरी सांप्रदायानें सर्व मतभेद मिटावेले, आणि 'ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम' सांगतात त्याप्रमाणें एकाच विठोबाला शिव. आणि विष्णु यांच्या स्वरूपांत पाहण्यास जनतेस शिकविलें.



## कार्तिक शु. १५ ( १ ) त्रिपुरासुराचा पराभव!

कार्तिक शु. १५ हा दिवस त्रिपुरी पौर्णिमेचा म्हणून प्रसिद्ध आहे.

या दिवसाचें महात्म्य पुराणग्रंथांतून सांपडतें. पूर्वी त्रिपुरासुर नांवाचा एक दैत्य फार उन्मत्त झाला होता. आपल्या राजधानीभोंवतीं तीन मोठे तट निर्माण करून तो अजिंक्य झाला होता. इंद्रादिक देवांचेंहि त्याच्यापुढे कांहीं चालत नव्हतें, तेव्हां नारदाच्या सांगण्यावरून सर्व देव शंकरास शरण गेले, व त्यांनीं त्रिपुर दैत्याचा नाश करण्यासाठीं शंकराला विनंति केली. शंकराने ती मान्य करून आपल्या प्रचंड सामर्थ्यानें त्रिपुरासुराचा नाश केला. तो दिवस कार्तिक शु. १५ हा होता.

या विजयाची स्मृति आजपर्यंत भारतीयांनीं कायम ठेविली आहे. या दिवशीं सर्व शिवालयांतून दीपोत्सव करण्यांत येत असतो. कांहीं प्रांतांत हा दिवस शिवाचा पुत्र स्कंद किंवा कार्तिकेय याचा जन्मदिवस म्हणून पाळतात; आणि तत्प्रीत्यर्थ त्याच्या मूर्तीची पूजा-अर्चा करण्यांत येते. तारकासुराचा नाश करणारा हाच वीर असून तो अतिशय सुंदर होता.

दक्षिण हिंदुस्थानांत शिवासाठीं कृत्तिका नांवाचा महोत्सव साजरा करण्याची पद्धत आहे. सर्वत्र उत्कृष्ट प्रकारचा साज-शृंगार करून मिरवणूक, महापूजा, वगैरे उत्सव मोठ्या प्रमाणावर होत असतात. "सुमारें पंचवीस हात उंचीचा खांब देवळासमोर उभा करून त्यावर कापूर व इतर ज्वालाग्राही पदार्थ घालून तो पेटवून देतात. तिरुवण्णामल्ली, त्रिचनापल्ली, तिरुलन्नी, इत्यादि ठिकाणीं जेथें जेथें टेकडी आहे अशा ठिकाणीं दीपोत्सव करण्यांत येत असतो."

पुराणांत सांगितलेल्या त्रिपुरासुराच्या वधाचा उल्लेख रूपकात्मक असावा असें कित्येकांचें मत आहे. "क्रोध, लोभ व मोह हे (असुर) प्रबल झाले म्हणजे इंद्रियांना (देवांना) त्रास देतात, तेव्हां इंद्रियें आत्म्यास (शिवास) शरण जातात आणि मग तो आत्मा एकाच बाणानें त्रिपुरांना (स्थूल, सूक्ष्म व कारण या तीन शरिरांना) व्यापून असणारे कामक्रोधादि जे असुर त्यांचा वध करतो. अशी कल्पना रूपक सोडवितांना करण्यांत येते.



## कार्तिक शु. १५ (२) ‘गीतांजली’स नोबेल पारितोषिक !

शके १८३५ च्या कार्तिक शु. १५ रोजीं आशियाचे कविसाम्राट् म्हणून ओळखले जाणारे रवीन्द्रनाथ टागोर यांच्या गीतांजलीला जगप्रसिद्ध असें नोबेल पारितोषिक मिळाल्याचे जाहीर झालें !

भारतास मिळालेला हा पहिलाच मान होता. या योगानें रवींद्रबाबूंचीच नव्हे तर सर्व हिंदुस्थान देशाची मान अधिक उंच झाली. हिंदुस्थानच्या पारतंत्र्याच्या काळांतहि उच्च प्रकारचें काव्य निर्माण होतें याची साक्ष युरोपियन लोकांना पटली. वास्तविक पाहतां ‘ गीतांजलीं ’ तील विषय भारतीयांना परका नव्हता. परंतु भौतिक शास्त्राच्या प्रगतींत सुख मानून वणवण करीत भटकणाऱ्या पाश्चात्य पांथस्थांना गीतांजलींतील अमृतवर्षाव अत्यंत सुखमय वाटून नवचैतन्य देणारा भासला. गीतांजलि हें काव्य रवींद्रबाबूंनीं सन १९०९ मध्यें बंगाली भाषेंत रचले, पुढें चार वर्षांनंतर त्याचे इंग्रजी भाषांतर प्रसिद्ध झालें. इतर भारतीय साधुसंतांनीं अध्यात्म-तत्त्वज्ञानावर अफाट वाङ्मय निर्माण केले आहे. गीतांजलींत सुद्धां हाच विषय टागोर यांनीं आपल्या उच्च कल्पनाशक्तीच्या साह्यानें अत्यंत मिष्ट केला आहे. भक्तियुक्त अंतःकरणानें जीं गीतकुसुमें टागोरांनीं परमेश्वराच्या चरणीं वाहिलीं त्यांतील १०३ अथवा मूळ बंगालींतील १५७ गीतांचा समुदाय म्हणजे ‘गीतांजलि’. याला रवींद्रबाबूंच्या प्रतिभेचें एक दिव्य विजयतोरणच म्हणणें इष्ट होईल. सर्व विषय अध्यात्मपर असूनहि कलापूर्ण मांडणी, सौंदर्ययुक्त दृष्टि, आणि कल्पनारम्य असा गूढवाद यांमुळें ‘गीतांजलि’ म्हणजे उत्कृष्ट असें भावमधुर स्तोत्रकाव्य झालें आहे. गीतांजलि वाचून अनेक लोकांच्या मनाला शांति प्राप्त होऊन एक प्रकारचा दिव्य उल्हास त्यांच्या मनांत निर्माण झाला आहे. सदा सर्वदा युद्धाच्या अग्नितांडवांत होरपाळून निघणाऱ्या पाश्चात्य समाजाला तर ‘गीताजलि’ एक अमोल असा ठेवाच वाटला. लीनता, भूतदया, स्वदेशप्रेम, आणि स्वर्गीय आनंद या गुणचतुष्टयावर टागोरांची काव्यसंपदा साकार झाली आहे. जगांतील बहुतेक सर्व भाषांतून गीतांजलीचीं भाषांतरें झालीं आहेत.

— १३ नोव्हेंबर १९१३.

## कार्तिक व. १ महात्मा फुले यांचें निधन !

शके १८१२ च्या कार्तिक व. १ रोजीं महाराष्ट्रांतील आद्य समाजसुधारक व स्वयंस्फूर्तीने समतावाद प्रतिपादिणारे महात्मा ज्योतिबा गोविंद फुले यांचें निधन झालें.

सातारा जिल्ह्यांतील कटगुण हे यांचें मूळ गांव. यांचे आजोबा शेटीबा हे उदर-निर्वाहासाठीं म्हणून पुण्यास आले. यांच्या तीनहि मुलांनीं माळी कामांत कौशल्य दाखवून पेशव्यांच्या येथें फुले देण्याच्या कामगिरींत लौकिक संपादन केला, म्हणून यांचें नांव फुले असें पडलें. शिक्षणास सुरुवात झाल्यावर ज्योतिबांनीं वा. ब. फडके यांचे मांग जातीचे गुरु लहूजीबुवा यांचेजवळ दांडपट्टा व नेमबाजी यांचें शिक्षण घेतलें. ख्रिस्ती धर्मोपदेशकांच्या सेवावृत्तीनें व कार्यनिष्ठेने हे चांगलेच भारावले गेले होते. बहुजनसमाजाला साक्षर करावे व त्याला सत्यधर्माचें ज्ञान करून द्यावे असा विचार यांच्या मनांत येऊं लागला. सन १८५१ मध्यें यांनीं बुधवार पेठेतील चिपळूणकरांच्या वाड्यांत मुलींची शाळा काढली. या कामीं यांना व यांच्या पत्नींना समाजाकडून अत्यंत त्रास झाला; परंतु यांच्या या अभिनव कार्याबद्दल यांचा जाहीर सत्कार झाला. व सरकारनें यांना दोनशें रुपयांची शालजोडी अर्पण केली. त्यानंतर सन १८५२ मध्यें वेताळ पेठेत अस्पृश्यांकरितां दोन शाळा यांनीं स्वतःच्या खर्चानें काढल्या. विधवाविवाहाचा प्रसार करून फुले यांनीं तसा एक विवाह घडवूनहि आणिला. तसेंच पतित मुलींच्या हातून भ्रूणहत्येचें पातक घडूं नये म्हणून यांनीं 'बालहत्या-प्रतिबंधक गृह' काढलें. यानंतरची यांची महत्त्वाची कामगिरी म्हणजे १८७३ मध्यें यांनीं आपल्या विख्यात अशा सत्यशोधक समाजाची स्थापना केली. ब्राह्मणांची मध्यस्थी दूर होऊन सामाजिक गुलामगिरी दूर व्हावी असा उद्देश या समाजाचा होता. समाजशास्त्रज्ञांनीं अभ्यासपूर्वक जे सिद्धान्त शोधून काढले ते यांनीं स्वयंस्फूर्तीनें प्रतिपादिले. ब्राह्मण व वेदपुराणादि ग्रंथांवर प्रखर हल्ला करून सबंध समाजरचनाच बदलून टाकण्याची दिशा यांनीं दाखविली. 'ब्राह्मणांचें कसब', 'गुलामगिरी', 'जातिभेदविवेकसार', 'इशारा', 'शेतकऱ्याचा आसूड' वगैरे पुस्तकें यांनीं लिहिलीं आहेत.



—२७ नोव्हेंबर १८९०

## कार्तिक व. २ इंग्रज व शिंदे यांचें लासवारीचें युद्ध !

शके १७२५ च्या कार्तिक व. २ रोजीं लासवारी येथें इंग्रज आणि मराठे यांचे निकराचें युद्ध होऊन शिंद्यांच्या फौजेचा संहार झाला.

अलीगडचा किल्ला हातीं आल्यावर इंग्लिशांचा सेनापति लॉर्ड लेक दिल्लीवर आला. येथील लढाईतहि फंदफितुरी करून इंग्रजांनीं जय मिळविला. त्यानंतर त्यांचा मोर्चा आग्र्याकडे वळला. थोड्याच प्रयत्नांनीं शहर हस्तगत झाल्यावर किल्ल्यावर तोफांचा मारा सुरू झाला. आणि किल्लेदार शरण आला. किल्ल्यांतील सर्व सामान, दारूगोळा, तोफांचा व हत्यारांचा कारखाना व प्रचंड द्रव्यसंचय लेकच्या हातांत सांपडला. या विजयाची बातमी दौलतराव शिंदे यांना दक्षिणेंत समजली. तेव्हां तेथून मोठी फौज निघाली. लॉर्ड लेकला सुगावा लागतांच त्याने आपले जड सामान फत्तेपूरशिक्रीजवळ ठेविलें व तो तयारीस लागला. भरतपुरापासून बारा कोसांवर असणाऱ्या लासवारीजवळ शिंद्यांची फौज एका ओढ्याकांठीं तयार होती. "गुलाबराय कदम वगैरे दोन हजार स्वार दक्षिणी, व फडणीस आदि करून पंधरा पलटणांनिशीं तांब्रांचा मुकाबला केला. चार प्रहर तोफखान्याची लढाई मातबर झाली. प्रथम लेकचा मदतनीस व्हॅण्डलूर यानें एकदम हल्ला केला. परंतु त्यांतच तो ठार झाला. त्या प्रसंगीं तुंबळ युद्ध झालें. मेजर ग्रिफिथ्स, जनरल वेअर, वगैरे अनेक शूर इंग्रज लढाईत ठार झाले. परंतु शेवटीं इंग्रजांस विजयश्रीनें माळ घातली. युद्ध मुख्यतः तोफांचेंच झालें. इंग्रजांकडील दोन हजार गोरे व तीन हजार तेलंगे ठार व जखमी झाले. अखेर जनरल लेकनें स्वतः हल्ला केला तेव्हां मराठ्यांची फौज पळून गेली." इंग्रजांना मिळालेला हा विजय फार मोठा होता. यायोगें शिंद्यांचा संपूर्ण पराभव होऊन इंग्रजांना आतां मोठा शत्रु उरलेला नव्हता. शिस्त, व्यवस्था, धडाडी, पराक्रम हे गुण शिंद्यांच्या फौजेंत अवश्य होते, परंतु स्वदेशभक्ति, प्रामाणिकपणा, करारीपणा, स्वार्थत्यागबुद्धि या गुणांची ओळख थोडी कमी असल्यामुळें लष्करी सामर्थ्य तुल्यबल असलें तरी शिंद्यांना पराभवच स्वीकारावा लागला.

— १ नोव्हेंबर १८०३

## कार्तिक व. ३ रमेशचंद्र दत्त यांचें निधन !

शके १८३१ च्या कार्तिक व. ३ या दिवशीं बंगाल्यांतील प्रारंभींचे आय्. सी. एस्. अधिकारी, थोर अभ्यासक, राष्ट्रसभेचे अध्यक्ष, बडोद्याचे दिवाण, हिंदु संस्कृतीचे अभिमानी व ग्रंथकार रमेशचंद्र दत्त हे मृत्यु पावले.

यांचा जन्म कलकत्ता येथें झाला. यांचे वडील इसनचंद्र हे डेप्युटी कलेक्टर असून ते बुडून मरण पावले. तेव्हां रमेशचंद्र कलकत्ता येथें हायस्कूलमध्यें शिकत होते. यांचे काका सुशीचंद्र यांनीं यांचे पालनपोषण केले. मॅट्रिक झाल्यावर यांनीं तीन वर्षें प्रेसिडेन्सी कॉलेजांत शिक्षण घेतले व नंतर हे आय्. सी. एस्. होण्याकरितां इंग्लंडला गेले. या परीक्षेत १७५४ पासून या वेळपर्यंत फक्त एकच हिंदी विद्यार्थी पास झाला होता. यांचेबरोबर यांचे दोन मित्र सुरेंद्रनाथ बानर्जी आणि बिहारीलाल गुप्त हे पण होते. हे त्या परीक्षेत तिसरे आले. नंतर दोन वर्षें इंग्लंडमध्यें हिंडून हे हिंदुस्थानांत परत आले. आल्याबरोबर 'Three Years in England' हें इंग्रजी पुस्तक यांनीं प्रसिद्ध केलें. प्रथम कांहीं दिवस अनुभव मिळविण्याकरितां दुष्काळ व वादळांत झालेले नुकसान यांसंबंधीं काम करीत असतां यांनीं एक निर्भीड लेख 'स्टेटस्मन 'मध्ये लिहिला. त्यामध्यें निवृत्त होणाऱ्या ले. गव्हर्नर सर ॲशले ईडन यांच्या कारकीर्दीचें हुबेहुब चित्रण होतें. त्याचबरोबर शेतकी जीवन सुधारण्याचे उपायहि सुचविले. त्यामुळें बंगाल टेनन्सी ॲक्ट झाला. मेमनसिंग, बरद्वान, वगैरे जिल्ह्यांत मुख्य म्हणून काम करीत असतां लॉर्ड रिपनच्या वेळीं ग्रामपंचायतीची सूचना मांडून ती यांनीं मान्य करून घेतली व लवकरच ती सर्व प्रांतांत सुरू झाली. ओरिसाचे कमिशनर व पोलिटिकल एजंट, वगैरे महत्त्वाच्या जागांवर काम केल्यावर मुदत संपण्यापूर्वीच हे सेवानिवृत्त झाले. नंतर जवळजवळ सात वर्षें हे लंडनच्या युनिव्हर्सिटी कॉलेजांत हिंदुस्थानच्या इतिहासाचे लेक्चरर होते. तेथेच त्यांनीं रामायण व महाभारतांतील निवडक भागाचा इंग्रजींत पद्यमय अनुवाद केला. तसेंच शेतसारा, राजद्रोह, राज्यसुधारणा वगैरे मूलगामी कार्यांमुळें यांना लखनौच्या राष्ट्रसभेचे अध्यक्षस्थान देण्यांत आलें होतें.

— ३० नोव्हेंबर १९०९

## कार्तिक व. ४ — पं. मालवीय यांचें निधन !

शके १८६८ च्या कार्तिक व. ४ रोजीं आंतरराष्ट्रीय कीर्तीचे हिंदी पुढारी, बनारसच्या विख्यात हिंदु विश्वविद्यालयाचे जनक व कळकळीचे सार्वजनिक कार्यकर्ते पं. मदनमोहन व्रजनाथ मालवीय यांचें निधन झाले !

जुन्या कर्मठ आचारविचारांच्या ब्राह्मण घराण्यांत अलाहाबाद येथें शके १७८३ मध्यें यांचा जन्म झाला. यांचे शिक्षण संपल्यानंतर गव्हर्नमेंट हायस्कूलमध्यें थोडे दिवस शिक्षकाचे काम केल्यावर मालवीयांनीं 'हिंदुस्थान' नांवाचे पत्र काढिलें. पुढें इंडियन युनियन, अभ्युदय, लीडर, हिंदुस्थान टाइम्स, या पत्रांचे संपादकत्वहि वेळोवेळीं यांनीं स्वीकारिलें होतें. सन १८८५ च्या कलकत्ता येथील कॉंग्रेसमध्ये यांनीं पहिले राजकीय भाषण केलें. लाहोर, दिल्ली व कलकत्ता येथील कॉंग्रेसच्या अधिवेशनांचें अध्यक्षस्थान यांना मिळालेलें होतें. सन १९०२ मध्यें प्रांतिक असेंब्लीमध्यें व सन १९१० मध्यें मध्यवर्ती असेंब्लींत हे निवडून गेले. मालवीय हे हिंदुस्थानांतील हिंदूंचे मोठे पुढारी होते. हे हिंदुमहासभेच्या संस्थापकांपैकीं एक असून प्रयाग व पुणे येथील अधिवेशनांचे अध्यक्षहि होते. मदनमोहन मालवीय यांच्यांत नव्याजुन्यांचें उत्कृष्ट मिश्रण झालेले होतें. हिंदु शास्त्रे, धर्म व संस्कृत भाषा यांचे शिक्षण देणाऱ्या प्राचीन विद्यापीठाच्या कल्पनेला शास्त्रीय ज्ञानाच्या अध्ययनाची यांनीं जोड दिली व हिंदु विश्वविद्यालयाचा पाया घातला. हिंदु संस्कृतीच्या अभ्यासाबरोबरच इतर आधुनिक तीस शाखांचे शिक्षण देणारें हे विद्यापीठ जगप्रसिद्ध आहे. "स्नानसंध्या, गीताभागवतादिकांचा नित्य व्यासंग, पापभीरू व शुचिर्भूत वृत्ति, कपाळीं चंदनाचा ठसठशीत तिलक, पांढरा स्वच्छ पोषाख आणि देश व धर्म यांबद्दल काम करण्याची तत्परता या गुणांमुळें मालवीयांबद्दल सर्वांना आदर वाटे." यांच्या चारित्र्याला नैतिक अधिष्ठान असल्यामुळे विरोधकहि मालवीयांना फार मान देत असत. 'हृदयाचे मृदु, तत्त्वाचे खंबीर, धार्मिकतेची मूर्ति अशा यांच्या व्यक्तित्वामुळें यांच्याबद्दल लोकांना अतिशय पूज्य भावना वाटत असे.'

— १२ नोव्हेंबर १९४६

## कार्तिक व. ५ — गंगाधरपंत नेवाळकरांचें निधन !

शके १७७५ च्या कार्तिक व. ५ या दिवशीं झांशीची राणी लक्ष्मीबाई हिचे यजमान गंगाधरपंत नेवाळकर यांचें निधन झालें.

झांशीचे सुभेदार नेवाळकर यांचें घराणे मूळचे कोंकणांतील. पेशवाईच्या आरंभीं इतर अनेकांबरोबर हें घराणें धुळें जिल्ह्यांतील साक्री येथें येऊन स्थायिक झाले. रघुनाथराव नेवाळकर हे मुख्य पुरुष. याच घराण्यांतलि प्रसिद्ध पुरुष म्हणजे गंगाधरराव नेवाळकर. झांशीचें नष्ट झालेलें वैभव पुन्हा एकदां निर्माण करावें असा यांचा प्रयत्न होता. हे स्वभावानें अत्यंत दयाळू असून शिस्तीचे मोठे भोक्ते होते. यांची द्वितीय पत्नी म्हणजे प्रसिद्ध राणी लक्ष्मीबाई. सन १८४२ मध्ये लक्ष्मीबाई झांशीची 'राणी' बनली. पुढें लौकरच या दांपत्यास सन १८५१ मध्यें मुलगा झाला. पुत्रजन्माचा आनंदोत्सव पुरा होतो न होतो तोंच हा एकुलता एक वारस परलोकास निघून गेला. पुत्रवियोगाचा धक्का राजास फारच जाणवला. वारंवार ते आजारी पडूं लागले. राज्यांतलि श्रमांमुळें संग्रहणीचा विकार जडला. नामवंत राजवैद्यांचे उपचार सुरू झाले, पण कांहीं इलाज चालेनासा झाला. दिवसेंदिवस गंगाधररावांची प्रकृति खंगतच चालली. राणी अहोरात्र पतिचरणांजवळ बसून चितायुक्त मुद्रेनें सेवाशुश्रूषा करीत होती. चिन्हें बरीं नाहींत असे पाहून आनंदराव नांवाच्या आप्तालाच दत्तक घेण्यांत आलें. लक्ष्मीबाई चिंतेनें व्याकुळ झालेली असतांनाच कार्तिक व. ५ हा दिवस उजाडला; महाराजांनीं राज्याची निरवानिरव केली. ब्रिटिश सरकारनें राज्य नेवाळकरांच्या वंशाकडेच राहील असें आश्वासन दिले; आणि याच दिवशीं महाराजांनीं कैलासवास केला! मृत्यूची बातमी वायुवेगानें सर्व नगरभर पसरली. सर्वत्र हाहाःकार उडून राजवाड्यांत एकच हलकल्लोळ माजला. महाराणी लक्ष्मीबाईस दुःखाचा आवेग सहन न झाल्यामुळें तिचें देहभानच हरपलें! पुत्रवियोगानंतर राणीवर हा दुसरा जबरदस्त आघात झाला होता. गंगाधररावांच्यानंतर झांशीच्या राज्याची काय अवस्था झाली; राणी लक्ष्मीस कोणतें दिव्य करावें लागलें; हा इतिहास प्रसिद्धच आहे.

— २१ नोव्हेंबर १८५३

**कार्तिक व. ६** **( १ ) जवाहरलाल नेहरू यांचा जन्म !**

शके १८११ च्या कार्तिक व. ६ रोजीं भारताचे जगप्रसिद्ध पुढारी, आंतरराष्ट्रीय राजकारणाचे अभ्यासक व स्वतंत्र भारताचे पहिले पंतप्रधान पंडित जवाहरलाल नेहरू यांचा जन्म झाला.

भारतांतील सुप्रसिद्ध राज्यघटनाशास्त्रज्ञ, कायदेपंडित व राजकारणी मुत्सद्दी पंडित मोतिलाल नेहरू यांचे हे एकुलते एक पुत्र. राजेमहाराजे यांना हेवा वाटावा अशा ऐश्वर्यांत यांचें बाल्पण गेलें. मि. एफ्. टी. ब्रुक्स यांच्या हाताखालीं घरगुती इंग्रजी शिक्षण झाल्यानंतर ते इंग्लंडमधील हॅरो या प्रसिद्ध शाळेंत गेले. इंग्लंडातच त्यांचे उच्च शिक्षणहि झालें.

भारतांत आल्यावर सन १९२० नंतर त्यांनीं वकिली सोडून असहकारितेच्या चळवळींत भाग घेतला व राजकारणाला सर्वस्वीं वाहून घेतलें. सन १९२३ साली राष्ट्रसभेच्या चिटणिसाचें काम करूं लागल्यापासून त्यांच्या कर्तबगारीचे तेज विशेष चमकूं लागलें. युरोपच्या प्रवासांत रशियांतील वास्तव्यानें त्यांना नवीन दृष्टि आली. ती त्यांनीं ‘ सोव्हिएट रशिया ’ या पुस्तकांत मांडली आहे. सन १९२९ मध्यें लाहोरच्या राष्ट्रसभेच्या अधिवेशनाचें अध्यक्षस्थान यांना लाभले तेव्हां भारताच्या संपूर्ण स्वातंत्र्याचा निर्धार त्यांनीं केला. यानंतर १९३५, १९३६ आणि १९४६ हीं तीन वर्षें हे राष्ट्रसभेचे अध्यक्ष होते.

त्यांनीं लिहिलेलें आत्मचरित्र जगांतील उत्कृष्ट पुस्तकांत गणलें गेले आहे. यांच्याच दीर्घ प्रयत्नानें आणि महात्मा गांधींच्या तपश्चर्येमुळें भारत देश स्वतंत्र झाला आहे. भारताची सर्वांगीण उन्नति कशी होईल याचीच एक चिंता पंडित नेहरूंना सारखी लागून राहिलेली असते. जगांतील थोर पुढाऱ्यांत पंडितजींचें स्थान फारच वरच्या दर्जाचे आहे. सन १९४९ सालीं त्यांनीं जी अमेरिकेला भेट दिली त्या वेळीं त्यांचा झालेला सन्मान म्हणजे भारतीयांचाच गौरव होता. आंतरराष्ट्रीय राजकारणांतील मुत्सद्देगिरी पंडित नेहरू चांगलीच जाणत असल्यामुळें सर्व जगांत त्यांना मोठाच मान आहे. हिंदुस्थानच्या जनतेचे तर ते अत्यंत लाडके असे ‘ जवाहर ’ आहेत.

**— १४ नोव्हेंबर १८८९**

## कार्तिक व. ६ ( २ ) ह. भ. प. पांगारकर यांचें निधन !

शके १८६३ कार्तिक व. ६ रोजीं मराठी भाषेंतील प्राचीन संतवाङ्मयाचे सुप्रसिद्ध अभ्यासक, रसाळ लेखक, वक्ते व ग्रंथकार ह. भ. प. लक्ष्मण रामचंद्र पांगारकर यांचें निधन झालें.

महाराष्ट्रांतील सुशिक्षितांच्या घरांत जुन्या काव्याचें लोण पोंचवून तरुण पिढीचें लक्ष जुन्या काव्याकडे वळविण्याचें बरेंचसे श्रेय पांगारकर यांना आहे. प्रवचन, व्याख्यान आणि लेखन या साधनांनीं लक्ष्मणरावजींनीं उभ्या महाराष्ट्रांत तीन तपेंपर्यंत अध्यात्म, भक्ति आणि धर्मसंस्कृति यांचा पाऊस पाडला. 'मुमुक्षु' नांवाचें साप्ताहिक (नंतर मासिक) काढून भारतीय संस्कृतींतील भक्तिगंगा त्यांनीं घरोघरीं पोंचविली. 'भक्तिमार्गप्रदीपा'च्या लाखो प्रती महाराष्ट्रांत आजहि खपत आहेत. मोरोपंतचरित्र, तुकारामचरित्र, ज्ञानेश्वरचरित्र, मराठी वाङ्मयेतिहासाचे तीन खंड वगैरे ग्रंथांतून त्यांच्या चिकित्सेचा आणि भावनेचा उत्कृष्ट संगम पाहावयास मिळतो. पांगारकर जातीचे कवि होते. पण आपल्या 'चरित्रचंद्र' या आत्मवृत्तांतांत ते लिहितात, "संतकाव्याची दिव्य भगवत्स्फूर्ति पाहतांना माझी कवित्वशक्ति लाजून मुरडली व संतांच्या पायीं दडी मारून राहिली."

पांगारकरांची आणखी एक महत्त्वाची कामगिरी म्हणजे मोरोपंत, रामदासस्वामी, आणि अहल्याबाई यांच्या सार्वजनिक पुण्यतिथींचा उपक्रम महाराष्ट्रांत यांनींच प्रथम सुरू केला. अध्यात्म आणि भक्ति यांमध्यें रंगणारे पांगारकर राष्ट्रीय बाबतींत तितकेच जागरूक होते. ते एका ठिकाणीं लिहितात, "आमचें राष्ट्र आपल्या संस्कृतिबळावरच पुन्हा ऊर्जित दशेला येईल. व्यावहारिक सत्तेंत मी आधीं मराठा, मग हिंदु व शेवटीं विश्वात्मा आहे. सर्व हिंदु लोकांची एक संस्कृति आहे व तिचाच जयजयकार झाला पाहिजे." पांगारकरांसारखे रसाळ वक्ते झाले नाहींत. प्राचीन संतकाव्याचे त्यांचें पाठांतर दांडगें होतें. हजारबाराशें ओव्यांचा किंवा आर्यांचा ओघ त्यांच्या मुखांतून निघत असे. सन १९४९ मध्यें त्यांच्याविषयींचा गौरवग्रंथ प्रसिद्ध झाला आहे.

— १० नोव्हेंबर १९४१

## कार्तिक व. ७ फोंड्याच्या युद्धांत पोर्तुगीझाचा पराभव !

शके १६०५ च्या कार्तिक व. ७ ला संभाजी राजे यांच्या फौजेनें फौंडा येथें अद्वितीय पराक्रम करून पोर्तुगीझांचा पराभव केला.

जंजिऱ्याचा सिद्दी, गोव्याचे पोर्तुगीझ व मोंगल बादशहा या तिघांशीं मुख्यतः संभाजीला युद्धप्रसंग करावे लागले. पश्चिम किनाऱ्यावर पोर्तुगीझ लोक धर्म व व्यापार या बाबतींत मराठ्यांचा उच्छेद करण्याचा प्रयत्न करीत होते. त्यामुळें संभाजी अत्यंत चिडून गेला होता. "फौंडा या जलदुर्गावर संभाजीनें पुष्कळ द्रव्यसंचय केला आहे." अशा माहितीवरून पोर्तुगीझ गव्हर्नरानें फोंड्यावर हल्ला करण्याचें ठरविलें. आणि १७-१०-१६८३ रोजी आठशें युरोपियन, आठ हजार कानडी पायदळ, व पांच मोठ्या तोफा घेऊन तो गोव्याहून निघाला व त्यानें चार दिवस फौंड्यावर तोफांचा मारा सडकून केला. सटास एक लहानसें खिंडार पडलें. त्यांतून पोर्तुगीझ लोक आंत प्रवेश करीत असतां संभाजीच्या लोकांनीं आंतून मोठ्या आवेशानें लढून तो हल्ला साफ मोडून काढला. एवढ्यांत या हल्ल्याची बातमी संभाजीस समजली. तेव्हां तो चौलहून त्वेषानें चालून आला आणि त्याने पोर्तुगीझांचा संपूर्ण पाडाव केला. पावसाने दारू भिजून गेल्यामुळें पोर्तुगीझांच्या बंदुका चालेनात. शेवटीं कार्तिक व. ७ ला मोठ्या नामुष्कीनें गव्हर्नर टाहोरानें खाडी ओलांडून स्वतःचा जीव बचावला व गोवें गांठलें. हा नसता उपद्व्याप केल्याबतल तो बाहेर तोंडहि दाखविण्यास तयार होईना. एका धर्मगुरूच्या मठांत कैक दिवस तो लपून बसला होता.

या फोंड्याच्या वेढ्यांत शिवाजीचा विश्वासू सरदार येसाजी कंक व त्याचा पुत्र कृष्णाजी यांनीं मोठा पराक्रम केला. "या दोघांनीं फोंड्याचे स्वारींत फिरंग्यासी गांठ पडली असतां बहुत शिकस्त केली. आणि गनीम मारून काढिला. ते वख्तीं दोघांनाहि जखमा लागून चकचूर झाले. कठीण जखमा राजश्री स्वामींनीं दृष्टीनें पाहिल्या आणि घरासी जावयासी आज्ञा दिली. त्यावर कृष्णाजी कंक यांच्या जखमा घरीं फुटून मयत झाला.—"

— १ नोव्हेंबर १६८३

## कार्तिक व. ८ थोरले माधवराव पेशवे यांचा अंत !

शके १६९४ च्या कार्तिक व. ८ रोजीं श्रीमंत माधवराव पेशवे यांचा थेऊर येथें अंत झाला. आणि त्यांच्याबरोबर त्यांची पत्नी रमाबाई सती गेली.

अल्पावधींत माधवराव पेशव्याला जिवापाड श्रम करावे लागले. त्यामुळें आधींच्याच नाजुक प्रकृतीवर विलक्षण ताण पडला. अखेरच्या कर्नाटकच्या स्वारींत त्यांची प्रकृति फारच बिघडली. अंगीं रुजत असलेला क्षयरोग हळूहळू वाढीस लागला. भारतांतील प्रसिद्ध वैद्य महीधर गंगा विष्णु यांचें औषध सुरू झाले. हवापालटासाठीं व गजाननावरील भक्ति म्हणून श्रीमंतांचा मुक्काम थेऊरला होता. कार्तिकांत प्रकृति फारच बिघडली.—" थेऊरास वाड्यांत होते ते देवळाच्या आवारांत येऊन राहिले. सर्व मंडळी झाडून थेऊरास आली. श्रीगणपतीस जलाची संतत धार धरली. ज्वरशांति व अनुष्ठानास ब्राह्मण घातले. कार्तिक शुद्ध ६ रोजीं रमाबाईस सहगमनाविषयीं बोध केला. तिणें जबाब दिला ; ईश्वरसत्ता प्रमाण...एकदम पर्जन्य फार पडला, त्यामुळें हवा खराब झाली. सर्वांगावर सूज आली. कार्तिक शु. ११ ला प्रहर दिवसांत फार गडबडले. भुईवर उतरले, दानधर्म बहूत करवला...रमाबाई फक्त गोमूत्र व दूध यांजवर पांच-सात दिवस राहिल्या. कार्तिक व. ३ ला रमाबाईनीं सती जाते वेळचीं पातळे आणावयास सांडणीस्वार पुण्यास पाठविला. त्यावरून पुण्यांत मृत्यूची आवई उठून दोन घटका दुकानें बंद झाली. मागाहून खरी बातमी समजली. तेव्हां गडबड शांत झाली...अखेरची वेळ आली. 'आम्ही महायात्रेस जातो. स्वारीची तयारी करा.' म्हणोन श्रीमंत बोलूं लागले. स्तुति अखेर क्षणापर्यंत होती. बुधवार, कार्तिक व. ८ ला दोन घटका दिवस होता, त्या वेळीं 'गजानन', 'गजानन' म्हणत मोठ्या योग्याप्रमाणें नेत्रद्वारें प्राण गेला. प्रजेचे छत्र गेलें. मोठा घात झाला. बाईसाहेबांनीं तरुणपणांत स्त्रीधर्माची शर्थ केली. सर्व जवाहीर आपले हातानें वाटलें. धर्मशिलेवर उभी राहून सती गेली. श्रीमंताचा प्रताप जसा होता तसा बाईनीं शेवट केला. सूर्यमंडळ भेदून गेली.—"

—१८ नोव्हेंबर १७७२

## कार्तिक व. ९ सर्वज्ञानी राजा तोडरमल्ल !

शके १४११ च्या कार्तिक व. ९ रोजीं अकबर बादशहाचा सुप्रसिद्ध दिवाण राजा तोडरमल्ल याचें निधन झालें.

तोडरमल्ल हा जातीनें क्षत्रिय होता. अयोध्या प्रांतांतील लहेरपूरगांवचा हा राहणारा. याचें लहानपण अत्यंत त्रासांत गेलें. तान्हेपणींच बाप वारल्यामुळें मोठ्या कष्टानें आईने संगोपन केलें. तोडरमल्ल थोडा मोठा झाला; आणि आईची परवानगी घेऊन तो दिल्लीस कामधंदा पहाण्यास आला. तेथें अकबराचा फडणीस मुझफरखान म्हणून होता, त्याच्यापाशीं तोडरमल्ल गेला. तेथें त्यानें कारकुनीचे काम पत्करलें. त्याचा चाणाक्षपणा पाहून मुझफरखानानें त्याला आपला मुख्य दिवाण नेमला. पुढें त्यानेंच तोडरमल्लाची आणि बादशहाची भेट घडविली. बादशहानें त्यास आपल्या खाजगी कारभारांत घेतलें. लेखणीबरोबरच तोडरमल्लानें तरवारहि गाजविली. बादशहाच्या फौजेची त्यानें अत्यंत शिस्तबद्ध अशी व्यवस्था केली. त्याच्या या बंदोबस्तामुळें लोक त्याला 'सर्वसाक्षी' व सर्वज्ञानी म्हणूं लागले. चितोडगड, सुरत व रणथंभोर येथील विजय याच्याच मसलतीमुळे बादशहास मिळाले. 'तोडरमल्ल हा खरा शूर शिपाई आहे', असा याचा लौकिक झाला. यानेंच जमाखर्चाची व वसुलीची व्यवस्था अत्यंत चोख अशी ठेविली. अनेक प्रकारच्या बंडखोरांचें पारिपत्य करण्याच्या कामीं बादशहास तोडरमल्लाचा फारच उपयोग झाला. हा अत्यंत चतुर, शूर व युक्तिवान् म्हणून लोक याला ओळखूं लागले. ऐने अकबरी लिहिणारा अबुल् फजल् याच्याविषयीं लिहितो, "स्वतःविषयीं यत्किंचितहि महत्त्वाकांक्षा मनांत न वागवितां या पुरुषानें अकबराच्या राज्याच्या अंतर्व्यवस्थेकडे आपलें सगळें चित्त लाविलें, आणि त्यामुळें आपलें नांव चिरस्मरणीय करून ठेविलें." यानें जमिनीची मापणी करून तिचें वर्गीकरण केलें व जमीनमहसुलाची पद्धत घालून दिली. याचा शेवट मात्र विपरित असा झाला. काश्मीरवरील कामगिरीहून परत येत असतांना कोण्या वेड्या फकिरानें त्याच्या उरांत खंजीर खुपसला आणि त्यांतच त्याचा अंत झाला.

— १० नोव्हेंबर १५८९

## कार्तिक व. १०  ‘ वनस्पतींचे वाचस्पति ’ जगदीशचंद्र !

शके १७८० च्या कार्तिक व. १० रोजीं आंतरराष्ट्रीय कीर्तीचे भारतीय वनस्पतिशास्त्रज्ञ सर जगदीशचंद्र बोस यांचा जन्म झाला.

विक्रमपूर जिल्ह्यांतील राणीखल या गांवीं यांचा जन्म झाला आणि कलकत्त्याच्या सेंट झेवियर कॉलेजांत यांचे शिक्षण पूर्ण झालें. पुढें लंडन येथें ख्राइस्ट चर्च कॉलेजातून अभ्यास करून विज्ञान, रसायन व वनस्पतिशास्त्र या विषयांची पदवी मिळवून ते हिंदुस्थानांत आले, आणि कलकत्ता येथील प्रेसिडेन्सी कॉलेजमध्यें प्राध्यापकाचे काम पाहूं लागले. उत्तरायुष्यांत वनस्पतिशास्त्रज्ञ म्हणून यांचा लौकिक वाढला; तरी सुरुवातीस त्यांनीं इलेक्ट्रिसिटीतील संशोधन केलें. त्यानंतर ते वनस्पतिशास्त्राकडे वळले. रेडियोमधील ध्वनिवाहक भांड्यांना सुद्धां दीर्घकाल वापरल्यानंतर शीण येतो; व थोड्या विश्रांतीनंतर तो जातो हें ध्यानांत आल्याबरोबर यांनीं प्राणी व अचेतन यांच्या अभ्यासास सुरुवात केली. त्यांची वृत्ति पहिल्यापासूनच जडांतून चित् पाहाण्याची असल्यामुळें त्यांना वनस्पतीचे ‘ जीवन ’ लौकरच समजून आले. रुधिराभिसरण, स्नायु, मज्जातंतु इत्यादि क्रिया यांनीं शोधून काढल्या. इंग्लंडमधील रॉयल इन्स्टिटयूटपुढें दिलेल्या भाषणांत यांनीं सांगितलें, “ अणुरेणूपासून सूर्यमालेपर्यंत मला एकच तत्त्व भरलेलें दिसतें व तीं हजार वर्षांपूर्वीं गंगातटाकीं निवास करणाऱ्या माझ्या पूर्वजांनीं उपनिषदांतून दिलेल्या एकत्वाच्या संदेशाचीच अल्पस्वल्प प्रचीति मला येत आहे.”

बिनतारी संदेशाचा शोध मार्कोनीने लावला व त्यानेंच रेडियोचा चमत्कार जगास दाखविला असें मान्य असलें तरी त्याच्या आधीं हा शोध जगदीशचंद्रांनींच लाविला होता. तरी पण ‘ वनस्पतींचे वाचस्पति ’ म्हणून जगानें यांना मान्यता दिलीच. जगदीशचंद्रांना आपल्या भारतीयत्वाचा मोठा अभिमान होता. “ भारताच्या गौरवार्थ ” ही काव्यपंक्ति त्यांच्या संस्थेवर आहे व तिच्या शिरोभागीं दधीच्या ऋषींच्या हाडांचें वज्र कोरून त्याग करण्याचा संदेश भारताला जगदीशचंद्र देत आहेत. आपल्या अमरत्वाची खूणगांठ त्यांनीं या शब्दांत सांगितली आहे, “ Not in Possessions but in ideals are to be found the seeds of immortality.”

— ३० नोव्हेंबर १८५८

## कार्तिक व. ११ भाई परमानंद यांचें निधन!

शके १८६९ च्या कार्तिक व. ११ या दिवशीं पंजाबमधील सुप्रसिद्ध हिंदुसभेचे कार्यकर्ते व पुढारी भाई परमानंद हे निधन पावले.

पंजाब युनिव्हर्सिटींतून एम्. ए. चें शिक्षण घेऊन हे आर्य समाजांत सामील झाले व लाहोरच्या डी. ए. व्ही. कॉलेजांत प्राध्यापकांचें काम करण्यास यांनीं सुरुवात केली. दरम्यान उत्तर व दक्षिण आफ्रिकेंतील हिंदी लोकांच्या विनंतीस मान देऊन हंसराज यांनीं यांना वैदीक धर्म व संस्काराच्या प्रचाराकरितां आफ्रिकेंत जाण्याची आज्ञा दिली. अशा रीतीनें यांच्या सार्वजनिक आयुष्यास सुरुवात झाली. यांच्या ऐतिहासिक शीख घराण्याचें भाई हें गौरवदर्शक उपपद आहे. आफ्रिकेंत यांच्या घरीं एस्. अजितसिंग, सूफी अंबाप्रसाद यांच्यासारखे क्रांतिकारक लोक रहात असत. त्यांच्या कटाचा मागमूस पोलिसांना लागला असल्याचे कळतांच ते तेथून निसटले व हे मात्र पोलिसांच्या तावडींत सांपडले. अशा तऱ्हेनें पोलिसांच्या काळया यादींत यांचें नांव गोवले गेले.

तीन वर्षें हे दक्षिण अमेरिकेंत राहिले तेव्हां तेथील मॉर्तेनिक या फ्रेंच वसाहतींत लाला हरदयाळ यांच्याशीं यांची ओळख झाली व क्रांतिकारक म्हणून हिंदुस्थानांत पाठविण्यांत येणाऱ्या शीख व इतर लोकांत यांचा समावेश झाला. त्यामुळेच हिंदुस्थानांत गदर पार्टीच्या इतर सभासदांबरोबर यांना पण अटक झाली. राजाविरुद्ध बंड केल्याच्या आरोपावरून यांना फांशीची शिक्षा झाली होती. परंतु ती कमी करून जन्मठेपींत तिचें रूपांतर केलें व यांना अंदमानांत पाठवून दिले. अनेक वर्षे शिक्षा भोगून तेथील जीवन असह्य झाल्यामुळे त्यांनीं आमरण अन्नत्याग सुरू केला, पण सी. एफ्. ॲण्ड्रयूज यांच्या मध्यस्थीनें वीस दिवसांनंतर यांची मुक्तता झाली. पुढें पांच वर्षेंपर्यंत यांनीं कौमी विद्यापीठांत कुलगुरूचें काम केलें. परंतु राष्ट्रीयत्वाच्या नांवाखालीं चाललेली हिंदूंची गळचेपी यांना पाहवेना. म्हणून यांनीं तसा प्रचार सुरू केला. या 'धाडसी' प्रचारामुळें लोकांनीं यांना वेड ठरविलें, तरीसुद्धां पं. मालवीय, लाला लजपतराय, स्वामी श्रद्धानंद यांच्या सहकार्यानें हिंदुसभेचें कार्य जोरांत सुरू झालें. हे अ. भा. हिंदुमहासभेचे अध्यक्ष होते.

—८ डिसेंबर १९४७

## कार्तिक व. १२ कन्हय्यालाल दत्त फांशी !

शके १८३० च्या कार्तिक व. १२ रोजीं बंगालमधील सुप्रसिद्ध क्रांतिकारक कन्हय्यालाल दत्त फांशी गेले.

वंगभंगानंतर बंगाल्यांत एक प्रकारचें नवचैतन्य निर्माण झालें होतें. ' युगांतर ' पत्राच्या संपादकाला कारावास दिल्यानंतर ' वंदे-मातरम् ' पत्राच्या संपादकांची–बाबू अरविंद घोषांची तीच गत झाली. बंगालमध्ये क्रांतिकारकांचें जाळे विणले जात होतें. बॉबची गूढ विद्या बंगाली वीरांना अवगत झाली होती. मुझफरपूर बॉब प्रकरणांतील खुदीरामबोस ११।८।१९०८ रोजीं फांशी गेला. पुढें याच प्रकरणांतून अलीपूर बॉब खटला निर्माण झाला व त्यांत कन्हय्यालाल दत्त, विभूतिभूषण सरकार, अरविंद घोष, बारींद्र घोष, इंदुभूषण रॉय, नरेन्द्र गोस्वामी, सत्येन्द्रनाथ बोस, आदि शिक्षित आणि सुसंस्कृत तरुणवर्ग सांपडला. या तरुणांनी बादशहाविरुद्ध बंड पुकारले होते. खटला सुरू होण्यापूर्वी नरेन्द्र गोस्वामी हा महत्त्वाचा साक्षीदार फितुर झाला. त्याचें प्रायश्चित्त त्याला मिळालें. हॉस्पिटलच्या आवारांतच त्याच्यावर गोळ्या झाडून सत्येन्द्र बोस व कन्हय्यालाल दत्त यांनीं त्याला यमसदनास पाठविलें. या भयंकर प्रकारामुळें सर्व भरतखंड हादरून गेलें. ' विद्रोह्याचा अंत ' या शीर्षकाखालीं बंगाली वृत्तपत्रांतून अग्रलेख लिहिले गेले. अर्थात्च या दोन क्रांतिकारकांवर खटले भरण्यांत आले. सत्येंद्र व कन्हय्या यांना फांशीची शिक्षा ठोठावली गेली. कार्तिक व. १२ रोजीं कन्हय्या दत्त फांशीं गेले. या दोघांच्या नवलकथा आणि धैर्याच्या गोष्टी सर्व बंगालमध्यें प्रसिद्ध आहेत. कन्हय्या फांशीं जाण्याच्या आधीं चारच दिवस बी. ए. ची परीक्षा उच्च श्रेणींत उत्तीर्ण झाला होता. थोरल्या बंधूनें गंहिवरून ही बातमी सांगितल्यावर कन्हय्या हंसून बोलले, " माझ्याबरोबरच डिप्लोमाहि फांशी द्यावा." फांशीं गेल्यानंतर कन्हय्याच्या देहाची मोठी प्रेतयात्रा निघाली. हजारों गीता या वीर युवकांवर फेंकण्यांत आल्या. दहनानंतर त्याची चिमूट चिमूट राख शेकडों वंगयुवतींनीं पूजेसाठीं म्हणून चांदीच्या डबींत भरून ठेविली.

—२० नोव्हेंबर १९०८

## कार्तिक व. १३ "ज्ञानदेव बैसले समाधीं!"

शके १२१८ च्या कार्तिक व. १३ रोजीं महाराष्ट्रांतील सर्वश्रेष्ठ तत्त्वज्ञ, कवि आणि संतमुकुटमणि श्रीज्ञानेश्वर महाराज यांनीं मध्यान्हकाळीं समाधि घेतली.

शके १२१८ च्या कार्तिक शु. १० ला ज्ञानदेवांनीं पंढरपुरास पांडुरंगाला समाधि घेण्याचा आपला मनोदय कळवून परवानगी घेतली. आळंदीक्षेत्र समाधिस्थान म्हणून निश्चित झालें. समाधीचा दिवस उजाडला. ज्ञानदेवांनीं गुरुचरणांचें ध्यान करून लहानग्या सोपानास कुरवाळलें, ज्ञानदेव समाधिस्थानीं जाण्यास निघाले, त्या वेळीं—"देवऋषिगण सकळ। जयजकार ध्वनि मंजुळ। स्तुतिस्तोत्रें सकळ। नक्षत्रादि गाती" अशी परिस्थिति झाली. आणि नामदेव ?— "नामा असे शोकाकुलित। चरणीं रत विठ्ठलाच्या।" निवृत्तीनाथांची नित्य समाधिहि भंग पावली, त्यांनाहि अत्यंत दुःख होऊन त्या योग्याच्या तोंडून शब्द निघाले :

"मायबापे आम्हां त्यागियेले जेव्हां। ऐसें संकट तेव्हां झालें नाहीं" आईला मुकणारीं पाडसें जशीं सैरावैरा धांवतात तशीं सोपान देव व मुक्ताबाई ज्ञानदेवांवांचून अनाथ होऊन स्फुंदून स्फुंदून रडूं लागलीं. 'अलं ददादि' म्हणजे पुरे म्हणण्यापर्यंत सर्व मनोरथ पूर्ण करणाऱ्या अळंदी येथें सिद्धेश्वर देवालयाच्या शेजारीं असणाऱ्या अजान वृक्षाखालीं दोन खणांची गुहा,–समाधिस्थान–तयार केलें होते. नामदेवांनीं तें स्वच्छ केले. तुळशी, बेल अंथरून ज्ञानदेवांचें आसन तयार करण्यांत आलें. श्रीविठ्ठलांनीं ज्ञानेश्वरांच्या कपाळीं केशरी गंध लावून गळ्यांत हार घातला. समाधिस्थानांत शिरण्यावेळीं श्रीविठ्ठलांनीं त्यांना हात दिला आणि 'फार केले कष्ट जगासाठीं' म्हणून त्यांना प्रेमानें आंत नेलें. ज्ञानदेव आसनावर स्थिर झाले आणि आपलीं करकमले जोडून त्यांनीं नेत्र मिटले. संतांनीं 'घातियेली शिळा समाधीसीं.' नंतर पुष्पवृष्टि करून सर्व संतांनीं त्या जागीं कीर्तनमहोत्सव साजरा केला. ज्ञानदेव हे मराठी भाषेंतील सर्वश्रेष्ठ तत्त्वज्ञ व कवि आहेत. त्यांची 'ज्ञानेश्वरी' वारकरी पंथाची 'आई' आहे. त्यांच्या अमृतानुभवाची गोडी चाखून आजहि लोक तृप्त होत आहेत.

— २६ ऑक्टोबर १२९६

## कार्तिक व. १४ बादशहा अकबर याचें निधन !

शके १५२७ च्या कार्तिक व. १४ रोजीं दिल्लीच्या मोंगल घराण्यांतील प्रसिद्ध सम्राट बादशहा अकबर याचे निधन झालें.

याचा बाप हुमायून वनवासांत असतांनाच उमरकोट येथे सन १५४२ च्या ऑक्टोबर १५ रोजीं अकबराचा जन्म झाला. लहानपणीं याला बऱ्याच संकटांतून मार्ग काढावा लागला. बुद्धि चलाख असल्यामुळे याने स्वानुभवानें बरेंच शिक्षण घेतले. हुमायूननंतर अकबर वयाच्या तेरा-चौदाव्या वर्षीच राज्यकारभार पाहूं लागला. आणि आपल्या प्रभावी सामर्थ्याने अकबरानें राज्याचा विस्तार केला. पंजाबांत सिंकदरशहा सूर, पूर्वेकडे महंमदशहा व हिमू, मध्यहिंदुस्थानांत व राजपुतान्यांत हिंदु हे सर्व अकबराचे शत्रु असतांना सुद्धां मोठ्या धीमेपणानें त्यांना तोंड देऊन बादशहाने आपलें साम्राज्य वाढविले. पंजाब, ग्वाल्हेर, अजमीर, लखनौ, माळवा, चितोड, रणथंभोर, आदि सर्व ठिकाणीं त्याचा अमल चालू झाला. आग्र्याचा किल्ला यानेच पस्तीस लाख रुपये खर्च करून बाधला. व सन १५६९ मध्यें फत्तेपूर-शिक्री हें शहर यानेच वसविलें. अकबराचीं शेवटचीं वर्षे मात्र अत्यंत त्रासांत गेलीं. जिवाची नातलग मंडळी व मित्रांपैकीं बरेच लोक मरण पावले, त्यामुळे याला फार दुःख झाले. मुलांच्यापासून कधींच सुख मिळालें नाहीं. उतारवयांत अकबर अगदीं भ्रमिष्ट बनला व आजारी पडून कार्तिक व. १४ रोजीं मरण पावला.

अकबराची राहणी अगदीं साधी असून तो फार नियमितपणाने वागे. गंगेच्या उगमाचा शोध यानेंच केला. अकबरास चित्रकलेची आवड फार होती. याचा मोठा गुण म्हणजे प्रजावात्सल्य हा होय. मृदुपणा व कठोरता यांचें विलक्षण मिश्रण अकबरांत झालें होतें. सर्व धर्मातील चांगल्या गोष्टी निवडून यानें 'दिने इलाही' नांवाचा नवीन धर्म स्थापन केला. याच्या दरबारांत अनेक सद्गुणी माणसांचा संग्रह झाला होता. अकबर बादशहा सूर्याचा उपासक होता. बिरबलापासून तो सूर्यपूजा शिकला होता. हिंदूंना खुष करण्यासाठीं यानें अनेक चांगलीं कृत्ये केलीं.

— १५ ऑक्टोबर १६०५

## कार्तिक व. ३० " बळवंतरावांस छातींत गोळी लागली !"

शके १६८२ च्या कार्तिक व. ३० रोजीं पानिपत येथें अहंमदशहा अब्दाली आणि मराठे यांचा मोठा संग्राम होऊन मराठ्यांचा विजय झाला. परंतु त्याच दिवशीं प्रसिद्ध योद्धा बळवंतराव मेहेंदळे हा गोळी लागून पडला.

यापूर्वी कार्तिक शु. १५ ला जनकोजी शिंदे यानें अब्दालीचा चांगलाच मोड केला होता. तो डाव मनात ठेवून कार्तिक व. ३० ला कांहीं निवडक अफगाण व रोहिले यांच्या फौजा, अमावास्येच्या अंधाऱ्या रात्रीं संधि साधावी असा बेत करून मराठ्यांवर चालून आल्या. वीस हजार स्वार घेऊन बळवंतराव मेहेंदळे गनिमांवर चालून गेला. सायंकाळीं चार वाजतां लढाईस तोंड लागलें. तास–दोन तास गोळागोळी होऊन तोफांचा मारा सुरू झाला. 'हर हर महादेव' अशी गर्जना करून स्वतः मेहेंदळे सर्वांच्या पुढे आले. या हातघाईत– "बळवंतरावांस छातींत गोळी लागली. तसेंच घोड्याखालीं पडले. तों त्याजकडील (शत्रूकडील) माणसे धावलीं. त्यांतील एकानें तोंडावर तरवारीचा वार केला. दुसऱ्याने गळा कापून शिर नेऊं लागले. तो पांचसात राऊत धाऊन आले. खंडेराव नाईक निंबाळकरानें शवावर पडून तरवारीचे घाव सोसले, पण शव गिलच्यांच्या हातीं लागूं दिले नाहीं. गळा अर्धा कापला होता. तसेंच आणून दहन केलें. समागमें स्त्री अग्निप्रवेश गेली.––" या साऱ्या प्रसंगाचे हृदयद्रावक चित्र रा. चिंतामणराव वैद्यांनीं आपल्या 'दुर्दैवी रंगू'– मध्ये सरसपणे रेखाटले आहे.

हा प्रकार झाल्यानंतर शिंदे-होळकर यांच्या फौजा शत्रूवर तुटून पडल्या आणि त्यांनीं पुन्हा एकदां अब्दालीचा पराभव केला. बळवंतराव मेहेंदळे हे उत्कृष्ट सेनानी होते. यापूर्वीहि यांनीं कांहीं पराक्रम केले होते. नानासाहेबांच्या विरुद्ध ताराबाई व दमाजी गायकवाड असतांना ज्या मंडळींनीं गेंड्याच्या माळावर गायकवाडांचा पराभव केला त्यांत मेहेंदळे होते. यांनींच कर्नाटकांत स्वारी करून होसकोटें, मुळबागल व कडपनाथ हीं ठिकाणें काबीज केलीं होतीं.

— ७ डिसेंबर १७६०




भगवान् श्राकृष्ण. हनुमंत. वीरवर अर्जुन. भीष्माचार्य.
श्रीद्रोणाचार्य. श्रद्धानंद. महारथी कर्ण. राजवाडे.

## मार्गशीर्ष शु. १ भाई मतिदासांचा अमानुष वध!

शके १५९७ च्या मार्गशीर्ष शु. १ रोजीं तेगबहादुरांचे अनुयायी भाई मतिदास यांचा करवतीने कापून वध करण्यांत आला.

या वेळीं दिल्लीस मोंगलांचा शेवटचा पराक्रमी आणि जुलमी बादशहा औरंगजेब राज्य करीत होता. हा बादशहा मोठा धर्मांध आणि क्रूर म्हणून प्रसिद्ध आहे. विश्वासघात, कपटविद्या, हृदयहीनता, इत्यादि दुर्गुणांचा सांठाच त्याच्याजवळ होता. याच्या राक्षसी धर्मप्रेमांत अनेक अपराधी, निरपराधी लोकांची आहुति पडत असे. शेकडो माणसे हालअपेष्टा भोगीत दिवस कंठीत असत. शीखांचे गुरु तेगबहादूर यांनीं मुसलमानी धर्मास मान्यता दिली नाहीं, म्हणून त्यांना कैदेंत पडावे लागले. अनेक अनुयायी त्यांचाच मार्ग चालत होते. गुरु तेगबहादुरांच्या अनेक शिष्यांना प्राणदंडहि सोसावा लागत होता. मार्गशीर्ष शु. १ रोजी घडलेली घटना अत्यंत हृदयद्रावक अशीच आहे. धर्मासाठीं प्राण देणाऱ्या हुतात्म्यांच्या इतिहासांत हा प्रसंग आपल्या तेजानें सदैव तळपत राहील असाच आहे. तेगबहादुराबरोबर 'मतिदास' नांवाचे त्यांचे शिष्य दिल्लीस कैदेंतच होते. त्यांच्या वधाचें फर्मान बादशहाकडून निघालें! "ऐन मध्यान्हींच्या सुमारास करवतीनें इंच इंच याप्रमाणें डोक्यापासून त्यांना चरचरां कापण्यांत आलें. असे कापलें जात असतां प्रतिक्षणीं त्यांना 'अजून तरी मुसलमान होतोस काय?' असें विचारण्यांत येत असे. व प्रत्येक वेळीं ते धीरोदात्तपणें 'नाहीं' असें उत्तर देत असत. नुसतें वर्णन वाचूनहि अंगावर शहारे येण्यासारख्या या अनन्वित वेदनांत मतिदासजींनीं नुसता सुस्कारा देखील सोडला नाहीं. अखेरीस तिळातिळायेवढया कापलेल्या मतिदासजींच्या रक्ताचा सडा दिल्लीच्या चांदणी चौकांत पडला. पण त्यांचा आत्मा मात्र हिंदु म्हणूनच परलोकास गेला. —"

शीखांचा सर्वच इतिहास अशा स्फूर्तिदायक आणि उदात्त घटनांनीं भरलेला आहे. मतिदासांच्या वधानंतर तीनचार दिवसांतच गुरु तेगबहादुर यांचा वध झाला. मतिदासजींप्रमाणेंच तेगबहादुरांनींहि अलौकिक धैर्य दाखविलें.

— ८ नोव्हेंबर १६७५

## मार्गशीर्ष शु. २ "रायगड मोंगलांस दिधला!"

शके १६११ च्या मार्गशीर्ष शु. २ या दिवशीं मराठ्यांची राजधानी रायगड मोंगलांच्या हातीं जाऊन येसूबाई व शिवाजी यांना कैद झाली.

संभाजीची भीषण हत्या झाल्यानंतर मराठ्यांचा नायनाट करण्यासाठीं बादशहा सिद्ध झाला. रायगडावर स्वारी करून राजारामासहि पकडून आणण्याच्या कामगिरीवर बादशहानें वजीर आसदखान याचा पुत्र इतिकदखान यास पाठविलें. त्याप्रमाणे खानानें रायगडास वेढा घातल्यावर मोठाच कठीण प्रसंग निर्माण झाला. शिल्लक राहिलेले मुत्सद्दी आणि सरदार जमा होऊन विचार करूं लागले. "खजिन्यांत शिल्लक नाहीं, पागा व फौज सर्व मोडलें, किल्ले बेसरंजाम झाले, पूर्वींचीं अनुभवी माणसें मरून गेलीं आणि मोंगलांच्या निरनिराळ्या फौजा मराठ्यांच्या प्रांतास उपद्रव देऊं लागल्या." अशा कठीण अवस्थेंत सर्वत्र निराशाच होती. या प्रसंगीं येसूबाईनें सल्ला दिला कीं, राजारामानें बाहेर पडून आपला बचाव करावा. ही योजना सर्वांना पसंत पडली. सर्वांची एकवाक्यता व शपथविधि झाल्यानंतर राजाराम रायगडावरून बाहेर पडला. तरी रायगड हस्तगत करण्याचा प्रयत्न बादशहाने मोठ्या जोमानें सुरू केला. संताजी घोरपडे आणि धनाजी जाधव ही जोडी आपल्या अतुल पराक्रमाने मोंगलांस त्रास देत होतीच. संभाजीच्या भीषण वधामुळे मराठ्यांच्यांत सूडाची विलक्षण भावना उसळून आली होती. शौर्य आणि पराक्रम यांच्या साह्यावर मराठे सहज विजयी झाले असते. परंतु फितुरी हा एक दुर्गुण मराठ्यांना पदोपदीं नडला आहे. रायगडास वेढा घालून सात-आठ महिने झाले तरी इतिकदखानाचें एक पाऊलहि पुढे पडले नव्हते. परंतु वाईच्या सुभेदारीच्या लालसेने सूर्याजी पिसाळ मोंगलांना फितुर झाला. त्यायोगे मार्गशीर्ष शु. २ ला मोंगलांचा रायगडावर सुलभ रीतीनें प्रवेश झाला. राजपत्नी येसूबाई मुलासह मोंगलांच्या स्वाधीन झाली! शिवरायांच्या मृत्यूनंतर दहाच वर्षांच्या आंत त्यांच्या सुनेवर व नातवावर हा कठीण प्रसंग आला. खानानें सर्व रायगड लुटला. शिवरायांचें सिंहासन फोडिलें.

— ३ नोव्हेंबर १६८९

## मार्गशीर्ष शु. ३ बाबराची भारतावर स्वारी !

शके १४४७ च्या मार्गशीर्ष शु. ३ या दिवशीं हिंदुस्थानांत मोंगली सत्ता स्थापन करणारा दिल्लीचा पहिला बादशहा जहीरुद्दीन महंमद बाबर हा हिंदुस्थानवर स्वारी करण्यास निघाला.

बाबर हा बापाकडून तैमूरलंगाचा व आईकडून चेंगीजखानाचा मोंगल वंशज होता. तैमूरच्या काबूल राजधानींत यास राज्याभिषेक झाल्यावर यानें आपल्या राज्यविस्तारास प्रारंभ केला. सन १५१९ मध्यें यानें हिंदुस्थानावर पहिली स्वारी केली. त्या वेळीं दिल्लीस इब्राहीमखान लोदी राज्य करीत होता. त्यास बाबरानें निरोप पाठविला: "पंजाब प्रांत तैमूरच्या वंशजाकडे चालत आला आहे, तो आपण परत द्यावा, नाही तर लढाईस सिद्ध व्हावे" पुढें पांच-चार वर्षातच पंजाबचा सुभेदार दौलतखान लोदी यानें दिल्लीच्या सुलतानाविरुद्ध बाबराची मदत मागितली. बाबर संधीची वाटच पहात होता. ताबडतोब हिंदुस्थानांत येऊन त्यानें पंजाब प्रांत आपल्या ताब्यांत घेतला. या वेळीं त्याच्या विशेष ध्यानांत आलें कीं, हिंदुस्थानांत फारच अव्यवस्था माजून राहिली आहे. राज्यलोभाची हाव सुटून त्यानें हिंदुस्थान जिंकण्याचा बेत केला. इब्राहीमखान लोदी कमकुवत होता. त्याच्यांत लढण्याचे सामर्थ्य नव्हतें. बाबराच्या मनांतील हा भाव पाहून दौलतखान लोदी त्याला सोडून गेला. तरी इब्राहीमचा भाऊ अल्लाउद्दीन लोदी बाबराकडे मदतीसाठीं गेलाच होता. या संधीचा फायदा घेऊन त्यानें आपलें सैन्य त्याच्या मदतीस हिंदुस्थानांत पाठविलें. पण त्याचा पराभव झाला. अल्लाउद्दीन पंजाबांत पळून गेला. हें बाबरास समजतांच त्यानें विशेष तयारी केली व हिंदुस्थानवर स्वारी करण्यासाठीं मार्गशीर्ष शु. ३ रोजीं तो निघाला. बाबर येत आहे असें समजतांच दौलतखान व त्याचा मुलगा गाजीखान हे दोघेहि पळून गेले. त्यानंतर बाबराने दिल्लीवर चाल केली. इब्राहीमची व त्याची गांठ पानिपतच्या रणांगणावर पडून मोठें युद्ध झालें. त्यांत लोदीचा संपूर्ण पराभव होऊन तो स्वतःच कामास आला आणि बाबरानें मोंगली, सत्तेचा पाया हिंदुस्थानांत स्थिर केला.

— १७ नोव्हेंबर १५२५

## मार्गशीर्ष शु. ४ शिवरायांकडे सातारचा किल्ला !

शके १५९७ च्या मार्गशीर्ष शु. ४ या दिवशीं विजापूरकरांच्या ताब्यांत असलेला सातारचा किल्ला श्रीशिवाजी राजे यांनीं हस्तगत केला.

हा किल्ला हातीं आल्यानंतर शिवाजी राजांनीं तेथेच वास्तव्य केलें. तेथे दोन-तीन महिने ते आजारी होते. त्यांच्या चित्तास उद्विग्नता प्राप्त झाली होती. ही उद्विग्नता श्रीसमर्थांनीं दूर केली. शिवाजी राजे यांनीं आपल्या राज्याची भिक्षा समर्थांच्या पायांवर घातली आणि सातारच्या किल्ल्यावरून परळीला असणाऱ्या समर्थांशीं त्यांनीं संभाषण केलें, वगैरे गोष्टी त्यांच्या याच आजाराच्या आगेमागें घडल्या. शिवाजीमहाराज समर्थांचे शिष्य होते. त्यांची व रामदासांची पहिली भेट केव्हां झाली, शिवाजींला अनुग्रह केव्हां मिळाला, हे प्रश्न अजून वादग्रस्त आहेत.

शिवाजी व रामदास यांचा संबंध ध्यानांत ठेवूनहि असे म्हणावेंसे वाटते कीं, सतराव्या शतकामध्ये महाराष्ट्रभूमींत शिवाजी व रामदास हीं दोन अगदीं स्वतंत्र स्फूर्तिस्थानें निर्माण झालीं होतीं. वयाच्या सतराव्या वर्षी शिवरायांनीं स्वराज्यमंदिराची मुहूर्तमेढ रोवली ती केवळ स्वयंप्रेरणेनेंच. शिवरायांनीं राज्यविस्ताराचे कार्य आणि समर्थांचे धर्मप्रसाराचें कार्य या दोनही गोष्टी एकसमयावच्छेदेकरून एकाच प्रांतांत सुरू झाल्या असल्या तरी आरंभीं एकमेकांना परस्परांची जाणीव नसावी. ‘आपुले देशीं वास्तव्य केलें। परंतु वर्तमान नाहीं घेतले’ असे एका पत्रांत समर्थ शिवरायांना म्हणतात. शिवरायांचा उद्योग, समर्थांचा नंतरचा आशीर्वाद, राज्यसमर्पण आदि गोष्टींचा उल्लेख खालील सनदेंत सांपडतो. शिवाजीराजे समर्थांना लिहितात.—

“आज्ञा केली कीं, तुमचा मुख्य धर्म राज्यसाधन करून धर्मस्थापना, देवब्राह्मणांची सेवा, प्रजेची पीडा दूर करून पाळण, रक्षण करावें हें व्रत संपादून त्यांत परमार्थ करावा, या उपरीं राज्य संपादिलें तें चरणीं अर्पण करून सर्व काळ सेवा घडावी ऐसा विचार मनीं आणिला तेव्हां आज्ञा जाहली कीं, तुम्हांस पूर्वी धर्म सांगितलें तेंच करावें. तीच सेवा होय.”

— ११ नोव्हेंबर १६७५

## मार्गशीर्ष शु. ५ "मान दिली....पण इमान दिलें नाहीं !"

शके १५९७ च्या मार्गशीर्ष शु. ५ रोजीं शीखांचे नववे गुरु तेगबहादुर यांना मुसलमानांनीं अत्यंत हाल करून ठार मारिलें.

तेगबहादुर हे गुरु हरगोविंद यांचे चिरंजीव. पंजाब प्रांत सोडून हे पुष्कळ वर्षें भ्रमण करीत होते. शेवटीं यांनीं 'बकाला' या गांवीं आपलें वास्तव्य केलें. तेग म्हणजे तरवार. या तरवारबहादुरांस शीखांनीं आपले गुरु म्हणून निवडले. हे मोठे शूर आणि त्यागी वृत्तीचे होते. हरगोविंद यांनीं आपल्या शिष्यांना शस्त्रे पुरवून लढवय्ये बनविलें होतें. तेगबदुरानें त्या सर्वांची संघटना करून त्यांच्यांत खालसा (पवित्र) धर्माबद्दलची श्रद्धा निर्माण केली. याच वेळीं औरंगजेब बादशहाचें धर्मवेड पराकोटीला जाऊन पोंचलें होतें. सर्व उत्तर हिंदुस्थान त्रस्त होऊन तेगबहादुराच्या आश्रयास आला होता. त्या सर्वांना एकत्र करून तेगबहादुरानें त्यांना धर्मयुद्धास प्रवृत्त केले. हांसीव सतलाज यांतील प्रदेशांत हे सशस्त्र फौज घेऊन हिंडत असत. औरंगजेबाच्या कानीं ही वार्ता गेल्याबरोबर त्यानें तेगबहादुरास पकडून आणण्याविषयीं हुकूम सोडला. त्याप्रमाणें तेगबहादुरांस अटक करण्यांत आली. याचें धर्मप्रेम आणि यांची लोकप्रियता पाहून औरंगजेब बादशहास अत्यंत क्रोध येऊं लागला. तेगबहादुरांचे पांच शिष्य मुसलमानी धर्म स्वीकारण्यास तयार होत नव्हते, म्हणून त्याचा क्रूरपणें वध करण्यांत आला. आपलीहि हीच गत होणार असे समजून तेगबहादुर शांतपणें ईश्वरचिंतन करूं लागले. थोड्याच दिवसांत औरंगजेबाचें आणि या स्वाभिमानी गुरूचें बिनसलें. दिल्लीच्या चांदणी चौकांत तेगबहादुर यांना उभे करण्यांत आले; आणि नंतर मारेकऱ्यांकडून त्यांचा शिरच्छेद झाला. मृत्यूच्या वेळीं तेगबहादुरांच्या मानेभोवतीं एका कागदाची चिठ्ठी गुंडाळलेली होती. शिरच्छेद झाल्यानंतर सरकारी लोकांनीं ती उलगडून पाहिली तों त्यांत लिहिलें होतें, "मान दिली, पण इमान दिले नाहीं !" आपल्या गुरूचा असा भीषण वध झालेला पाहून सर्व शिष्यांचीं अंतःकरणें हळहळलीं. तेगबहादुरांचें शिर शिष्यांच्या ताब्यांत आल्यावर तें आनंदपूर येथें नेऊन त्यांनीं त्याला अग्निसंस्कार दिला. धडाचा दहनविधि दिल्लीसच झाला.

— ११ नोव्हेंबर १६७५

## मार्गशीर्ष शु. ६ शूरांचें दैवत स्कंद ऊर्फ खंडोबा !

मार्गशीर्ष शु. ६ हा दिवस चंपाषष्ठी म्हणून देवीप्रीत्यर्थ किंवा खंडोबाच्या स्मृतीसाठीं पाळण्यांत येतो.

या दिवशीं सर्व शिवालयांतून देवीचा उत्सव सुरू असतो. जेजुरी, पाली, मंगसुळी, आदि खंडोबाच्या ठिकाणीं या दिवशीं प्रेक्षणीय उत्सव होत असतो. शंकरानें खंडोबाचा अवतार घेतला आणि मणिमल्ल नावाच्या दैत्याला ठार केलें अशी कथा आहे. या खंडोबाची पत्नी म्हाळसा नांवानें प्रसिद्ध आहे. त्यामुळें खंडोबाला मल्हारी म्हाळसाकांत असेंहि म्हटलें जाते. महाराष्ट्रांतील कित्येक घराण्यांचें खंडोबा हे कुलदैवत आहे. क्षत्रिय बाण्याचा देव म्हणून मराठ्यांना हा विशेष प्रिय वाटतो. जयाद्रि महात्म्यांत या खंडोबाचें महत्त्व वर्णन केलें आहे. रामोशी, धनगर हेहि खंडोबाची उपासना करतात. देव बनण्यापूर्वी खंडोबा लिंगायत वाणी होता असे रामोशी समजतात. वनस्पति-वर्गांत भंडारांत खंडोबाचे अस्तित्व मानून त्यास पावित्र्य देण्यांत आलें आहे. प्राणिवर्गात कुत्र्याच्या रूपांत खंडोबा वास करतो अशी समजूत आहे.

"स्कंद या संस्कृत शब्दाचें रूप खंड. त्याचे ममतादर्शक रूप खंडू व प्राशस्त्यदर्शक मराठी रूप खंडोबा. म्हणजे महाराष्ट्रांतील जेजुरी, पाली, वगैरे ठिकाणचे खंडोबा मूळचे स्कंद होत. स्कंद म्हणजे कार्तिकस्वामी. याचे देऊळ पर्वतीवर आहे. ते स्कंदाचें म्हणजे खंडोबाचेंच. स्कंद ही देवता शूरांची व योद्धयांची म्हणून फार पूर्वीपासून प्रसिद्ध आहे. सेनानी असें दुसरें नांव स्कंदाला आहे. शूर वीर लोक यांची उपासना करतात." अशी माहिती ज्ञानकोशांत मिळते. कित्येक घराण्यांतून मार्गशीर्ष शु. १ पासूनच या दैवताचा उत्सव सुरू असतो. कित्येक ठिकाणीं या उत्सवांत बगाड काढण्याची प्रथा आहे. "बगाड म्हणजे दगडी चाकाच्या मोठ्या गाड्यावर एक मोठा खांब बांधून त्याला एक मोठा आडवा खिळा ठोकावयाचा व ज्याचा नवस असेल त्यानें आपल्या पाठीस तो खिळा टोंचवून घ्यावयाचा व तशाच लोंबकळलेल्या अवस्थेंत शेंकडों माणसांनीं एकमेकांवर बेलभंडारा उधळून तो गाडा पळवावयाचा."

● ● ●

## मार्गशीर्ष शु. ७ अफझलखानाचा वध!

शके १५८१ च्या मार्गशीर्ष शु. ७ रोजीं शिवाजीमहाराज यांनीं विजापूर दरबाराहून पकडावयास आलेल्या अफझलखानाचा वध केला.

शिवाजीचा वाढता प्रताप पाहून विजापूर दरबाराच्या मनांत स्वतःच्या अस्तित्वाबद्दल भीति निर्माण झाली. शिवाजीचे पारिपत्य कपटानें करण्याचें त्यानें ठरविले. अफझलखान यानें प्रतिज्ञा केली कीं, 'या डोंगरांतील उंदरास जिवंत अगर मेलेला पकडून मी येथे आणून रुजू करतो.' त्याने बरोबर मोठी फौज घेऊन पुण्याकडे प्रयाण केले. पंढरपूर, माणकेश्वर, करकंब, भोसे, शंभुमहादेव, या गांवांवरून त्याची स्वारी येत असतां त्यानें अनेक हिंदु देवस्थाने उध्वस्त केलीं. पंढरपूरच्या विठोबाची दुर्दशा केली. 'श्रीभवानी कुलदेवता महाराजांची, तीस फोडून जातियांत घालून भरडून पीठ केलें.' या उच्छेदामुळे लोकांचीं मनें प्रक्षुब्ध झालीं. प्रतापगडीं शिवरायांची तयारी होतीच. श्रीदेवीनें महाराजांना आशीर्वाद दिला– 'अरे मुला चिंता कां करितोस? तुजला वर माझा आहे.'

प्रतापगड किल्ल्याच्या पायथ्याशीं भेटीसाठीं मंडप तयार होऊं लागला. मार्गशीर्ष शु. ७ हा भेटीचा दिवस ठरला. शिवाजीराजे यांनीं अंगांत चिलखत घातलें. डोकीस शिरस्त्राण चढविलें. उजव्या हातांत भवानी तलवार, बाहींत बिचवा, डाव्या हातांत वाघनखे, अशी सिद्धता करून घेतली. देवीचा आणि मातोश्रींचा आशीर्वाद घेऊन महाराज निघाले. भेटीचे वेळीं प्रथम आलिंगन देतांना खानानें शिवाजीस आपल्या डाव्या बगलेत आवळून धरले व पोटांत जमदाड चालविली. खानापुढें 'महाराज केवळ द्वितीयेच्या चंद्रासारखे होते.' वेळ कठिण आहे हें पाहून शिवाजीनें डाव्या हाताचीं वाघनखें खानाच्या पोटांत खुपसलीं. त्याबरोबर 'दगा रे दगा' असें ओरडून खानाने शिवाजीच्या डोक्यावर वार केला. शिरस्त्राण असल्यामुळें फारशी इजा झाली नाहीं. शिवाजीनें आपल्या तरवारीचा वार खानाच्या खांद्यावर करून त्यास पोटापर्यंत चिरलें. त्याबरोबर खान गतप्राण होऊन जमिनीवर पडला.

—१० नोव्हेंबर १६५९

## मार्गशीर्ष शु. ८ — सती जाण्यास मनाई !

शके १७५१ च्या मार्गशीर्ष शु. ८ रोजीं गव्हर्नर जनरल बेंटिंग याने सती जाणें बेकायदेशीर आहे असा कायदा जाहीर केला.

भारतीय संस्कृतीमध्यें स्त्रीधर्म अति उज्ज्वल स्वरूपाचा आहे. परंतु कित्येक चांगल्याबरोबर वाइटाचीहि निपज होते. सती जाण्याचे मूळचें प्रयोजन उच्च भावनेचें होतें. तरी अवनतीच्या उत्तर काळांत हा प्रकार क्रूर व निंद्य बनला. "फक्त विवाहित स्त्रियाच सती जात असें नव्हे तर दासी व रक्षा या देखील आपल्या यजमानाबरोबर स्वतःस जाळून घेत. स. १७२९ मध्यें कान्होजी आंग्रे मेला तेव्हां सात स्त्रिया व स. १७५५ मध्यें रघूजी भोसले मेला तेव्हां तेरा स्त्रिया जळून मेल्या. मारवाडचा अजितसिंह मृत्यु पावला तेव्हां चौसष्ट स्त्रियांचे बलिदान झाल्याचें नमूद आहे."

पंजाबांतील शीख लोकांत हा प्रकार जारी होता. 'धर्मकृत्यांत' हात घालण्याची इच्छा सरकारची नव्हती. लॉर्ड हेस्टिंग्जनें सती जाण्यास परवाना पाहिजे अशी अट घातल्यामुळे या निंद्य कृत्यास सरकार सहमत आहेसें सिद्ध होऊन लाचलुचपतीस ऊत आला. सतीची संख्याहि वाढत चालली. एकट्या बंगाल प्रांतांत १८१५ सालीं ३७८, व १८१८ सालीं ८३९ स्त्रिया सती गेल्या. भारतीय धर्माबद्दलचें कौतुक नष्ट होऊन त्याचें निकृष्ट स्वरूप विरोधकांपुढें प्रामुख्यानें येऊं लागले. बेंटिंग अधिकारावर येतांच त्यानें या बाबतींत लक्ष घालून मतें मागविलीं. विल्यम केरी व राममोहन रॉय इत्यादींचीं अनुकूल मते पाहून बेंटिंगनें मार्गशीर्ष शु. ८ ला सती जाणें बेकायदेशीर आहे असा कायदा करून टाकला.

पति हेंच दैवत मानून त्याच्यानंतर सर्वस्वाचा होम करणें हा भारतीय स्त्रियांचा विशेष होता. रजपुत पतिव्रतांनीं केलेले जोहार प्रसिद्धच आहेत. पतीच्या शवाबरोबर आनंदाने स्वतःला जाळून घेणें यास लागणारें मनोधैर्य अलौकिक खरेंच, यांत दिसून येणारी निष्ठा दिव्य खरीच, परंतु कालांतरानें याहि प्रकारांत सक्तीचा अमल होऊन यांतील पावित्र्य नष्ट झाल्यासारखें झालें होतें.

—४ डिसेंबर १८२९

## मार्गशीर्ष शु. ९ हिंदु राजा जयपाल याचा पराभव!

शके ९२३ च्या मार्गशीर्ष शु. ९ रोजीं पंजाबचा प्रसिद्ध राजा जयपाल आणि गझनीचा सुलतान महंमुद यांचें मोठें युद्ध होऊन जयपालाचा पराभव झाला.

आठव्या शतकापासूनच मुसलमानांचे पाय भारतांत दृढ होऊं लागले होते. त्यांची राज्यतृष्णा व क्रूरतेचीं कृत्यें यांमुळें सारा भारतवर्ष त्या वेळीं हादरून गेला होता. जयपाल हा जातीनें ब्राह्मण असून तो काबूलच्या शाही घराण्यांतील भीमदेवाचा मुलगा होता. शके ९०२ मध्यें याची आणि सबक्तगिनाची लढाई होऊन याचा मोठा विजय झाला होता. यानंतर सबक्तगिनाचा दासीपुत्र सुलतान महंमद याचें लक्ष वैभवसंपन्न अशा भारताकडे गेलें. महंमद गझनीनें पंचवीस वर्षांच्या काळांत हिंदुस्थानावर एकूण सतरा स्वाऱ्या करून अगणित लूट त्यानें बरोबर नेली.। लोकांची कत्तल करणे, जाळपोळ करणे, देवळे पाडून मशिदी उभारणें या प्रकारांना तर सीमा नव्हती. महंमदाची पहिली स्वारी शके ९२३ मध्यें झाली. नोव्हेंबर महिन्यांत मोठी फौज घेऊन महमद पेशावरच्या रणभूमीवर येऊन दाखल झाला. लाहोरचा राजा जयपाल आपलें सैन्य घेऊन त्याजवर चालून गेला. हिंदूंची फौज मोठी होती; पण तींत शिस्त नव्हती. मार्गशीर्ष शु. ९ रोजीं दोनहि सैन्यांत निकराची लढाई होऊन जयपाल व त्याचे दोन मुलगे महंमुदाच्या हातांत सांपडले. जयपालाची सर्व संपत्तिहि महंमुदासच मिळाली. आपलीं दोन मुले महंमुदाकडे ओलीस ठेवून व दरसाल खंडणी पाठविण्याचे कबूल करून जयपालाने आपली सुटका करवून घेतली. तरी झालेल्या पराभवाबद्दल त्यास फारच वाईट वाटलें. शेवटीं त्यानें अग्निकाष्ठ भक्षण करून प्राणत्याग केला. आक्रमक अशा इस्लामी संकटास तोंड देण्याचें सामर्थ्य दुर्दैवानें त्या वेळीं भारतांत नव्हतें. "हिंदु राज्यांचा वृद्धापकाळ झाला होता. शौर्याचे दिवस निघून गेले होते. कोण आला व कोण गेला याची त्यास चाड राहिलेली नव्हती. अंगांतील सत्त्व निघून गेल्यामुळें जुलुमास्तव हातपाय हालवावे अशांतली त्यांची स्थिति झालेली होती" अशा अवस्थेंत हिंदूंच्या वांट्यास पराभवाखेरीज काय येणार?

— २७ नोव्हेंबर १००१

## मार्गशीर्ष शु. १० हनुमंताचें समुद्रोल्लंघन !

मार्गशीर्ष शु. १० रोजीं शक्ति आणि बुद्धि यांचें मूर्तिमंत प्रतीक असणाऱ्या सेवक हनुमानाने श्रीरामचंद्राची पत्नी सीतादेवी हिचा शोध करण्यासाठीं समुद्रोल्लंघन केले !

जटायूंचा बंधु संपति याच्याकडून माहिती कळली कीं, दक्षिण समुद्रापलीकडे असणाऱ्या रावणाच्या लंका बेटांत सीता बंदिखान्यांत आहे. लागलीच अंगद, गज, गवाक्ष, गवय, शरभ, गंधमादन, मैन्द, द्विविद, सुषेण, जांबवान् इ. वानर सरदार समुद्रकिनाऱ्यावर जमले. पण समुद्राचें तें आवाढव्य व अपार स्वरूप पाहून सर्वांचा धीर खचला. सर्वांनीं आपआपली शक्ति सांगितली, पण ती अगदींच अपुरी आढळून आली. तेव्हां जांबवान् बोलला— " हनुमानाची शक्ति विलक्षण आहे. वीराग्रणीच आम्हांस या संकटांतून पार पाडील. याचें सामर्थ्य समुद्राहूनहि अपरंपार आहे. त्याचा पराक्रम रामलक्ष्मणाप्रमाणें आहे. गरुडाच्या पंखांतील बळ त्याच्या भुजांत आहे.—' हे हनुमानस्तवन होत असतांच हनुमानाचे शरीर स्फुरण पावूं लागले, त्याला मोठा आवेश चढला. त्याच्या तेजस्वी स्वरूपाने सारे दिपून गेले. त्यानें सांगितलें, " मी शतयोजन समुद्र उल्लंघन करून सीतेचा शोध लावून आणतों. तुम्ही घाबरूं नका, भिऊं नका. मी सागराला पिऊन टाकीन, पर्वताला चूर्ण करीन—" नंतर मारुति एका पर्वताग्रावर गेला. मान आणि डोकें उंच करून त्यानें समुद्राचें प्रथम निरीक्षण केले. वायूला नमस्कार केला. आणि आपलें शरीर हळूहळू वाढविण्यास आरंभ केला. नंतर उड्डाण करण्याच्या अवसानानें त्यानें आपल्या पर्वतप्राय शरिराच्या हातांनीं व पायांनीं पर्वतावर जोर दिला, त्याबरोबर तो एवढा मोठा पर्वत पण थरथरा कांपूं लागला. मारुतीनें आपलें अंग हालवून केस पिंजारले, व मेघगर्जनेसारखा मोठ्यानें भुभुःकार करून सत्त्व व तेज यांचें स्फुरण केलें आणि ' हे कपींनो, रामानें सोडलेल्या बाणाप्रमाणें मी सरळ लंकेला जातों ' असें म्हणून प्रतापशाली हनुमानाने समुद्रावर झेंप घेतली.

## मार्गशीर्ष शु. ११ भगवद्गीतेचा अवतार!

शकपूर्व २००९ च्या मार्गशीर्ष शु. ११ ला भगवान् श्रीकृष्ण यानीं अर्जुनास गीतेचा उपदेश केला. सर्व जगांत अद्वितीय ठरलेल्या भगवद्गीतेचा जन्म आज झाला. गीतेच्या जन्मकथेची हकीगतहि संस्मरणीय अशीच आहे.

मदानें उन्मत्त झालेल्या कौरवांकडून पांडवांवर अतोनात अन्याय झाला. प्रत्यक्ष श्रीकृष्णानें युद्ध टाळण्यासाठीं केलेली शिष्टाई फुकट गेली, तेव्हां कुरुक्षेत्रावर--पानिपतच्या पटांगणावर कौरवांचे अकरा अक्षौहिणी सैन्य व पांडवांचें सात अक्षौहिणी सैन्य येऊन ठेपलें. दोनहि छावण्यांतून हत्तींच्या गर्जना, घोड्यांचे खिंकाळणें, योद्धयांचे सिंहनाद, धनुष्यांचे टणत्कार व शंख, भेरी, नगारे यांचा गंभीर ध्वनि सुरू झाला. धृष्टद्युम्न पांडवांचा सेनापति होता. वयोवृद्ध असणारे भीष्म कौरवांचे सेनापति झाले. अर्जुनाच्या रथाचे सारथ्य स्वतः श्रीकृष्णानें स्वीकारलें. आणि प्रत्यक्ष युद्धाला सुरुवात होण्यापूर्वी ज्यांच्याशीं आपणांस लढावयाचे आहे, त्या वीरांना निरखून पाहण्याच्या हेतूनें अर्जुनाने समोरील सैन्याकडे नजर टाकली.

तेव्हां या वीराच्या मनांत आलें, "हे लक्षावधि वीर प्रियपितामह, आचार्य, स्वशुर, शालक, पुत्र, पौत्र, बंधु, आप्त, मित्र...यांच्याशीं का लढून मी राज्य मिळवणार?" अर्जुन हतवीर्य होऊन त्याच्या डोळ्यांतून झरझर अश्रु वाहूं लागले. आणि 'गोविंदा, या कुलक्षयापासून त्रिखंडाचें राज्य मला मिळालें तरी नको. मी युद्ध करणार नाहीं.' असे श्रीकृष्णाला म्हणून अर्जुनानें धनुष्य खालीं टाकलें. क्षत्रियाने आपला धर्म सोडला. त्या वेळीं श्रीकृष्णाने त्यास गीतेच्या उदात्त धर्माचा उपदेश केला : "अर्जुना, तुझ्यासारख्या वीराचे ठायीं हे कारुण्य योग्य नाहीं. धर्मयुक्त युद्धाहून कोणतीहि अन्य गोष्ट क्षत्रियास श्रेयस्कर नाहीं. तेव्हां सुखदुःख, लाभालाभ, जयपराजय यांस समान लेखून युद्धास आरंभ कर, आणि ध्यानांत असूं दे कीं, जेथें श्रीकृष्ण आणि पार्थ आहेत तेथे श्री, विजय, भूति, आणि नीति यांचें वास्तव्य असतें." भगवंतांनीं अर्जुनास दिलेला हा उपदेश आहे.

—१८ ऑक्टोबर इ. स. पूर्व १९३१

## मार्गशीर्ष शु. १२ भारतीय युद्धास सुरुवात !

शकपूर्वी २००९ या वर्षी मार्गशीर्ष शु. १२ ला कौरव–पांडव यांमधील विख्यात असें भारतीय युद्ध सुरू झालें.

पांडवांचा वनवास व अज्ञातवास संपल्यानंतर न्यायानें त्यांच्या राज्याचा वांटा त्यांना मिळणे अवश्य होते. परंतु मदमत्त झालेल्या दुर्योधनाकडून तें घडलें नाहीं. तेव्हां युद्धाचा प्रसंग उद्‌भवला. तत्पूर्वी स्वतः श्रीकृष्णांनीं कौरवांकडे जाऊन समजूत काढण्याचा प्रयत्न केला — "हे पांडवहि तुझेच आहेत. कौरवपांडवांचा संधि घडवून आण. जोंपर्यंत अर्जुन व कृष्ण कंबर बांधून युद्धास सज्ज झाले नाहींत, जोंपर्यंत भीम आपली गदा घेऊन सैन्याच्यां शिरोभागीं उभा राहिला नाहीं, तोंपर्यंतच हा प्रश्न मिटव —" परन्तु हा श्रीकृष्णाचा सल्ला ऐकून दुर्योधन संतापानें लाल झाला. आणि मूर्तिमंत पाशवी सत्ता बोलली कीं, "सुईच्या अग्रावर राहील एवढी मातीसुद्धां पांडवांना मिळणार नाहीं."

शेवटीं श्रीकृष्णाची शिष्टाई फुकट जाऊन युद्धाचा प्रसंग येऊन ठेपला आणि बरोबर तीन हजार आठशे एकूणऐंशीं वर्षांपूर्वी आजच्याच दिवशी न्याय आणि अन्याय यांचा फार मोठा लढा सुरू झाला. दोनहि सैन्यांच्या मिळून १८ अक्षौहिणी (एक अक्षौहिण म्हणजे २१८७० हत्ती, २१८७० रथी, तिप्पट म्हणजे ६५६१० घोडेस्वार व पांच पट म्हणजे १०९३५० पायदळ) कुरुक्षेत्रावर युद्धासाठीं तयार झाल्या. पायदळांच्या पायांचा व शस्त्रांचा, घोड्यांच्या टापांचा व खिंकाळ्याचा, हत्तींच्या चीत्कारांचा, रथाच्या गडगडाटांचा व ध्वजाच्या फडफडण्याचा, वीरांच्या सिंहनादांचा व शस्त्रांचा गगनभेदी भयंकर आवाज होऊं लागला. द्रुपद, विराट, सात्यकी, धृष्टद्युम्न, शिखंडी, भीम आदि वीर एका बाजूला, आणि शल्य, शकुनि, जयद्रथ, कृतवर्मा, भीष्म, द्रोण आदि झुंजार दुसऱ्या बाजूला होते. भीष्मार्जुन, भीम–दुर्योधन, सात्यकी–कृतकर्मा, युधिष्ठिर–शल्य यांचीं द्वंद्वयुद्धें सुरू झालीं. संग्रामांत पहिल्याच दिवशीं हजारों हत्ती घोडे व पायदळे मरून रणमैदान रक्तामांसानें माखून गेले.

— १८ ऑक्टोबर इ. स. पूर्व १९३१

## मार्गशीर्ष शु. १३ छत्रपति राजाराम जिंजीस !

शके १६११ च्या मार्गशीर्ष शु. १३ रोजीं मराठ्यांचा राजा राजाराम हा जिंजी येथे जाऊन पोचला.

या वेळीं महाराष्ट्रांत मोठी आणीबाणीची परिस्थिति निर्माण झाली होती. संभाजीच्या वधामुळे सर्वत्र सूडाची भावना धुमसत होती. राजाराम हातीं यावा म्हणून मोगलानीं रायगडास वेढा दिला. त्या वेळीं कांहीं मसलत करून राजाराम रायगडावरून प्रतापगडास गेला. तेथेंहि राहणें धोक्याचे झाल्यावर त्याने पन्हाळ्यावर आपले वास्तव्य केलें. पुढें पन्हाळ्याकडे सुद्धां बादशहाच्या फौजा येऊन धडकल्या. तेव्हां आपल्या साथीदारांसहित यात्रेकरूंचा वेष धारण करून राजारामानें जिंजीकडे प्रयाण केलें. जिवास जीव देणारी अनेक मंडळी त्याच्याबरोबर होतीच. सेनापति पानसंबळ, प्रल्हाद निराजी, नीळकंठ मोरेश्वर, नीळकंठ कृष्ण, खंडो बल्लाळ, कृष्णाजी अनंत, खंडोजी कदम, मानासिंग मोरे, संताजी जगताप, रूपाजी भोसले इत्यादि अनेक राजनिष्ठांनीं राजारामाला फारच मदत केली.

राजारामाचा हा प्रवास अत्यंत हालाचा व जिकीरीचा असा झाला. अनेक संकटें त्याच्या मार्गांत निर्माण झालीं. पाठीमागून बादशहाच्या फौजा पाठलाग करीतच होत्या. कर्नाटकांतील प्रत्येक शहरीं मोंगली अधिकारी राजारामास पकडण्यास टपलेले होते. मध्यंतरीं अनेकांना बादशहाच्या लोकांनीं पकडून नेलें. कांहींचा शिरच्छेद करण्यांत आला. कित्येकांना भयंकर अशा शिक्षा झाल्या. परंतु हे सर्व लोक खंबीर मनाचे होते. त्यांनीं सर्व कष्ट सोसले आणि आपल्या धन्यास सुखरूपपणें मार्गशीर्ष शु. १३ रोजीं जिंजीस पोहोंचते केलें. राजाराम जिंजीस पोहोंचल्यावर अर्थातच तिकडील हिंदु सत्ताधीशांना मोठाच धीर आला. हिंदु धर्म नाहींसा होऊन सर्वत्र यावनी राज्य होणार ही जी भीति कर्नाटकांत निर्माण झाली होती ती आतां नष्ट झाली. सर्व सत्ताधीश फौज व नजराणा घेऊन राजारामास येऊन मिळाले. मोंगलांविरुद्ध प्रचंड सामना द्यावयाचा हेंच एक ध्येय या वेळीं मराठ्यांच्यापुढें होते.

— १५ नोव्हेंबर १६८९

## मार्गशीर्ष शु. १४ रावणाच्या लंकेचें दहन !

मार्गशीर्ष शु. १४ या दिवशीं श्रीहनुमान याने मदोन्मत्त अशा रावणाची लंका जाळून टाकली.

रामाज्ञेवरून मारुतिराय लंकेत आले व त्यांनीं सीतेला सर्व वृत्तांत कथन केला. रामाने पाठविलेली अंगठी त्याने सीतेला दाखविली. तेव्हां तिलाहि खूण पटली. सीतेने रामाला दाखविण्यासाठीं आपल्या डोक्यांतील चूडामणि मारुतीजवळ दिला. सर्व निरोप घेऊन हनुमान अशोक वनांतून निघाले. परंतु त्यांना तितकेसें समाधान वाटलें नाहीं. आपल्या सामर्थ्याचा प्रभाव येथें दाखवावा असे हनुमानांच्या चित्तांत येऊन गेले. लागलीच मारुतीने रावणाचें शोभिवंत असें प्रमदावन उध्वस्त करण्यास सुरुवात केली. सर्व वृक्ष काडकाड मोडून गेले. सुंदर दीर्घिका व विहिरी मोडून टाकिल्या. जिकडे तिकडे हाहाःकार उडाला. रावणाला ही सर्व बातमी समजल्यावर त्याचे डोळे क्रोधानें लालभडक झाले. आपल्या अति बलाढ्य अशा ऐंशीं हजार राक्षसांना त्यानें मारुतीवर पाठविलें. त्यांतील बहुतेक राक्षस मरून गेले. त्यानंतर रावणानें सेनापति प्रहस्ताचा मुलगा जम्बुमाली यास मारुतीचा नायनाट करण्यासाठीं पाठविलें. या वेळीं हनुमंताने रावणाच्या राजवाड्याचाहि विध्वंस करण्यास सुरुवात केली. मारुतीने जम्बुमालीचाहि पराजय केल्यावर रावणाने अनुक्रमे सात अमात्य-पुत्र, स्वतःचा मुलगा अक्ष, इंद्रजित यांना हनुमंतावर पाठविले. इंद्राजितानें मारुतीवर ब्रह्मास्त्र सोडले, आणि दोरखंडांनीं बांधून त्याला रावणापुढे नेलें. मारुतीनें रावणाची चांगलीच कानउघाडणी केली. अर्थात् रावणास ती कशी रुचणार? रावणानें हुकूम सोडला, "या वानरांना आपल्या पुच्छाचा मोठा अभिमान वाटतो. द्या तें पेटवून." मारुतीच्या शेपटीला शहरांतील सर्व वस्त्रे गुंडाळण्यांत आलीं आणि तें पेटाविण्यांत आलें. शेपटी पेटल्यानंतर मारुतीने या घरावरून त्या घरावर असे उड्डाण सुरू केले. हजारों रमणीय वाडे जळूं लागले. राक्षसराक्षसिणी किंचाळून बाहेर पळूं लागल्या. अनेक रत्नांनीं बनलेल्या रावणाच्या वाड्यासहि आग लागली! "आला, कपिरूपी अग्नि आला म्हणून जिकडे तिकडे एकच हलकल्लोळ माजून राहिला."

• • •

## मार्गशीर्ष शु. १५ (१) "तें हें दत्तात्रेय रूप ओतिलें!"

मार्गशीर्ष शु. १५ हा दिवस भारतांत दत्तात्रेयजयंतीचा म्हणून मानण्यांत येतो. अत्रि ऋषीस अनसूयेपासून दहा पुत्र झाले. त्यांपैकीं दत्त हा एक होय.

पुत्रप्राप्तीसाठीं अत्रीने त्र्यक्षकुल पर्वतावर तप केलें. त्याच्या घोर तपानें मस्तकांतून ज्वाला निघूं लागल्या व त्या ज्वालांमुळे त्रैलोक्याचा दाह होऊं लागला. तेव्हां सर्व देवांच्या सल्ल्यानें ब्रह्मा-विष्णु-महेश यांच्या अंशांनीं दत्तात्रेय यांचा अवतार झाला. या अवताराचा मुख्य गुण म्हटला म्हणजे क्षमा. यानें यज्ञक्रियासहित वेदांचें पुनरुज्जीवन करून चातुर्वर्ण्याची पुनर्घटना केली. या अवताराला अविनाशी समजण्यांत आलें आहे. "अवतारहि उदंड होती । सर्वेची मागुती विलया जाती । तैशी नव्हे दत्तात्रेयमूर्ति । नाश कल्पांतीं असेना" असे श्रीधरानें म्हटलें आहे.

दैवतांच्या उपासनांवरून समाजांत नाना संप्रदाय निर्माण होतात. महाराष्ट्रांतील या मोठ्या दत्तोपासनेचे मुख्य प्रणेते श्रीनृसिंह सरस्वती होत. त्यांचा मुख्य ग्रंथ 'गुरुचरित्र' हा आहे. मुसलमानी रियासतीच्या ऐन भरांत नृसिंह सरस्वतींनीं चातुर्वर्ण्यघटित वैदिक धर्माचे स्वतःच्या आचरणानें व उपदेशानें संरक्षण करून सर्व भारतीयांवर आपल्या तपोनिष्ठेची छाप पाडली. या संप्रदायाचें वैशिष्ट्य म्हणजे शिव व विष्णु यांच्या उपासना येथें एकरूप झाल्या आहेत. जनार्दनस्वामी, एकनाथ, दासोपंत, माणिकप्रभु आदि संतवर्यांनीं या संप्रदायाला संघटित स्वरूप दिले. माहूर, गाणगापूर, औदुंबर व नरसोबाची वाडी हीं दत्तक्षेत्रें महाराष्ट्रांत प्रसिद्ध आहेत. सर्व सांप्रदायिकांची समजूत आहे कीं, "पूर्ण ब्रह्म मुसावलें, तें हें दत्तात्रेयरूप ओतिले." सांप्रदायिक लोक गुरुचरित्र, औदुंबरवृक्ष व त्रिमूर्तिदत्त यांची उपासना करून गुरुवारीं दत्ताची पूजाअर्चा करितात.

"माळा दंड करीं कमंडलु, जटेचा मस्तकीं टोप तो ।
ब्रह्मांडांतरिं जो फिरेचि लपतो, भक्तीस आटोपतो ॥
भक्तीची दृढ चित्ति प्राप्ति करितां, युक्ति मला साधेना ।
स्वामी दत्त दयाघना अवधूता, श्रीअत्रिच्या नंदना!"

असें दत्तवर्णन एका भक्त कवीने केलें आहे.

## मार्गशीर्ष शु. १५ (२) गोविंदपंत बुंदेल्यांचा अंत!

शके १६८२ च्या मार्गशीर्ष शुद्ध १५ ला पानिपतच्या मैदानावर मराठे व मोंगल यांचा संग्राम होऊन गोविंदपंत बुंदेले मारले गेले.

पंधरा दिवसांपूर्वींच बळवंतराव मेहेंदळे ठार होऊन मराठ्यांची बाजू लंगडी झाली होती. गोविदपंत बुंदेल्यांनीं दिलेला शह हाणून पाडण्यासाठीं अब्दालीनें शिकारीचें निमित्त काढून आताईखान यास दहा हजार निवडक स्वारांनिशीं गुप्त रीतीनें गोविंदपंतांवर पाठविलें. तीन-चार प्रहरांतच पंचवीस कोसांची दौड करून दिवस मावळण्याच्या सुमारास गाजद्दीन नगराजवळ आताईखानानें गोविंदपंतांस गांठलें. या शत्रूकडील स्वारांनीं बांड्या रंगाचे होळकरी निशाण पुढें धरलेलें असल्यामुळे मराठे फसले आणि शेवटीं निकराची कापाकापी सुरू झाल्यावर स्वतः पंतांचीहि धडगत उरली नाहीं. पंत पळतां पळतां घोड्यावरून पडले, त्याबरोबर त्यांचें शिर कापून गिलचांनीं तें अब्दालीस दिलें. आणि या दिवसापासून मराठ्यांच्या फौजेची छबी मावळली. गोविदपंत अब्दालीची रसद मारण्याचें काम चांगलें करीत होता!

गोविंदपंत बुंदेले यांचें घराणें रत्नागिरी जिल्ह्यांतील नवरे गांवच्या कुलकर्ण्यांचें होतें. गोविंदपंत देशावर येऊन बाजीरावापाशीं राहिले व अंगच्या हुशारीनें व कर्तबगारीनें मोठेपणास चढले. पानिपतच्या युद्धापूर्वीपासूनच फौज जय्यत तयार ठेवण्यास हे पेशव्यांना बजवीत असत. "रांगडे लोक हरामजादे फौज नसलिया बंदोबस्त राहणार नाहीं." असें यांचें सारखें म्हणणें असे. बाजीराव छत्रसालच्या मदतीस निघाले तेव्हां हे लष्कराबरोबर होते. यांच्या पराक्रमामुळें यांना छत्रसाल राजाकडून झांशी, जालवण, गुलसराई, काल्पी व सागर हे प्रांत मिळाले होते.

गोविंदपंतांच्या मृत्यूनंतर त्यांचें शिर सदाशिवरावभाऊंकडे पाठविण्यांत आलें. भाऊनेंहि यांच्या मुलाचें समाधान सांत्वनपर पत्र लिहून केले व बुंदेलखंडाची व्यवस्था अत्यंत दक्षतेनें घेण्याविषयीं बजाविलें. अब्दालीची रसद मारण्याचें काम गोविंदपंत चांगल्या प्रकारें करीत असत.

—२२ डिसेंबर १७६०

## मार्गशीर्ष व. १ रामचंद्र गणेशांचा प्राणत्याग!

शके १७०२ च्या मार्गशीर्ष व. १ रोजीं मराठेशाहींतील सुप्रसिद्ध वीर रामचंद्र गणेश कानडे यांनीं वज्रेश्वरीजवळ इंग्रजांशीं लढतां लढतां प्राणत्याग केला.

या वेळीं इंग्रजांनीं वसई या महत्त्वाच्या ठाण्यावर हल्ला करून तें हस्तगत करण्याचा विचार केला होता. दोनतीन दिवसांपूर्वीच किल्ल्यावर तोफा डागल्या गेल्या होत्या. गॉडर्डनें वसई घेण्याचा निश्चय केला होता, अशा आणीबाणीच्या प्रसंगीं नानांनीं जुना कसलेला सेनापति रामचंद्र गणेश यास वसईस मदतीसाठीं म्हणून पाठविलें. रामचंद्र गणेश घाटांतून जात असतां इंग्रज सेनानी हार्टले व मुसा नारन यांनीं त्याला अडविलें. वज्रेश्वरी उर्फ वज्रयोगिनीचा पर्वत सुप्रसिद्ध असून त्याचा आश्रय लढाऊ फौजांस चांगलाच होता. कांहींहि होवो, पण वसईस मदत पोंचवून इंग्रजांचा पराभव करावयाचा हा निश्चय रामचंद्र गणेशाचा होता. हार्टले व मुसा नारन यांच्याशीं निकराचा सामना झाला. मार्गशीर्ष व. १ या दिवशीं धुके पडलेलें होतें. तेव्हां न दिसतां रामचंद्र गणेश हार्टले यास पकडण्यास अगदीं तोफाखान्याजवळ आला आणि आतां शत्रूस हस्तगत करणार तों अभ्रपटल दूर होऊन एकदम स्वच्छ सूर्यप्रकाश पडला. मराठे शूर गडी अगदींच जवळ आल्याचे हार्टलेच्या ध्यानीं येतांच त्यानें तोफांचे बार केले. मराठे मुळींच डगमगले नाहींत. अशा या भयंकर प्रसंगींहि ते तोफ पकडण्यास धांवले. इतक्यांत एक गोळा रामचंद्र गणेश यांस लागला व ते तात्काळ ठार झाले. परमेश्वरहि इंग्रजांचीं साह्यकर्ता झाला. अभ्रसुदर्शन वज्राबाईनें जर दूर केलें नसतें तर लढाईचा रंगच बदलला असता; पण मराठ्यांच्या दुर्दैवानें विपरीतच घडलें. आणि रामचंद्र गणेश धारातीर्थीं पतन पावले. आदल्याच दिवशीं वसई इंग्रजांच्या हातीं आलेली होती. या दोन गोष्टींमुळें मराठे जास्तच खवळून गेले आणि पुढें त्यांनीं प्रचंड आवेशानें युद्ध करून गॉडर्डला तह करण्यास भाग पाडलें. अशा प्रकारें रामचंद्र गणेशाच्या मृत्यूमुळें अधिक महत्त्वाची कामगिरी झाली. रामचंद्र गणेश यांनीं लढाईचें शिक्षण सदाशिवरावभाऊंच्या हाताखालीं घेतलें होतें.

— १२ डिसेंबर १७८०

## मार्गशीर्ष व. २ सिंधुदुर्गाची उभारणी !

शके १५८६ च्या मार्गशीर्ष व. २ या दिवशीं शिवाजी राजे यांनीं सिंधुदुर्ग बांधण्यास सुरुवात केली.

शिवशाहीपासूनच मराठ्यांचें आरमाराकडे विशेष लक्ष होतें. 'घरांत जैसा उंदीर तैसा आमचे राज्यास सिदी' असें शिवाजी नेहमीं म्हणे. आणि जंजिऱ्याच्या सिद्दीमुळेंच मराठ्यांचें आरमार वाढीस लागलें. सरहद्दीचा बंदोबस्त ठेवणें हें राज्यसंरक्षणाचें मुख्य काम असल्यामुळें कारवारपासून सुरतेपर्यंत पश्चिम किनाऱ्यावर आपणास कोणी शत्रु नसावा अशी शिवाजीची व्यवस्था होती. समुद्रावर जहाजे ठेवून आपली सत्ता अबाधित ठेवण्याची मनीषा त्याची होती. '—तो स्वतः खलाशी नव्हता म्हणून बरें, नाहीं तर त्यानें जमिनीचा पृष्ठभाग साफ करून टाकला तसा समुद्राचाहि टाकला असता.' असे इंग्रज म्हणत. सन १६६४ पासून शिवाजीचे आरमार विशेषेकरून वाढलें. 'जंजिरा पाण्यांत किल्ला, जेर न होय, असाध्य तो आपणांस यावा, समुद्रांत सत्ता करावी, म्हणून बहुत चित्तांत हेतु धरून, जहाजें नवीन तयार महाराजांनीं करविलीं.' दहापांच लक्ष रुपये खर्च केला, समुद्रांत सत्ता बसविली, बेटे चांगलीं पाहून किल्ले बांधले. त्यांपैकीं सिधुदुर्ग किल्ला बांधण्यास शिवाजी स्वतः खपत होता. सन १६६४ हें वर्ष शिवरायांच्या वाढत्या पराक्रमाचें निदर्शक आहे. सुरतेहून अमूप लूट आणली होती. कुडाळ प्रांत हस्तगत केला होता, वेंगुर्ल्योचा बंदोबस्त करून गोवेकरांस गप्प बसविलें होतें. मुधोळचे संस्थान ताब्यांत घेतले आणि मार्गशीर्ष व. २ या दिवशीं सिंधुदुर्ग बांधण्यास सुरुवात करून तेथील बंदरांत मोठ्या गलबतांचें लढाऊ आरमार त्यानें बनविलें.

"उत्तरेस जंजिरा व दक्षिणेस गोवा या दोन तटबंदीच्या नाविक स्थलांमुळें राज्यास बळकटी कशी येते हें शिवरायांच्या ध्यानीं चांगलेंच होतें. जंजिऱ्याच्या जोरावर व्यापार वाढतो, त्यासाठीं लढाऊ व व्यापारी आरमार पाहिजे हें जाणून मार्गशीर्ष व. २ रोजीं महाराजांनीं खुद्द आपल्या हस्तें किल्ला बांधण्यास मुहूर्त करून चिरा भूमीमध्यें बसविला."

— २५ नोव्हेंबर १६६४

## मार्गशीर्ष व. ३ पुण्यश्लोक शाहूचें निधन !

शके १६७१ च्या मार्गशीर्ष व. ३ या दिवशीं छत्रपति शाहूमहाराज यांचें निधन झालें.

संभाजी व येसूबाई यांचे हे पुत्र. संभाजीच्या, अमानुष वधानंतर सूर्योजी पिसाळाच्या फितुरीमुळें रायगड किल्ला, औरंगजेबाच्या हातीं जाऊन राजमाता येसूबाई व शाहू यांना कैदेंत जावें लागलें. एकूण सतरा वर्षे ते बादशहाच्या अटकेंत होते. त्यानंतर मोंगलांचा मांडलिक म्हणून शाहू सुटूं शकत होता; पण ज्या स्वातंत्र्याकरितां मराठे तीस वर्षे लढत होते तें गमावून मराठे शाहूचें स्वागत करण्यास तयार नव्हते. सन १७०७ मध्यें अजमशहानें मराठ्यांत दुफळी करण्यासाठीं शाहूची कैदेतून मुक्तता केली. १७०८ मध्यें शाहूने सातारा येथें आपणांस राज्याभिषेक करून घेतला; आणि त्या वेळेपासून ताराबाईचा पक्ष स्वतंत्र म्हणून नांदूं लागला. तेव्हां आरंभापासून मदत करणाऱ्या बाळाजी विश्वनाथाला पेशवाई देणें शाहूला प्राप्त झाले.

बाळाजी विश्वनाथ, बाजीराव, बाळाजी बाजीराव यांना हाताशीं धरून त्यानें राज्यविस्तार खूप केला. मरतेसमयीं त्याला पुत्र नव्हता. शाहूविषयीं सर्वांना मोठा आदर वाटत असल्यामुळे त्यांच्या मृत्यूनें सर्वांनाच दुःख झालें. " मनुष्यमात्र लहानथोर, दासदासी पदरचे, त्यांचा बाप प्रतिपालनकर्ता, ते दुःख स्मरून क्लेश जाले, ते लिहावयास असमर्थता आली, कारण असा प्रभु दयावंत दुसरा जाला नाहीं. धन्याचे राज्यांत अपराधी झाला तरी, ' हत्यारें करून घ्या ' परंतु ' मारा ' असा शब्द ज्याचे मुखीं आला नाहीं, अजानबाहु, अजातशत्रु, पुत्रमित्र अशा एकरूप व्यवस्थेने वागावयाचें, कोणास गैरभाषण केलें नाहीं. असा पुण्यश्लोक राजा निधन पावला. ...एकच हाहाःकार झाला." शाहूमहाराजांनंतर त्यांची पत्नी सकवारबाई सती गेली. शाहूच्या कारकीदासंबधानें एके ठिकाणीं म्हटलें आहे – "जशी काशी तसें सातारा–पुणें विद्यापीठच जालें, आज्ञा कोणीं उलंघन न करावी. ऐसें सार्वभौम राज्य केलें. नीतिन्यायेकरून प्रजेचें पालनपोषण केलें. रयतेस उपद्रव काडी मात्र नाहीं. पर्जन्यवृष्टि यथाकाल होऊन पृथ्वीनें धान्य-पीक बहुत द्यावें ऐसें सुभिक्ष जालें.–"

— १५ डिसेंबर १७४९

## मार्गशीर्ष व. ४ स्वामी श्रद्धानंद यांचा खून!

शके १८४८ च्या मार्गशीर्ष व. ४ या दिवशीं सुप्रसिद्ध गुरुकुल विश्वविद्यालयाचे संस्थापक व हिंदु समाजाच्या उपेक्षित भागाकडे लक्ष वेधविणारे थोर गृहस्थ स्वामी श्रद्धानंद यांचा अमानुषपणें खून झाला.

स्वामींचा जन्म शके १७७८ मध्यें पंजाबांतील तळवण गावीं झाला. यांचे मूळचे नांव मुनशीराम असें होतें. प्रथम हे नास्तिक होते, परंतु पुढे दयानंद-सरस्वतींच्या व्याख्यानांचा परिणाम यांच्यावर होऊन हे पक्के आर्यसमाजी बनले. लाहोर येथें वकिली सुरू केल्यावर यांनीं हिंदूंच्या उपेक्षित भागाकडे लक्ष देण्यास प्रारंभ केला. यांचें 'सद्धर्मप्रचारक' साप्ताहिक प्रथम उर्दू लिपींत निघत असे, पण पुढें तें देवनागरी लिपींत निघूं लागलें. यांनीं स्त्रीशिक्षणावर एक लेखमाला लिहिली व जालंदर येथें सन १८९० मध्यें कन्याशाळा सुरू केली. विधवाविवाह व अनाथरक्षण या प्रश्नासंबंधींहि यांनीं लोकांना प्रत्यक्ष कार्याची दिशा दाखविली. पुढें यांनीं प्राचीन गुरुकुल पद्धतीच्या शिक्षणाचा पुरस्कार केला व त्यासाठीं हे पैसे जमवूं लागले. सन १९०२ मध्यें हरिद्वारजवळ गंगा नदीच्या किनाऱ्यावर झोपड्या बांधून यांनीं गुरुकुलाच्या कार्यास सुरुवातहि केली. पुढे या गुरुकुलाचा प्रसार मोठ्या प्रमाणावर झाला आणि त्याला विश्वविद्यालयाचें स्वरूप आलें. त्यानंतर सन १९१७ मध्यें यांनीं संन्यास घेतला. रौलट बिलाविरोधी झालेल्या चळवळींत यांनीं बरेंच कार्य केलें. दिल्लीस पोलिसांनीं जमावावर बंदुका झाडण्यास सुरुवात केली तेव्हां हे निधड्या छातीनें पुढें झाले व स्वतःवर निशाण धरणाऱ्या पोलिसाना म्हणाले, "मी हा श्रद्धानंद, चालव गोळी" अर्थातच पोलिस नरम पडले. मलबारांतल्या मोपल्यांनीं हिंदूंना बाटविण्यास सुरुवात केली, तेव्हां हे तेथें धांवत गेले आणि त्यांनीं अनाथांचें रक्षण केलें. शेवटीं दिल्ली येथील आपल्या आजारातून बरे होत असतां मार्गशीर्ष व. ४ रोजीं अबदुल रशीद नांवाच्या एका इसमाने रुग्णशय्येवर पडलेल्या या वृद्ध संन्याशास गोळी घालून ठार केलें. सबंध हिंदुस्थानला जबरदस्त धक्का बसला.

—२३ डिसेंबर १९२६

## मार्गशीर्ष व. ५ (१) छत्रसाल बुंदेले यांचें निधन !

शके १६५५ च्या मार्गशीर्ष व. ५ रोजीं बुंदेलखंडाचा अधिपति छत्रसाल बुंदेला याचें निधन झालें.

याच्या वयाच्या चौदाव्या वर्षींच आईबाप निवर्तून राज्याची वाताहात झाली होती. तेव्हां यानें 'नशीब' काढण्यासाठीं मोगल दरबारकडे धांव घेतली. मीमी जयसिंग याच्या पदरीं तो राहूं लागला. जयसिंगाबरोबर त्यानें अनेक लढायांत पराक्रम करून दाखविला. परंतु पुढें मोंगल दरबारांतील बेइमानीपणा पाहून मोगलांच्या सेवेंतून तो मुक्त झाला. याच वेळीं श्रीशिवाजीमहाराज यांची आग्र्याहून सुटका झाल्यामुळें त्यांचें नांव भारतांत दुमदुमून राहिलें. तेव्हां छत्रसाल दक्षिणेंत आला व शिकारीच्या निमित्ताने शिवरायांची यानें भेट घेतली. याची तेजस्विता पाहून आपलें गमावलेलें उत्तरेंतील 'स्वराज्य' काबीज करण्यास श्रीशिवाजींनीं याला प्रवृत्त केलें. याच प्रसंगीं शिवाजीनें यास एक तरवार अर्पण केली; आणि तिच्या जोरावर छत्रसालानें लढायांवर लढाया मारण्यास सुरुवात केली. तहवर खॉं, अनवर खा, सदरुद्दीन आदि शूर सरदारांचा पाडाव केला आणि यमुना व चंबळा या नद्यांच्या दक्षिण प्रांताचा म्हणजे सर्व बुंदेलखंडाचा हा मालक झाला.

सन १७३२ मध्यें अहमदशहा बंगश याने छत्रसालावर स्वारी केली. या वेळीं छत्रसालाचें वय एक्याऐंशीं होतें. स्वतःचे अंगीं शक्ति न राहिल्यानें या वृद्ध राजाने स्वातंत्र्य-रक्षणासाठीं दक्षिणेंतील बाजीराव पेशव्यांचें साह्य मागितले आणि छत्रसालानें त्याला पत्र लिहिले :—

" — जो गति ग्राह गजेंद्रकी सो गति जानहुं आज।
बाजी जात बुन्देल की राखो बाजी लाज --॥"

आणि या विनंतीप्रमाणे बाजीरावानें बंगशचा संपूर्ण पराभव केला. तेव्हां कृतज्ञता म्हणून आपल्या राज्याचा तिसरा हिस्सा यानें बाजीरावास दिला. असें सांगतात कीं, त्या वेळीं प्रसिद्ध असलेला भूषण कवि याच्या दरबारीं गेला होता. त्या वेळीं यानें त्याच्या पालखीला खांदा देऊन त्याचा सत्कार केला.

— १४ डिसेंबर १७३३

## मार्गशीर्ष व. ५ (२) 'दासबोध' ग्रंथाचा संकल्प!

शके १५७६ च्या मार्गशीर्ष व. ५ रोजीं श्रीसमर्थ रामदासस्वामी यांनीं शिवथरच्या घळींत बसून दहा वर्षेपर्यंत कोठेंहि न जातां दासबोध ग्रंथ लिहिण्याचा संकल्प केला.

महाराष्ट्राला योग्य प्रसंगीं जागृति देऊन कार्यप्रवृत्त करणारी रामदास ही एक अलौकिक विभूति होऊन गेली. रामदासांनीं सर्व भरतखंडांत यात्रा करून देश-स्थिति स्वतःच्या डोळ्यांनीं पाहिली होती. 'आनंदवनभुवन' म्हणून ज्याचा उल्लेख रामदास करितात त्या महाराष्ट्राचा कानाकोपरा त्यांना माहीत होता. अनेक सौंदर्यपूर्ण असलेलीं रम्य स्थळें त्यांनीं हुडकून काढिलीं आहेत. 'एकांते-वीण प्राणियाते बुद्धि कैची?' असे स्वानुभवाने समर्थांनीं म्हटलें आहे. भोर-हून महाडला जातांना दारमंडप लागतो. तेथून खालींच कोकणच्या खोऱ्यांत शिवथर गांव आहे. डोंगरांतून पाण्याचे प्रवाह सारखे वाहत असतात. येथेंच डोंगराच्या तळाशीं एक मोठी घळ निर्माण झाली आहे. याच एकांतवासांत सबंध राष्ट्राला जागविणारा प्रसिद्ध असा दासबोध ग्रंथ निर्माण झाला. परमार्थ, राजकारण व समाजकारण यांचा सुंदर मिलाफ या ग्रंथांत, पाहावयास मिळतो.

"ग्रंथां नाम दासबोध। गुरु शिष्यांचा संवाद।
येथे बोलिला विशद। भक्तिमार्ग॥
नवविधा भक्ति आणि ज्ञान। बोलिले वैराग्याचें लक्षण।
बहुधा अध्यात्म निरूपण। निरोपिलें॥"

असें या ग्रंथाचें स्वरूप समर्थांनीं स्वतःच सांगितले आहे. हा दिव्य ग्रंथ म्हणजे समर्थांची वाङ्मयीन मूर्तिच. 'आत्माराम दासबोध। माझें रूप स्वतः-सिद्ध' असे उद्‌गार समर्थांचेच आहेत. 'प्रयत्न, प्रबोध, प्रचीति' यांचा मंत्र दासबोधांतूनच सर्व महाराष्ट्रास मिळाला आहे. पारमार्थिक ज्ञानानंतर समर्थांनीं दासबोधांत व्यवहारज्ञान व प्रपंचविज्ञान यांचें विवरण करून महाराष्ट्राला प्रवृत्ति-धर्म स्पष्टपणें शिकविला. 'वैराग्य आणि परमार्थ' यांऐवजीं 'प्रपंच आणि परमार्थ' व 'भजना'च्या ऐवजीं 'यत्न' असे शब्द समर्थांच्या बोलण्यांत येऊं लागले.

— ८ डिसेंबर १६५४

## मार्गशीर्ष व. ६ भीष्माचार्य शरपंजरीं !

शकपूर्व २००९, मार्गशीर्ष व. ६ या दिवशीं भारतीय युद्धांतलि कौरवांकडील विख्यात सेनापति भीष्माचार्य यांनीं शरपंजरीं देह ठेवला.

नऊ-दहा दिवस युद्ध होऊनहि पांडवांकडील कांहीं हानी होत नाहींसें पाहून जेव्हां दुर्योधन कर्णाकडे सेनापतिपद देण्याचा विचार करूं लागला त्या वेळीं भीष्म संतप्त होऊन बोलले, 'उद्यां मी मरेन नाहीं तर पांडव तरी मरतील, उद्यां मी असें युद्ध करतो कीं, त्याची आठवण हजारों वर्षे लोक काढत राहतील.' वीरश्रीच्या आवेशांत आचार्य कौरवसेनेस मागें टाकून बरेच पुढें गेले. रक्षक मागें राहिले, ही संधि साधून श्रीकृष्णाच्या सल्ल्यावरून अर्जुनानें शिखंडीचा रथ पुढें केला, आणि अर्जुनानें बाण टाकण्यास सुरुवात केली. शिखंडीवर बाण टाकावयाचे नाहींत ही भीष्मांची प्रतिज्ञा होती! शिखंडीला पुढें पाहून भीष्मांनीं धनुष्य खालीं ठेवले होतें; त्या वेळीं शेंकडों बाण कवच फोडून त्यांच्या अंगांत घुसले. 'यांतील अर्जुनाचे बाण माझीं मर्मे तोडीत आहेत' असे स्वतःशीं म्हणत म्हाताऱ्याने धनुष्य उचलण्याचा प्रयत्न केला. तोंच तें अर्जुनानें तोडून टाकलें. दुसरें उचललें तेंहि तोडलें. या अवधींत भीष्मांच्या अंगांत इतके बाण शिरले होते कीं, रिकामी जागा दोन बोटेंहि नव्हती. शेवटीं प्राण कासावीस होऊन सूर्यास्ताच्या सुमारास भीष्म रथांतून पूर्वेकडे डोकें होऊन खालीं पडले.

पण अंगांत घुसलेल्या बाणांमुळें ते अक्षरशः 'शरपंजरी'च राहिले. दोनहि पक्षांकडील वीरश्रेष्ठ भीष्माभोंवतीं जमले. 'डोके लोंबकळत आहे' असें म्हणतांच कांहींनीं मोठमोठ्या उशा आणल्या; पण भीष्मांनीं त्या नाकारल्या. तेव्हां अर्जुनानें तीन बाण मारून त्या बाणांनीं भीष्माचें डोकें सांवरून धरलें. भीष्म क्षीण स्वरांत बोलले, "माझें शव बाणांवरच असूं द्या. उत्तरायण होईपर्यंत मी असाच प्राण धरून ठेवणार आहें. पिताजींच्या आशीर्वादानें मी इच्छामरणी आहें." या सर्व व्यवस्थेनंतर भीष्माचार्यांनीं दुर्योधनास उपदेश केला कीं, "दुर्योधना, हें तुझें भांडण भीष्माबरोबरच नाहींसें होऊं दे."

**—२७ ऑक्टोबर इ. स. पू. १९३१**

## मार्गशीर्ष व. ७ हनुमंताचें वृत्तांत-निवेदन !

मार्गशीर्ष व. ७ ला श्रीहनुमान रावणाच्या लंकेमध्यें असणाऱ्या सीतेचा शोध लावून परत रामरायापाशीं आले आणि त्यांनीं सर्व वृत्तांत निवेदन केला.

लंकेत रावणाच्या अंतःपुरांत असणाऱ्या अशोकवनांतील सीतेचा शोध मोठ्या युक्तीनें हनुमानाने लावला आणि तिला रामाची सर्व हकीकत सांगितली. रामास सांगण्यासाठीं तिचाहि निरोप घेतला. सीतेचा शोध लावून कर्तव्य केलें आणि लंकादहन करून आपला पराक्रम शत्रूंनाहि दाखविला. आणि आतां रामाकडे येण्यासाठीं तो अरिष्ट नांवाच्या पर्वतावर चढला, व तेथून त्यानें उड्डाण घेतले. आणि थोड्याच अवधींत उत्तर किनाऱ्यावर तो येऊन ठेपल्यावर जांबवान, अंगद आदींनीं त्याचें स्वागत केलें. त्याच्या कामगिरीचा सर्वांनीं गौरव केला. आणि यानंतर सारी मंडळी राम, लक्ष्मण व सुग्रीव हे ज्या ऋष्यमूक पर्वतावर होते त्या ठिकाणीं आली.

हनुमानाने सीतेसंबंधीं सर्व प्रकार रामरायाला निवेदन केला. "धरणीवर बसलेली, सारखा निःश्वास टाकणारी, रावणाविषयीं अत्यंत क्रोध व अनादर असलेली व मरणास तयार झालेली, अशी सीता मीं पाहिली...मीं तिचें समाधानहि केले कीं, वानरांचा राजा सुग्रीव बलाढ्य आहे, माझ्यासारखे शेंकडों बलाढ्य वीर त्याच्याजवळ आहेत. या सर्वांच्या साहाय्यानें रामलक्ष्मण रावणाचा नाश करून तुझी सुटका करतील"

याप्रमाणें श्रीरामचंद्र व हनुमान यांचे आणखी या बाबतींत संभाषण झाल्यानंतर रामचंद्र मारुतीची स्तुति करून म्हणाले, "हनुमंता, तूं जें काम केलेंस तें दुसरा कोणीहि करूं शकला नसता. शंभर योजनें रुंद समुद्र ओलांडून जाण्याची शक्ति तुझ्याशिवाय किंवा गरुडाशिवाय दुसऱ्या कोणासहि नाहीं." असें म्हणून रामानें मोठ्या प्रेमानें मारुतीस आलिंगन दिलें. यानंतर सर्व जण पुढच्या तयारीस लागले. मोठ्या प्रयासानें सेतु बांधण्यात आला. लक्षावधि वानरसेना त्यासाठीं खपत होती.



## मार्गशीर्ष व. ८ पं. मालवीय यांचा जन्म !

शके १७८३ च्या मार्गशीर्ष व. ८ रोजीं प्रसिद्ध हिंदु विश्वविद्यालयाचे संस्थापक पंडित मदनमोहन मालवीय यांचा जन्म झाला.

यांचे मूळ घराणें मालव प्रांतांतील. माळवा सोडल्यानंतर प्रयाग क्षेत्रीं या घराण्यानें आपलें अस्तित्व कायम केले. मालवीयांच्या घराण्यांतील सर्वच पुरुष विद्वान् व उदारचरित असे होते. पं. प्रेमधर मालवीय हे मदनमोहनांचे आजे. संस्कृत विद्येतील यांची कीर्ति त्या वेळीं अत्यंत मोठी होती. यांचे चिरंजीव व्रजनाथ मालवीय हेहि विद्वान् म्हणून प्रसिद्ध होते. भागवतावर लिहिला गेलेला यांचा ग्रंथ प्रसिद्ध आहे. याच भाग्यशाली पित्यास मार्गशीर्ष व. ८ या दिवशीं जो मुलगा झाला तो म्हणजे मदनमोहन. पित्यानें यांच्या शिक्षणाची फारच काळजी घेतली. धार्मिक आणि सांस्कृतिक संस्कार घरच्या घरींच होत असल्या-मुळें मदनमोहन मालवीयांचा विकास चांगला होत होता. प्राथमिक शिक्षण घरींच घेतल्यानंतर धर्मज्ञानोपदेश पाठशाळा व विद्याधर्मवर्धिनी सभा या संस्थां-तून यांचे शिक्षण सुरू झाले. अलाहाबाद जिल्हा स्कूलमधून प्रवेश परीक्षा व म्यूर सेंट्रल कॉलेजमधून पदवी परीक्षा उत्तीर्ण झाल्यानंतर त्यांचे लक्ष सार्वजनिक कार्याकडे वळले. धर्मकारण व शिक्षण हे यांचे आवडते विषय होते. अलाहाबाद लिटररी इन्स्टिटयूट व हिंदु समाज या संस्थांतून ते काम पाहूं लागले. आणि हळूहळू यांच्या कार्याचा विस्तार होऊन जगप्रसिद्ध अशा बनारस येथील विश्व-विद्यालयाची निर्मिति यांच्याकडून झाली. यांच्यासंबंधीं कै. तात्यासाहेब केळ-कर यांनीं एके ठिकाणीं म्हटले होतें :" हिंदुत्वाचा आदर्श कोण? असा मला कोणीं प्रश्न केला तर मी हिंदुस्थानांतील एकाच विभूतीकडे बोट दाखवीन. ती म्हणजे पंडित मदनमोहन मालवीयजी ... जुन्या व नव्या संस्कृतीचा सुंदर मिलाफ कसा घालावा हें पंडितजींइतकें कोणीच जाणीत नाहीं. हिंदु विश्वविद्यालय हे या सुंदर मिलाफाचे उत्कृष्ट उदाहरण आहे ...देवाजवळील नंदादीपाने जी चित्ताला एक प्रकारची प्रसन्नता वाटते ती पंडितजी आहेत." हिंदु धर्म आणि हिंदु संस्कृति यांचा अभिमान पंडित मालवीय यांना फार असे.

– २५ डिसेंबर १८६१

## मार्गशीर्ष व. ९ कोरेगांव येथील इंग्रज-मराठे यांचें युद्ध !

शके १७३९ च्या मार्गशीर्ष व. ९ रोजीं म्हणजे बरोबर एकशें-तीस वर्षांपूर्वी कोरेगांव येथें इंग्रज आणि मराठे यांचा संग्राम होऊन त्यांत मराठ्यांचा पराभव झाला.

एकोणिसाव्या शतकाच्या सुरुवातीपासून मराठेशाहीस अनिष्ट अशी ग्रहदशा सुरू झाली होती. याच काळाच्या आगेमागें महाराष्ट्राच्या भाग्यसूर्यास ग्रहण लागलें होतें. "राष्ट्रैक्याला अवश्य अशा तडजोडीचें मुत्सद्दीपण हरिपंत फडक्यांबरोबरच गेलें. स्वकीयांना–परकीयांना चळचळां कांपावयास लाविणारा पराक्रम महादजी शिंदे यांचेबरोबर गेला, मराठ्यांच्या वैभवानें सवाई माधवरावाबरोबर उडी घातली, मराठेशाहीच्या पुण्याईने अहिल्याबाईबरोबर नर्मदेंत बुडी मारली व मराठ्यांची शारदादेवी मोरोपंतांबरोबर पंढरींत पांडुरंगाच्या चरणांशीं दडी मारून राहिली." मग उरलें काय? दुसऱ्याची धन करून 'स्व' त्याला पारखे होणारे रावबाजी. त्यांच्या धरसोडीच्या धोरणामुळे आणि कचखाऊ स्वभावामुळें खडकी, येरवडा येथें इंग्रजांकडून मराठ्याचा पराभव झाला; आणि १७ नोव्हेंबर १८१७ या दिवशीं मराठ्यांच्या राजधानीमध्यें शनिवारवाड्यावरील ध्वज उतरवून त्या स्थानीं यूनियन जॅक फडकविण्यांत आलें. मराठेशाहीचा सौभाग्यतिलक पुसला गेला.

या समयीं धनी बाजीरावसाहेब पर्वतीवरून आपलें सामान आटोपून पुरंदर, सासवड या मार्गाने पलायन करीत होते. अनेक गांवें करीत ३० डिसेंबर रोजीं ते चाकण येथे आले. ही बातमी इंग्रजांस समजतांच त्यांनीं कोरेगांवजवळ १ जानेवारीस त्यास गांठलेंच. श्रीमंतांनीं बापू गोखले यास आज्ञा दिली कीं, आज लढाई करून पुढें जाण्यास मार्ग काढून द्या. तेव्हां मराठ्यांचा तोफांचा मारा सुरू झाला. संगिनींचें आणि तरवारींचें मोठें युद्ध झालें. रात्रीं नऊ वाजेपर्यंत लढाई होऊन शेवटीं पेशव्यांचें सैन्य छावणींत आलें. इंग्रजांचे एकशें-पंचाहत्तर जखमी झाले. मराठ्यांचे पांचशें लोक पडले. त्याचे अगोदरच बाजीराव जेजुरीच्या वाटेनें साताऱ्याकडे निघून गेला होता.

— १ जानेवारी १८१७

## मार्गशीर्ष व. १० जयद्रथास प्रायश्चित्त मिळालें!

शकपूर्व २००९ च्या मार्गशीर्ष व. १० रोजीं कौरवांकडील सेनानी जयद्रथ यास अर्जुनानें श्रीकृष्णाच्या साह्यानें ठार केले.

आदल्याच दिवशीं अर्जुनाचा षोडश वर्षाचा मुलगा अभिमन्यु द्रोणाचार्यांनीं रचलेल्या चक्रव्यूहांत शिरला आणि त्यानें अद्वितीय पराक्रम केला. पण या सोळा वर्षांच्या बालकावर द्रोण, अश्वत्थामा, कर्ण, कृप, कृतवर्मा आणि बृहद्बल या सहा जणांनीं एकदम प्रहार करण्यास सुरुवात केली. अभिमन्यु विरथ झाला, हातांत गदा घेऊन तो पायींच लढूं लागला. दुःशासनाचा पुत्र गदा घेऊन त्यास सामोरा आला; दोघे गदेच्या प्रहारांनीं मूर्च्छित झाले, आणि दुःशासनाचा पुत्र सावध झाल्यावर त्यानें अभिमन्यु मूर्च्छित असतांनाच त्याला गदेचा प्रहार करून ठार मारलें! आणि जयद्रथाने त्या मृत बालकाला लाथ मारली.

संशप्तकाच्या युद्धात गुंतलेला अर्जुन विजयी होऊन परत आल्यावर त्याला हा भीषण प्रकार कळला. तेव्हां संतप्त होऊन अन्यायाचा पुरेता सूड उगवण्यासाठीं त्यानें प्रतिज्ञा केली, "सूर्यास्ताच्या अगोदर मी जयद्रथाला ठार करीन, नाहीं तर स्वतः अग्निप्रवेश करीन" आणि त्याच्या गांडीव धनुष्याच्या टणत्कारानें दशदिशा भरून गेल्या. कौरवांचे वीर भीतीने ग्रस्त झाले. जयद्रथाच्या रक्षणासाठीं सौमदत्ति, कर्ण, अश्वत्थामा, शल्य, वृष व कृप असे वीर ठेवून शुभ्र कवच व उष्णाव घातलेले द्रोणाचार्य युद्धास तयार झाले. दुर्योधनानें द्रोणाकडून घेतलेलें दिव्य कवच घातलें असल्यामुळें अर्जुनाचे बाण निष्फळ झाले. तरी देखील या दिवशीं दोनहि पक्षांत भयंकर रणकंदन झाले. संध्याकाळच्या सुमारास अर्जुनाचा रथ जयद्रथापाशीं आला. येथील सहा वीरांशीं त्यानें युद्ध केलें, परंतु युद्धाचा रंग ठीक दिसेना तेव्हां श्रीकृष्णांनीं मायाजालानें सूर्यावर अभ्रें आणून सर्वत्र काळोख पसरविला. 'अर्जुनाची प्रतिज्ञा खोटी झाली' असे म्हणत जयद्रथ विजयानंदानें बाहेर आला. इतक्यांत सूर्य एकदम ढगाबाहेर येऊन रणांगणावर किरणे पडलीं. त्याच्या प्रकाशांत अर्जुनानें जयद्रथाचें शिर उडविले.

—३१ ऑक्टोबर इ. स. पू. १९३१

## मार्गशीर्ष व. ११ सेनापति द्रोणाचार्यांचा वध !

शकपूर्व २००९ मार्गशीर्ष व. ११ या दिवशीं भारतीय युद्धांत कौरवांकडील प्रसिद्ध सेनापति द्रोणाचार्य यांचा वध झाला.

जयद्रथाचा वध झाल्यावर दुर्योधन द्रोणाचार्यांना टाकून बोलला, "आचार्य, आपण आंतून पांडवांकडील आहांत...." त्यावर द्रोण रागानें बोलले, "दुर्योधना, या वाक्‌शल्यांनीं मला कां टोंचतोस ? बाबा, शकुनीनें द्यूतांत जे फांसे टाकले ते फांसे नव्हते, अर्जुनाचे बाण होते.... सती द्रौपदीला सभेंत खेचून आणून जो अधर्म केलात त्याचें आतां फळ भोगा.... तरी पण कर्तव्य म्हणून मी आज प्रतिज्ञा करतों कीं, जीवांत जीव आहे तोंपर्यंत आज मी युद्ध करीन." आणि या दिवशीं रात्रींसुद्धां घनघोर संग्राम सुरू झाला. द्रोणांनीं मोठा पराक्रम करून द्रुपद, त्यांचे नातु व विराट यांचा नाश केला.

द्रोणांचा पराभव होण्याचे चिन्ह दिसेना. 'द्रोणपुत्र अश्वत्थामा मेला' अशी बातमी उठल्याखेरीज द्रोणांचा पराभव अशक्य असें श्रीकृष्णांनीं हेरलें आणि त्याच्याच सूचनेवरून मालवराजा इंद्रवर्मा याचा अश्वत्थामा नांवाचा हत्ती ठार करून 'अश्वत्थामा मेला' अशी बातमी वृद्ध द्रोणाचार्यांना कळविण्यांत आली. सत्यनिष्ठ धर्माकडूनहि खात्री झाल्यावर या म्हाताऱ्याच्या मर्मावर वार बसला. लहानपणीं पाण्यांत पीठ कालवून तें दूध म्हणून पिणारा आणि आनंदानें बागडणारा एकुलता एक पुत्र अश्वत्थामा-द्रोणांचा प्राण-नाहींसा झाला ! पुत्रशोकानें विह्वल झालेल्या द्रोणांनीं शस्त्र खालीं टाकलें. द्रोणाचा सूड घेण्यासाठीं उतावीळ झालेला धृष्टद्युम्न द्रोणांच्या रथावर चढला, व शोकसमाधींत निमग्न होऊन शस्त्रसंन्यास करून बसलेल्या त्या पंचाऐशीं वर्षांच्या वृद्ध गुरूची शेंडी धरून त्यानें तरवार उपसली, "हा ! हा ! गुरूंना जिवंत धरा ! मारूं नका !" या अर्जुनादि पांडवांच्या ओरडण्याकडे पितृवधामुळें संतप्त झालेला धृष्टद्युम्न कोठून लक्ष देणार ! त्यानें आपल्या तरवारीच्या फटक्यासरशीं त्या अजिंक्य वृद्ध वीराचें मस्तक छाटून कौरवसेनेपुढें फेंकून दिलें.

— १ नोव्हेंबर इ. स. पू. १९३१

## मार्गशीर्ष व. १२  ( १ ) श्रीजनार्दनस्वामींची समाधि !

शके १४९७ च्या मार्गशीर्ष व. १२ रोजीं प्रसिद्ध सत्पुरुष आणि एकनाथमहाराज यांचे गुरु श्रीजनार्दनस्वामी यांनीं समाधि घेतली.

जनार्दनस्वामी मूळचे चाळीसगांवचे देशपांडे. यांचा जन्म फाल्गुन व. ६ शके १४२६ मध्यें झाला. पूर्वायुष्यांत हे यवनांच्या सेवेत होते. हे देवगड ऊर्फ दौलताबाद येथील मुख्य अधिकारी व यवन पातशहाचे विश्वासू मुत्सद्दी झाले. जनार्दनस्वामी मोठे शूर, करारी स्वभावाचे, टापटिपीचे व तेजस्वी पुरुष होते. महाराष्ट्रांत यावनी धर्माचा जोर सर्वत्र असतांहि यांच्या स्वधर्मनिष्ठेची दुंदुभि चोहोंकडे दुमदुमून राहिली होती. हे दत्ताचे सगुणोपासक होते. पहांटे उठल्यापासून तों मध्याह्नकालपर्यंत स्नानसंध्या, समाधि व दत्तसेवा यांत ते निमग्न असत. दुपारच्या वेळीं कचेरींतील काम झालें म्हणजे मग रात्रीं ज्ञानेश्वरी व अमृतानुभव यांचें निरूपण करीत. यांच्यासाठीं पातशाही हुकुमावरून देवगडावर दर गुरुवारीं कचेऱ्यांना सुट्टी होती. दत्ताच्या सगुण साक्षात्कारामुळें स्वामींच्या ठिकाणीं समता, शांति व अनासक्ति नांदत होती. भक्तिज्ञानवैराग्याचा हा पुतळा हिंदु-मुसलमानांना सारखाच प्रिय वाटे. नित्य भजनपूजन व आत्मचर्चा यांच्या दिव्य परिमळानें 'देवगड' पुण्यवान् झाला होता. 'श्रीमद्देवगिरी जनार्दनपुरी वैकुंठलोकापरी' असें वर्णन एका कवीनें केलें आहे. याच जनार्दस्वामींनीं शेजारच्या पैठण क्षेत्रीं वास करणाऱ्या बालभागवतास–एकनाथास– आपल्याकडे आकर्षून घेतलें. आणि त्यांना आपल्या कृपेनें जगदुद्धार करण्यास समर्थ केलें. जनार्दनस्वामी हे दत्ताचे परमभक्त होते. त्यांची श्रद्धा पाहून दत्तानें त्यांना साक्षात् दर्शन दिले होतें. स्वतः दत्तांनीं जनार्दन स्वामीवर अनुग्रह केला; या प्रसंगाचें वर्णन एकनाथमहाराज करतात :

"गुरु प्राप्तिलागीं सर्वथा । थोर जनार्दनासी चिंता ।
विसरला तिन्ही अवस्था । सद्गुरु चिंतिता चिंतनीं ॥
देवो भावाचा भोक्ता । दृढ जाणोनि अवस्था ॥
येणें जालें श्रीदत्ता । तेणें हातु माथां ठेविला ॥

— २९ नोव्हेंबर १५७५

## मार्गशीर्ष व. १२ (२) जिवबादादा बक्षी यांचें निधन !

शके १७१७ च्या मार्गशीर्ष व. १२ रोजीं महादजी शिंदे यांचे प्रसिद्ध सेनापति व मुत्सद्दी जिवबादादा बक्षी यांचें निधन झालें.

हे शेणवी जातीचे असून यांचें आडनांव केरीकर असें होतें. दौलतराव शिंद्यांच्याबरोबर यांनीं खर्ड्यांच्या लढाईंत मोठा पराक्रम केला होता. सवाई माधवरावांच्या मृत्यूनंतर यशोदाबाईच्या मांडीवर दत्तक देण्याविषयीं यांनीं प्रथम सल्ला दिला होता, परंतु बाळाजी विश्वनाथाचा औरस वंशज हयात असल्याचें समजल्यावरून यांनीं आपला सल्ला चुकीचा असल्याचें कबूल केलें. सवाई माधवरावांच्या मृत्यूनंतर थोड्याच दिवसांत यांचें निधन झालें. "जिवबादादांस एकाएकीं मोठा ज्वर येऊन त्यांत वायुप्रकोपहि झाला. म्हणून, मोठमोठे वैद्य आणवून उपचार करविले. पण गुण दिसेना; ताप हटेना. अगदीं थकत चालले." दौलतरावांनां व पुत्र नारायणरावांना चार उपदेशाच्या गोष्टी यांनीं सांगितल्या. आणि स्वतःचें लक्ष ईश्वराकडे लाविलें. 'विधियुक्त भस्म चर्चून गळयांत रम्य रुद्राक्षमाला व हातांत स्मरणी हीं त्यांनीं धारण केलीं होतीं व नेत्र मिटून ते ध्याननिमग्न झालेले दिसत. भोंवतालीं सर्वत्र पवित्र वातावरण दुमदुमून राहिलें होतें. ब्राह्मणांकडून गीतापाठ, विष्णुसहस्रनाम, शिवकवच इत्यादींचें पठण सुरू होतें. शेंकडों लोक समाचार घेण्यासाठीं उपस्थित होते. अशा स्थितींत मार्गशीर्ष व. १२ बुधवार रोजीं जिवबादादांना ग्लानि येऊन त्यांची हालचाल बंद पडली आणि थोड्याच वेळांत रा–म असा अस्पष्ट उच्चार होऊन जिवबादादांचें प्राणोत्क्रमण झालें. शेजारीं दौलतराव शिंदे होते. "शिद्यांच्या दौलतींत अत्युत्कृष्ट मनुष्य जिवबादादा बक्षी मरण पावले." यामुळें सर्वांच्या अंतःकरणास वेदना झाल्या. "निर्मळ अंतःकरण, पवित्र वर्तन, साधी राहणी, गोड स्वभाव, विलक्षण श्रमशीलता, लोकोत्तर शौर्य, गंभीर व आटोकाट राजकीय धोरण, स्पृहणीय स्वराज्यनिष्ठा आणि समाधानकारक धर्मशीलता या उत्कृष्ट गुणांचा जिवबादादा हे एक पुतळा होते.... आपण कोणी मोठे मनुष्य आहों व बाकी सारे क्षुद्र आहेत, अशी बुद्धि यांची नव्हती." जिवबादादांचें विस्तृत चरित्र राजाध्यक्ष यांनीं लिहिलें आहे.

— ६ जानेवारी १७९६

## मार्गशीर्ष व. १२ (३) इतिहासाचार्यांचें निधन !

शके १८४८ च्या मार्गशीर्ष व. १२ या दिवशीं महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध वाङ्मयसेवक, अभ्यासक, इतिहाससंशोधक व नवसिद्धान्तप्रतिपादक इतिहासाचार्य विश्वनाथ काशीनाथ राजवाडे यांचें निधन झालें.

आवश्यक असें शिक्षण झाल्यानंतर सुरुवातीस यांनीं कांहीं वर्षें न्यू. इं. स्कूलमध्यें शिक्षकाचें काम केलें. तरुणपणींच पत्नी वारल्यामुळें यांच्या ध्येयनिष्ठ जीवनाला विशेष प्रकारचें वळण लागलें. इंग्रजी भाषेंतील उत्कृष्ट ग्रंथांचें भाषांतर करण्यासाठीं यांनीं प्रारंभीं 'भाषांतर' नांवाचें मासिक काढलें. प्रो. काथवटे यांच्या सांगण्यावरून यांनीं वाई येथें जुन्या ऐतिहासिक कागदपत्रांचें संशोधन सुरू केलें. पानिपतविषयक अनेक प्रकारची सामग्री त्यांना तेथें मिळाली. सन १८९८ सालीं 'मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें' म्हणून पहिला भाग भाऊशास्त्री लेले यांनीं मोदवृत्त प्रेसमधून प्रसिद्ध केला. इंग्रजी लेखक व बखरी यांवर विश्वास ठेवण्यापेक्षां अस्सल कागदपत्रे शोधण्यास फार महत्त्व आहे, असा यांचा आग्रह होता. यानंतर यांनीं साधनांचे बावीस खंड प्रसिद्ध केले. "संपादन, संकलन व संशोधन यांपेक्षांहि मिळालेल्या साधनांवरून नवे नवे सिद्धान्त प्रतिपादिण्यांत यांचा तल्लखपणा विशेष प्रगट होतो. आपल्या इतिहासाचीं साधनें घरोघर विखुरलेलीं असून त्यांच्या द्वारां आपण इतिहासांत मोलाची भर घालूं शकूं, असा विश्वास निर्माण करून यांनीं अनेकांना कार्यप्रवृत्त केलें. इतिहाससंशोधनाला संघटित स्वरूप देण्यासाठीं यांनीं सन १९१० मध्यें पुण्यास भारत इतिहाससंशोधक मंडळ स्थापन केलें. याच मंडळांतून यांनीं महानुभावांच्या गुप्त लिपीचा उलगडा करून त्या संशोधनाचा मार्ग खुला केला, आणि आपण स्वतः यानंतर भाषा, व्याकरण व समाज यांकडे लक्ष देण्यास सुरुवात केली. एकनाथपूर्व ज्ञानेश्वरीचा शोध यांनींच लाविला. यांच्या कोणत्याहि लिखाणांत यांची स्वतंत्र बुद्धि दिसून येते. देशाभिमान, कळकळ आणि महाराष्ट्राच्या भवितव्याबद्दल चिन्ता त्यांच्या वाङ्मयांत सदैव दिसून येई. राजवाडे जन्मभर अकिंचन, फिरते आणि असंग्रही राहिले.



— ३१ डिसेंबर १९२६

## मार्गशीर्ष व. १३ धनुर्वीर कर्ण याचा वध !

शकपूर्व २००९, मार्गशीर्ष व. १३ रोजीं पृथ्वीवरील अलौकिक धनुर्वीर कर्ण याचा वध झाला.

कर्ण आणि अर्जुन यांचे युद्ध अत्यंत निकराचे झालें. अर्जुनानें अस्त्र सोडावें व कर्णानें दुसरें उलट अस्त्र सोडून तें निष्फळ करावें, असे होऊं लागलें. प्रत्यक्ष श्रीकृष्णाचें कवच कर्णाने जेव्हां फोडून टाकलें, तेव्हां अर्जुनाने एका अमोघ बाणानें कर्णास मूर्च्छित केलें. थोड्या वेळांत सावध झाल्यावर खांडव वनांत अर्जुनाच्या तडाख्यांतून वांचलेल्या अश्वसेन नागबाणाचा उपयोग करावा असें कर्णानें ठरविलें; व फार दिवस जपून ठेवलेला हा बाण त्यानें हातीं घेतला, आणि 'हतोऽसि वै फाल्गुन !' (अर्जुना, हा ठार झालास पहा) म्हणून तो सोडला. परंतु अर्जुनाचे सारथी भगवान् श्रीकृष्ण होते ! त्यांनीं रथ एक वीत खालीं करून घोड्यांनाहि गुढघे टेंकावयास लावले. त्यामुळें अर्जुनाचें शिर न उडतां त्याचा दैदीप्यमान किरीट मात्र नष्ट झाला. पुढें निकराच्या युद्धांतच कर्णाच्या रथाचें डावें चाक भूमीमध्यें रुतून बसलें. तें वर काढण्यासाठीं कर्ण खालीं उतरला. आणि अर्जुनाला म्हणाला, "मी येथे निःशस्त्र स्थितींत उभा आहें. तूं बाण टाकूं नकोस. तुला क्षात्रधर्म माहीत आहे." त्यावर श्रीकृष्णांनीं आवेशानें उत्तर केलें, "भीमाला विप घालून त्याचे अंगास तुम्हीं सांप डसविले, पाडव वारणावत नगरांत असतां तुम्हीं घराला आग लावलीत, द्यूतांत विशेष प्रवीण नसलेल्या धर्माला कपट करून जिकलेंत, द्रौपदी एक वस्त्र नेसलेली व रजस्वला असतां तिला भर सभेत आणून तिची विटंबना केलीत, तेव्हां गेला होता कोठें राधासुता तुझा धर्म ?" श्रीकृष्णाचें भाषण ऐकून लज्जा, दुःख व संताप यांनीं भरून गेलेला कर्ण पुनः रथावर चढला; आणि एक अमोघ बाण सोडून त्यानें अर्जुनास मूर्च्छित केलें; कर्ण रथचक्राशीं धडपड करीत असतांच अर्जुनानें सावध होऊन एक सणसणीत बाण काढला, आणि आपलें सारें सामर्थ्य एकवटून कर्णावर सोडला. सूं सूं करीत निघालेल्या त्या बाणानें क्षणार्धांत कर्णाचें मस्तक उडविलें !

— ३ नोव्हेंबर इ. स. पू. १९३१

## मार्गशीर्ष व. १४ जोगा परमानंदांची समाधि!

शके १२६० च्या मार्गशीर्ष व. १४ रोजीं प्रसिद्ध भगवद्भक्त जोगा परमानंद यानें बार्शी येथें समाधि घेतली.

तेराव्या शतकांत परमार्थाचें पीक सर्वत्र सोळा आणे आलेलें होतें. जोगा परमानंद तेली जातींत निर्माण झाला. परमानंद हें याच्या गुरूचे नांव आणि जोगा हें याचें स्वतःचें नांव. हा बार्शीस रहात असे. तेथें असलेल्या भगवानाच्या मंदिराकडे तो रोज गीतेंतलि एक श्लोक म्हणत, नमस्कार घालीत जात असे. अंगाला खडे टोंचूं नयेत म्हणून एका भाविकानें त्याला उंची पितांबर नेसवला. त्याची काळजी घेण्यासाठीं जोगा नमस्कार जपून घालूं लागला, तों देवळांत जाण्यास उशीर झाला. आरती केव्हांच होऊन गेली होती. देवाच्या भजनाच्या आड येणारा पीतांबर त्यानें फाडून टाकला! देवाला गरिबी आवडते, श्रीमंती नाहीं. पंढरीनाथाचा प्रेमळ भक्त म्हणून जोगा प्रसिद्ध आहे. सत्संगाची त्याला अत्यंत प्रीति होती. याची उपलब्ध कविता थोडी परंतु फार प्रेमळ आहे. 'लावण्यगुणसागर' परमात्मा हृदयांत प्रगटल्यावर जी अवस्था होते, ती त्यानें—

"मेघश्याम पाहतां आपोआप। डोळ्यां लागले वडप।
अष्टहि सात्त्विकांचें रोप। हृदयआळां उगवलें॥
भक्तिभावें ओल्हावलें। प्रेमफळासी पैं आलें।
नवविधा हें पिकलें। परमाब्द म्हणे जोगा॥

या अभंगांत सांगितली आहे. जोगा परमानंदाला परमेश्वरभक्तीबरोबरच संतसंगाचीहि विशेष आवड होती. 'रोमांच खरवितु खेदाबिंदु डळमळितु। पाहता नेत्र उन्मीळितु' अशी अवस्था व्हावी, अष्ट सात्त्विक भाव प्रगट व्हावेत आणि प्रेमभरित अंतःकरणांत देव प्रगटावा, अशी यांची इच्छा होती. 'राया विठोबाचे डिंगर प्रेमें बोधले डुलती', असे संत प्रत्यक्ष 'सच्चिदानंदाचिया-मूर्ति' आहेत, संत हें 'माझें माहेर' आहे, अशी यांची भावना असे. जोगा परमानंदांच्या काळांत सर्वत्र 'ब्रह्मविद्येचा सुकाळु' झाला होता. पंढरीच्या विठोबाचे भक्त सर्व जातींत निर्माण होऊन त्यांनीं समाजांत सत्प्रेरणा निर्माण केली.

—७ ऑक्टोबर १३३८

## मार्गशीर्ष व. ३० कौरवेश्वर दुर्योधन याचें निधन !

शकपूर्व २००९ मार्गशीर्ष व. ३० या दिवशीं कौरवसम्राट दुर्योधन याचें निधन होऊन अठरा दिवस चालू असलेलें भारतीय युद्ध समाप्त झालें.

दुर्योधन अनाथ व असहाय होऊन घोड्यावरून फिरत होता. रणभूमीपासून एक कोस अंतरावर एक सरोवर होतें. त्या सरोवरांत मायेनें पाण्याचें स्तंभन करून दुर्योधन विश्रांति घेत स्वस्थ राहिला. पांडवांना ही बातमी कळल्यावर त्यांचें सैन्य जयघोष करीत सरोवराच्या कांठीं आलें. धर्मराज आणि दुर्योधन यांच्या मर्मभेदक संभाषणानंतर दुर्योधन स्फुरण पावून नागाप्रमाणें त्वेषानें खांद्यावर गदा घेऊन सरोवराबाहेर आला. भीम गदा हातांत घेऊन त्याच्याशीं झुंजण्यास सिद्ध झाला. भीमाचें बळ जास्त होतें. दुर्योधन गदायुद्धांत कुशल होता. भीमास जय मिळण्याचें चिन्ह दिसेना. श्रीकृष्ण अर्जुनास बोलले, "आतां कपटाशीं कपट, मायेशीं माया पाहिजे." हें ऐकून अर्जुनानें आपल्या डाव्या मांडीवर थाप मारून भीमास इषारा दिला; त्याप्रमाणें संधि साधून दुर्योधन गदेचे घाव चुकविण्यासाठीं उडी मारीत असतां भीमानें त्याच्या मांडीवर आपल्या गदेचा प्रहार केला. त्यासरशीं दुर्योधन ओरडतच जमिनीवर पडला. भीमसेन आनंदानें गर्जूं लागला. तेरा वर्षें अंतःकरणांत दाबून ठेवलेल्या क्रोधाचा व वैराचा असा शेवट पाहून त्यास आवेश चढला.

यानंतर अश्वत्थामा–द्रोणाचार्यांचा पुत्र–संतापानें बेहोष होऊन त्याच रात्रीं गुप्तपणें पांडवांच्या शिबिरांत गेला आणि आपल्या पित्याचा वध करणारा धृष्टद्युम्न, आणि युधामन्यु, उत्तमौजा, शिखंडी, द्रौपदीचे पांच पुत्र या सर्वांची त्यानें क्रूरपणें कत्तल केली. ही आनंददायक बातमी दुर्योधनास कळविण्यांत आली. मरणकाळच्या असह्य वेदना सोसणाऱ्या दुर्योधनास ही वार्ता ऐकून हर्ष झाला. "भीष्म, द्रोण, कर्ण यांच्या हातून न होणारा पराक्रम अश्वत्थामा, तूं करून मला अंतसमयीं आनंद दिलास. तुझे कल्याण असो. तुमची आमची आतां स्वर्गांत भेट." एवढे शब्द कसेबसे उच्चारून दुर्योधनानें मार्गशीर्ष व. ३० [illegible] प्राण सोडला.

—५ नोव्हेंबर इ. स. पू. १९३१



वामी विवेकानंद.   महात्मा गांधी.   न्या. मा. गो. रानडे   महर्षि वि. रा. शि

शवचंद्र सेन.   वासुकाका जोशी.   सुभाषचंद्र बोस.

## पौष शु. १ राजारामशास्त्री भागवत यांचें निधन !

शके १८२९ च्या पौष शु. १ रोजीं महाराष्ट्रांतील सुधारक व प्रसिद्ध नवविचारप्रवर्तक राजारामशास्त्री भागवत यांचें निधन झालें.

तीन वर्षें मेडिकल कॉलेजांत शिक्षण घेतल्यानंतर त्यांनीं जुन्या शास्त्र्यांजवळ पांच-सहा वर्षें संस्कृतचें अध्ययन केलें. त्यानंतर ते सेंट झेवियर कॉलेजमध्यें संस्कृत शिकवूं लागले. याच वेळीं त्यांनीं बॉम्बे हायस्कूल व मराठा हायस्कूल काढून तेथें बावीस वर्षें अध्यापन केलें. कर्ते समाजसुधारक म्हणून त्यांची ख्याति होती. वेदोक्त धर्माकडे त्यांचा ओढा असून जातिभेद व खाण्यापिण्याचे निर्बंध यांविरुद्ध ते होते. मूलगामी व स्वतंत्र विचार त्या वेळीं समाजाला न झेपल्यामुळें त्यांची कांहीं काळ उपेक्षाच झाली. क्वचित् प्रसंगीं ते विक्षिप्तहि ठरत. शब्दांच्या व्युत्पत्त्या व भाषाशास्त्रांतील नवे सिद्धांत यांच्या प्रतिपादनास मराठींत त्यांनींच सुरुवात केली. त्यांचीं 'विधवा–विवाह शास्त्र कीं अशास्त्र ?', 'मराठ्यासंबंधीं चार उद्गार', 'ब्राह्मण व ब्राह्मणधर्म' 'व्रात्यस्तोम' इत्यादि पुस्तकें प्रसिद्ध आहेत.

राजारामशास्त्री यांचा जन्म शके १७७२ मध्यें राजापूर तालुक्यांत झाला. यांच्या घराण्याचें मूळचें नांव 'राऊत' असें होतें. कोणी एक पुरुष पेशव्यांकडे बारगीर असून तो चाबूकस्वार व अश्वविद्यानिपुण होता. म्हणून हें नांव यांच्या घराण्यास होतें. पुढें राजारामशास्त्री नांवारूपास येऊन त्यांची नेमणूक सेंट झेवियर कॉलेजांत संस्कृतचे प्रोफेसर म्हणून झाली. स्वतः पदवीधर नसतांना त्यांनीं अंगच्या गुणांवर ही कामगिरी सुमारें तीस वर्षें चांगल्या रीतीनें पार पाडली. सन १८८४ मध्यें 'बॉंबे हायस्कूल' नांवाची जी संस्था मुंबईस निघाली तिच्या संस्थापकांत राजारामशास्त्री हे एक होते. शास्त्रीबोवांनीं आपल्या विचारांच्या प्रचारासाठीं 'वार्ताहार' नांवाचें एक मासिक कांहीं दिवस काढलें होतें. भाषाशास्त्रावरहि शास्त्रीबोवांचें लिखाण अत्यंत महत्त्वाचें आहे. 'मराठ्यांविषयीं चार शब्द' यासारखे ऐतिहासिक लेखहि यांनीं लिहिलेले आहेत.

—४ जानेवारी १९०८

## पौष शु. २ श्रीनृसिंहसरस्वतींचा जन्म !

चौदाव्या शतकांत पौष शु. २ या दिवशीं दत्त सांप्रदायांतील प्रसिद्ध पुरुष श्रीनृसिंहसरस्वती यांचा जन्म झाला.

शिव आणि विष्णु यांची उपासना एकरूपानें करणाऱ्या दत्तसांप्रदायानें महाराष्ट्रांत संस्कृतीप्रसाराचें कार्य चांगलेंच केलें आहे. श्रीपाद श्रीवल्लभांच्यानंतर नृसिंहसरस्वतींचा अवतार झाला. श्रीपाद श्रीवल्लभांनीं कुरवपुरास अंबिका नांवाच्या स्त्रीस आशीर्वाद दिला होता कीं, "पुढील जन्मीं तुला अलौकिक पुत्र होईल." ही अंबिकादेवी मरणोत्तर वऱ्हाडांत कारंजगांवीं जन्मास आली. 'जन्म झाला पुढें तियेसी। करंजनगर उत्तरदेशीं। वाजसनेय शाखेसी। विप्रकुळीं जन्मली.' या जन्मीं तिचें नांव अंबाभवानी असें होतें. माधव नांवाच्या धर्मनिष्ठ ब्राह्मणाशीं तिचा विवाह झाला आणि यांच्या पोटीं नृसिंहसरस्वतींचा जन्म झाला. यांचें चरित्र पहिल्यापासूनच अलौकिक अशा चमत्कारांनीं भरून राहिलें आहे. असे सांगतात कीं, "जन्मताच तो बालक। ॐकार शब्द म्हणतसे ऐक." ज्योतिषांनीं याचें भविष्य असे वर्तविलें कीं, 'न होती तयासी गृहिणीसुत। पूज्य होईल त्रिभुवनांत.' ॐ या अक्षराखेरीज दुसरा कोणताहि उच्चार हें बालक करीत नसल्यामुळें सर्वांना चिंता लागून राहिली. परंतु मुंज झाल्यानंतर आईनें पहिली भिक्षा घातली तेव्हां यांनीं 'अग्निमिळे पुरोहित', 'इषेत्वा', 'अग्नि आयाहि' इत्यादि वेदांतील चार मंत्र म्हणून दाखविले. त्यानंतर यांनीं आईच्या आग्रहासाठीं घरच्या घरींच वेदपठण केलें. दुसरीं भावंडें झाल्यावर हे तीर्थयात्रेस निघाले. काशी येथे नृसिंहसरस्वतींनीं खडतर असे तपोनुष्ठान केलें. त्याच ठिकाणीं कृष्णसरस्वती नांवाचे एक तपोनिष्ठ व अति वृद्ध संन्यासी होते. त्यांच्यापासून यांनीं संन्यासाची दीक्षा घेतली. नृसिंहसरस्वतींचें संपूर्ण चरित्र गुरुचरित्रांत वर्णिलें आहे. हे साक्षात् दत्तांचा अवतार असल्यामुळें यांच्या जीवितांत अनेक अद्भुत आणि चमत्कारिक गोष्टींचा संग्रह झाला आहे. हे नृसिंहसरस्वती शके १३८० मध्यें समाधिस्थ झाले.

शिशिर ऋतु माघ मासीं। असितपक्ष प्रतिपदेसी।
शुक्रवारीं पुण्य दिवशीं। श्रीगुरु बैसले निजानंदीं॥



## पौष शु. ३ " मोंगलांस कृपावंत झाले ! "

शके १६८२ च्या पौष शु. ३ रोजीं राघोबादादा यांनीं निजामशीं उरळी येथें अप्रयोजक असा तह केला.

पानपतच्या युद्धात मराठ्यांचा प्रचंड संहार झाला आणि कलिपुरुष राघोबादादा कचखाऊ निघाले. ही संधि निजामाने चांगलीच साधली. त्यानें कारवाया सुरू करून मराठ्यांचे मुलूख घेण्यास आरंभ केला. 'अविंधानें लबाडी केली. त्याचें पारिपत्य शीघ्रच घडेल' या विश्वासावर निजामास तोड देण्याची तयारी मराठ्यांनीं जोराची केली. उद्‌गीरच्या लढाईत गेलेला प्रांत परत मिळविण्यासाठीं निजामाची धडपड होती. पानपतावर मुख्य फौजा बुडाल्या, व नानासाहेब दिवंगत झाले यामुळें निजामास पुरतेंच फावलें. माधवराव पेशवे व रघुनाथराव दादा दसऱ्याच्या मुहूर्तावर बाहेर पडले. गोपाळराव पटवर्धन, बापूजी नाईक, विसाजी कृष्ण, शहाजी भोसले, विठ्ठल शिवदेव, नारो शंकर, दमाजी गायकवाड, शिंदे, प्रतिनिधि, इत्यादि सर्व सरदार जमा होऊन सत्तर हजार फौज एकत्र झाली. नागपूरकर जानोजी भोसलेहि सामील झाले. युद्धाची झोंबी सुरू झाली. " मोंगल अगदीं हैराण व गार झाला. त्यास असा मार कधीं झाला नाहीं. त्यांचे घोडें, माणूस आठशेपर्यंत ठार, खेरीज जखमी हजार दोन हजार, आमच्या फौजा भारी झाल्या आहेत. श्रीमंतांचे प्रारब्ध उत्तम आहे." अशी स्थिति असली तरी सुद्धां मोंगलांच्या प्रलयामुळें जनता त्रस्त झाली. मराठ्यांना अंतिम यशाची खात्री नव्हती. कारण " दादासाहेबांचें अवशीस बोलणें एक, आणि पहांटेस एक असें आहे. कोणाचे मनांत युद्ध करावेसे नाहीं. सर्वांचें एकचित्त असल्यास पारिपत्य करणें अगाध नाहीं. परतु बहुनायकी.... उभयतां श्रीमंतांचें चित्त शुद्ध नाहीं. दरबार नासलें आहे. मोंगलानें मातबर झुंजे केलीं. दौलताबाद, नगर, हिवरें, श्रीगोंदें व भुलेश्वर या ठिकाणीं चांगलीं युद्धें झालीं.... " अशा प्रकारें विजयाची खात्री असतांहि विचित्र योगेंकरून दादासाहेबांनीं निजामशीं तह करून हातचें यश दवडलें. " दादासाहेब भोळा सदाशिव, मोंगलांस कृपावंत झाले–"

—२९ डिसेंबर १७६१

## पौष शु. ४ रामचंद्र–बिभीषण–भेट !

पौष शु. ४ या दिवशीं लंकेचा राजा रावण याचा धाकटा भाऊ बिभीषण आणि रामचंद्र यांची भेट झाली.

लंकेला आग लावून मारुति गेल्यानंतर रावण पुढें काय करावें या विचारांत असतां बिभीषणानें सुचविले— "राम धर्मानें लढत आहे. तेव्हां युद्धाग्नि पेटण्यापूर्वीच त्याची धर्मपत्नी परत करावी." पण मदोन्मत्त झालेला रावण, कुंभकर्ण, इंद्रजित् यांना हा सल्ला काय म्हणून पसंत पडावा ? शेवटीं "बंधो, धर्माचा मार्ग सोडून आपण वागत आहांत, नीतीचें आणि हिताचें बोलणे तुम्हांला रुचत नाहीं" असें म्हणून बिभीषण तडक रामाकडे येण्यास निघाला. उत्तम अलंकार घातलेला, गदा, खड्ग, आदि आयुधें घेतलेला राक्षस पाहतांच वानरसैन्यांत गडबड उडाली, परंतु बिभीषणानें समजाविलें, — 'वानरांनो, मरणाऱ्याला जसे औषध रुचत नाहीं, तसेंच माझा उपदेश रावणास पचला नाहीं, आज मी रामचंद्रास शरण आलों आहें. —" ही वार्ता ऐकून सुग्रीवादि वानरांचा बिभीषणावर विश्वास बसला नाहीं; पण रामचंद्रांनीं म्हटलें, "सुग्रीवा, शरणागताला अभय द्यावें. त्याचा त्याग करूं नकोस, मग तो बिभीषण असो वा रावण असो." त्यानंतर बिभीषण पुढें झाला आणि त्यानें रामाच्या पायांवर डोके ठेवून 'आत्मनिवेदन' केलें. रावणाच्या सामर्थ्याचेंहि खरें वर्णन त्यानें केलें. आणि म्हटलें, — "लंकेवर हल्ला करून राक्षसांचा नाश करण्यास मी तुम्हांस जिवापाड साह्य करीन." आणि यानंतर राम-बिभीषण यांनीं एकमेकांना आलिंगन दिलें. रामाज्ञेवरून लक्ष्मणानें समुद्राचें पाणी आणलें. तें घेऊन राम बोलले — "रावणाला प्रहस्त इंद्रजितासह ठार करून तुला लंकेच्या राज्यावर बसवीन. हें पहा आतांच राज्याभिषेक करतों. —"

तेव्हां सर्व वानरांनीं 'धन्य राजा रामचंद्र' म्हणून रामचंद्राच्या औदार्याचा जयघोष केला. या राज्याभिषेकानंतर राम, लक्ष्मण, सुग्रीव, बिभीषण, अंगद, हनुमान, इत्यादि लोक समुद्र कसा ओलांडावा याचा विचार करण्यास बसले. आणि त्या दृष्टीनें तयारीस प्रारंभ झाला.



## पौष शु. ५ तैमूरलंगाची भारतावर स्वारी !

शके १२७० च्या पौष शु. ५ रोजीं मनुष्यजातीचा शत्रु म्हणून प्रसिद्ध असलेला तैमूरलंग'यानें हिंदुस्थानवर स्वारी करून दिल्ली जिकली !

तैमूरलंग जातीनें तुर्क असून त्याच्या ठिकाणीं तीव्र बुद्धि व अचाट धाडस या गुणांचें वास्तव्य होतें. पूर्वायुष्यांत अनेक प्रकारच्या संकटांना तोंड देऊन हा ऐश्वर्यास चढला. आपल्या जीवितांत यानें एकंदर पस्तीस स्वाऱ्या केल्या. सर्व जगावर स्वामित्व असावे ही याची जबर इच्छा. अफगाणिस्तान ताब्यांत आल्याबरोबर याची दृष्टि 'सुवर्णमय भारता' कडे वळली. तैमूरच्या सहकाऱ्यांत मतभेद झाले तरी त्यानें स्वारी निश्चित केली. तो आत्मचरित्रांत लिहितो, "हिंदुस्थानच्या काफर लोकांवर स्वारी करून त्यांस इस्लामी धर्मात आणावे, त्यांचीं मंदिरें व मूर्ति नाहींशा कराव्या, आणि 'गाझी' हें सन्मान्य नांव मिळवावें, अशी माझी फार इच्छा आहे." याप्रमाणें शके १२७० मध्यें तैमूर समर्कंदहून हिंदुस्थानांत येण्यास निघाला. चिनाब व रावी यांच्या संगमावरील सर्व लोकांना यानें कापून काढिलें. अनेक ठिकाणीं त्यानें भयंकर कत्तली केल्या आणि थोड्याच अवधींत याची धाड पानपतावरून दिल्लीवर आली. दिल्लीचा सुलतान महंमूदशहा व त्याचा वजीर मल्लू इक्बालखान यांनींहि तयारी केली. अल्लाची प्रार्थना करून तैमूरने युद्धास सुरुवात केली. यांत महंमूदचा पराभव झाला. तैमूरकडे दिल्लीचे बादशाही तख्त आले. तैमूरच्या लोकांनीं या वेळीं केलेली लूट व कत्तल यास इतिहासांत तोड नाहीं. "रस्त्यांतून जाण्यास मार्ग नाहीं इतक्या प्रेतांच्या राशी शहरभर पसरल्या. हिरे, माणकें, मोत्यें, सोनें, चांदी, वगैरे लूट किती जमा झाली याची गणति नाहीं. पकड, लूट, हाणमार यांशिवाय कोणासच कांहीं सुचत नव्हतें." तैमूरला या प्रकाराबद्दल वाईट वाटलें नाहीं. त्यानें ईश्वरास प्रार्थना केली, "देवा ! हिंदुस्थानांतील माझी कामगिरी त्वां सिद्धीस नेलीस. काफर लोकांशीं लढून परलोकसाधन करावें, आणि संपत्ति लुटावी हीं दोनहि कार्यें पूर्ण झालीं. धर्माकरितां लूट करणें हें मुसलमानांचें बाळकडूच आहे."

— १४ डिसेंबर १३४८

**पौष शु. ६** **न्या. माधवराव रानडे यांचा जन्म !**

शके १७६४ च्या पौष शु. ६ रोजीं हिंदुस्थानांतील प्रसिद्ध राजकारणी, समाजसुधारक, दूरदृष्टीचे विवेचक, अर्थशास्त्रज्ञ व स्वतंत्र भारताचे द्रष्टे न्यायमूर्ति माधव गोविंद रानडे यांचा जन्म झाला.

पेशवाईच्या अखेरीस कोंकणांतील मोभार पाचोरी गांवाहून यांचें घराणें देशावर आलें. माधवरावांचे निपणजे भगवंतराव यांनीं पंढरपुरास वास्तव्य करून आपला जम बसविला. भगवंतरावांचा मुलगा भास्कर आप्पा यांनीं आपला ज्योतिषाचा धंदा सोडून शिपाईगिरींत नांव कमाविलें. यांचे चिरंजीव अमृतराव ; आणि यांचे चिरंजीव म्हणजे माधवरावांचे वडील गोविंदराव. हे अहमदनगर जिल्ह्यांतील दुय्यम कलेक्टरच्या हाताखालीं कारकून होते.

माधवरावांच्या बालपणींची एक विलक्षण घटना नमूद करण्यासारखी आहे. त्यांची मातुःश्री गोपिकाबाई ही आपल्या तीन वर्षांच्या लहानग्या माधवास घेऊन निफाडहून कोल्हापुरास निघाली होती. त्या वेळीं दळणवळणाचीं साधनें आजच्यासारखीं नव्हतीं. गोपिकाबाई बैलगाडीनेंच निघाल्या होत्या. दिवसभर विश्रांति घेऊन रात्रीचा प्रवास त्या वेळीं सुखकर होत असे. मार्गात एक घाट होता, त्यांतून शिळोप्याच्या सुमारास ‘ माधवा ’चा प्रवास सुरू झाला. डोंगराच्या थंड हवेमुळें गाडींतील सर्व मंडळींना झोंप लागली. उतरणीवरून बैल भरधांव पळत होते. या वेळीं पांघरुणांत गुरफटलेले माधवराव एखाद्या गांठोड्याप्रमाणें खालीं पडले. कोणालाहि याचा मागमूस नव्हता. वेळ रात्रीची होती. निर्मनुष्य प्रदेश असल्यामुळें माधवरावांचा चरित्रक्रम येथेंच आटोपण्याची वेळ आली होती. परंतु या माधवाच्या हातून अलौकिक कामगिरी व्हावयाची असल्यामुळें हा भयानक प्रसंग टळला. त्यांचे चुलते घोड्यावरून येत होते. कोणा मुलाच्या रडण्याचा आवाज आला म्हणून ते पाहतात तों लहानगा माधव ! “ मोठी खैर झाली ” म्हणून त्यांनीं त्याला उचलून घेतलें. याच माधवानें पुढें अलौकिक पराक्रम केला. त्यांनीं आपल्या अद्वितीय विद्वत्तेनें, धोरणानें, कर्तबगारीनें राष्ट्राला नवें वळण लाविलें.

— १८ जानेवारी १८४२

## पौष शु. ७

## ( १ ) " त्याच स्थानीं मोल देउनी स्वातंत्र्याच्या नरडीचें ! "

शके १७२४ च्या पौष शु. ७ रोजीं प्रसिद्ध असा वसईचा तह होऊन त्या दिवशीं बाजीराव इंग्रजांना सर्वस्वीं गुलाम बनला व मराठी राज्याच्या काळजाचीं इंग्रजांच्या मध्यस्थीनें अनेक शकलें झालीं.

यशवंतराव होळकरानें पुण्यावर चाल केली तेव्हां दुसरा बाजीराव रायगड, महाड या ठिकाणीं निघून गेला. त्या वेळीं होळकरांनीं विनंति केली —

" धनी गादिचे आपण, आम्ही चाकर पायाचे असतां
भिउनी आम्हां, करित ; हमामा सैरावैरा कां पळतां ?
धनीपणानें येऊन मानें, हिशोब घेणे दौलतिचा,
दर्शन द्यावें, धन्य करावें, हीच एक कीं मनिं इच्छा "

परंतु 'सती अहल्येच्या लेकरानें' केलेली ही विनंति बाजीरावास मान्य झाली नाहीं आणि मनांत फार घाबरल्यामुळें तो इंग्रजांच्या जहाजांत बसून ८ डिसेंबरला वसई येथें गेला. ज्या वसईचें ठाणें पूर्वीं चिमाजीअप्पानें मोठा पराक्रम करून घेतलें होतें.

" ह्याच स्थानीं मोल देउनी स्वातंत्र्याच्या नरडीचे
विकत घेतलें नामर्दानें रक्षण अपुल्या देहाचें ! "

त्या वेळीं इकडे पुण्यास अमृतरावांच्या नांवानें कारभार सुरू झाला. होळकरांशीं तह करण्यापेक्षां हातीं आलेल्या बाजीरावाशीं तह करणें अधिक इष्ट म्हणून कर्नल क्लोज हा वसईस गेला आणि त्याच्या तंत्रानें बाजीराव व इंग्रज यांमध्यें पौष शु. ७ ला वसईचा तह झाला. इंग्रजाचें सैन्य पदरीं बाळगावें, त्याच्या खर्चासाठीं इंग्रजांना मुलूख तोडून द्यावा, पेशव्यांनीं इतर युरोपियन पदरीं ठेवूं नयेत. सुरतेवरील ताबा मराठयांनीं सोडावा, इत्यादि कलमें या तहांत होतीं. या तहानें बाजीराव पेशवे इंग्रजांच्या हातांतील बाहुलें बनले. शिंदे, होळकर, भोंसले, यांना परम दुःख झालें :—" धन्याचें धनीपण गमावल्याचें धन्याला दुःख झालें नाहीं, इतकें चाकरांचें चाकरपण गमावल्यानें चाकरास झालें ! "

— ३१ डिसेंबर १८०२

## पौष शु. ७ (२) महर्षि वि. रा. शिंदे यांचें निधन !

शके १८६५ च्या पौष शु. ७ रोजीं सुप्रसिद्ध अस्पृश्यतानिवारक; समाजशास्त्रज्ञ, भाषाशास्त्रज्ञ व ध्येयवादी, त्यागी पुरुष महर्षि विठ्ठल रामजी शिंदे यांचे निधन झालें.

शिंदे यांचा जन्म जमखंडी येथें झाला असून तेथूनच हे मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाले. त्यानंतर पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजांत अभ्यास करून हे बी. ए. झाले. पहिल्या एल्‌एल्. बी. च्या परीक्षेनंतर शिंदे यांचा ओढा प्रार्थनासमाजाकडे वळला व हे त्या संस्थेचे प्रचारक झाले. याच कार्यासाठीं यांना 'युनिटेरियन' शिष्यवृत्ति मिळून हे ऑक्सफर्ड येथील मॅंचेस्टर कॉलेजांत तुलनात्मक धर्मांचे अध्ययन करण्यास गेले. लिव्हरपूल व ॲमस्टरडॅम या ठिकाणीं भरलेल्या युनिटेरियन परिषदेस हे हजर होते. या वेळीं यांनीं लिबरल रिलिजन इन् इंडिया हा निबंध वाचला होता. मायदेशीं परत आल्यावर यांनीं प्रार्थनासमाजाच्या प्रचारासाठीं तीन वेळां आसेतुहिमाचल प्रवास केला. ब्रह्मदेशांतहि हे जाऊन आले होते. यानंतर यांचें लक्ष अस्पृश्यांच्या प्रश्नाकडे वळलें आणि यांनीं सन १९०६ मध्यें 'डिप्रेस्ड क्लासेस मिशन सोसायटी ऑफ इंडिया ऊर्फ भारतीय निराश्रित साहाय्यकारी मंडळी' या संस्थेची स्थापना केली. सर्व हिंदुस्थानांत या संस्थेच्या शाखा सुरू झाल्या. सर तुकोजी होळकर व मुंबई सरकार यांच्या मदतीनें एक लाख रुपये जमवून पुण्यास विद्यार्थी-वसतिगृह व अहल्याश्रम यांसारख्या इमारती यांनीं उभ्या केल्या. यांची वृत्ति पक्की राष्ट्रीय बाण्याची होती. म. गांधींनीं यांना कॉंग्रेस वर्किंग कमिटींत घेतलें होतें. सन १९३० च्या चळवळींत भाग घेतल्याबद्दल यांना सहा महिन्यांची शिक्षाहि झाली होती. समाजांत आमूलाग्र सुधारणा व्हावी म्हणून यांनीं रात्रंदिवस खटपट केली. यांच्या ध्येयवादी व त्यागी वृत्तीमुळें लोक यांना महर्षि म्हणत. इतिहास व भाषा यांचा अभ्यासहि शिंदे यांनीं उत्कृष्टपणें केला होता. यांच्या लिहिण्याबोलण्यांतहि माहितीचा सूक्ष्मपणा व ठसकेपणा आढळत असे. यांनीं लिहिलेले आत्मचरित्र प्रसिद्ध आहे.

— २ जानेवारी १९४४

## पौष शु. ८ ( १ ) पानपतचा अखेरचा संग्राम !

शके १६८३ च्या पौष शु. ८ या दिवशीं पानिपतचा शेवटचा घनघोर संग्राम होऊन सदाशिवरावभाऊ पेशवे यांचा अंत झाला व लढाई थांबली.

या दिवशीं सूर्योदयापूर्वी मरूं वा मारूं या भावनेनें मराठ्यांची सेना वीरश्रीनें मैदानावर आली. श्रमिंत भाऊसाहेब व विश्वासराव घोड्यावर बसून निशाणा-कडे निघाले. सर्वांच्या अंगांत त्वेष संचारत होता. लढाईचें तोंड भारी लागून मारामारी, खणाखणी, एक प्रहरपर्यंत चालू होती. भाऊसाहेब व विश्वासराव बारा वाजण्याच्या सुमारास घोड्यावर स्वार होऊन स्वतः हल्ल्यांत पुढें झाले. मराठ्यांकडे जयश्री चालून येत होती तों अहमदशहाच्या नशिबानें विश्वासरावास गोळी लागून ते ठार झाले. नानासाहेबांचें निधान हरपलें. भाऊसाहेबांनीं बहुत विलाप केला आणि 'गिलच्यास खाशानिशीं मारीन' म्हणून भाऊसाहेब पुढें झाले. जरिपटक्याजवळ भाऊसाहेबांच्यावर गिलच्यांचा मारा पडला होता तिकडे जनकोजी धांवला. भाऊसाहेबांचा चेहरा लाल झाला असून धुळीनें भरला होता, तरवार रक्तानें न्हाली असल्यानें चमकत नव्हती, त्यांनीं जनकोजीला शाबासकी दिली. आतां चार घटका दिवस राहिला होता. दहा हजार ताजा दमाचे गिलचे व रोहिले आणि पांच हजार थकलेले पण निर्वाणीच्या शूरत्वानें लढणारे मराठे यांचेमधील हा अखेरचा सामना फारच भयंकर झाला. चारी बाजूंनीं तरवार उसळत होती. भाऊसाहेब दिसतां दिसतां दिसेनासे झाले. तेव्हां जरिपटक्याच्या निशाणाचें घोडें इकडे तिकडे भटकूं लागले. शेवटीं घोड्यावरील निशाण धरणारा मनुष्य ठार झाला. तेव्हां निशाण जमिनीवर पडलें. लढाई बंद झाली. पानिपतचा संग्राम समाप्त झाला.

या युद्धांत मराठ्यांची एक सबंध पिढीच्या पिढी कापली गेली. मराठ्यांचा पराजय झाला तरी त्यांतहि शत्रूला जबरदस्त धक्का बसल्यामुळें तो एक प्रकारचा विजयच होता. "Even the battle of panipat was a triumph and glory for Marathas" असा निर्वाळा इंग्रज लेखकहि देतात.

— १४ जानेवारी १७६१

## पौष शु. ८ ( २ ) श्रीविष्णुदास माहूरकरांची समाधि !

शके १८३९ च्या पौष शु. ८ रोजीं माहूर येथील प्रसिद्ध सत्पुरुष श्री. विष्णुदास कवि यांनीं समाधि घेतली.

यांचा जन्म सातारा येथील धांदरफळे याच्या घराण्यांत झाला. यांना लहानपणापासूनच भगवद्भक्तीची आवड होती. लग्न झाल्यानंतर एका वर्षानें हे दत्तदर्शनासाठीं घर सोडून निघाले. तीर्थयात्रा करीत करीत हे दक्षिणेंतील विरूपाक्ष येथील मठांत येऊन श्रीमच्छंकराचार्य यांच्या चरणीं लीन झाले. यांचा सद्भाव पाहून स्वामींनीं याना विष्णुदास हें नांव दिलें. शेवटीं तीर्थक्षेत्रें करीत करीत हे श्रीक्षेत्र मातापूर येथें आले. पुढें गोदावरी तीरावर चासर येथें यांना श्रीसरस्वतीची कृपा प्राप्त झाली ; त्यानंतर काव्यरचना करीत यांनीं माहूर येथें आपलें वास्तव्य कायम केलें. नंतर परमेश्वराची कृपा झाल्यावर यांचें चित्त शांत झालें. कवित्वाला रसाळपणा प्राप्त झाला. त्यांत अनुभवाचे अमृतमय बोल प्रकट होऊं लागले. विष्णुकवींच्या या भ्रमणामुळें घरीं पत्नी राधादेवी हिची फारच कठीण अवस्था झाली होती. तिचें उत्कृष्ट चित्रण विष्णुकवींनीं आपल्या आत्मचरित्रपर पोवाड्यांत रेखाटलें आहे. घरच्या मंडळींना विष्णुकवींचा शोध लागला. पुन्हा त्यांनीं प्रपंचास सुरुवात केली. परंतु त्याचें वैभव थोडा वेळच टिकलें. पत्नीनिधनानंतर विष्णुदास विरक्त बनले आणि आदि जननी श्रीरेणुकादेवी हिची उपासना त्यांनीं मोठ्या कळकळीनें सुरू केली. परमेश्वरास आई संबोधून केलेली वात्सल्यभक्ति हा यांच्या कवितेचा विशेष आहे. त्यांची काव्यपद्धति त्यांच्याच शब्दांत अशी सांगतां येईल —

“आरस नाहीं, सरस आहे खिरस गाईचा ।
मिळेना बहु महागाईचा ॥
घ्यावा मासला मधूर केवळ साखरसाईचा ।
आहे बहु तुमच्या सोईचा ॥ ”

यांचें विस्तृत चरित्र व कवितेचे दोन खंड यांचे भाचे व सच्छिष्य श्री. नरहरशास्त्री खरशीकर यांनीं प्रसिद्ध केले आहेत.

— २० जानेवारी १९१८

## पौष शु. ९ पानपतच्या संग्रामानंतरची निरवानिरव !

शके १६८२ च्या पौष शु. ९ या दिवशीं आदल्याच दिवशीं पानिपतच्या भयंकर संहारांत पतन पावलेले यशवंतराव पवार, विश्वासराव, भाऊसाहेब, तुकोजी शिंदे, संताजी वाघ, आदि लोकांच्या शवांना अग्निसंस्कार देण्यांत आले.

पौष शु. ८ ला भाऊसाहेब पडल्याची वार्ता रणांगणावर पसरतांच मल्हारराव होळकर, विठ्ठल शिवदेव, दमाजी गायकवाड यांनीं पळ काढण्यास सुरुवात केल्यावर सर्वत्र पळापळ सुरू झाली; आणि जेत्यांनीं एक प्रकारच्या आवेशानें सर्व पळणाऱ्यांची कत्तल केली. शेवटीं दमून गेल्यानंतर कत्तल थांबली. दुसऱ्या दिवशीं म्हणजे पौष शु. ९ ला १५ तारखेस मराठ्यांच्या छावणींत जे जिवंत सांपडले त्यांची पुन्हा अत्यंत क्रूरपणें कत्तल झाली. या दिवशीं मोठमोठ्या मराठे सरदारांच्या प्रेतांचा शोध लावावा म्हणून शेषधर पंडित, गणेश पंडित इ. सदाशिवरावभाऊंच्या माहितींतील इसम बरोबर घेऊन स्वतः सुजाउद्दौला घोड्यावर बसून रणभूमीवर फिरत होता.

एका ढिगाऱ्याखालीं प्रेताच्या अंगावर तीनचार रत्ने चमकलीं म्हणून तें वर काढले. पायावरील व पाठीवरील जखमांचे वण पाहून तें सदाशिवरावांचें प्रेत होय असें समजून मंडळींनीं त्यास अग्नि दिला. विश्वासरावांचें प्रेत पाहण्यास दुराणी लष्करांतून आबालवृद्ध जमले होते. पेशव्यांच्या घरांत विश्वासरावाएवढा सुंदर पुरुष झाला नव्हता. त्याचें शव पाहून अहमदशहा अब्दालीहि क्षणभर हळहळला! सुजाउद्दौलाचा सरदार उमरावगीर गोसावी यानें तुकोजी शिंदे, संताजी वाघ, यशवंतराव पवार व विश्वासराव यांचीं प्रेतें तीन लक्ष रुपयांना सोडवून आणून ब्राह्मणांकरवीं त्यांना अग्नि दिला. भरतपूरच्या जाटानेंहि बहुत पैसा खर्च करून लोकांचे प्राण वांचविले.

या पानिपतच्या युद्धांत मराठ्यांची एक सबंध पिढीच्या पिढी कापली गेली. चांदी, सोने, हिरे-माणकें, पांचशें हत्ती, पन्नास हजार घोडे, एक हजार उंट इत्यादि पुष्कळच संपत्ति मराठ्यांच्या छावणींतून अब्दालीस मिळाली.



—१५ जानेवारी १७६१

## पौष शु. १० चिमाजीअप्पांचें निधन !

शके १६६२ च्या पाष शु. १० रोजीं बाळाजी विश्वनाथांचे दुसरे पराक्रमी चिरंजीव चिमाजीअप्पा यांचें निधन झालें.

वडिलांच्याबरोबर हे दिल्लीला गेले होते. थोरल्या बाजीरावांनीं मोंगलांविरुद्ध चढाईचें धोरण स्वीकारले, तेव्हां हे माळवा प्रांतांत मुलुखगिरीवर होते. चिमाजीअप्पांचें नाव वसईच्या युद्धामुळे अमर झालें आहे. सन १७३१ पासूनच पोर्तुगीझ व मराठे यांचा बेबनाव वाढीस लागला. शेवटीं सन १७३८-३९ सालीं मराठयांनीं वसईचा संग्राम चांगलाच गाजविला. वसईवर विजय मिळत नाहींसें पाहून मोठ्या वीरश्रीनें चिमाजी बोलले, "वसई ताब्यांत येत नाहीं. माझा हेतु तर ती घ्यावी असा आहे. तरी तोफ डागून माझें मेलेलें शरीर तरी वसईच्या किल्ल्यांत पडेल असें करा." तेव्हां सर्वांना वीरश्री चढली आणि निकराचा लढा झाल्यावर वसईवर मराठयांचे निशाण लागलें. "या लढाईमुळें यांचें नांव अजरामर झाले आहे. मराठयांच्या इतिहासांत महत्त्वाच्या व अत्यंत जुटीनें केलेल्या लढायांपैकीं ही एक आहे. यांत मराठयांना फिरंग्याचा तीनशें चाळीस गांवे असलेला पाऊणशें मैल लांबीचा पट्टा, वीस किल्ले व पंचवीस लाखांचा दारूगोळा वगैरे साहित्य मिळालें."

त्यानंतर पुढल्या वर्षीं यांनीं दीव, दमण यांमधील रेवदंडा नांवाचें ठिकाण काबीज केलें. या वेळीं त्यांची प्रकृति फारच ढासळली होती. स्वारींतून परत आल्यावर पौष शु. १० रोजीं यांचा अंत झाला. यांची पत्नी अन्नपूर्णाबाई यांच्याबरोबर सती गेली. तिचें वृंदावन पुणें येथें ओंकारेश्वराच्या दारासमोर आहे.

चिमाजीअप्पा हे शूर, धोरणी, मनमिळाऊ व नीतिमान असे होते. चिमाजीअप्पांची इतरहि पराक्रमी कृत्यें प्रसिद्ध आहेत. शाहूच्या आज्ञेवरून सिद्दीसातास यांनींच ठार मारिलें. वसईच्या किल्ल्यांत सापडलेल्या फिरंग्यांच्या मुलीस यांनीं सन्मानानें परत पाठविले ही आख्यायिका यांच्या नीतिमत्तेची साक्ष देते. बाजीरावानें उत्पन्न केलेल्या अनेक प्रकरणांचा निकाल हेच लावीत.

— १७ डिसेंबर १७४०

## पौष शु. ११ — केशवचंद्र सेन यांचें निधन !

शके १८०५ च्या पौष शु. ११ रोजीं ब्राह्मसमाजातील थोर पुरुष, उत्कृष्ट वक्ते, श्रेष्ठ कार्यकर्ते आणि विख्यात लोकसेवक केशवचंद्र सेन यांचें निधन झालें.

यांचें घराणें कट्टें बंगाली वैष्णव होतें; यांच्या आजाचें नांव रामकमल असून प्यारीमोहन व शारदासुंदरी हीं यांच्या मातापितरांचीं नांवें होतीं. शाळेंत असतांना बायबलाच्या वाचनाचा परिणाम यांच्या मनावर विशेष झाला आणि सन १८५७ मध्यें कुलामध्यें रूढ असणाऱ्या वैष्णव सांप्रदायाची दीक्षा न घेतां ब्राह्मसमाजाची त्यांनीं दीक्षा घेतली आणि या कार्यासाठीं स्वतःला वाहून घेतलें व 'इंडियन मिरर' नांवाचें इंग्रजी साप्ताहिक सुरू केलें. सन १८६४ मध्यें त्यांनीं प्रचारासाठीं मुंबई-मद्रासकडे जो दौरा काढला तो त्यांच्या प्रभावी इंग्रजी वक्तृत्वानें फार यशस्वी झाला; परंतु शेवटीं मतभेद झाल्यामुळें त्यांनीं स्वतंत्रपणें 'भारतवर्षीय ब्राह्मसमाज' नांवाची संस्था सन १८६६ मध्यें काढली. त्यानंतर ते इंग्लंडमध्यें गेले. तेथें त्याचा समाजसुधारक म्हणून अत्यंत गौरव झाला. तेथून परत मायदेशीं आल्यावर समाज सुधारण्यासाठीं त्यांनीं अनेक संस्था काढल्या. 'सुलभ समाचार' यासारखीं नियतकालिकें त्यांनीं काढलीं. शेवटीं कांहीं खाजगी गोष्टींवरून यांचे सहकारी फुटून दूर निघाले. त्यांनीं केशवचंद्रावर टीकेचा गहजब केला.

या सर्वांचा परिणाम त्यांच्यावर झाला; आणि त्रस्त झालेल्या मनास विश्रांति मिळावी म्हणून यांनीं ध्यानधारणेसाठीं 'साधनकानन' नांवाची बाग तयार केली, परंतु येथेंहि त्यांना म्हणावी अशी शांति लाभली नाहीं. यांच्या परिवारांतील लोकांनीं स्वतंत्रपणें 'साधारण ब्राह्मसमाज' काढला. त्यामुळें यांच्या मनावर चमत्कारिक परिणाम झाला. तेव्हां यांनीं 'नवविधान' नांवाच्या पंथाची स्थापना केली. "यांच्याइतका प्रचंड व्याप करणारा, रोज नव्या कल्पना काढणारा, नव्या संस्था काढून त्यांच्याकडून कामें करून घेणारा समाजसुधारक अलीकडच्या काळांत क्वचितच सांपडेल." जीवनवेद (आत्मचरित्र) व ब्राह्मधर्माधिष्ठान हे यांचे दोन महत्त्वाचे ग्रंथ होत.

—८ जानेवारी १८८४

## पौष शु. १२ (१) लंकेवरील स्वारीची तयारी !

पौष शु. १२ रोजीं रामचंद्रांच्या नेतृत्वाखालीं वानरसैन्याकरवीं लंकेवर स्वारी करण्यासाठीं समुद्रावर सेतु बांधून पूर्ण झाला.

बिभीषण रामाच्या पक्षास येऊन मिळाला होता. त्याच्या सल्ल्यावरून सामोपचारानें समुद्रास अनुकूल करून घेण्याचा अध्यात्मिक सामर्थ्यानें प्रयत्न रामानें केला, पण तो सफल झाला नाहीं. तेव्हां रामचंद्र क्रोधयुक्त होऊन म्हणाले, " लक्ष्मणा, पाहिलास समुद्राचा गर्विष्ठपणा ! अरे या जगांत कीर्ति वा यश सामोपचारानें मिळणें शक्य नाहीं. सर्वत्र हातीं दंडा उगारून असलेल्या माणसालाच लोक मान देतात. ( सर्वत्रोत्सृष्ट दण्डं च लोकः सत्कुरुते नरम्। ). आण धनुष्य, पाहतों कसा वश होत नाहीं तें. " असें म्हणून रामानें बाणांचा वर्षाव केला. तेव्हां समुद्रानें सेतुबंधनास योग्य असा मार्ग दाखविला आणि अवघ्या पांच दिवसांत मानवी प्रयत्नांच्या बळावर सेतुबंधनाचें काम पूर्ण झालें. त्याचें वर्णन महर्षि वाल्मीकि देतात :—

" हास्तिप्रायान् महाकायाः पाषाणश्च महाबलाः ।
पर्वतांश्च समुत्पाट्य यंत्रैः परिवहन्ति च । " ( युद्ध. २२।५६ )

म्हणजे " मोठमोठ्या हत्तींच्या अंगाएवढे दगड व पर्वतांचे कडे मुळांतून उखडून काढून, मोठे धिप्पाड वानर वीर यंत्रांच्या साह्यानें वाहून आणत होते... कांहीं वानर वीर सूत्र हातीं धरून लांबी मोजण्याचें काम करीत होते, तर कांहीं वीर दण्ड उभे धरून उंची पाहत होते व बाकीचे दगड, माती, झाडेझुडपें आणून भर घालीत होते. "

वानर ही एक मानवी जमात पुढारलेली होती, हें ध्यानीं घेतल्यावर वरील वर्णनांत विस्मयकारक कांहीं न वाटतां शुद्ध मानवी प्रयत्नांचें स्वरूपच दिसून येतें. पौष शु. १२ स शंभर योजनें लांब व दहा योजनें रुंद असा सेतु तयार झाल्यावर तो आकाशांत गंगा दिसते त्याप्रमाणें शोभूं लागला ! आणि वानरसेना त्या सेतूवरून पार होऊं लागली. स्वतः बिभीषण पुढें होऊन शत्रूसमोर उभा राहिला. आणि त्याच्यामागून राम, लक्ष्मण, सुग्रीव आदि लोक जाऊं लागले.

● ● ●

## पौष शु. १२ (२) शेवटचे बाजीराव पेशवे यांचें निधन !

शके १७७३ च्या पौष शु. १२ रोजीं मराठ्याचे शेवटचे पेशवे बाजीराव रघुनाथ हे ब्रह्मावर्त येथें निधन पावले.

पेशवाई समाप्त झाल्यावर बाजीराव ब्रह्मावर्त येथें राहूं लागला. यांच्या नाकर्तेपणामुळें व धरसोडीच्या धोरणामुळें पेशवाईचा अंत सुलभ रीतीनें झाला. माल्कमच्या हातावर राज्याचें दान देऊन यानें पुणें कायमचेंच सोडिलें. ब्रह्मावर्तास याचा काळ शांततेनें जाऊं लागला. "बाजीराव ब्रह्मावर्तास राजैश्वर्यानें राहत, स्नान-संध्या, जेवणखाण, व्रतें-उद्यापनें, मंत्रघोष व जुजबी ऐषआराम अशा सुखवस्तु स्थितींत बाजीरावानें ब्रह्मावर्तास तेहतीस वर्षें काढलीं. तो शरीराने धष्टपुष्ट, काठीनें उंच व चेहऱ्यानें उमदा दिसे.... एकंदरींत पुरुष निष्काळजी व बालिश खरा, स्वशरीरसंरक्षण एवढीच या गृहस्थाची काळजी. यापलीकडे दुसरी जबाबदारी त्यानें ओळखिली नाहीं. व ओळखण्याचें सामर्थ्यहि त्याच्या अंगांत नव्हतें. साम्राज्य, 'तत्संबंधीं राष्ट्राच्या पुढाऱ्यांवरील जबाबदारी, प्रजेचे ऋण, वगैरेची जाणीव या पुरुषाला भासलीच नाहीं." हा अभिप्राय बाजीरावाचें नाकर्तेपण स्पष्ट करण्यास पुरेसा आहे. अशाच अर्थाचे उल्लेख सर्वत्र आढळतात.

"बाजीराव पेशवा रूपानें फार सुंदर आणि प्रौढ आहे, अक्कडबाज नाहीं. तो सुरेख, प्रौढ आणि साधा मनुष्य आहे. बाजीरावाच्या मनाचा मुख्य धर्म भित्रेपणा हा आहे.... आपल्या मनांतील गोष्टी लोकांना कळूं न देण्यांत ते फार पटाईत आहेत.... ते बुद्धिमान नाहींत असें मात्र नाहीं. पैशाच्या देवघेवींत ते फार सचोटीनें वागतात.... ते अतिशय' देवभोळेपणाचे बंदे गुलाम आहेत. त्यांचें अर्धें आयुष्य उपासतापास, जपध्यान, पाठप्रार्थना, आणि यात्रा यांत व स्नानसंध्या, पूजाअर्चा, होमहवन यांत जातें. उत्पन्नापैकीं बराचसा भाग मंत्रतंत्र प्रकरणांत खर्च होतो आणि हे कांहीं करूं लागले तरी मुहूर्त, शकुन, अपशकुन पाहत असतात." कन्याविक्रयाविरुद्ध हुकूम काढणें ही एकच गोष्ट बाजीरावांच्या जीवितांत चांगली दिसते.

—१४ जानेवारी १८५१

## पौष. शु. १३ केशवस्वामींचें निधन !

शके १६०४ च्या पौष शु. १३ रोजीं समर्थपंचायतनांतील प्रसिद्ध सत्पुरुष भागानगरकर केशवस्वामी हे समाधिस्थ झाले !

महाराष्ट्रांतील संतांत तीन पंचायतनें प्रसिद्ध आहेत. निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान, मुक्ताबाई व चांगदेव हे ज्ञानेश्वर–पंचायतन, एकाजनार्दन, रामजनार्दन, जनी-जनार्दन, विठा रेणुकानंद व दासोपंत हे एकनाथ–पंचायतन व रामदास, जयरामस्वामी, रंगनाथस्वामी, केशवस्वामी व आनंदमूर्ति हे रामदास–पंचायतन. या शेवटच्या पंचायतनांतील केशवस्वामीखेरीज इतर सर्व संत सातारा प्रांतांत शेजारींशेजारीं राहत असत, त्यामुळें त्यांच्या वारंवार गांठी–भेटी होत असत; परंतु केशवस्वामींचें वास्तव्य मात्र हैद्राबादेस असे. केशवस्वामी मूळचे कल्याणीचे. आत्मारामपंत कुलकर्णी व गंगाबाई या सच्छील दांपत्याच्या पोटीं केशवस्वामींचा जन्म झाला. असें सांगतात कीं, केशवस्वामी वयाच्या पांचव्या वर्षापर्यंत बोलतच नव्हते. परंतु पुढें श्रीमत् आचार्य यांच्या कृपेवरून केशवस्वामी बोलूं लागले. समर्थांप्रमाणें यांनाहि गाण्याची अत्यंत आवड होती. केशवस्वामी 'स्वामी' असले तरी प्रपंची होते. ते व त्यांची पत्नी नेहमीं भगवद्भक्तींत दंग असत. जनतेंत धर्मश्रद्धा निर्माण करण्यासाठीं, हे स्वतः कविता रचून कीर्तनें करीत असत. त्यांच्या पद्यांतून वरवर शृंगाराची छटा असे. गीतगोविदकर्ते जयदेव कवि यांचेच अवतार म्हणूनहि लोक यांना समजत. यांच्या काव्याबद्दल राजाराम प्रासादी भक्तमंजरीमालेंत म्हणतात,

"जगत्रें जाली कीर्ति । धन्य कृपाळु केशवमूर्ति ॥
उद्धारावया यया जगतीं । जयदेव कवि अवतरला ॥
पूर्वी शृंगार देवाचा । वर्णितां लाचावली वाचा ।
तोचि अभ्यास पडता साचा । अनुकार कवनाचा तोचि पै ॥
अध्यात्मयुक्त शृंगारिक । भाषण जयाचें नेमक ।
जाहलें काव्य तेंचि चोख । प्रासादिक सकल जनां । "

केशवस्वामींची कविता श्री. नरहरशास्त्री खरशीकर यांनीं प्रसिद्ध केली आहे.

— १ जानेवारी १६८३

## पौष शु. १४ "श्रीमंतांच्या राज्याचा आळा गेला!"

शके १७१९ च्या पौष शु. १४ रोजीं मराठेशाहीच्या अखेरच्या काळांतील थोर मुत्सद्दी नाना फडणीस यांना बाजीरावाच्या मदतीनें दौलतराव शिंदे यांनीं कैद केलें व त्यांची सर्व मालमत्ता जप्त केली.

या वेळीं मराठी राज्याचे सर्वच ग्रह फिरले होते. महादजी शिंदे व हरिपंत फडके हे नानांचे डावे-उजवे हात कालाच्या ओघाबरोबर निघून गेले होते. सवाई माधवरावाच्या आत्महत्येमुळें मराठेशाहीवर मृत्युयोगच ओढवला होता. पेशवाईचे धनी रावबाजी अगदींच कमकुवत होते. शिंदे यांच्या मदतीनें त्यांनीं नानाविरुद्ध कारस्थानें करण्यास सुरुवात केली. बाळोबा पागनीस, परशुराम-भाऊ पटवर्धन हेहि नानांच्या विरुद्ध झाले. तेव्हां नाना महाडास गेले आणि पैसा व बुद्धि या जोरावर त्यांनीं तेथें मोठे कारस्थान उभें केलें. शिंदे यांनाहि आपल्याकडे फितवून घेतलें. आणि बाजीरावास पेशवा नेमून नानांनीं राज्याकार-भार पुन्हा हातीं घेतला. शिंद्यांनीं कपट-कारस्थान केलें. भोजनासाठीं म्हणून नाना कांहीं साथीदार बरोबर घेऊन शिंदे यांच्या भेटीस गेले. त्या वेळीं मुकीर या इटालियन सरदारानें दौलतराव शिंदे यांच्या सांगण्यावरून नानांस कैद केले. "नानांच्या लोकांनीं बराच दंगा केला. पण त्यांस शिंद्यांच्या फौजेने उधळून लाविलें. या बनावानें पुण्यांत मोठा हाहाःकार उडाला. लोकांचीं तोंडें काळीं ठिक्कर पडलीं. पेशवाईचा लय होऊन आजपासून बेबंदशाहीसच सुरुवात झाली असें सर्वांना वाटलें." दुसऱ्या दिवशीं म्हणजे पौष शु. १४ रोजीं नाना व त्यांचे साथीदार यांच्या घराची जप्ती झाली! हीं सर्व चिन्हे पेशवाई समाप्त होण्याचीं होतीं. "नानांस कैदेत घालण्याचा विधि समाप्तीस गेला. याउपरीं श्रीमंतांच्या राज्याचा आळा गेला. आतां जो जबरदस्त त्याचें पागोटे वांचेल." अशी स्थिति निर्माण झाली. नानांना अहमदनगरच्या किल्ल्यांत कैदेंत राहावे लागलें. पुढें बाजीरावानें आपण निरपराध असल्याचें नानांस सांगितले. "शिंद्यानें तुम्हांस कैदेत टाकले. मी नव्हे. मी तुम्हांस बापाप्रमाणें मानतो." इत्यादि मिठास भाषण बाजीरावानें केलें. पुढें नानांची सुटका झाली.

—१ जानेवारी १७९८

## पौष शु. १५ डॉ. शरच्चंद्र चतर्जी यांचें निधन !

शके १८५९ च्या पौष शु. १५ रोजीं आंतरराष्ट्रीय कीर्ति मिळविणारे बंगालचे विख्यात कादंबरीकार डॉ. शरच्चंद्र चतर्जी यांचें निधन झालें.

कविश्रेष्ठ रवीन्द्रनाथ ठाकूर हे अमीरउमरावांचे कवि होते. पण बंगालमधील दलित समाजाचें दर्शन घडविणारा श्रेष्ठ कादंबरीकार म्हणून चतर्जींचा लौकिक आहे. चतर्जींचें बहुतेक सर्व आयुष्य दारिद्र्याशीं झगडण्यांत गेलें. घरांतून बाहेर पडून संन्यासी होऊन हे अनेक ठिकाणीं फिरले. अनेक दलित, पतित व्यक्तींचें निरीक्षण केलें आणि वयाच्या सत्ताविसाव्या वर्षी गृहहीन, धनहीन व उदास अशा स्थितींत शरच्चंद्र ब्रह्मदेशांत गेले. तेथेंहि अनेक आपत्तींना तोंड देत देत एका सरकारी हपिसांत लहानशा पगारावर कारकून म्हणून राहिले, आणि आपल्या संगीतप्रियतेमुळें अधिकाऱ्यांची कृपा संपादन करून थोडी शांतता मिळवली व त्यांच्याच ग्रंथालयांतील मिल्ल, कॅन्ट, हेगेल, आदि तत्त्ववेत्त्यांचीं पुस्तकें त्यांनीं वाचून काढली. रवींद्रांच्या उत्तमोत्तम ग्रंथांचा अभ्यास केला. त्यानंतर कलकत्त्याच्या 'यमुना' मासिकांत अनेक मित्रांच्या आग्रहावरून त्यांचीं एक गोष्ट प्रसिद्ध झाली आणि त्यांना कीर्ति मिळाली. बडी दिदी, परिणीता, चंद्रनाथ, श्रीकांत, दत्ता या कादंबऱ्यांमुळे त्यांचें नांव सबंध बंगल्यांत प्रसिद्ध झालें. 'पाथेर दबी' ही यांची सुप्रसिद्ध कादंबरी. ही आणि तिचें मराठी भाषांतर 'भारती' कित्येक दिवस सरकारनें जप्त केले होतें.

समाजांतील पतित व्यक्तींच्या अंतःकरणांतील हळुवार भावना अति सूक्ष्मपणें रेखाटून त्यांचे स्वभाव साकार आणि सगुण करणे हें त्यांच्या कादंबऱ्यांचें वैशिष्ट्य आहे. समाजांतील सर्व थरांतील पात्रांचें उत्कृष्ट स्वभावरेखन यांच्या वाङ्मयांत सांपडतें. चतर्जी म्हणत, – "मी समाजासाठीं लिहितो, आणि रवीन्द्रबाबू माझ्यासाठीं लिहितात." यांच्या चाळीस-पंचेचाळीस कादंबऱ्यांपैकीं बऱ्याच कादंबऱ्यांची इंग्रजी, फ्रेंच, हिंदी, गुजराथी, मराठी आदि भाषांतून भाषांतरें झालीं आहेत. 'देवदास,' 'काशिनाथ,' 'सव्यसाची,' 'बडी दिदी' 'छोटाभाई' इत्यादि चित्रपटांतील कथानकें यांचींच आहेत.

— १६ जानेवारी १९३८

**पौष व. १** **सोरटी सोमनाथाचा विध्वंस !**

शके ९४८ च्या पौष व. १ रोजीं गझनीच्या महमुदानें सोरटी सोमनाथ या देवस्थानावर स्वारी केली आणि दैवत छिन्नभिन्न करून अगणित लूट नेली.

महमुदानें एकूण सतरा स्वाऱ्या हिंदुस्थानावर केल्या. त्यांतील सोरटी सोमनाथावरील स्वारी विशेष महत्त्वाची आहे. काठेवाड द्वीपकल्पास पूर्वी सुराष्ट्र ऊर्फ सौराष्ट्र असें म्हणत असत. त्याच्या दक्षिण टोकास लहानशा द्वीपकल्पावर सोमनाथाचें एक पवित्र व प्रख्यात असे देवस्थान होतें. सौराष्ट्र सोमनाथ' याचा अपभ्रंश सोरटी सोमनाथ असा झाला आहे. हें देवस्थान अत्यंत संपन्न असे असून येथे दरवर्षी असंख्य यात्रा जमत असे. हजार ब्राह्मण सोमनाथाच्या पूजेसाठीं होते. या बलाढ्य देवस्थानाचा नाश करावा असा बेत महमुदाने केला. अत्यंत अवघड परिस्थितींत तीस हजार स्वार, तीस हजार उंट इत्यादि सामग्री घेऊन महमूद हिंदुस्थानांत आला. सोमनाथाच्या देवालयाभोंवतीं भक्कम असा तट होता. पौष व. १ शुक्रवार रोजीं 'अल्ला हो अकबर' अशी आरोळी ठोकून महमुदानें निकराचा हल्ला चढविला. आसपासच्या रजपूत वीरांनीं निकरानें तोंड दिलें. पण कांहीं, उपयोग न होऊन देवालयात महमुदाचा प्रवेश झाला. आंत सुवर्णमय शृंखलांनीं बद्ध झालेल्या घंटा लोंबत होत्या. गाभाऱ्यांतील मूर्ति नऊ फूट उंचीची होती. ब्राह्मणांनीं विनविलें, "सोन्याच्या राशी तुम्हांस देतों. मूर्ति फोडूं नका." यावर महमूद बोलला, "मूर्ति विकणारा (बुत्फरोश्) अशा कीर्तीपेक्षां ती फोडल्याची (बुत्शिकन्) कीर्ति मला अधिक प्रिय आहे." आपल्या हातातील सोटा त्यानें मूर्तीवर मारला. त्याबरोबर मूर्ति भंग पावून तींतून हिरेमाणकांचे ढीग बाहेर पडले ! सभोंवार आणखीहि सोन्याचांदीच्या शेंकडों मूर्ति होत्या. सर्व मालमत्ता एकूण तीस-चाळीस कोटी रुपयांची होती.

आज सोमनाथ छिन्नावस्थेंत भयाण रीतीनें उभा आहे. फक्त समुद्राच्या लाटाच त्याचें पाद्यपूजन करीत आहेत. सरदार वल्लभभाई पटेल सोमनाथाचा पुनरुद्धार करणार असल्याची योजना आहे.

**— ७ जानेवारी १०२६**

## पौष व. २ वासुकाका जोशी यांचें निधन !

शके १८६५ च्या पौष व. २ रोजीं लोकमान्य टिळकांचे निकटचे सहकारी व महाराष्ट्राच्या धकाधकीच्या सार्वजनिक जीवनांत ठळकपणें दृष्टीस पडणारे थोर कार्यकर्ते वासुदेव गणेश तथा वासुकाका जोशी यांचें निधन झाले.

वासुकाकांचा जन्म वाईशेजारीं कृष्णाकांठीं असलेल्या धोम या क्षेत्रीं झाला. जोसपणा, सावकारी व शेती करून यांचे घराणें रहात असे. वयाच्या चौदाव्या वर्षी हे पुण्यास आले व इंग्रजी पांच-सहा यत्ता शिक्षण झाल्यावर त्यांनीं एक वर्ष इंजिनियरिंग कॉलेजांतील ॲग्रिकल्चरल क्लासमध्ये काढलें. यांचें विस्तृत चरित्र श्री. देवगिरीकर यांनीं प्रसिद्ध केले आहे. आयुष्याच्या सुरुवातीस विष्णुशास्त्री चिपळुणकरांची ओळख झाल्यानंतर वासुकाका निबंधमालेचे व्यवस्थापक बनले. त्यांनीं चित्रशाळाहि भरभराटीस आणली. विष्णुशास्त्र्यांनंतर ते टिळकांचे सहकारी बनले. सन १९०३ मध्यें ताईमहाराज प्रकरणांत टिळकांना शिक्षा झाली तेव्हां ते विष्णुपंत छत्रे यांच्या निमंत्रणावरून त्यांच्या सर्कसबरोबर चीन–जपानकडे गेले. परक्या देशांत सर्कशीची आगाऊ व्यवस्था करण्याचें काम वासुकाका करीत. तिकडे सर्कशीला खूप पैसा मिळाला. चीनची डॉवेजर राणी झुशी हिनें प्रसन्न होऊन सर्कशीला तीस हजार रुपये बक्षीस दिले. तेव्हां त्यांनीं सर्कशींतील एक हत्ती माहूतासह राणीला नजर केला.

जपानमध्यें यांची व स्वामी रामतीर्थांची भेट झाली. स्वामींना मोठा आनंद झाला. तेथून पुढें अमेरिकेंत गेल्यावर त्यांनीं रामतीर्थांचीं व्याख्यानें पुस्तकरूपानें प्रसिद्ध केलीं. तेथून परतल्यावर कृ. प्र. खाडीलकर आणि वासुकाका कांहीं दिवस नेपाळमध्यें 'कौलांचा कारखाना' काढण्यांत गुंतले होते. त्यांचा शेवटचा प्रवास म्हणजे लो. टिळकांबरोबर त्यांनीं केलेली इंग्लंडची सफर. राष्ट्रसभेच्या निमित्तानें ते भारताच्या कानाकोपऱ्यांत हिंडले होते. अग्रेसर असणाऱ्या जहाल राजकारणांत त्याचा नेहमींच भाग असे. सार्वजनिक, राजकीय चळवळींत प्रत्यक्षपणें भाग घेण्यापेक्षां अंतस्थ हालचाली अचूकपणें करण्याबद्दल त्यांची प्रसिद्धि होती.

— १२ जानेवारी १९४४

## पौष व. ३ रामचंद्रांनीं लंकेस वेढा दिला !

पौष व. ३ या दिवशीं मदोन्मत्त रावणास शासन करण्यासाठीं श्रीरामचंद्रांनीं त्याच्या लंकेस वेढा दिला.

लंकेचा राजा रावण अत्यंत जुलमी आणि गर्विष्ठ झाला होता. ब्रह्मदेवापासून अवध्यत्वाचा वर मिळाल्यावर त्यानें अनन्वित कृत्ये करण्यास सुरुवात केली. प्रत्यक्ष कुबेराचाहि पराभव रावणानें केला. कैलासपर्वतावरील शंकरांना उपद्रव दिला. कुशध्वजाची मुलगी देववती ही तपस्विनी होती, तिच्यावर बलात्कार करून रावणानें अधमपणाची सीमा गांठली. शेवटीं जुलमाच्या व क्रूरतेच्या इमारतीवर कळस म्हणजे प्रत्यक्ष रामचंद्रांची पत्नी सीतादेवी हिलाच रावणानें पळवून नेली. रामाने त्याचें पारिपत्य करण्याचे ठरविलें.

दक्षिणेंतील सुग्रीव, हनुमंत वगैरे रामास मदत करण्यास तयार झाले. मारुतीनें अशोक वनांतील सीतेचा शोध लावला. स्वारीची जय्यत तयारी सुरू झाली. प्रचंड शक्ति खर्च करून सेतु बांधण्यांत आला. आणि राम, लक्ष्मण, सुग्रीव, बिभीषण, अंगद, हनुमान वगैरे लोकांनीं समुद्रपार होऊन लंकेस वेढा दिला. रावणास ही सर्व वार्ता समजलीच. त्यानें रामाचें मायावी शिर उत्पन्न करून ते सीतेपुढें आणले व तो तिला म्हणाला, “मूर्ख स्त्रिये, हें पहा, माझा सेनापति प्रहस्त यानें रामाचे शिर तोडून आणले आहे. आतां तरी हट्ट सोड.” परंतु रावणाच्या या कपटविद्येचा कांहींहि उपयोग झाला नाहीं. कोणाचेहि न ऐकतां रावणानें युद्ध करण्याचा निश्चय केला.

रामचंद्रांनींहि आपल्या सैन्याची व्यवस्था चांगलीच ठेवली. पूर्वेकडील दरवाजावर नील, दक्षिणेकडील दरवाजावर अंगद व पश्चिमेकडील दरवाजावर हनुमान यांची नेमणूक करून खुद्द आपण लक्ष्मणासहित उत्तरेकडील दरवाजावर राहिले व सर्वांना मदत करणाऱ्या सैन्याच्या विभागावर राजा सुग्रीव, जांबवान्, बिभीषण यांची नेमणूक केली. याप्रमाणें सर्व व्यवस्था होऊन लंकेचा वेढा दृढ झाला. रावणाच्या जुलमी कारकीर्दीचीं शंभर वर्षें भरत आलीं होतीं.

• • •

## पौष व. ४ "सुरतेची बेसुरत जाली!"

शके १५८५ च्या पौष व. ४ रोजीं श्रीशिवाजी राजे यांनीं सुरत लुटून बादशहास चांगलीच दहशत बसविली.

त्या वेळीं सुरत हें अत्यंत श्रीमंत शहर असून मोंगल बादशाहींतील पश्चिम किनाऱ्यावरील व्यापाराचे मोठेंच ठिकाण होतें. त्यावर हल्ला करण्याचा विचार शिवाजीनें केला. बहिर्जी नाईक नांवाच्या चतुर हेराने सर्व गुप्त बातमी आणली. जंजिऱ्याजवळ दंडा राजपुरीनजीक एक व कल्याण येथील दुसरी अशा दोन फौजा शिवाजीनें तयार केल्या आणि पौष व. ४ या दिवशीं अचानकपणें चार हजार स्वारांनिशीं शिवराय सुरतेवर येऊन पोंचले. सर्व लोकांच्या अंगांत धडकी भरली. इनायतखान शहरांतील मोंगली अमलदार होता. किनाऱ्यावर इंग्रज व डच यांच्या वखारी होत्या. आदल्या दिवशीं शिवाजीनें नागरिकांना कळविलें, "इंग्रजी व एतद्देशीय व्यापारी किंवा इतर लोक यांस कोणत्याहि प्रकारें इजा पोंचविण्याची आमची इच्छा नाहीं. फक्त बादशहानें आमच्या मुलखावर हल्ला करून लोक मारिले; आणि आमचें पुण्याचें वास्तव्य बंद पाडिलें त्याचा वचपा घ्यावा, येवढाच आमचा हेतु आहे." शिवाजीचा दावा फक्त बादशहाशीं होता. त्यानें शिवाजीचा नायनाट करण्याचा प्रयत्न चालविला होता. तेव्हां त्याला हात दाखविणें क्रमप्राप्तच होतें. शिवाजीशीं कपटकारस्थान करण्याचा व त्याचा खून करण्याचा डावहि फसला. शिवरायांनीं त्या सर्वांना जबरदस्त शिक्षा दिल्या आणि पौष व. ४ रोजीं लुटीस प्रारंभ झाला. तीन-चार दिवसपर्यंत यथेच्छ लूट करण्यांत आली. चांदी, सोनें, मोतीं व जवाहीर यांची प्राप्ती मोठ्या प्रमाणावर झाली. शिवाजीच्या या कृत्यास कोणी कोणी 'लुटारूपणा'चा अर्थ चिकटवितात. परंतु येथें हें ध्यानांत घेतलें पाहिजे कीं, मोंगल सुभेदार पुण्यामध्यें खुद्द शिवाजीच्या वाड्यांत राहून हिंदु धर्म, हिंदु समाज यांचा उच्छेद करण्यास प्रवृत्त झाला होता त्याचा बंदोबस्त शिवाजीनें करावयाचा नाहीं तर कोणी? औरंगजेबासारख्या बलाढ्य बादशहाला दहशत बसवण्यासाठीं याचा फार उपयोग झाला.

—६ जानेवारी १६६४

## पौष व. ५ ( १ ) सुभाषचंद्र बोस यांचा जन्म !

शके १८१८ च्या पौष व. ५ रोजीं भारताच्या पूर्ण स्वातंत्र्याचे उपासक, दुसऱ्या आझाद हिंद सेनेचे प्रमुख व कुशल संघटक ' नेताजी ' सुभाषचंद्र बोस यांचा जन्म झाला.

बंगालमधील कटक येथील सुप्रसिद्ध वकील जानकीनाथ बसू यांच्या घरीं सुभाषचंद्रांचा जन्म झाला. त्यांची आई प्रभावतीदेवी. या धार्मिक वृत्तीच्या असल्यामुळें सुभाषबाबूंच्या मनावर चांगलेच संस्कार झाले. शाळेंत शिकत असतांना श्रीरामकृष्ण परमहंस व स्वामी विवेकानंद यांच्या शिकवणुकीचा यांच्या मनावर अत्यंत परिणाम झाला, आणि गंगायमुनांच्या तीरीं व हिमालयाच्या गिरिकंदरांतून ' सुभाष ' गुरूच्या शोधार्थ हिंडूं लागले. कलकत्त्याच्या प्रेसिडेन्सि कॉलेजमधून नांव कमी केल्यावर हे इंग्लंडला गेले आणि तेथें आय्. सी. एस्. ची परिक्षा पास झाले. मायदेशीं येऊन सरकारी नोकरी न करतां देशसेवेसाठीं त्यांनीं आपणास वाहून घेतलें. म. गांधी व चित्तरंजनदास यांच्या नेतृत्वाखालीं देशसेवा सुरू केली. राष्ट्रसभेंत संपूर्ण स्वातंत्र्याचा ठराव आणण्यासाठीं त्यांनीं जी अतोनात खटपट केली तिला लाहोर सभेत यश आलें. सन १९३८ सालीं हरिपुरा कॉंग्रेसचे अध्यक्ष झाल्यामुळें त्यांचें यश सर्वत्र विकसूं लागलें. पुढल्या वर्षींहि त्रिपुरी कॉंग्रेसच्या वेळीं गांधींनीं पाठिंबा दिलेल्या पट्टाभिसीतारामय्यांपेक्षां अधिक मतें पडून हेच निवडून आले. त्या वेळीं त्यांना गांधीगटाच्या असहकाराला तोंड द्यावें लागलें. त्यानंतर सशस्त्र क्रांतीवर अधिक विश्वास, बसूं लागल्यावर २६ जानेवारी १९४१ रोजीं ते राहत्या घरांतून अदृश्य झाले. बहिऱ्या व मुक्या असणाऱ्या झियाउद्दीनच्या वेषानें पेशावरमार्गे काबुलास जाऊन तेथून बर्लिन व त्यानंतर सिंगापूर येथें सुभाषबाबू आले. तेथें आझाद हिंद सेनेची स्थापना करून २१ ऑक्टोबर १९४३ रोजीं हिंदुस्थानचें स्वतंत्र सरकारहि स्थापन केलें. जपानचा पराजय होण्याचीं चिन्हें होत असतां सुभाष बाबू सिंगापूरहून १६ ऑगस्ट १९४५ रोजीं विमानानें टोकियोला निघाले असतां विमानाला अपघात होऊन त्यांचें निधन झालें.

—२३ जानेवारी १८९७

## पौष व. ५ (२) महात्मा गांधींची भीषण हत्या !

शके १८६९ च्या पौष व. ५ रोजीं. जगद्वंद्य विभूति महात्मा गांधी यांचा अमानुषपणें खून करण्यांत आला.

नित्याप्रमाणें सायंप्रार्थनेसाठीं गाधीजी दिल्ली येथील बिर्लाभवनामध्यें प्रार्थनेच्या व्यासपीठाकडे जात असतां एका युवकानें त्यांच्यावर हातातील पिस्तुलानें चार गोळया लागोपाठ झाडल्या. गांधीजी त्या क्षणींच खालीं पडले. लगबगीनें त्यांना बिर्लाभवनांत नेण्यांत आलें. परंतु कशाचाच उपयोग न होतां ५-४० वाजतां महात्मा गांधी आपल्या आवडत्या भारताला कायमचे सोडून गेले. सन १९१७-१८ सालापासून सतत तीस वर्षे भारतालाच नव्हे तर सबंध विश्वाला प्रकाशित करणारी त्यांची प्राणज्योत विश्वतेजांत विलीन झाली !

सर सर्वपल्ली राधाकृष्णन, लॉर्ड पेथिक लॉरेन्स, मि. रेजिनॉल्ड, सोरेन्सन, जनरल स्मसट्, लॉर्ड हॅलिफॅक्स आदि जगांतील श्रेष्ठ व्यक्तींनीं महात्माजींना श्रद्धांजलि वाहिली. राष्ट्राचे केवळ राजकीय नुकसान झालें म्हणून नव्हे तर सर्व जगताला बंधुत्वाचा, अध्यात्माचा, अहिंसेचा संदेश पोचविणारा शांतिदूत गेला म्हणून सर्व जगतावर दुःखाची छाया पसरली. " आमच्या पौर्वात्य संस्कृतीचें अंतिम ध्येय गाधींच्या रूपाने अवतरले आहे. यशाला स्वतःला. मनुष्यरूप घ्यावेंसे वाटले आणि तो गांधींच्या रूपाने अवतरला..." असें जें कविवर्य रवींद्रनाथ टागोरांनीं म्हटलें होतें त्याचाच साक्षात्कार गेलीं तीस वर्षे महात्माजींच्या राजकीय वा सांस्कृतिक जिवनांत जगाला दिसून आला होता. जे. एच्. होम्स यांनीं गाधींची योग्यता उचित अशा शब्दांत सांगितली आहे कीं — " जेव्हां मी गाधींचा विचार करतों तेव्हां माझ्यापुढें ख्रिस्त उभा रहातो ; कारण ते ख्रिस्ताचें जीवन जगत आहेत, ते त्याचे शब्द बोलत आहेत, ते दुःख सहन करीत आहेत, ते प्रयत्न करीत आहेत आणि एखादे दिवशीं तरी ईश्वराचें राज्य या भूमीवर यावें या ध्येयासाठीं ते देहत्याग करतील." महात्माजींच्या भीषण हत्येमुळें सर्व भरतखंडांत उदासवाणी छाया पसरली. जिकडे तिकडे शोकसागराला पूर आला. तेरा दिवसपर्यंत सबंध राष्ट्रानें सुतक पाळलें. गांधीजींची स्मशान-यात्रा अभूतपूर्व अशीच निघाली होती.

— ३० जानेवारी १९४८

## पौष व. ६ — भरतपूरचा अजिंक्य किल्ला !

शके १७२६ च्या पौष व. ६ रोजीं होळकर आणि जाट यांनीं भरतपूर येथें इंग्रजांचा प्रचंड पराभव केला.

बाजीराव, शिंदे, होळकर यांची सत्ता संपुष्टांत आणण्याचे अनेक प्रयत्न इंग्रजांनीं या वेळीं चालू केले होते. दीगच्या लढाईनंतर यशवंतराव होळकर भरतपूरच्या आश्रयास ससैन्य येऊन राहिले होते. सुरजमल जाटाचा नातु रणजितसिंग हा या वेळीं भरतपूरच्या गादीवर होता. यशवंतराव होळकरास इंग्रजावर विजय मिळतात हे पाहून रणजितसिंगासहि अवसान चढलें. यशवंतराव व जाट एक झालेसें पाहून इंग्रजांनीं आपला मोर्चा भरतपुरावर वळविला. २ जानेवारी १८०५ रोजी भरतपूरच्या किल्ल्यासमोर इंग्रजांचा तळ पडला. भरतपूरचा किल्ला उंच डोंगरावर असून त्याच्याभोंवतीं पाण्याचे विस्तीर्ण खंदक होते. जाट आणि मराठे यांच्यासारखे खंदे वीर हातीं शस्त्र घेऊन इंग्रजांविरुद्ध उठले. पहिल्याने इंग्रजांचा पराभव झाला. नंतर पौष व. ६ रोजीं त्यांनीं दुसरा हल्ला चढविला. खंदकांच्या लांबी-रुंदीचीं मापें घेऊन इंग्रजांनीं जोराची तयारी चालविली होती. खंदकाच्या एका कांठावरून पलीकडच्या कांठापर्यंत पोचतील अशा शिड्या तयार झाल्या. सर्व सिद्धता झाल्यानंतर ले. कर्नल मॅकराय, कॅ. लिंडसे या इंग्रज अधिकाऱ्यांच्या नेतृत्वाखालीं सैन्य खंदकांतून पार होऊं लागलें. होळकरांचे घोडेस्वार तटाच्या बाहेर असून पायदळ मात्र आंत गेलें होतें. किल्ल्यांत येण्याबद्दल भरतपूरच्या राजाकडून आग्रह झाल्यावर यशवंतराव बोलले, "माझी गादी माझ्या घोड्याच्या पाठीवर आहे." इंग्रज सैन्य पार होत असतांना होळकरांच्या घोडेस्वारांनीं त्यांना अगदीं बेजार करून सोडलें. इंग्रजांची अगदीं दुर्दशा उडाली. हिंदुस्थानच्या अर्वाचीन इतिहासांत भरतपूरचें नांव अजरामर आहे. या किल्ल्यानें इंग्रजांचा चार वेळां पराभव केला. सर्व किल्ले भराभर इंग्रजांच्या हवालीं झाले. पण भरतपूरचा किल्ला मात्र भोंवतालच्या पाण्यांत आपली मुर्दुकीचीं प्रतिबिंबें दाखवीत अभिमानानें त्या वेळीं उभा होता.

—२१ जानेवारी १८०५

## पौष व. ७ स्वामी विवेकानंद यांचा जन्म!

शके १७८४ च्या पौष व. ७ रोजीं भारतीय तत्त्वज्ञानाचा सर्व जगभर प्रसार करणारे थोर पुरुष स्वामी विवेकानंद यांचा जन्म झाला.

विवेकानंदांची पूर्वपरंपरा अध्यात्मिक वैभवानें नटलेली आहे. 'शुद्ध बीजापोटीं फळें रसाळ गोमटीं' या उक्तीप्रमाणें विवेकानंद या श्रेष्ठ व्यक्तीच्या कुलाचा इतिहासहि उज्ज्वल असाच आहे. विवेकानंदांचे आजे बाबू दुर्गाचरण दत्त यांनीं ऐन वयांतच संन्यास घेऊन परामार्थवृत्ति स्वीकारली होती. दुर्गाचरणांचे चिरंजीव विश्वनाथ बाबू मोठे विद्वान् होते. त्यांची ज्ञानलालसा अतुलनीय अशीच होती. त्यांची पत्नी भुवनेश्वरी ही देखील आदर्श आर्य स्त्री होती. तिचा चेहरा भव्य व उदात्त असून त्यावर दिव्य शक्तीचे तेज ओसंडत असे. रामायण-महाभारतांतील कित्येक भाग तिनें मुखोद्‌गत केले होते. अशा या उच्च मातापितरांच्या पोटीं विवेकानंदांचा जन्म झाला. नामकरणाच्या दिवशीं अनेकांनीं 'दुर्गादास' हें नांव सुचविलें; परंतु भुवनेश्वरी देवीच्या पसंतीनें 'वीरेश्वर' हें नांव ठेवण्यांत आले. पुढें नरेंद्र हेंच नांव रूढ झाले. लहानपणीं यांचा स्वभाव हट्टी व खोडकर असला तरी साधुसंतांविषयीं प्रेम यांना होतेच. अलौकिक बुद्धिमत्ता, खेळाङ्-पणा, तेजस्विता या गुणांच्या साह्याने नरेंद्रांचें शिक्षण झपाट्यानें होऊं लागले. यांचा आवाज मोठा मधुर होता. बी. ए. ची परीक्षा दुसऱ्या दिवशीं असतांना यांच्या हृदयांत अध्यात्मज्ञानाचा दिव्य आनंद निर्माण झाला. त्यांची वृत्ति अध्यात्मचिंतनांत गुंगू लागली. त्यांना योग्य असे रामकृष्ण परमहंस हे गुरु भेटले.... रामकृष्णांचा सहवास, हिंदुस्थानांतील भ्रमण, हिमालय व तिबेट येथील वास्तव्य, सन १८९३ मधील जपानमार्गें अमेरिकेचा प्रवास, धर्मपरिषदेंतील असामान्य कर्तृत्व, 'राजयोग' या ग्रंथाचें लेखन, इंग्लंडमधील पं. मॅक्समुल्लर व भगिनी निवेदिता यांची मैत्री, मायदेशीं परत आल्यावर रामकृष्ण मठाची स्थापना, सन १८९९ मध्यें परत अमेरिकेस जाण्याची तयारी, वाटेंत मधुमेयाचा विकार झाला म्हणून सिलोनमधूनच परत हिंदुस्थानांत आगमन आणि सन १९०२ मध्यें समाधिअवस्था असा यांचा संक्षिप्त जीवितक्रम आहे.

— १२ जानेवारी १८६३

## पौष व. ८ "बचेंगे तो और भी लढेंगे!"

शके १६८१ च्या पौष व. ८ रोजीं राणोजी शिंद्यांचे पराक्रमी चिरंजीव व पानपतच्या संग्रामांतील आघाडीचे वीर दत्ताजी शिंदे याचें निधन झालें.

सन १७६० च्या ३ जानेवारीस दत्ताजी दिल्लीस आले. स्वतःचे शौर्य व फौजेचा दम यांजवर विश्वास ठेवून अब्दालीस जेर करूं असा विश्वास त्यांना होता. यांची बायको भागीरथीबाई हिनें नारोपंत, बुंदेले, जनकोजी यांच्याफार्मत यांना युद्धापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न केला, पण त्याला यश आले नाहीं. पौष व. ८ रोजीं दत्ताजी फौजेनिशीं गिलच्यावर चालून गेले. "शत्रूनीं एकदम निशाणावर चाल केली आणि तोफांचा व बंदुकांचा मार मराठी फौजेवर जोराचा चालू केला. नदीच्या तीरावर अडचण भारी, शेरणीचीं बेटें असल्यामुळें पळून जाण्यास सोय पडेना. ... आठ घटका पूर्ण होतांच पांचशे मनुष्य ठार झालें. दत्ताजी व जनकोजी यांस पळून जातां आले असतें, परतु तसें न करतां निशाणापाशींच लढत राहिले. तों जनकोजीचे दंडास गोळी लागून तो बेशुद्ध होऊन खालीं पडला. हे वर्तमान दत्ताजीस समजलें तेव्हां त्यानें जोराने शत्रूंवर घोडे घातले. त्या गर्दींत यशवंतराव जगदाळे गोळी लागून पडला. त्याचे प्रेत काढावयास दत्ताजी पुढें गेला, तों त्याचे उजवे बरगडींत गोळी लागून तोहि तात्काळ गतप्राण झाला. तेव्हां सर्वांचीं अवसानें गेलीं."

दत्ताजी गोळी लागून रणभूमीवर पडले तेव्हां त्यांना कुत्बशहाने विचारलें, "पटेल, लढेंगे क्या?" त्यावर त्यांनीं उत्तर दिले, "बचेंगे तो और भी लढेंगे!" यावरून दत्ताजीच्या शूरत्वाची कल्पना येते. "मराठ्यांच्या इतिहासांत जे कित्येक हृदयद्रावक प्रसंग आहेत त्यांत दत्ताजीच्या वरील पराक्रमाची गणना झाली पाहिजे. पानपतच्या प्रचंड संहाराने दत्ताजींचें अचाट कृत्य लोपून गेले आहे. धन्याची कामगिरी पार पाडण्यासाठींच त्यानें आपल्या प्राणांची आहुति दिली." दत्ताजी शिंदे पडले आणि जनकोजी जखमी झाले हें समजतांच मल्हारराव होळकर शोक करूं लागले. त्या वेळीं त्यांची स्त्री गौतमाबाई हिनें सांगितले, "सुभेदार, तुमचें वृद्धपण झालें. शिंदे यांच्या मुलांच्या तोंडचा जार वाळला नाहीं. ते मारतां मारतां मेले. तुमचे दिवस समीप आले. हिम्मत धरून धरून मारतां मारतां मरावें."

 —१० जानेवारी १७६०

## पौष व. ९ — तैमूरचा राक्षसी प्रताप!

शके १३२१ च्या पौष व. ९ रोजीं तैमूरलंग भारतांतून अगणित लूट घेऊन आणि मनसोक्तपणें रक्तपात करून आपल्या मायदेशीं गेला.

दिल्ली शहर हस्तगत झाल्याबरोबर तैमूरच्या सैन्यांत विजयोत्सव सुरू झाले. पकड, लूट, मारहाण या प्रकारांना ऊत आला. पंधरा दिवसपर्यंत तैमूरलंगाचा मुक्काम दिल्लीस होता. भारतांतील कलाकौशल्यावर तो फार खुष होता. कित्येक कारागीर त्यानें स्वतःबरोबर घेतले. जातां जातांहि त्याने पुष्कळच अनन्वित प्रकार केले. मिरत शहरीं त्याच्या सैन्याची थट्टा कोणीं केली म्हणून त्यानें सर्वांची कत्तल केली. अग्नि व तरवार यांच्या साह्याने तैमूरचा तुफानी प्रचार होत होता. हरद्वार येथें आल्यावर त्यास समजले की, गोमुखांतून गंगा पडते. या 'पाखंडीपणा'वर तो खूपच संतापला आणि त्यामुळें त्यावर विश्वास ठेवणारांना कडक शासन भोगावें लागले. लक्षावधि लोकांना त्यानें मृत्युलोकांत पाठविलें.

"मनुष्यजातीचे महान् शत्रु म्हणून इतिहासांत जे नांवाजलेले आहेत त्यांच्यांत तैमूरची गणाना केली जाते. तो एखाद्या नवीन शहरीं आला म्हणजे तेथील लोकांजवळ सर्व संपत्तीची दरडावून मागणी करीत असे. नंतर ती लुटून आणण्यास आपली फौज पाठवी. सर्व लोकांना पकडून तो एका ठिकाणीं जमा करी. अशा लोकांतून कोणी कारागीर किंवा विद्वान् असतील तर तो त्यांना निवडून दूर करी. इतरांचा जीव घेऊन त्यांच्या शिरांचा एक मोठा ढीग शहराबाहेर रचण्यांत येई. बगदाद शहर घेतलें त्या वेळेस अशा शिरांचे मनोरे एकशेंवीस झाले होते. केव्हां केव्हा जिवंत माणसांना चुन्याने व विटांनीं चिणून त्यांचा तट बांधण्याचे काम तैमूरचे कुशल कारागीर करीत."

हिंदुस्थानांत मोगली जुलमास व्यवस्थितपणें सुरुवात तैमूरनेच केली. त्याच्या नांवानें बादशाहीहि चालू होती. तो जिवंत असेपर्यंत त्याच्या नांवानें खुत्बा वाचण्यांत येत असे. तैमूरलंगाची स्वारी म्हणजे एक प्रकारचा ईश्वरी क्षोभच भारतीय लोक समजत असत.

—१ जानेवारी १३९९

## पौष व. १० श्रीशिवरायांचा वाढता प्रताप !

शके १५८१ च्या पौष व. १० रोजीं श्रीशिवराय यांनीं चालून आलेले आदिलशाहीचे सरदार रुस्तुमिजमान व फाजलखान यांचा पराभव केला.

अफझलखानाच्या वधानंतर श्रीशिवरायांचे महत्त्व फारच वाढून बादशहाचा एक मोठाच डाव फसल्यासारखा झाला होता. आतां विजापूरकरांच्या ताब्यातील प्रांत व किल्ले सोडविणें हेंच एक ध्येय शिवाजीमहाराजांच्यासमोर होतें. २८-११-१६५९ रोजीं मोठ्या युक्तीनें पन्हाळा किल्ला शिवाजीच्या हातांत आला. या समयीं कोल्हापूर प्रांतांत विजापूरच्या एका सुभ्याचें काम रुस्तुमिजमान नांवाचा सरदार पहात असे. त्याच्या प्रांतांतील पन्हाळा किल्ला फारच मजबूत होता. याशिवाय पावनगड, खेळणा, रांगणा, हे प्रसिद्ध किल्ले जिंकावेत अशी मनीषा शिवाजीची होती. अफजलखानाच्या वधानंतर अण्णाजी दत्तो यांच्याकडून पन्हाळा हस्तगत झाला. पावनगड, वसंतगड हेहि किल्ले मिळाले. तेव्हां शिवाजीचा बंदोबस्त करणें विजापूर दरबारला अत्यंत आवश्यक वाटलें. या कामगिरीवर रुस्तुमिजमान व फाजलखान यांची नेमणूक झाली. आदिलशाहीच्या हुकमावरून या दोघांनीं फौज जमा केली व ते शिवाजीवर चालून आले. परंतु पौष व. १० रोजीं शिवाजीनें त्यांचा संपूर्ण मोड केला आणि कृष्णा नदीच्या पलीकडे त्यांना हांकून दिले. व शिवराय स्वतः खंडण्या वसूल करीत करीत थेट विजापूरपर्यंत चालून गेले. त्यांना प्रतिकार करावा असें कोणासहि वाटलें नाहीं. त्यांचा पाठलाग करणेंहि शत्रूंना अशक्य होऊन बसले. रायबागसारखीं समृद्ध स्थळे शिवाजीच्या हातीं आलीं. आणि त्यानंतर नेताजीनें गदग लक्ष्मेश्वरपर्यंतचा मुलूख लुटला. याप्रमाणें बरीच लूट जमा करून शिवाजी राजगडीं परत आला. शिवाजीचा हा पराक्रम पाहून आदिलशहा घाबरूनच गेला. रुस्तुमिजमान तर उघडपणें शिवाजीचा मित्र बनला होता. "आतां विजापूरचें राज्य संपून शिवाजीचें चालू होणार, त्याचा बाप शहाजी सतरा हजार फौज घेऊन कर्नाटकांतून त्याचे मदतीस येत आहे" अशी बातमी पाश्चात्य व्यापारी वरिष्ठांस कळवूं लागले.

— २८ डिसेंबर १६५९

## पौष व. ११ न्या. रानडे यांचें निधन

शके १८२२ च्या पौष व. ११ रोजीं हिंदुस्थानांतील सुप्रसिद्ध समाजसुधारक, विख्यात राजकारणी, दूरदृष्टीचे विवेचक व स्वतंत्र भारताचे द्रष्टे न्यायमूर्ति माधव गोविंद रानडे यांचें निधन झालें.

राजकीय, सामाजिक, धार्मिक, औद्योगिक, आर्थिक इत्यादि अनेक क्षेत्रांत माधवरावांनीं मार्गदर्शन केले. हिंदी अर्थशास्त्राचे ते तर जनकच होते. आयुष्यांतील शेवटच्या दिवसांतहि यांचें लक्ष सार्वजनिक कार्यांत गुंतून राहिलें होतें. लाहोरच्या सामाजिक परिषदेस जातां आलें नाहीं म्हणून यांना मनस्वी वाईट वाटलें. रोज रात्रीं साडे दहा वाजतां काळजात वेदना सुरू होत असल्या वेळीं मृत्यूशींच झुंज सुरू होई. पौष व. ९ रोजीं पायावर सूज दिसत होती आणि पौष व. ११ ला सकाळीं माधवरावांना थोडी हुशारी वाटली. रमाबाई-सह थोडें फिरून आल्यावर त्यांचे मित्र कीर्तिचंद्र मुकर्जी मरण पावल्याची बातमी तारेनें यांना समजली. 'काम करतां करतां मरण्यांत सुख असतें' अशा अर्थाचें सुभाषित माधवरावांच्या तोंडांतून बाहेर आलें. रात्रीं जेवण झाल्यावर वाचीत असतांना नेहमींची कळ आली. शेजारचे डॉक्टर धांवत आले. रमाबाई माधव-रावांना सावरूं लागल्या, पण उपयोग झाला नाहीं. एक रक्ताची वांति झाली आणि माधवरावांचा आत्मा त्यांचे शरीर सोडून गेला !

दुसऱ्या दिवशीं सर्व देश दुःखसागरांत बुडून गेला. लो. टिळकांनीं माधव-रावांची योग्यता सांगितली. "महाराष्ट्र देश म्हणजे त्या वेळीं थंड गोळा होऊन पडला होता. या थंड गोळयास कोणत्या तऱ्हेने ऊब दिली असतां तो पुन्हां सजीव होईल व हातपाय हालवूं लागेल, याचा रात्रंदिवस एकसारखा विचार करून अनेक दिशांनीं, अनेक उपायांनीं, अनेक रीतींनीं त्यास पुन्हा जिवंत करण्याचे दुर्धर काम अंगावर घेऊन त्याकरितां जिवापाड जर कोणीं मेहनत केली असेल तर ती प्रथमतः माधवरावांनींच केली असें म्हटलें पाहिजे." ना. गोखले यांनीं उद्गार काढले, "Mr. Ranade was one of those men who appear, from time to time, to serve as a light to guide the footsteps of our weak and erring humanity."

— १६ जानेवारी १९०१

## पौष व. १२ वडगांव येथें इंग्रजांचा पराभव !

शके १७०० च्या पौष व. १२ रोजीं वडगांव येथें इंग्रज व मराठे यांचे युद्ध होऊन इंग्रजांचा पराभव झाला; आणि त्यांना मराठ्यांशीं तह करावा लागला.

मुंबई प्रातात फ्रेंचांचें वर्चस्व वाढून ते पुण्याच्या दरबारांत सलोखा करीत आहेत असे दिसतांच इंग्रजांना वैषम्य वाटलें. मराठ्यांच्या दरबारीं फ्रेंचांचें वर्चस्व वाढलें तर कंपनीच्या हितास मोठाच धक्का बसणार होता. तेव्हां त्यांच्या प्रतिकारासाठीं कलकत्त्याहून इंग्रजी फौजा खुष्कीच्या मार्गानें मुंबईकडे येऊं लागल्या. मुंबईकरांच्या हातीं असलेल्या राघोबास मराठ्यांच्या स्वाधीन त्यांनीं केलें नव्हतेच. या सर्व गोष्टी पुरंदरच्या तहाविरुद्ध होत आहेत असे पाहून मराठ्यांनींहि सामना देण्याचे ठरविलें. नाना फडणीस आणि महादजी शिंदे या जोडीनें जोरांत तयारी सुरू केली. इंग्रजांच्या फौजेंत कर्नल इगर्टन, कार्नेक व मॉस्टिन हे तीन अधिकारी होते. त्यांनीं दादा व अमृतराव यांना घेऊन पनवेलखालीं आपले सैन्य उतरवलें. मराठ्यांचें सैन्य सावध होतेच. त्यांनीं इंग्रजांना सतावून सोडण्यास सुरुवात केली. वडगांव येथे दोन्ही सैन्यांची गांठ पडली. त्या ठिकाणीं निकराचा सामना होऊन इंग्रजांचा मोड झाला. तहनाम्याचीं बोलणीं सुरू झालीं. त्या वेळीं महादजीनें स्पष्ट बजाविलें,— ‘ पुरंदरचा तह तुम्हीं मोडला आहे. प्रथम रघुनाथरावांस स्वाधीन करा आणि मग बोला. आम्हांस लढाईचा बाऊ दाखवूं नका. त्याची आम्हांला मुळींच परवा नाहीं. या ठिकाणीं नवीन तह केल्याखेरीज आम्ही तुम्हांस परत जाऊं देणार नाहीं ! ” तेव्हां तहाच्या वाटाघाटी झाल्या. ‘ दादास स्वाधीन करावें, साष्टी, ठाणें, उरण, गुजराथचे महाल इंग्रजांनीं मराठ्यांना परत करावेत, दादापासून दस्तऐवज परत द्यावेत...’ याप्रमाणें पौष व. १२ ला वडगांव येथें तह ठरला. आणि नंतर इंग्रज फौजेस परत जाण्यास परवानगी मिळाली. यासंबंधीं इंग्रज रिपोर्टर लिहितो.—“ करार पुरा होऊन मराठ्यांच्या अंगचें औदार्य व नेमस्तपणा यांचा लगोलग अनुभव इंग्रजांना आला. जिंकलेल्या शत्रूंना इतक्या सवलतीनें वागविल्याचीं उदाहरणें क्वचितच सांपडतात. ”

— १३ जानेवारी १७७९

**पौष व. १३** **शहाजहान बादशहाचें निधन!**

शके १५८७ च्या पौष व. १३ रोजीं मोगलांचा पांचवा बादशहा शहाजहान याचें निधन झालें.

शहाबुद्दीन मुहमद किरान उर्फ शहाजहान हा जहांगीर ऊर्फ सेलीमचा जोधपूरच्या राजकन्येपासून झालेला पुत्र होय. सन १६२८ मध्यें हा गादीवर आला. सर्व आप्तांचा नायनाट करून यानें सन १६३७ मध्यें शहाजीचा पराभव केला व अहमदनगरचा सर्व मुलूख आपल्या ताब्यांत आणला. युरोपियन लोकांच्या बाबतींत हा मोठा धूर्त होता. त्यांनीं धर्माच्या बाबतीत हात न घालावा म्हणून हा अत्यंत दक्ष असे. पोर्तुगीझ धार्मिक जुलूम करतात, म्हणून यानें हुबळी नदीच्या कांठीं असलेली त्यांची वखार लुटली. असफखानाची मुलगी मुमताज ही शहाजहानची बायको होती. या मुमताजवर त्याचे फारच प्रेम होते. तिच्याच स्मरणार्थ याने जगप्रसिद्ध अशी ताजमलची इमारत बांधली. असें सांगतात कीं, या इमारतीच्या बांधकामावर वीस हजार मनुष्यें बारा-तेरा वर्षें खपत होतीं. एकूण खर्च नऊ कोटी, सतरा लाख रुपये झाला. याची कारकीर्द म्हणजे मोगल अमदानीचे सुवर्णयुग होय. हल्लींचे दिल्ली शहर यमुनेच्या कांठावर यानेंच वसविलें. हा मोठा विलासी व रंगेल असे. जुम्मा मशीद, मोती मशीद, दिवाणी आम, दिवाणी खास, वगैरे प्रेक्षणीय इमारती यानेंच बांधिल्या. हा बादशहा वृद्ध झाला तेव्हां वडील मुलगा दारा राज्यकारभार पाहूं लागला. पुढें औरंगजेबाने सर्व बंधूंचा नायनाट करून शहाजहानास कैदेंत टाकलें व राज्य बळकावलें. आठ वर्षांची कैद शहाजहानास भोगावी लागली, आणि त्यांतच त्याचा अंत झाला.

शहाजहान इतरांविषयीं बेपर्वा, वर्तनांत गर्विष्ठ, स्थिर वृत्तीचा व शांत स्वभावाचा होता. युद्धकलेंत त्याचें प्रावीण्य विशेष होतें. राज्यकारभारांत तो बराच कुशल होता. त्याच्या दरबाराचा डौल विशेष थाटाचा असे. कविताश्रवण, संगीत, नृत्य, नाटक इत्यादींची त्याला विशेष आवड होती. सुप्रसिद्ध मयूरसिंहासनाची निर्मिति यानेंच केली.

— २२ जानेवारी १६६६

## पौष व. १४ सुभाष 'चंद्रा'स ग्रहण ?

शके १८६२ च्या पौष व. १४ रोजीं वंगभूमीचे सुपुत्र सुभाषचंद्र हे आपल्या राहत्या घरातून बेपत्ता झाल्याचा पुकारा सर्व देशभर झाला.

१६ जानेवारीपासून मौन धारण करून ते आपल्या खोलींत चिंतनांत मग्न झालेले होते. व्याघ्राजिनावर बसून 'गीता', 'चंडी' व इतर धर्मग्रंथांचें पारायण करीत ते संन्यस्त वृत्तीनें वागत होते. दि. २६ ला सकाळीं त्यांच्या खोलीशीं गेलेल्या लोकांना आढळून आलें कीं, आदल्या दिवशीं ठेवलेलीं फळें, दूध, पाणी हीं जशींच्या तशींच आहेत. कांहींच हालचाल दिसेना, म्हणून लोक आंत गेले. तों काय ? सुभाषचंद्र बिछान्यावर नाहींत ! सर्व नातेवाईक घाबरून गेले. बेलूर, दक्षिणेश्वर, पांदेचरी येथे तारा करण्यांत आल्या, पण सुभाषबाबूंचा शोध लागला नाहीं. दुसऱ्या दिवशीं त्यांच्यावर खटला सुरू होणार होता. सरकारनें तीन तास घराची झडती घेतली, अटक करण्याचें वॉरंट काढलें, पण कोणालाही यश आलें नाहीं. सारी भारतीय जनता चिंतामग्न झाली, सुभाषचंद्र कोठें गेले ? ध्येयवादित्वाचा, त्यागाचा, कर्तृत्वाचा, संघटनेचा, चतुरतेचा, नेतृत्वाचा आदर्श कोठें हरपला ? सदैव आपल्या प्रकाशाने तळपत असणाऱ्या या चंद्राला ग्रहण कां लागलें ? त्यांच्याविषयीं सर्वांना फार प्रेम वाटे, त्यामुळें जनतेच्या मनांत अनेक शंका-आशंकांचीं वादळे निर्माण झालीं. विद्याभ्यास चालू असतांना सुभाष असेच अदृश्य झाले होते. गंगा-यमुनाकांठचीं पवित्र क्षेत्रें व हिमालयाचीं गिरिकंदरें गुरूच्या शोधार्थ हिंडूनहि मनःशांति लाभली नाहीं म्हणून हे परत आले होते. त्यांची वृत्ति मूलतःच तात्त्विक स्वरूपाची, गूढचिंतनात्मक आणि रामकृष्ण परमहंस व विवेकानंद यांच्या शिकवणींत मुरलेली असल्यामुळें ते पुनः एकदां अदृश्य होऊन अध्यात्मसाधनांत गुंग झाले कीं काय असा तर्क करण्यांत आला.

सुभाषबाबूंनीं या वेळीं केलेलें धाडस जगप्रसिद्ध आहे. मुक्या व बहिऱ्या अशा झियाउद्दिन पठाणाच्या वेषानें काबूलला जाणें, बर्लिनला राजकारण करणें, सिंगापूरला आझाद हिंद सेना स्थापन करणें या घटना जगाला थक्क करून सोडणाऱ्या होत्या.

— २६ जानेवारी १९४१

## पौष व. ३० दोन जन्मठेपींची शिक्षा !

शके १८३२ च्या पौष व. ३० रोजीं स्वातंत्र्यवीर सावरकर यांच्या दुसऱ्या खटल्याचा निकाल लागून त्यांना दुसरी जन्मठेप-काळया पाण्याची शिक्षा झाली.

मायदेशीं सावरकर आले ते नाशिकच्या तुरुंगांतच अटकेत राहिले. जॅक्सनच्या खुनामुळें सरकार चिथरून गेलें होतें. स्पेशल ट्रिब्यूनलपुढें खटल्याचे काम सुरू झाले. एकूण सत्तर दिवस खटल्याचें काम चालले. शेवटीं मार्गशीर्ष व. ८ (२४-१२-१९१०) या दिवशीं निकाल सांगण्यांत आला. त्यांत पहिली शिक्षा सावरकरांना जन्मठेप-काळ्यापाण्याची झाली. सावरकरांना याची जाणीव होतीच. आदल्याच दिवशीं त्यांनीं एक सुंदर काव्य लिहिले होते. त्यांत ते मातृभूमीस म्हणतात, "ऋण तें फेडाया । हसा पहिला तस स्थंडिलीं देह अर्पितो हा । जननी देह अर्पितो हा"

यानंतर जॅक्सनच्या खुनास मदत केल्याच्या दुसऱ्या खटल्यास सुरुवात झाली. "कटाच्या खटल्यांत सावरकर यांना जी शिक्षा झाली तिने सरकारचें समाधान झाले नाहीं. सरकारने हट्टानें हा दुसरा खटला उभा केला. त्या अर्थी सावरकरांना शक्य तर फांसावर लटकावण्याचा सरकारचा उद्देश आहे असें लोकांना वाटूं लागले." या खटल्यांत सावरकरांनीं आपली बाजू मांडली, "जॅक्सनच्या खुनाला मदत करण्याच्या बाबतींत माझा प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीनें कांहींहि संबंध नाहीं." न्यायमूर्तींनीं अर्थात्च त्याला मान्यता दिली नाहीं. विलायतेस जाण्यापूर्वीं आरोपीचें चरित्र, इंग्लंडमधील त्याचीं कृत्यें, इत्यादीं-वरून त्यांनीं असा निष्कर्ष काढला कीं, आरोपीने दोन पिस्तुलें सरकारी अधिकाऱ्यांचा खून करण्यासाठींच धाडलीं होतीं, आणि यासाठीं सावरकरांना दुसऱ्यांदां जन्मठेप-काळयापाण्याची शिक्षा झाली. यावर या क्रांतिसिंहाने उद्गार काढले, "तुम्हीं जी परमावधीची शिक्षा सांगितली ती निमूटपणें सोसण्याला मी सिद्ध आहें. आमची प्रिय मायभूमि शाश्वतीच्या विजयाप्रत पोचावयाची ती हाल, अपेष्टा व स्वार्थत्याग या मार्गांनींच पोचेल अशी माझी श्रद्धा आहे." सावरकरांचें सर्वच जीवित याप्रमाणें अद्भुत घटनांनीं भरलेलें आहे.

— ३० जानेवारी १९११



महादजी शिंदे. समर्थ रामदास. पू. गोळवलकर. वापू गोखले.
वा. ब. फडके. राणा संग्रामसिंह. तानाजी मालुसरे. शहाजी राजे.

## माघ शु. १ "अधर्मानें राज्य टिकत नसतें !"

माघ शु. १ या दिवशीं श्रीरामचंद्रांनीं राजधर्मास अनुसरून व बिभीषणाची संमति घेऊन सामोपचाराचें शेवटचें बोलणे करण्यासाठीं अंगदास रावणाकडे पाठविलें.

लंकेभोवतीं वेढा कायम केल्यावर रामचंद्र आपल्या सहकाऱ्यांसह सुवेल-पर्वतावर चढले व तेथून त्यांनीं लंकेचे निरीक्षण केलें. त्यानंतर प्रत्येक दरवाजावर कोटि कोटि वानर बसविले आणि स्वतः उत्तर दरवाजावर राहून अंगदास शिष्टाईसाठीं पाठविले. रामचंद्रांनीं अंगदास सांगितले, "अंगदा, मोठ्या धैर्यानें या लंकानगरींत तूं जा आणि बुद्धि नष्ट झालेल्या व मृत्यूच्या फेऱ्यांत सांपडलेल्या रावणाला माझा असा निरोप सांग कीं, 'राक्षसाधमा, ज्या जोरावर सीतेला मायेने हरण करून तूं माझा उपमर्द केलास, ते सामर्थ्य आतां दाखीव. त्या सीतेला मुक्त करून तूं मला शरण आला नाहींस तर मी आपल्या तीक्ष्ण बाणांनीं तुझ्या लंकेंतील सर्व राक्षसांचा निःपात करीन. आणि हा तुझा धर्मात्मा बंधु बिभीषण यास लंकेचे सारे राज्य देऊन टाकीन. तूं स्वतः पापी आहेसच. पण तुझ्या-भोंवतीं जमलेले सवे राक्षसहि मूर्ख आहेत. त्यांच्या ध्यानांत हे येत नाहीं कीं, अधर्माने राज्याचे व राजाचे कधींहि कल्याण होत नसते.' "

रामचंद्रांचा निरोप घेऊन अंगद रावणाच्या सभेत येऊन दाखल झाला. आणि स्वतःचे नांव सांगून त्यानें रामाचा निरोप रावणास जशाचा तसा निवेदन केला. मदांध झालेल्या रावणाला सद्बुद्धि कोठून सुचणार ? क्रोधाच्या आवेशांत अंगदास पकडण्यासाठीं त्यानें आपल्या प्रधानाला सूचना केली. चौघे राक्षस अंगदास कैद करण्यास धांवले. त्या चौघांनाहि घेऊन अंगदानें तेथून उड्डाण केलें. उडण्याच्या वेगाने ते राक्षस रावणाच्यासमोर धाडकन् खालीं आपटले. खुद्द रावणाच्या वाड्यावर चढून अंगदानें शिखरास एवढा मोठा धक्का दिला कीं, वाड्याच्या शिखराचा मोठा आवाज झाला; त्यानंतर अंगद रामरायापाशीं येऊन पोंचला. राजवाड्याचे शिखर कोसळलेलें पाहून मोठा अपशकुन झाला, असें वाटून रावणास अत्यंत दुःख झालें.



**माघ शु. २** **( १ ) गोपाळराव पटवर्धनांचें निधन !**

शके १६९२ च्या माघ शु. २ रोजीं पेशवाईतील साडेतीन रावांपैकी पहिले राव गोपाळ गोविंद पटवर्धन, मिरजकर याचे निधन झाले.

गोपाळराव पटवर्धन, मुरारराव घोरपडे, भवानराव प्रतिनिधि व अर्धाराव माधवराव पेशवे मिळून साडेतीन राव त्या वेळीं विख्यात होते. सन १७४० मध्यें गोपाळरावांना शिलेदारी मिळाल्यावर यांनीं गेळ्याच्या लढाईत चांगलाच पराक्रम केला. यांची कर्नाटकांतील कामागिरी विशेष महत्त्वाची आहे. तिकडील बहुतेक सर्व स्वाऱ्यांत यांनीं पराक्रम केला आहे. हैदरशीं चाललेल्या युद्धाच्या वेळीं माधवराव पेशव्यांची सारी भिस्त यांच्यावरच होती. यांनीं हैदराशीं अनेक वेळां युद्धे करून त्याचा पराभव केला. परंतु पुढे या सर्व कामागिरीमुळें त्यांच्या शरीरावर ताण बसला आणि त्यांना जलोदराची व्यथा लागली. त्यामुळे स्वारी सोडून यांना मिरजेस यावें लागले. तिसऱ्याच दिवशीं म्हणजे माघ शु. २ रोजीं गोपाळरावांचा अंत झाला. तेव्हां "त्रिंबकराव गोपाळरावांकरितां फार श्रमी झाले. आम्हां सर्व ब्राह्मणांमध्यें केवळ मुकुटमणि होते. महत्त्व कायम राहून गेलें. मुरारराव घोरपडेहि फार श्रमी झाले."

गोपाळराव जसे शूर तसे स्पष्ट वक्ते व व्यवहारांत चोख होते. ते शरिरानें सडपातळ व मध्यम उंचीचे असून स्वभावाने आनंदी व उत्साही होते. स्वभाव मोठा मानी असून सर्व संस्थानिकांना यांचा मोठाच दरारा वाटे. हैदरहि त्यांना मोठा मान देई. "गोपाळरावासारखे पुण्यश्लोक कोणी नाहीं. आमचीं अदृष्टें खोटीं म्हणून ते नाहींसे झाले. डेरा थोरला मुदपाकाचा व संध्येची राहुटी, साच्या वेळ मस्कऱ्या हें नजरेंत येते, तेव्हा परम दुःख होतें. वहिनीस आकाशीची कुऱ्हाड पडली. सारें क्षणभंगुर" असा मजकूर यांच्या संबंधाने सांपडतो. गोपाळरावांइतकी कर्नाटकांतील माहिती इतर कोणालाहि नव्हती. पटवर्धनांच्या सबंध घराण्याचा इतिहासच मोठा ओजस्वी आहे. त्यांचें शौर्य, धाडस, स्वार्थत्याग, वगैरे गुणांचा राष्ट्रास मोठाच उपयोग झालेला आहे. या घराण्याने देशाची सेवा उज्ज्वलपणें केली आहे.

— १७ जानेवारी १७७१

## माघ शु. २ ( २ ) उमाजी नाईक फांसावर !

शके १७५३ च्या माघ शु. २ रोजीं जेजुरीच्या खंडोबाचा प्रसिद्ध भक्त आणि विख्यात बंडखोर रामोशी उमाजी नाईक हा फांशीं गेला.

शके १७१३ मध्ये पुरंदरशेजारच्या भिवंडी गांवीं उमाजीचा जन्म झाला. सन १८०२ च्या वसईच्या तहानंतर पेशवे आणि रामोशी मंडळी यांचें बिनसलें. रामोशांचीं वतनें जप्त झालीं. त्या वेळेपासून याने लुटालूट करण्यास प्रारंभ केला. अनेक वेळां सक्त मजुरीच्या शिक्षा, व फटक्यांच्या सजा यानें भोगिल्या होत्या. सन १८२१ मध्ये पुणे प्रांतांत याने फारच धुमाकूळ घातला. याचा बंधु सत्तु जेजुरीच्या यात्रेंत पकडला जात असतां उमाजीनें दोन पोलिसांनाच ठार करून इंग्रजांविरुद्ध बंड उभारलें. आपला संच जमवून यानें पुण्याच्या सरकारी तिजोरीवर हल्ला केला व सहा हजार दोनशे रुपये लांबविले. सत्तु वारल्यावर हाच टोळीचा नायक झाला. इंग्रज सरकारने याला पकडण्यासाठीं फारच प्रयत्न केले. 'पूना हॉर्स' या फौजेच्या मुख्य अधिकाऱ्याला उमाजीवर पाठविले पण कांहीं उपयोग झाला नाहीं. पोलिसांचीं मुंडकीं कापून तीं तो गव्हर्नराकडे पाठवीत असे. वतने परत देण्याच्या अटीवर सरकारशीं याचे सख्य झालें. आणि उमाजीचा उपयोग सरकारला गुन्हे पकडण्याच्या कामीं होऊं लागला. परंतु पुढे याचा कार्यक्रम सर्व बदलून हा पुनः बंडखोर झाला. खंडोबाचें दर्शन घेऊन याने आपल्या साथीदारांसह पुणे, सातारा, नगर, सोलापूर, नाशिक, भोर या प्रांतांतून दंगल उडवून दिली. साडेतीनशें लोक याच्या टोळींत होते. सरकार पुन्हा याला पकडण्याच्या कामगिरीस लागलें. नाकेबंदीमुळें अन्नवस्त्र मिळेनासें झाल्यावर याचे साथीदार याला सोडून जाऊं लागले. कांहीं फितुर होऊन सरकारला मिळाले. पांच हजारांचें बक्षीस सरकारने लाविलें होते. ते दहा हजारांपर्यंत वाढल्यावर याच्याच टोळींतील नाना व काळू यांनीं उमाजीला भोर संस्थानच्या पोलिसांच्या स्वाधीन केलें. शेवटीं माघ शु. २ ला पुणें येथें दोघां साथीदारांसह याला फांशीं देण्यांत आलें. उमाजी मोठा शूर व मनाचा उदार होता.

— ३ फेब्रुवारी १८३२.

## माघ शु. ३ शनिवारवाड्याचें वैभव !

शके १६५१ च्या माघ शु. ३ रोजीं पुणें येथें पहिल्या बाजीरावाच्या कारकीर्दीत प्रसिद्ध अशा शनिवारवाड्याच्या बांधकामास सुरुवात झाली.

बाजीराव मधून मधून पुण्यास येत असे तेव्हां त्याचा मुक्काम कसब्यांत धडफळे यांच्या वाड्यांत असे.–" शके १६५० मध्ये पुरातन नदीकिनारा कोटकिल्ले, हिसार मोगलाई ठाणें होते. तो कोट बाजीरावांनीं पाडून मैदान केलें आणि मुत्सद्दी वगैरे लोकांस घरें बांधावयास जागा दिली. आणि पूर्वेच्या बाजूस दोन गांव होते ते मोडून कसबा केला. हा कसबा शाहूनें पेशव्यास इनाम दिला. शके १६५१ व मावळ वेसीजवळ जागा घेऊन वाडा बांधावयास आरंभ केला. नवबुरजी कूस वाड्यास घालून आंत इमारत केली–" या वाड्यांत जयपूर येथील कारागिरांकरवीं भिंतींवर सुन्दर चित्रे बाजीरावानें काढून घेतलीं. प्रथमच्या इमारतींत दोन मजले व दोन चौक होते. पुढें नानासाहेब पेशवे यांनीं त्यांत अनेक फेरफार करून तो मोठा केला. कांहीं भागाचे सहा मजले करून चार चौक केले. चौक फरसबंदी असून मध्यें कारंजीं होतीं. सभोवतींचा कोट नानासाहेबांनीं सन १७५५ त बांधला तो अद्यापि आहे.

महाराष्ट्रांतील सर्व मोठ्या वाड्यांप्रमाणें शनिवारवाड्याचे तोंडहि उत्तरेकडे आहे. त्यासच दिल्ली दरवाजा असें नांव होतें. मराठे सरदारांची दृष्टि नेहमीं उत्तरेस दिल्लीवर खिळून राहिलेली असायची. शिवशाहीच्या पूर्वीपासूनच रामदास बलशाली दैवत हनुमान यासहि हीच प्रार्थना करतात कीं–' कोटिच्या कोटि उड्डाणें झेंपावे उत्तरेकडे–' शनिवारवाडा सागवानी लांकडाचा असून आंतील नक्षीचे काम प्रेक्षणीय होतें. " शनिवारवाडा इंद्रप्रस्थ येथील पुराणप्रसिद्ध वाड्याचे बरहुकूम बाधला आहे. वाड्यांतील कारंजापैकीं कमलाकृति कारंजें हिंदुस्थानांत सर्वांत मोठें असून त्या कल्पनेचा उगमहि भारतीयच आहे.–" असा उल्लेख या वाड्यासंबंधीं सांपडतो. याच शनवारवाड्यांतून मराठ्यांचें राजकारण चालत असे. येथें अनेक ऐतिहासिक संस्मरणीय अशा घटना घडल्या.

— १० जानेवारी १७३०

## माघ शु. ४ श्रीगणपतीचा जन्मदिवस !

माघ शु. ४ हा दिवस श्रीगणपतीचा जन्मदिन म्हणून मानला जातो.

गणपति हा शंकर–पार्वतीचा पुत्र असला तरी तो अयोनिज आहे. पद्मपुराण, मत्स्यपुराण, स्कंदपुराण ... आदि ग्रंथांतून याच्या जन्माच्या कथा दिल्या आहेत. पार्वतीनें आपल्या अंगावरील उटण्याची मूर्ति बनवून ती सजीव केल्यावर गणपति निर्माण झाला; अदितीच्या पोटीं हा महोत्कटरूपानें जन्मास आला; पार्वती स्नान करीत असतां द्वाररक्षकाचे काम करणाऱ्या गणपतीने शंकरालाहि मज्जाव केला, त्यामुळें युद्ध झाले आणि शंकरांनीं याचं मस्तक तोडले, परंतु पार्वतीच्यासाठीं शंकरांनीं परत इद्राच्या हत्तीचें मस्तक बसविलें; शनीच्या दृष्टिपाताने गणपतीचें मस्तक जळालें, पण देवांनीं तेथें हत्तीचें मस्तक बसविलें. इत्यादि अनेक कथा पुराणग्रंथांतून वर्णन केल्या आहेत. कित्येक ठिकाणीं गणेशाच्या बालचरित्राचेहि वर्णन आढळतें. 'गणानां त्वा गणपति' हे ऋग्वेदांतील सूत्र गणपतीचें मानतात. महाभारतासारख्या अवाढव्य ग्रंथनिर्मितीच्या वेळीं गणेश हाच 'लेखकु' झाल्याचा उल्लेख आहे. सुमुख, एकदन्त, कपिल, गजकर्णक, लंबोदर, विकट, विघ्ननाश इत्यादी बारा नांवे याचीं प्रसिद्ध आहेत. गणपतीला गृत्समद, राजा वरेण्य व मुद्गल यांसारखे थोर भक्त मिळाले आहेत.

'सुखकर्ता दुःखहर्ता –' म्हणून गणपती हें भारतीयांचे आराध्यदैवत बनलें आहे. शैव–वैष्णव या दोन्ही पंथांचे लोक गणपतीची उपासना करतात. तामिल देशांत तंबिकाई अलवर म्हणजे बुद्धिवान् गजानन आहे. तंजावर येथेंही प्रसिद्ध असे गणपतीचे देवालय आहे. त्रिचनापल्लीला उच्छि पिल्लैयर हें अत्यंत भव्य असें गणेश–मंदिर आहे. गणपतीच्या उपासकांचा गाणपत्य पंथ मान्यतेस पावला आहे. गणपतीचे अनेक अवतार मानले गेले आहेत. कृतयुगांत विनायक, त्रेतायुगांत मयूरेश्वर, द्वापरयुगांत गजानन, ... असें त्याचे वर्णन आढळतें. पेशव्यांचे आराध्य दैवत गणपति हेंच होतें. महाराष्ट्रांतील मोरगांव, थेऊर, लेण्याद्रि, सिद्धटेक आदि अष्टविनायकांचीं स्थाने प्रसिद्ध आहेत.



## माघ शु. ५ (१) "देखिलें ऐकिलें नव्हतें कोणीं"

शके १२०९ च्या माघ शु. ५ रोजीं प्रसिद्ध महाराष्ट्रीय संत ज्ञानदेव यांनीं पैठण येथे रेड्याकडून वेद बोलविला.

संन्याशाचीं पोरें म्हणून ज्ञानेश्वरादि भावंडांचा फारच छळ झाला. ब्रह्मवृंदांच्या निकालावरून विठ्ठलपंत व रुक्मिणिबाई यांनीं आपले देहविसर्जन केलें आणि पोरकी झालेलीं हीं भावंडे शुद्धिपत्र मिळविण्यासाठीं पैठणची वाट चालूं लागलीं. आळंदीकर ब्राह्मणांनीं दिलेले पत्र निवृत्तिनाथांनीं पैठणच्या ब्रह्मवृंदांसमोर ठेवून आपला सर्व वृत्तांत "होता तैसा स्पष्ट निवेदिला." मोठमोठे वैदिक, शास्त्रज्ञ, विद्वान् ज्ञानदेवांच्या मुंजीसाठीं शास्त्रार्थ पाहूं लागले. कोठेहि आधार सांपडत नव्हता. हीं चार तेजस्वी अशीं 'संन्याशाचीं मुलें' सर्वांचीं अंतःकरणें आपणांकडे ओढून घेत होतीं. ब्राह्मणांनीं निकाल सांगितला, "नाहीं, प्रायश्चित्त उभयकुलभ्रष्ट." आणि भगवभक्तीचा आसरा घ्यावा असें सुचविण्यांत आलें. निर्णय ऐकून सर्व मुलें आनंदीच राहिलीं.

कोणी तरी थट्टेनें मुलांना नांवें विचारलीं. तेव्हां त्यांनीं आपल्या निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान, मुक्ता या शब्दांचे अर्थ सांगितले. लहान तोंडीं हें ज्ञान पाहून ब्राह्मणांना हंसूं आलें. त्यांतील एक बोलला, "नांवांत काय आहे? तो समोरचा रेडा पहा. त्याचें नांव ज्ञानदेव आहे." त्यावर ज्ञानेश्वर म्हणाले, "रेडियांत आम्हां कांहीं। भेद पाहतां किंचित नाहीं। आत्मा व्यापक सर्वां देहीं। भूतमात्रांसारिखा" आणि याची प्रचीति सर्वांना आली. रेड्याच्या पाठीवर ओढलेल्या कोरड्यांच्या वेदना ज्ञानदेवांना झाल्या. ब्रह्मवृंदांच्या आग्रहावरून ज्ञानदेवांनीं आपला हात त्या रेड्याच्या मस्तकावर ठेविला. तो रेडा चारहि वेदांच्या ऋचा तोंडाने भराभर म्हणूं लागला. स्वर व वर्ण अचुकपणें बाहेर येत होते. ब्राह्मणवृंद लज्जित झाला. ज्ञानेश्वरादिकांची स्तुति करण्यास त्यांनीं आरंभ केला. 'देखिलें ऐकिलें नव्हतें कोणीं। तें आजी प्रत्यक्ष देखिलें नयनीं' अशी सर्वांची अवस्था होऊन त्यांनीं या मुलांना शुद्धिपत्रहि दिलें.

—९ जानेवारी १२८८

## माघ शु. ५ — ( २ ) विजयनगर साम्राज्याचा अंत !

शके १४८६ च्या माघ शु. ५ ला प्रसिद्ध तालिकोटचे युद्ध होऊन दक्षिण भारतांतील बलाढ्य असे विजयनगरचें हिंदु राज्य नष्ट झाले.

देवगिरीच्या यादवांचे राज्य बुडाल्यावर दक्षिणेत शंभर वर्षें बजबजपुरी माजली होती. गोदा, कृष्णाकांठावर इस्लामी लाटेस तोंड देणारें कोणी नाहीं असे पाहून तुंगभद्राकांठचे हिंदु लोक या उद्योगास लागले. साऱ्या दक्षिण प्रांतांत इस्लामी सत्ता प्रबळ होणार असा रंग दिसूं लागला. धर्म नष्ट झाला, पारतंत्र्य आले, मंदिरे जमीनदोस्त झालीं. अशा कठीण समयीं तुंगभद्रेच्या दक्षिण तीरावर विजयनगर शहरीं ( सुग्रीवाच्या किष्किंधा नगरीच्या जागीं ) विद्यारण्य ऊर्फ माधवाचार्य यांच्या साहाय्याने हरिहर आणि बुक्क या बंधूंनीं एका प्रचंड हिंदु साम्राज्याची मुहूर्तमेढ शके १२५८ मध्ये रोविली ! बुक्क, दुसरा हरिहर, नृसिंहराय, कृष्णदेवराय, अच्युतराय, सदाशिवराय, आदि अनेक पराक्रमी राजे विजयनगरच्या गादीवर होऊन गेले. विजयनगरएवढें ऐश्वर्यशाली साम्राज्य त्या वेळीं दुसरें नव्हते. परंतु शेवटीं निजामशहा, आदिलशहा, कुतुबशहा व बेरीद-शहा या चौघा मुसलमान बादशहांनीं रामराजास ठार मारून विजयनगरचे हिंदु राज्य धुळीस मिळविले. कृष्णेच्या कांठीं रकसगी व तंगडगी या दोन खेड्यांत रामराजाच्या सैन्याचा तळ होता. त्यावरून या युद्धास 'राक्षसतागडी'चें युद्धहि म्हणतात. माघ शु. ५ ला दोनहि फौजा युद्धास सज्ज झाल्या. रामराजा स्वतः पालखींतून सर्वांना उत्तेजन देत होता. बराच वेळ अगदीं कडाकडीचें युद्ध झाल्यावर हुसेन निजामशहा फळी फोडून रामराजाच्या अंगावर धांवला. सत्तर वर्षांचा रामराजा पालखींत चढत असतांच निजामशहाचा एक मस्त हत्ती त्याच्या अंगावर धांवला. भोई पालखी टाकून पळाले. रुमीखान नांवाच्या अधिकाऱ्याने रामराजास धरून निजामशहाकडे नेले. निजामशहानें त्याचे शिर कापून ते भाल्यास लावलें व शत्रूस कळण्यासाठीं चोहोंकडे फिरविलें ! हिंदु सैन्याची धूळधाण उडाली. " करनाटकी लस्केर तमाम चिंदीचोल जहालें. कुल लस्कर मिलोन विजयनगरासी गेलें–"



— २३ जानेवारी १५६५

## माघ शु. ५ ( ३ ) शहाजी राजे यांचें निधन !

शके १५८४ च्या माघ शु. ५ रोजी शिवरायांचे वडील प्रसिद्ध 'राज्य-संकल्पक' शहाजी राजे यांचे निधन झालें.

बेदनूरच्या स्वारींत असतांना तुंगभद्रेच्या तीरीं बसवापट्टणजवळ होडिकेरी येथें त्यांचा मुक्काम होता.–"या ठिकाणीं अनेक श्वापदें उठली. राजास शिकार करावयाची इच्छा होऊन घोड्यावर स्वार होऊन हरणाचे पाठीस लागले. ईश्वरेच्छा त्यायोगें घोड्याचा पाव भंडोळींत अडकून, घोडा व राजे एकवच्छेदे पडले, ते गतप्राण झाले. मागाहून लोकमाणसे आलीं. त्यांनीं एकोजी राजांस तेथे आणाविले. एकोजी राजे यांनीं उत्तर क्रिया सांग केली. शिवाजी सुरतेच्या स्वारीहून परत आल्यावर वृत्त कळून जिजाबाई सुद्धां शोकसमुद्रीं बुडून बहुत विलाप केला."

शहाजी राजे मोठे धाडसी, कल्पक, व विपन्नावस्थेत न डगमगणारे होते. कर्नाटकांत मराठ्यांचा प्रवेश प्रथम शहाजीनें करविला. ब्राह्मण, क्षत्रिय, कारागीर यांची महाराष्ट्रीय संस्कृति दक्षिणेंत अद्यापि दिसून येते. सन १६३६ सालापर्यंत निजामशाहीचा कारभार पाहिल्यानंतर त्यांची दृष्टि कर्नाटकाकडे वळली. मोगल नर्मदेअलीकडे येऊं नयेत म्हणून शहाजीने कमालीचे प्रयत्न केले. शहाजहानच्या दोन लाख फौजेस सुद्धां त्याने दाद दिली नाहीं. तत्कालीन व्यक्तींत राष्ट्रीय स्वत्व दिमाखाने दाखवणारा हाच एकटा हिंदु सत्ताधीश दक्षिणेंत होता. आपण हिंदु असून मुसलमानी सत्तेची वृद्धि करण्यास आपला पराक्रम कारणीभूत होतो याची जाणीव शहाजीस कष्टी करीत होती. पूर्वपरंपरेची, प्राचीन संस्कृतीची व संस्कृत विद्येची आवड शहाजीच्या ठिकाणीं होती. तो विद्याकलांचा भोक्ता होता. कवींना, शिल्पज्ञांना बंगलोर, तंजावरास जो आश्रय मिळाला तो महाराष्ट्रांत मिळाला नाहीं. शहाजीनें निर्माण केलेली प्राचीन संस्कृतीची ही आवड आजहि त्या प्रांतांतून दिसून येते. विजयनगरचा शेवटचा राजा श्रीरंगराय याबद्दल शहाजीस पराकाष्ठेचा आदर होता ; त्याचा बचाव करण्याची त्याने शिकस्त केली.

—२३ जानेवारी १६६४

## माघ शु. ६ ‘ आजिंक्य तारा ’ जिंकला गेला !

शके १७३८ च्या माघ शु. ६ रोजीं ,मराठ्यांच्या राजधानींतील सातारचा ‘ आजिंक्य तारा ’ इंग्रजांनीं जिंकला व,त्यावर आपलें निशाण उभारले.

मराठयांच्या राज्याचें सर्व सामर्थ्य त्यांच्या किल्ल्यांतून होते. तेव्हां इंग्रजांनीं एकामागून एक असे किल्ले घेण्यास सुरुवात केली. सिंहगड व पुरंदर यांसारखे मोठे किल्ले इंग्रजांकडे आले. सर्वत्र फंदफितुरी माजून राहिली होती. सातारचा किल्ला सर्वांत प्रसिद्ध आणि महत्त्वाचा असा होता. सातारा मराठयांच्या राजधानीचें शहर असल्याने त्यास विशेष योग्यता प्राप्त झालेली होती. त्याकडे इंग्रजांचा मोर्चा वळला. ब्रिगेडिअर जनरल स्मिथ आणि जनरल प्रिझलर यांच्या हाताखालील फौजा कोरेगांवजवळ एकत्र झाल्या, आणि माघ शु. ५ रोजीं त्यांचा मुक्काम साताऱ्याजवळ झाला. लागलीच किल्ल्यावर मारा करण्यास प्रारंभ होऊन सर्वत्र दाणादाण उडाली. किल्ल्यावर चारपांचशे लोक असून पंचवीस मोठाल्या तोफाहि होत्या. परंतु त्या तोफांच्या पाठीमागे प्राण पणाला लावून लढणारे त्यागी वीर नव्हते. सर्व मुत्सद्दी लोक बाळाजीपंत नातूंच्या वशिल्याने इंग्रजांकडून स्वार्थ साधण्यास गुंतले होते. स्वत्वाची जाणीव कोणालाहि नव्हती. फितुरखोर व निमकहराम लोकांनीं किल्ला अगोदरच पोखरून ठेविला होता. त्यावर इंग्रजांच्या तोफांचा प्रभाव चारसहा तासांतच झाला. सायंकाळींच किल्ल्याचा पाडाव झाला, आणि दुसऱ्या दिवशीं माघ शु. ६ ला सातारच्या ‘ अजिंक्यताऱ्या ’वर इंग्रजांचें युनियन जॅक लागले. आणि क्रमाक्रमाने महाराष्ट्रांतील सर्व किल्ले इंग्रजांच्या स्वाधीन झाले.

राज्याचें सर्व बळ याच किल्ल्यांत एकवटलेले होते. यांच्याच मदतीवर श्रीशिवाजी महाराजांनीं हिंदुपदपातशाहीची स्थापना केली होती. त्यांच्यानंतरहि याच किल्ल्यांनीं दोनतीन शतकें देशाचें रक्षण केलें. परंतु किल्ल्यावर वावरणारीं माणसें मात्र स्वाभिमानी न राहिल्यामुळें महाराष्ट्राचे दुर्दैव उभे राहिले ! शौर्य, पराक्रम, बुद्धिमत्ता यांची कमतरता मुळींच नव्हती. वाण होती ती ऐक्याची, प्रामाणिकपणाची व स्वार्थत्यागाची.

— ११ फेब्रुवारी १८१८

## माघ शु. ७ सूर्यदेवाचें महात्म्य !

माघ शु. ७ हा दिवस सर्व भारतांत रथसप्तमी म्हणून मानला गेला असून या दिवशीं सर्वत्र भक्तिभावानें सूर्यपूजन होत असतें.

पृथ्वीवरील चराचर वस्तूंचें जीवन सूर्यप्रकाशावर अवलंबून असल्याकारणाने प्राचीन लोक सूर्यास देव मानूं लागले. ही सूर्याची उपासना फार प्राचीन काळ-पासून सुरू आहे. ऋग्वेदामध्यें सूर्य या देवतेच्या अनेक प्रार्थना आहेत — "आकाश म्हणजे अदिति, त्याचा पुत्र सूर्य म्हणजे आदित्य, तो आम्हांस पापमुक्त करो." अशा आशयाच्या प्रार्थना सूत्रांतून आढळतात. सूर्योदय व अस्त या वेळी सूर्यअर्घ्य देण्याची प्रथा आपल्यांत आहेच. उपनयनाच्या वेळीं बटु हा सूर्याचाच विद्यार्थी मानला गेलेला आहे. इच्छित अन्न देणारी थाळी युधिष्ठिरास सूर्यापासून मिळाली होती. मयूरकवीचा कुष्ट रोग सूर्योपासनेनें बरा झाला ... यावरून आर्यावर्तांत सूर्योपासनेची चाल पहिल्यापासून होतीसे वाटतें. त्याची पूजा कर-णाऱ्या पंथास 'सौर' पंथ असे नांव मिळाले. रामायण, महाभारतकालीं सूर्याचीं आयतनें स्वतंत्र मांडून पूजा करीत असत. पुराणकाळीं मूर्तिपूजा सुरू झाल्यावर सूर्याच्याहि मूर्ति शास्त्रशुद्ध पद्धतींनें तयार होऊं लागल्या. ह्यूएनत्संग व आल्बरोनी यांनीं मुलतान येथील प्रसिद्ध सूर्यमंदिर पाहिले होते. सतराव्या शत-कांत धर्मवेड्या औरंगजेबानें त्याचा विध्वंस केला.

ऋग्वेदांतील 'ॐ तत्सवितुर्वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि। धियो यो नः प्रचो-दयात्"; "अखिल चराचराला प्रेरणा करणारा जो भगवान् सूर्य त्याचें सर्वांना प्रिय असे जे एक सर्वश्रेष्ठ उज्ज्वल तेज आहे त्याचें आम्ही ध्यान करतो. तो आमच्या बुद्धीला आणि ध्यानभक्तीला उत्तम रीतीनें प्रेरणा करतो-" हा श्लोक आणि त्याचा अर्थ अत्यंत श्रेष्ठ मानतात, "ज्योतिषां रविरंशुमान" (सर्व ज्योतींत भास्वान् रवि तो मी) या गीतेंतील श्रीकृष्णाच्या सांगण्यावर भारतीयांची श्रद्धा आहे. हिंदुस्थानांत स्थानपरत्वें या तिथीला निरनिराळीं नांवें प्राप्त झालीं आहेत. हा मन्वंतराचा पहिला दिवस असून या दिवशीं भगवान् सूर्यनारायण सात घोडे जुंपलेल्या नवीन रथांतून मार्ग आक्रमण करीत असतो.

● ● ●

## माघ शु. ८ (१) भीष्माचार्यांचा अंत !

माघ शु. ८ रोजीं उत्तरायणाची वाट पाहत शरशय्येवर पहुडलेले, कुरुकुलाचे पितामह, कौरव-पांडव यांचे पालनकर्ते, दुर्योधनाचे मंत्री, अलौकिक योद्धे आणि सेनापति, मुत्सुद्दी, भक्त, योगी व ज्ञानी अशा भीष्माचार्यांचा अंत झाला.

भारतीय युद्ध समाप्त झाल्यानंतर राज्याभिषेक झाल्यावर युधिष्ठिर श्रीकृष्णाच्या भेटीस गेला. त्या वेळीं त्रैलोक्याचा धनी श्रीकृष्ण 'भीष्मांचें' ध्यान करीत होता. त्यानंतर पांडव व श्रीकृष्ण रथांत बसून शरशय्येजवळ आले. श्रीकृष्णाच्या सांगण्यावरून भीष्मांनी राजधर्म, क्षत्रियधर्म व नीति यांचा बोध युधिष्ठिरास केला. या बोधामृताचा उपदेश छपन्न दिवस, म्हणजे मरणकालपर्यंत अखंड सुरू होता. महाभारताच्या 'शांति' व 'अनुशासन' या दोन पर्वांत तो उपदेश व्यासांनीं ग्रथित केला आहे. त्यानंतर सूर्य उत्तर दिशेस वळल्यावर भीष्मांचा अंतकाल नजिक आला. सर्व आप्तेष्ट, उपाध्याय, पांडव, श्रीकृष्ण इत्यादि सर्व भीष्मांच्या शेवटच्या दर्शनास आले. सर्वांचा निरोप घेतल्यावर भीष्मांनीं आपले नेत्र व मन श्रीकृष्णाकडे वळविले. श्रीकृष्णाने अनुज्ञा दिली. तेव्हां श्रीकृष्णाचे ध्यान करीत हळूहळू भीष्म आपला प्राणवायु योगबलानें ब्रह्मांडीं नेऊं लागले. शेवटीं मस्तकांतून एक तेजोमय ज्योति बाहेर पडून आकाशांत निघून गेली. भीष्माचा आत्मा श्रीकृष्णस्वरूपांत मिळून गेला !

भारतांत भीष्मासारखा सर्वगुणसंपन्न पुरुष दुसरा आढळत नाहीं. अलौकिक धैर्य, निष्पाप वर्तन, अचल कर्तव्यनिष्ठा, अनुपमेय सत्य-प्रीति इत्यादि गुण त्यांच्यांत उठावानें दिसून येतात. पित्याच्या सुखासाठीं त्यांनीं आमरण ब्रह्मचर्य पाळून राज्य-पत्नीसुखाचा त्याग केला. भावांना, मुलांना, नातवांना शिक्षण दिले, उपदेश केला, युद्धाचे प्रसंगीं खराखोटा पक्ष माहीत असूनहि केवळ कर्तव्य म्हणून हा अलौकिक पुरुष कौरवांच्या बाजूनें लढला. या त्यांच्या गुणांना दुसरी तोड नाहीं. आपल्या अंतकाळीं भीष्मांनीं जो उपदेश केला तो भारतीयांना आजहि मोलाचा वाटणारा आहे. सत्यनिष्ठा आणि धर्मप्रीति यायोगेंच सर्वांचें कल्याण आहे असे त्या उपदेशाचें सार होते.



## माघ शु. ८ (२) भारताच्या इतिहासांतील सोनेरी पान !

शके १८७१ च्या माघ शु. ८ रोजीं भारतांत सार्वभौम प्रजासत्ताक गणराज्याची स्थापना होऊन भरतखंड संपूर्ण स्वतंत्र झाले.

'स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे' या लो. टिळकांच्या घोषणेची पूर्तता आज झाली. २६ जानेवारी १९३० या दिवशीं पंडित नेहरूंच्या संदेशानुसार संपूर्ण स्वातंत्र्याच्या प्रतिज्ञा सर्व देशभर घेण्यांत आल्या. आणि हजारों लोकांच्या प्रयत्नांनीं, चिकाटीने, त्यागाने हिंदुस्थानच्या भाग्याचा हा दिवस उजाडला. १५ ऑगस्ट १९४७ रोजीं इंग्रज या देशांतून गेले. आणि भारत देश स्वतंत्र झाला. परंतु माघ शु. ८ या दिवशीं भारतानें स्वतः तयार केलेल्या घटनेनुसार राज्य चालविण्यास प्रारंभ केला. भारताच्या राजधानींत–दिल्लीत अपूर्व सोहळा झाला. भारताचे अखेरचे गव्हर्नर जनरल श्री. राजगोपालाचार्य यांनीं सकाळीं दहा वाजून अठरा मिनिटांनीं भरतखंड संपूर्ण, स्वतंत्र व प्रजासत्ताक गणराज्य झाल्याचे घोषित केलें. भारताचे पहिले राष्ट्रपति म्हणून देशरत्न बाबू राजेन्द्रप्रसाद यांनीं शपथ घेतली. याच वेळीं एकतीस तोफांची सलामी होऊन राष्ट्रपतींचा झेंडा फडकूं लागला.

"पांडवांच्या इंद्रप्रस्थ राजधानीच्या वैभवशाली प्राचीन कालापासून भारताच्या या राजधानीनें वैभवाचे, उन्नतीचे, उत्कर्षाचे, भरभराटीचे किती तरी दिवस पाहिले आहेत. परंतु स्वतंत्र भारताच्या संपूर्ण प्रभुत्वसंपन्न जनतंत्रात्मक गणराज्याच्या प्रस्थापनेच्या सूर्योदयाचा हा दिवस दिल्लीच्याच काय पण सर्व भारताच्या इतिहासांत अपूर्व असा आहे." या प्रसंगीं उद्‌घाटणाच्या वेळीं महामंत्री पं. जवाहरलाल नेहरू यांनीं भारतीय जनतेला संदेश दिला, "हा दिवस भारत आणि भारतीय जनता यांच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचा आहे. आज मिळालेली दौलत ही मोठ्या जबादारीची गोष्ट असून तिला आपण सत्कृत्यांच्या द्वारां डोळ्यांत तेल घालून जपलें पाहिजे. कारण आपले प्रयत्न मंदावल्यास किंवा आपण मार्ग चुकल्यास ती आपल्या हातून निसटण्याचा संभव आहे."

— २६ जानेवारी १९५०

## माघ शु. ९ राणा संग्रामसिंहाचें निधन !

शके १४५० च्या माघ शु. ९ ला मेवाडचा प्रसिद्ध संग्रामसिंह ऊर्फ राणा संग याचे निधन झालें.

हा महाराणा रायमलचा तिसरा पुत्र. गादीवर आल्यापासून याला सतत स्वातंत्र्यरक्षणासाठीं मोंगलांशीं लढावे लागलें. दिल्लीच्या इब्राहिम लोदीचा याने धौलपुराजवळ चांगलाच पराभव केला. बाबरास राज्यवर्धनाची इच्छा फार होती. त्याने या संग्रामसिंहाशीं अनेक लढाया केल्या व प्रत्येक ठिकाणीं बाबर पराजित झाला. शेवटीं बाबरानें दारू पिण्याचे सोडून देऊन कुराणाची शपथ घेतली आणि मरेपर्यंत लढावयाचा निश्चय करून मोठ्या ईर्ष्येनें लढण्यास सुरुवात केली. तोफखान्याच्या जोरावर मुसलमानांनीं रजपुतांना चारहि बाजूंनीं वेढले. संग्रामसिंहाला मर्मस्थानीं बाण लागला आणि तो बेशुद्ध पडला. बाबराचा जय होऊन भारतांत इस्लामी राज्य स्थिर झाले. राणा संग याला मूर्छितावस्थेंतच नेत असतांना बसवा या गांवापाशीं तो सावध झाला. आपणास युद्धभूमींतून परत आणले याबद्दल त्याला मनस्वी खेद वाटला. आणि तो पुनः युद्धास सिद्ध झाला. पण युद्धविरोधी रजपुतांना ही गोष्ट सहन झाली नाहीं. त्यांनीं राणा संग्रामसिंहाला विषप्रयोग केला. तेव्हां माघ शु. ९ रोजीं हा शूर राजा काल्पी येथे मरण पावला.

मरतांना याला फार दुःख झालें. तो म्हणाला, “बाबराचा पराभव केल्याखेरीज चित्तोडास पाऊल ठेवावयाचे नाहीं असा माझा निश्चय आहे. चित्तोडचें सिंहासन माझ्यासारख्या रणांगणांतून परत फिरणाऱ्यासाठीं नसून शत्रुसंहार करून चित्तोडचा गौरव वाढविणाऱ्या वीरांसाठीं आहे.”

राणा संग शूर, बुद्धिमान आणि कृतज्ञ होता. गुजराथ, माळवा व दिल्ली येथील सुलतानांचा पराभव करून यानें महाराणा कुंभ याचे कार्य पुढे नेले. राजनीति आणि धर्म यांचा ज्ञाता म्हणून याचा लौकिक आहे. राणा एका डोळ्यानें अंध, हातानें थोटा, पायानें लंगडा पण मजबूत व धिप्पाड होता.

— ३० जानेवारी १५२८

## माघ शु. १० "सत्य गुरुरायें कृपा मज केली!"

शके १५५४ मधील माघ शु. १० ला गुरुवारीं पहांटे भंडाऱ्याच्या डोंगरावर प्रसिद्ध सत्पुरुष तुकारामबोवा याना स्वप्नांत गुरुपदेश झाला.

हा गुरुपदेश होण्यापूर्वी तुकारामाची मानसिक व्यथा पाहण्यासारखी आहे. शके १५२० मध्ये एकनाथमहाराज समाधिस्थ झाल्यावर दहाच वर्षांनीं तुकोबांचा जन्म देहू येथें झाला. त्यांच्या घरामध्यें भगवद्भक्ति पहिल्यापासूनच असून वडील बोल्होबा यांची पंढरीची वारी अखंडपणें चालू होती. घरीं थोडी शेती, व्यापारधंदा व सावकारी होती. या कुटुंबांत वयाचीं तेरा वर्षें तुकोबांनीं आनंदांत घालवलीं. त्यानंतर त्यांचें लग्न झाले. पहिली बायको दमेकरी निघाली म्हणून दुसरे लग्न केले. बोल्होबांनीं सर्व संसार तुकोबांच्या गळ्यांत टाकला. तुकारामबोवांनींहि आरंभाच्या काळांत चोखपणें संसार केला. — पण त्यानंतर एकामागून एक दुःखाचे डोंगर कोसळले. वयाच्या सतराव्या वर्षी वडील निवर्तले. भावजय मरून गेली. थोरला भाऊ सावजी विरक्त होऊन तीर्थयात्रेस निघून गेला. तुकोबा थोडे दिवस खिन्न झाले. त्यांचें प्रपंचांत मन लागेना. त्यांच्या उदासीनतेचा फायदा लोकांनीं घेतला. देणेकऱ्यांनीं पैसे बुडविले, घेणेकऱ्यांनीं तगादे लावले, तुकोबांना कर्ज झालें, वडिलार्जित मालमत्ता नाहींशी होऊन दुकानाचे दिवाळें निघालें, दुष्काळ पडून घरचीं गुरेंढोरे मरून गेलीं, व्यापारांत अतोनात नुकसान झालें, लोकांनीं फजितवाडा आरंभला, वडील बायको अन्नान्न करून मरून गेली! तुकोबांच्या मनाला लज्जा वाटली. शेवटीं 'विठो तुझे माझे राज्य। नाहीं दुसऱ्याचे काज —' असा निश्चय करून गांवांतील विठ्ठलाची पूजाअर्चा ते करूं लागले. नव्या साधनमार्गांत असतांना माघ शु. १० रोजीं —

"सत्य गुरुराये कृपा मज केली। परि नाहीं घडली सेवा कांहीं।
राघव चैतन्य केशव चैतन्य। सांगितली खूण मालिकेची॥
बाबाजी आपुलें सांगितलें नाम। मंत्र दिला रामकृष्ण हरी।
माहो शुद्ध दशमी पाहूनि गुरुवार। केला अंगिकार तुका म्हणे॥ —"

यानंतर तुकोबांना 'नित्य नवा दीस जागृतीचा' दिसूं लागला.

— ९ जानेवारी १६३३

**माघ शु. ११** **( १ ) राणा प्रतापसिंहांचें निधन !**

शके १५१९ च्या माघ शु. ११ रोजीं उदेपूरचा पराक्रमी, स्वातंत्र्याभिमानी राणा प्रसापसिंह याचें निधन झालें.

राणा प्रतापसिंहाची चितोड घेण्याची गर्जना अकबराच्या कानीं गेलीच होती. मानसिग व स्वतःचा पुत्र सेलीम यांबरोबर फौज देऊन अकबरानें युद्धाची सिद्धता केली. हळदीघाटाच्या खिंडींत दोनहि सैन्यांची गांठ पडली. सेलीम या युद्धांत ठारच व्हावयाचा; पण थोडक्यांत बचावला. युद्ध करीत असतां प्रतापसिंहास सात जखमा झाल्या होत्या. त्याचा विश्वासू घोडा चेतक त्याला धीर देत होता. पुढील पावसाळ्यांत हळदीघाटाच्या वाटेवर सेलीमने प्रतापाच्या सैन्याची भयंकर कत्तल केली. प्रतापवर बिकट प्रसंग आला. त्याचें दारिद्र्य व दुर्दैव यांनीं त्याला वेढलें. हा उदेपूरचा राणा रानांवनांतून दबून राहूं लागला. त्याच्या मुलांचे फार हाल झाले. हालअपेष्टा सोशीत असतांना प्रतापानें पुन्हां एकदां युद्धाची सिद्धता केली. भराभर बत्तीस किल्ले त्यानें परत घेतले. मोगल सेना त्रस्त झाली. चितोडखेरीज बहुतेक मेवाड प्रतापने परत जिंकून घेतला. पण चितोडगड मिळविण्याची त्याची इच्छा तृप्त झाली नाहीं. या चिंतेनेंच त्याला दुखणें लागून तो खंगून गेला. राणा मृत्यूशय्येवर सारखा तळमळत असे. त्याच्या यातना एका सरदारास पहावेनात म्हणून तो म्हणाला, " महाराण्याच्या जीवास कोणते क्लेश होत आहेत ? कोणती इच्छा आहे ? " राणा बोलला, " माझा देश माझ्या पश्चात् परकीयांच्या ताब्यांस जाऊं नये. याबद्दल कोणी खात्री करून देईल तर माझा प्राण सुखाने जाईल...... " मरतांना प्रताप कोणाची काळजी करीत होता ? बायका-मुलांची ? त्यांच्या सुखाची कीं देशाची ?... त्याच्या मुखांत शेवटीं वैयक्तिक मोक्षास अनुसरून ईशनाम आलें. दुःख, दारिद्र्य आणि वनवास यांना सबंध जीवितभर निग्रहानें तोंड देणारा राणा प्रताप 'चितोड चितोड' करीत इहलोक सोडून गेला. चावंड येथें राण्यानें देह ठेवल्यावर त्याचा अग्निसंस्कार तेथून दीड मैलावर बंडोलच्या एका ओढ्याकांठीं झाला.

— १९ जानेवारी १५९७

## माघ शु. ११ (२) वासुदेव बळवंतांचें निधन !

शके १८०४ माघ शु. ११ रोजीं महाराष्ट्रांतील पहिले क्रांतिकारक वासुदेव बळवंत फडके यांचें निधन एडन येथील कारागृहांत झालें.

भारतीय स्वातंत्र्यासाठीं लढणाऱ्या या वीरश्रेष्ठाला काळ्या पाण्याची शिक्षा होऊन एडन येथील तुरुंगांत डाबून रहावे लागले होतें. त्यांचा मुक्त आत्मा रोगानीं जर्जर झालेल्या शरीरांत तडफड करीत होता. दोन तीन वर्षांपूर्वी तुरुंगांतून पळून जाण्याचा मोठा धाडसी प्रयत्न वासुदेव बळवंतांनीं केला असल्यामुळें सरकारनें त्यांच्यावर अधिक बंधनें लादलीं होतीं. जीवन अधिक त्रासाचे व कष्टाचें झालें होतें. त्यांचे मन आणि शरीर खंगून गेल्यामुळें उत्साह पार मावळून गेला होता. दुर्धर अशा क्षयरोगानें त्यांना गांठलें. तेथील अधिकारी त्या वेळीं फलटण येथील डॉ. बर्वे हे होते. ओळखीचे, जवळचे व थोड्या मायेचे असे एकच गृहस्थ म्हणजे बर्वे डॉक्टर. वासुदेव बळवंतांना आतां कोठलीहि आशा उरली नव्हती. एका मृत्यूचीच मार्गप्रतिक्षा त्यांनीं चालविली होती. घरदार शेंकडो मैलांवर दूर होते. वडीलबंधु, पत्नी, मेहुणे इत्यादि सर्व नातलग माणसे त्यांच्या गांवीं-शिरढोण व पुणे येथे राहिलीं होतीं. मृत्यूची वाटचाल करणारे वासुदेव बळवंत इंग्रज सरकारवर मनांतून चरफडत होते. आपल्या मृत्यूनंतरहि जुलमी इंग्रज सत्तेस सुख मिळूं नये यासाठीं जणुं देवाची प्रार्थना त्यांनीं आरंभली होती. माघ शु. ११ या दिवशीं त्यांच्या अंगांतील ताप वाढला आणि अखेरची घटका जवळ आली. सायंकाळीं चार साडेचार वाजतां त्यांचें निधन झालें.

देशासाठीं प्राणार्पण करणाऱ्या क्रांतिकारांत फडके यांचें स्थान पहिलें आहे. "दधिची ऋषीनीं आपल्या अस्थीहि देवासाठीं दिल्या; मग हे भारतीयांनो, मी आपला प्राण तुमच्यासाठीं कां देऊं नये?" असे यांचे उद्‌गार आहेत. शिरढोण येथील यांच्या स्मारकस्तंभापुढे भाषण करतांना स्वा. वी. सावरकरांनीं उद्‌गार काढले, "आमच्या हृदयांतील स्वातंत्र्याकांक्षेची ज्योत ही वासुदेव बळवंतांच्या हृदयांतील ज्योतीनेंच उत्स्फूर्त झाली आहे....

— १७ फेब्रुवारी १८८३

## माघ. शु. ११ (३) अण्णासाहेब पटवर्धन यांचें निधन !

शके १८३८ च्या माघ शु. ११ रोजीं महाराष्ट्रांतील राजकारणीवृत्तीचे प्रसिद्ध साधुपुरुष महर्षि विनायक रामचंद्र ऊर्फ अण्णासाहेब पटवर्धन यांचें निधन झालें.

कोंकणांतील आरमाराचे अधिपति धुळप यांच्या आश्रयास पटवर्धनांचे घराणे होतें. रामचंद्रपंत पटवर्धन प्रथम पुण्यास आले. गुंडांच्या गणपतीच्या कृपेमुळें अण्णासाहेबांचा जन्म शके १७६९ च्या वैशाख व. ४ रोजीं झाला, म्हणून त्यांचें नांव विनायक असें ठेवण्यांत आलें. बी. ए. झाल्यानंतर यांनीं मुंबईस मेडिकल कॉलेज व लॉ क्लास या दोनहि ठिकाणीं अभ्यासास प्रारंभ केला.दोनहि परीक्षा एकदम देतां येत नसल्याने हे एल्‌एल्. बी. झाले. परतु डॉक्टरीची एल्. एम्. ॲण्ड एस्. ही पदवी मात्र यांना मिळाली नाहीं. अण्णासाहेबांना आयुर्वेदाचें ज्ञान उत्तम होते. परंतु वैद्यकीवर पैसा मिळवावयाचा नाहीं अशी यांची श्रद्धा असल्यामुळें यांनीं वैद्यकीवर एक पैहि मिळविली नाहीं. मुंबईस यांचे वास्तव्य बारा वर्षांपर्यंत होते. त्या वेळीं यांनीं काचकारखाना वगैरे औद्योगिक क्षेत्रांत लक्ष घातले. औद्योगिक व राजकीय उलाढाली मोठ्या प्रमाणावर करण्यासाठीं यांना आर्थिक साह्याची आवश्यकता वाटूं लागली. त्यासाठीं निजामच्या ताब्यांत गेलेला वऱ्हाड प्रांत, फ्रेंच बॅंकेंतून मोठी रक्कम काढून हैद्राबादचे दिवाण सर सालजंग यांच्या सहकार्यानें विकत घेण्याचे यांनीं ठरविलें. परंतु थोड्याच दिवसांत सालरजंग निधन पावले व अण्णासाहेबांचा सवे डाव फसून ते गोत्यांतच आले.

त्यानंतर यांची वृत्ति उदासीन बनली. आळंदी येथील नरसिंहसरस्वती स्वामींचें शिष्यत्व यांनीं स्वीकारिले व आपले सर्व आयुष्य हे सार्वजनिक कार्यांत खर्च करूं लागले. कायदेशीर सल्लामसलत देणे, नगरपालिकेच्या निवडणुका लढविणे, फिर्यादी लिहून देणें, मोफत औषधोपचार करणे इत्यादि कार्यांत यांचें जीवित व्यतीत होऊं लागले. लो० टिळकांच्यावर यांची मोठी भक्ति होती. अण्णासाहेब अत्यंत धार्मिक, उत्कृष्ट आचारशील आणि राजकीय दृष्ट्या स्वातंत्र्यवादी होते. हे मुंबईच्या ग्रॅंट मेडिकल कॉलेजच्या मासिकाचे व नंतर 'वैद्यसुधा' मासिकाचे संपादक होते.

— २ फेब्रुवारी १९१७

## माघ शु. १२ शिवरायांचा कोंकणांत अमल !

शके १५८३ च्या माघ शु. १२ रोजीं श्रीशिवाजीमहाराज यांनीं तळकोकण काबीज करून तेथे आपला अमल बसविला.

विजापूर दरबारनें अफझलखानास आपल्यावर पाठविले याबद्दल शिवाजीच्या मनांत राग होता. त्याचा सूड घेण्यासाठीं कल्याणपासूनच्या दक्षिण किनाऱ्यावर त्यांनीं आपले लक्ष वेधवून घेतलें. आदिलशहाच्या ताब्यातील तेथील प्रदेश सोडवावेत व पश्चिमेकडील व्यापाऱ्यांचाहि बंदोबस्त करावा असा दुहेरी हेतु शिवाजीचा होता. दाभोळ, राजापूर, कारवार इत्यादि धनाढ्य बंदरांच्या आश्रयास राहून युरोपियन व्यापारी सिद्दीस मदत करीत. तेव्हां त्यांचीं हीं ठाणें उठवणे अगत्याचें होतें. म्हणून शिवाजीची स्वारी आतां या उद्योगास लागली. कोकणांतील श्रीमंत शहरे व पेठा हस्तगत केल्या. निजामपूर, दापोली, पालवण, संगमेश्वर वगैरे ठिकाणे हस्तगत केलीं. पुढें शिवराय राजापुरास आले. तेथील इंग्रजांची वखार लुटून उपद्रव देणाऱ्या सहा इंग्रजांना त्यानें कैदेत ठेविले. सर्व प्रदेश ताब्यांत आल्यावर प्रचितगड, पालगड, मंडनगड हे किल्ले त्यांनीं नवीन बांधले. सर्वत्र शिवरायांचे वर्चस्व प्रस्थापित होऊन 'तळकोकण महाराजांस अजोनी झाले.'

कोकण हस्तगत झाल्यावर शिवाजीची फौज दाभोळवर आली. या संपन्न बंदरांत अफझलखानाचीं तीन जहाजे होतीं. तीं घेऊन तेथील अमलदार राजापुरास पळून गेला. खानाचीं तीन जहाजे इंग्रजांच्या आश्रयास गेलीं. इंग्रज सुखासुखी जहाजे शिवाजीकडे देत नव्हते. अफझलखानाची दुर्दशा सर्वत्र जाहीर झाली होती. शिवाजीचे नांव ऐकतांच भीतीने वखारीचा मुख्य रेव्हिंग्टन हा बंदर सोडून भर समुद्रांतून पळून गेला. पुढें रॅडॉल्फ टेलर, रिचर्ड टेलर, गिफर्ड इत्यादि इंग्रजांनीं कांहीं आगळीक केली म्हणून शिवाजीने त्यांना कैदेत ठेविलें. शिवाजीच्या अधिकाऱ्यानें इंग्रजांना कळविलें, "महाराजांस सिद्दीचे ताब्यांतून दंडा राजापुरी घ्यावयाची आहे, त्या कामीं तुम्ही मदत करीत असाल तर तुम्हास मोठें बक्षिस देऊं, नाहीं तर दंड भरल्याशिवाय तुमची सुटका व्हावयाची नाहीं."

— २१ जानेवारी १६६२

## माघ शु. १३ महादजी शिंदे यांचें निधन !

शके १७१५ च्या माघ शु. १३ रोजीं प्रसिद्ध मराठा वीर आणि मुत्सद्दी महादजी शिंदे यांचें निधन झालें. मरणसमयीं महादजी शिंदे वानवडी येथील छावणींत होते. आठदहा महिने पाटिलबोवांना ज्वरबाधा झाली होती.

महादजी हा राणोजी शिंद्यांचा मुलगा. त्याने प्रथम तळेगांव-उंबरीच्या लढाईत शौर्य गाजवून नांव मिळविलें. औरंगाबाद, सारवरखेडा, पंजाब इत्यादि मोहिमांतूनहि त्यानें मोठा पराक्रम केला. पानपतच्या लढाईत एका पठाणानें याच्या डाव्या पायावर वार करून महादजीस कायमचे लंगडें केलें होतें. पानिपतच्या लढाईनंतर महादजीनें उत्तरेंतील कारस्थाने व भानगडी यांची चांगली माहिती करून घेतली. उत्तर हिंदुस्थान जिंकून पानपतचे अपयश धुवून काढण्यांत महादजीची बरीच कर्तबगारी दिसून येते. लढाया, कारस्थानें, राज्यव्यवस्था, फौजेची उभारणी इत्यादि गोष्टींतील तपशील पाहिला म्हणजे असे वाटते कीं, "हिंदुपदपातशाही सिद्धीस नेण्याचा मराठेशाहीच्या आद्यचालकांचा प्रधान हेतु जर कोणी सफल केला असेल तर तो महादजीनेंच. यानेच पानपतचें अपयश धुऊन काढले, आणि अटकेपावेतों नेलेल्या झेंड्याचे सार्थक केलें. फांद्या तोडीत बसण्यापेक्षां मूळच उपटून काढावें ही कल्पना खरी करून दाखविणारा पुरुष मराठेशाहींत एकच झाला आणि तो म्हणजे महादजी शिंदा होय"

महादजींचा वर्ण काळा असूनही, चेहऱ्यावर बुद्धीची व औदार्याची चमक होती. त्याचें वर्तन साधे व अकृत्रिम असून तत्कालीन मराठी बाणा महादजींच्या ठिकाणीं मूर्तिमंत होता. तो चांगला बहुश्रुत असून धर्मनिष्ठ होता. हा रणवीर एक प्रेमळ भगवद्भक्त म्हणूनहि प्रसिद्ध आहे. स्वतः भक्तिपर पदे रचून तो म्हणत असे. 'माधव विलास' या संज्ञेनें त्याचीं पद्ये प्रसिद्ध झालीं आहेत. साधुसंतांवर त्याचा विश्वास होता. त्याचें चारित्र्य धुतल्या तांदुळाप्रमाणें होतें. "उत्तरेंत विदुर नामाभिधान पावलेला महादजी धन, सत्ता, लौकिक, ऐश्वर्य यांच्या परमावधीस पोंचूनही अंतर्बाह्य वर्तनानें सर्वथा निर्मळ राहिला. शत्रूला त्यानें आदराने व औदार्याने वागविलें."

—१२ फेब्रुवारी १७९४.

## माघ शु. १४ बापू गोखले यांचें निधन !

शके १७३९ च्या माघ शु. १४ रोजीं गोपाळ–अष्टी येथें इंग्रज-मराठे यांची लढाई होऊन मराठ्यांचे शेवटचे सेनापति बापू गोखले यांचे निधन झाले.

एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धात इंग्रज-मराठ्यांच्या ज्या लढाया झाल्या त्यांत अष्टीच्या लढाईचे महत्त्व विशेष आहे. या लढाईमुळें दक्षिणेंतील मुख्य युद्ध संपले, आणि बाजीराव वऱ्हाड-चांद्याकडे निघून गेल्यामुळे अनायासें त्याचे प्रांत इंग्रजांस मिळाले. दोन–तीन महिने सारखी पळापळ चालली असल्यामुळे मराठी फौज कंटाळून गेली होती. बाजीरावाचा पाय कोठेंच स्थिर होत नव्हता. माघ शु. १४ रोजी त्याचा मुक्काम अष्टी येथें असतांना स्मिथची फौज त्याचा पाठलाग करून आली. बापू गोखले श्रीमंताजवळ होते. ते बोलले, " इंग्रज जवळ आले. आतां आपण पळूं नये " त्यानंतर लढण्याच्या निमित्तानें गोखले सामन्यास निघून गेले. " रणांगणीं स्वामीकार्यावर आल्यानेच बहुमान आहे; या उपरीं चरणदर्शन होईल तर उत्तम, नाहींपेक्षां हेच शेवटचें. " असे बोलून, नमस्कार करून इंग्रजांचे सन्मुख जाऊन उभे राहिले. इंग्रजांची पहिली तुकडी माघारीं हटली. तें पाहून दुसऱ्या तुकडीने गोखल्यावर चाल केली. गोखले यांस गोळी लागली. घोडा मोकळा झाला. गोखले गर्दीत मिसळून काटले गेले...... गोविंदराव घोरपडे, आंनदराव बाबर वगैरे प्रमुख सरदार लढाईत मारले गेले. इंग्रजांचेंहि पुष्कळ नुकसान झालें. खुद्द स्मिथ्च्या डोक्यास तरवारीची जखम झाली. बापू गोखल्यांना पिस्तूलाच्या' तीन गोळया व तरवारीच्या दोन जखमा लागल्या.– "

गोखले यांचे नांव नरहर गणेश असे असून त्यांचा जन्म शके १६९९ मध्यें झाला होता. गोखले हे स्वामीनिष्ठ सेनापति असून कोणत्याहि लढाईतून त्यांनीं कधीं पाय काढला नाहीं. गणेश खिंडीच्या लढाईत त्यांचा घोडा ठार झाला, तरी ते पायउतार होऊन लढत होते. बापू प्रथम बदामीच्या लढाईत स्वपराक्रमाने प्रसिद्ध झालें. त्यानंतर बऱ्याच मोहिमांतून बापूंची कामगिरी प्रामुख्याची आहे.

— २० फेब्रवारी १८१८

## माघ शु. १५ बंका महाराची समाधि !

शके १२४० च्या माघ शु. १५ रोजी प्रसिद्ध भगवद्भक्त चोखा मेळा याच्या बायकोचा भाऊ बंका महार हा समाधिस्थ झाला.

तेराव्या शतकांतील नामदेवांच्या कुटुंबाप्रमाणेंच चोखामेळ्याचें कुटुंब भगवद्‌भक्त व कवि म्हणून प्रसिद्ध आहे. चोखोबाची पत्नी सोयराबाई, बहीण निर्मळाबाई, मुलगा कर्ममेळा, मेहुणा बंका हे सारे विष्णुभक्त असून त्यांचे अभंग प्रसिद्ध आहेत. या वेळीं महाराष्ट्रांत समाजांत एक क्रांतिकार्य सुरू होतें. पंढरपुरांत चंद्रभागेच्या तीरावर लोकविलक्षण धर्मकार्य चालू झालेलें होते. त्यापूर्वी— "परमेश्वराच्या दाराचीं कवाडें युगानुयुगे बंद राहिलीं होतीं. मी सर्वांचाच आहें, ही श्रीकृष्णाची मंगल घोषणा त्रैवर्णिकांच्या जपणुकीच्या कुंद हवेंत लुप्त झाली होती, धर्माच्या वाहत्या पाण्याला खांडवे पडले होते, परमेश्वराच्या भक्तीची अखिल समाजाला प्राप्त झालेली समान अधिष्ठानाची भूमि आकसून गेली होती, निर्मल तत्त्वज्ञानाचें तेज मावळल्यासारखें झालें होते. मानवी जीवनाच्या विशाल संपुष्टांतील आकाश आचारकांडांच्या कचऱ्याने भरून गेले होतें.... धर्माच्या पंचमहाभूतांची प्रकृतिच क्षीण झाली होती. जग आंबून गेलें होते, जिणे रुग्ण झालें होते, मन जरत्करू बनले होते— (श्री. म. माटे)— " आणि याच योग्य वेळीं नामदेव–ज्ञानदेव समतेचा संदेश सर्वत्र पसरवीत होते.

> "तैसे क्षत्री वैश्य स्त्रिया । कां शूद्र अंत्यजादि इया ।
> जाती तंवाचि वेगळालिया । जंव व पवती मातें ।
> मग जाती–व्यक्ति पडे बिंदुले । जेव्हां भावें होती मज मीनलें ।
> जैसे लवणकण घातले । सागरामाजीं ॥"

अशी गर्जना ज्ञानदेवांनीं केली. चोखोबाच्या कुटुंबियांनीं केलेले अभंग अतिशय गोड आहेत. बंकाचा गुरु चोखोबा स्वतःच होते. एका अभंगांत बंकाने आपली गुरुपरंपरा सांगून शेवटीं म्हटलें आहे —

> "— नामदेवें हात चोखयाचे शिरीं । विठ्ठल ती अक्षरे उपदेशिलीं ।
> बंका म्हणे माझी चोखा गुरु माउली । तियेचे पायीं लोटांगण ।—"

— ७ जानेवारी १३१९

## माघ व. १ (१) श्रीनिवृत्तिनाथांचा जन्म !

शके ११९५ श्रीमुखसंवत्सर माघ व. १ प्रातःकाळीं विख्यात तत्त्वज्ञानी संत ज्ञानदेव यांचे श्रीगुरु निवृत्तिनाथ यांचा जन्म झाला.

त्यांच्या वडिलांनीं–विठ्ठलपंतांनीं संन्यास घेऊन नंतर गृहस्थाश्रम स्वीकारला. त्यांतच चार मुलें झालीं. साहजिकपणें तत्कालीन समाजाकडून या कुटुंबाचा अत्यंत छळ झाला. आईबाप निघून गेले. पोरकीं मुलें निराश्रित झालीं. निवृत्तिनाथ सर्वांत वडील होते. त्यांना गहिनीनाथांचा उपदेश असला तरी घरांतील भक्ति विठ्ठलाची होती. निवृत्तींच्या लहान वयांत त्यांच्या अंगीं जो सर्व बोध तयार होता तो त्यांनीं ज्ञानेश्वरादि भावंडांना दिला. निवृत्तिनाथांचे चारशे अभंग उपलब्ध आहेत. त्यामध्ये कांहीं अभंग योगपर, अद्वैतपर व कांहीं कृष्णभक्तिपर आहेत. "निवृत्तींची ओळख ज्ञानाशिवाय कोणाला होणार?" ज्ञानेश्वरांनीं निवृत्तिनाथांना यथार्थ जाणिले. या आपल्या गुरूचा गौरव ज्ञानेश्वरींत अनेक ठिकाणीं ज्ञानदेवांनीं मुक्त कंठानें गाईला आहे. ज्ञानेश्वरीच्या उपोद्घातांतच ज्ञानदेव म्हणतात :—

"कां चिंतामणि आलियां हातीं। सदा विजयवृत्ति मनोरथीं ॥
तैसा पूर्णकाम श्रीनिवृत्ति। ज्ञानदेव म्हणे —"

वडील बंधु आणि गुरु या दोनहि भूमिका निवृत्तिनाथांनीं स्वीकारल्या होत्या. हे परंपरेनें नाथसांप्रदायांतील असले तरी त्यांच्या अभंगांतून सर्वत्र कृष्णभक्ति, विठ्ठलस्तुति दिसून येते. "निवृत्तीचें गोत्र कृष्णनामें तृप्त। आनंदाचे चित्त कृष्णनामे," अशी त्यांची भूमिका होती. त्यांचें उत्कट विठ्ठलप्रेम असे होतें—

"सुमनाचेनि वासें भ्रमर भुलले। मार्गे पै विसरले इंद्रियांचा ॥ १ ॥
तैसे हे संत विठ्ठलीं तृप्त। नित्य पै निवांत हरिचरणीं ॥ २ ॥
नाठवे हा दिन नाठवे हे निशी। अखंड आम्हांसी हरिराजा ॥ ३ ॥
तल्लीन प्रेमाचे कल्लोळ अमृताचे। डिंगर हरीचे राजहंस ॥ ४ ॥
टाहो करूं थोर विठ्ठलकीर्तनें। नामाच्या सुमनें हरि पूजूं ॥ ५ ॥
निवृत्ति निवांत तल्लीन पै झाला। प्रपंच अबोला हरिसंगे ॥ ६ ॥"

— २९ जानेवारी १२७४

**माघ व. १** **(२) नरहरि सोनार यांची समाधि !**

शके १२३५ च्या माघ व. १ रोजीं पंढरपूरचे प्रसिद्ध भगवद्भक्त नरहरि सोनार यांनीं समाधि घेतली.

प्रारंभींच्या आयुष्यांत नरहरि सोनार हे एकांतिक शिवभक्त होते. इतर कोणत्याहि देवाचें दर्शन घ्यावयाचे नाहीं असा यांचा बाणा होता. पंढरपूरला राहूनहि यांनीं विठ्ठलाचें दर्शन घेतले नाहीं. एकदां एका विठ्ठलभक्त सावकारानें विठोबाच्या कमरेस येईल असा सोन्याचा करगोटा करण्याचें काम नरहरि सोनारांना सांगितलें. परंतु माप घेऊनहि करगोटा लांब तरी होत असे किंवा आंखूड तरी होत असे. असे चारपांच वेळां घडलें. शेवटीं डोळे बांधून नरहरि सोनार देवळांत गेले, आणि विठ्ठलास चांचपू लागले. तो त्यांच्या हातांना पांच मुखे, सर्पालंकार, मस्तकीं जटा, व त्यांत गंगा अशी शंकराची मूर्ति लागली. तेव्हां त्यांनीं डोळे उघडले ; तो पुढे विठ्ठलाची मूर्ति! पुनः डोळे झांकले तो शंकराची मूर्ति ! असा प्रकार पाहिल्यावर हरिहर हे एकरूपच आहेत याचा बोध त्यांना झाला. नरहरि सोनार वारकरी मंडळांत येऊन मिळाले. याबद्दलचा त्यांचा अभंग प्रसिद्ध आहे—

“ शिव आणि विष्णु एकचि प्रतिमा। ऐसा ज्याचा प्रेमा सदोदित ॥ १ ॥
धन्य ते संसारीं नर आणि नारी। वाचें हरि हरि उच्चारिती ॥ २ ॥
नाहीं पै तो भेद अवघाचि अभेद । द्वेषाद्वेष संबंधा उरीं नुरे ॥ ३ ॥
सोनार नरहरि न देखे पै द्वैत । अवघा मूर्तिमंत एकरूप ” ॥ ४ ॥

शिव आणि विष्णु यांच्यांत भेद नाहीं असा प्रचार फक्त महाराष्ट्रांतच वारकरी सांप्रदायाने जोराने केला ; त्यामुळे शैव—वैष्णवांचे वाद तेथे मुळींच माजले नाहींत. नरहरि सोनारांच्या जीवितांत याचे स्पष्ट प्रतिबिंब दिसते. ज्ञानदेवांच्या तीर्थयात्रेत हे होतेच. ज्ञानदेवादि भावंडांवर त्यांची फारच भक्ति बसली. माघ व. १ रोजीं नरहरि सोनार समाधिस्थ झाले, “ शककर्ता शालिवाहन । बारा शते पस्तीस जाण । प्रमादीनामें संवत्सर पूर्ण । माघ कृष्ण प्रतिपदा । भूवैकुंठ पंढरी क्षेत्र । नरहरि सोनार परम पवित्र । मध्यान्हिं येतां कुमुदिनी मित्र । देह अर्पिला तयानें ”

 —२ फेब्रुवारी १३१४

## माघ व. २ (१) उद्गीरच्या लढाईत निजामाचा पराभव !

शके १६८१ च्या माघ व. २ ला उद्गीर येथे मराठ्यांनीं निजामाचा प्रचंड पराभव केला.

महाराष्ट्राच्या इतिहासांत निजामाचे प्रकरण कायमचे भानगडीचें म्हणून टिकलें आहे. पूर्व महाराष्ट्राचा भाग निजामाच्या ताब्यांत असून निजाम दिल्लीच्या बादशहाचा दक्षिणेतील प्रतिनिधि म्हणून काम पहात असे. दक्षिणेंतील कर्नाटकावर कोणीं हक्क गाजवावा यासंबंधीं निजाम–मराठे यांमध्यें सतराव्या शतकांत वाद सुरू होतेच. शके १६८२ मध्ये पानिपतचे युद्ध झालें. तत्पूर्वी उत्तर भारतांत अनेक घडामोडी झाल्या, त्याचप्रमाणें दक्षिणेत कर्नाटकावर स्वामित्व बसविण्यास मराठ्यांची खटपट यशास पावत होती. शके १६८१ च्या सुमारास निजामअल्ली कारभारावर होता. दोन वर्षांपूर्वी शिंदखेड येथे ठरल्याप्रमाणे पंचवीस लक्षांचा मुलूख मराठ्यांना यावयाचा, पण तो अजून हवालीं झाला नव्हता. मोठ्या प्रयत्नांनीं अहमदनगरचा किल्ला मराठ्यांना मिळाला. निजामअल्ली लागलीच लढण्यास सिद्ध झाला. फौजा तयार केल्या. मराठ्यांच्या तर्फे सदाशिवराव, रघुनाथराव, विश्वासराव असे त्रिवर्ग आपल्या सैन्यासह हजर होतेच. उद्गीर येथे दोनहि सैन्यांची गांठ पडली. "युद्धप्रसंग बराच झाला. मोगलांकडील दोनतीन मातबर सरदार पडले, सरकारच्या फौजा चौगीर्दे चालतात, दाणा वैरण त्यास मिळूं देत नाहींत. त्यांजकडे दाणावैरणीचा आकांत आहे....तोफांच्या माराने मागें रेटीत रेटीत औसा किल्ला येथें नबाब पोंचल्यावर भाऊसाहेब व विश्वासराव यांनीं दोन प्रहरच्या समयांत मोंगलांवर हल्ला केला. तोफा बंदुकांचा मार अतिशय केला. उजवीकडून भाऊसाहेब व रावसाहेब व डावेकडून दादासाहेब खासे मारामार करीत खाशांचे हौद्यापर्यंत पोचले. एक प्रहरपर्यंत उत्तम युद्ध झालें. मोंगल कचरला, हिंमत सोडली. बहुत लोक पडले, व जखमी झाले ; मोंगलाने जवळ येऊन मुक्काम केला....बहुत संतोष झाला." निजाम व मराठे यांचा तह होऊन साठ लक्षांचा मुलूख व किल्ले मराठ्यांना मिळाले.

— ३ फेब्रुवारी १७६०

## माघ व. २ (२) सयाजीराव गायकवाड यांचें निधन !

शके १८६० च्या माघ व. २ रोजीं जगप्रसिद्ध असलेले राज्यव्यवस्थापक, ज्ञानोपासक व समाजसुधारक, बडोदा राज्याचे आधिपति महाराज सयाजीराव खंडेराव गायकवाड यांचें निधन झालें.

कवळण्याच्या काशिराव गायकवाडांचे हे चिरंजीव. यांना कै. खंडेराव गायकवाडाच्या पत्नी जमनाबाई यानीं दत्तक घेतलें. वयाच्या बाराव्या वर्षी खेडेगांव सोडून आलेला अज्ञान मुलगा बडोद्यास आल्यावर अठराव्या वर्षी राज्यकारभार पाहूं लागला. यांचें शिक्षण मातोश्री जमनाबाई, दिवाण सर टी. माधवराव व मि. इलियट यांच्या नेतृत्वाखालीं सुरू झालें. यांनीं आपल्या राज्याची सर्वांगीण सुधारणा केली. सर्व राज्याची स्वतः पाहणी केली आणि राज्यकारभार करण्यासाठीं अधिकाऱ्यांचें सल्लामसलत मंडळ नेमले. वरिष्ठ इंग्रजी राजसत्तेशीं यांना सतत झगडावें लागलें. हे मोठे स्वाभिमानी होते. व्हाइसरॉयच्या परवानगीशिवाय संस्थानिकांनीं परदेशीं जाऊं नये, सातव्या एडवर्डच्या राज्यारोहणानिमित्त दिल्लींतील मिरवणुकींत संस्थानिकांनीं सामील व्हावें, इत्यादि इंग्रज सरकारच्या आग्रहाबद्दल यांनीं वेळोवेळीं आपली नापसंती तीव्र शब्दांत व्यक्त केली. सयाजीराव प्रजेंत अत्यंत प्रिय झाले होते. शिक्षणाची सुधारणा यांनीं मोठीच केली. राज्यावर आले तेव्हां अवघ्या एकशें ऐशीं शाळा राज्यांत होत्या, परंतु नंतर यांच्या प्रयत्नामुळें २५३९ शाळा चालू झाल्या. साहित्यनिर्मितीस मदत देण्यासाठीं यांनीं मोठा उदारपणा दाखविला. यांनीं समाजसुधारणाहि सर्वांच्या प्रथम आपल्या राज्यांत केली. मिश्रविवाह, पडदा–पद्धतिबंदी, बालविवाह–बंदी, विधवाविवाह, अस्पृश्यतानिवारण, इत्यादि सुधारणा यांनीं अमलांत आणल्या. सन १९०४ सालीं हे राष्ट्रीय सामाजिक परिषदेचे अध्यक्षहि होते. यांनीं चीन, जपान, अमेरिका व युरोप येथील प्रवास केलेला असल्यामुळें यांची दृष्टि अधिक विशाल व उदार झाली होती. "सतत ध्येयवादानें आणि संग्राहक बुद्धीनें वागून यांनीं आपला उत्कर्ष साधला, आपल्या प्रजेचें कल्याण केलें, मराठ्यांच्या उज्ज्वल इतिहासांत भर घातली आणि जगांतील एक कर्तबगार व यशस्वी महाराजा म्हणून अलौकिक कीर्ति सयाजीरावांनीं मिळविली."

— ६ फेब्रुवारी १९३९

## माघ व. ३ श्रीधरस्वामींची समाधि !

शके १६५१ च्या माघ व. ३ रोजीं राम–कृष्णांच्या कथा अत्यंत रसाळ भाषेंत सांगणारे महाराष्ट्राचे आवडते भक्तकवि श्रीधर यांनीं समाधि घेतली.

श्रीधरस्वामी हे अत्यंत विद्वान्, प्रतिभासंपन्न आणि रसाळ असे ग्रंथकार होऊन गेले. यांच्या काळीं मराठी काव्य पांडित्याकडे झुकल्यामुळें सामान्य जन-समूहापासून तें दुरावूं लागलें होते. पारमार्थिक ज्ञान सामान्य जनतेस समजेल अशा सोप्या भाषेंत सांगण्यासाठीं राम–कृष्णांच्या कथा सुबोध रीतीनें कथन करावयाच्या हा मराठी वाङ्मयाचा जीवितहेतु होता. परंतु या वेळीं या हेतूकडे दुर्लक्ष झालें होतें. संस्कृतमिश्र भाषेमुळें मराठी काव्य अवघड होऊन लोकांना अपरिचित होत होतें. श्रीधर कवि हे मात्र अपवादरूपाने आहेत. यांनीं आपल्या 'हरिविजय', 'रामविजय', 'पांडवप्रताप', 'शिवलीलामृत' इत्यादि ग्रंथद्वारां महाराष्ट्रांत संस्कृतिप्रसाराचें कार्य उत्कृष्टपणें केलें आहे. "श्रीधराच्या वाणीची गोडी ज्याने मुळींच चाखली नाहीं असा अभागी देह महाराष्ट्रांत कोठेहि सांपडावयाचा नाहीं. आमच्या अठरापगड जातींत सर्वांचा आवडता, संसारतापानें तापलेल्या अनाथांचें मनरंजन करून त्यांचे चित्त परमेश्वराकडे लावणारा, सर्वांच्या संकटकाळांतला एक तऱ्हेनें आधार असा श्रीधरस्वामींशिवाय दुसरा ग्रंथकार नाहीं. नामदेव–तुकारामाचे अभंग फार पसरलेले खरे; पण ते फक्त पुरुषांच्याच सहवासाचे. भजनाचा छंद बायकांना, पतितांना आणि विधवांना किंवा लहान मुलांना आढळत नाहीं. या सर्वांना सारखे अन्नछत्र श्रीधरांचेंच आढळतें. भाषाशुद्ध सरणी, सुबोध व विषयाची मांडणी गोड यांमुळे हे ग्रंथ वाचण्यासहि सोपे आहेत.... निर्मळ आयुष्यक्रम, सच्छील वर्तन, शुद्ध अंतःकरण, दृढ आत्मविश्वास यांमुळें श्रीधरांचे ग्रंथ लोकांच्या आदरास पात्र झाले आहेत. श्रीधरांची वाणी सर्व संकटांना विसर पाडणारी, श्रमभाग हरणारी, अरसिकांनाहि गुंगवणारी, अनंतरसवाहिनी दुःख-दारिद्र्य-परिहारिणी अशी आहे.–" श्रीधरांनीं 'श्रीपंढरीमहात्म्य', 'मल्हारी-विजय' इत्यादि इतर अनेक ग्रंथ लिहिले आहेत.

— २६ जानेवारी १७३०

## माघ व. ४ (१) श्रीचक्रधरस्वामींचें प्रयाण

शके ११९४ च्या माघ व. ४ रोजीं महानुभाव पंथाचे आद्य संस्थापक श्रीचक्रधरस्वामी यांनीं प्रयाण केलें.

बाराव्या-तेराव्या शतकांत महाराष्ट्रांत नामदेव-ज्ञानदेवांनीं पारमार्थिक तत्त्वज्ञान समाजाच्या खालच्या थरापर्यंत लोकभाषेत सांगण्याला सुरुवात केल्यामुळें एक अपूर्व क्रांति घडत होती. पण तत्पूर्वीच एक-अर्ध शतक तरी महानुभाव पंथानें या कार्यास सुरुवात केली होती. भडोच येथील मल्लदेव राजाचा प्रधान विशालदेव याला श्रीदत्ताच्या कृपेनें शके १११६ मध्यें एक पुत्र झाला. त्याचें नांव हरिपालदेव. शके ११४३ मध्ये या हरिपाल देवाचें निधन झाले. त्याचें प्रेत स्मशानांत जेव्हां नेलें त्या वेळीं श्रीचांगदेव उर्फ श्रीचक्रपाणि यांनी द्वारकेंत योगबलाने देहत्याग करून हरिपालदेवाच्या मृत कायेंत प्रवेश केला. हरिपालदेव जिवंत झाले. यात्रेंत असताना ११४५ शकांत ऋद्धिपूर येथे गोविंदप्रभु यांच्याकडून त्यांना शक्तिस्वीकार झाला. त्यांचें नांव 'चक्रधर' असें प्रसिद्ध झालें. त्यांनीं सुमारे चाळीस वर्षें भारतांत प्रवास करून समाजाची पाहणी केली. त्या वेळीं धर्माचें स्थान कर्मकांडाने बळकाविलेलें त्यांना दिसले. स्त्रीवर्ग, शूद्रवर्ग यांना मोक्षमार्ग खुला नव्हता. तेव्हां ही अडचण दूर करण्यासाठीं व मोक्षप्राप्तीच्या साधनांत संसारप्रवर्तक देवतोपासनादि प्रवृत्त वैदिक कर्मांची अनुपयुक्तता व संसारनिवर्तक परमेश्वरोपासनादि निवृत्त वैदिक कर्मांची उपयुक्तता प्रतिपादन करण्यासाठीं श्रीचक्रधरांनीं पैठण येथें शके ११९० मध्ये संन्यासदीक्षा घेऊन महानुभाव पंथाची स्थापना केली. या पंथानें बरीच कामगिरी केली. मध्यंतरींच्या कालांत महानुभाव पंथासंबधीं पुष्कळ गैरसमज पसरले असले तरी अलीकडे डॉ. कोलते प्रभृतींच्या प्रयासाने महानुभावांच्या आचाराचे व तत्त्वज्ञानाचें उज्ज्वल आणि सत्य स्वरूप लोकांच्या ध्यानांत येत आहे. श्रीचक्रधरांनीं स्वतः कोणताहि ग्रंथ लिहिला नाहीं. पण प्रसंगानुसार त्यांनीं केलेल्या उपदेशपर आणि तत्त्वज्ञानपर वचनांचा संग्रह म्हणून केशवराजसूरी यांनीं 'श्रीचक्रधरसिद्धांतसूत्रपाठ' या नांवाचा ग्रंथ तयार केलेला आहे.

— ७ फेब्रवारी १२७३

## माघ व. ४ रमाबाई पेशवे हिचें निधन !

शके १७१४ माघ व. ४ रोजीं सवाई माधवराव पेशवे यांची पत्नी रमाबाई हिचे निधन झालें.

सन १७९४ पासून महाराष्ट्रांत दैवी, मानवी आपत्ति कोसळूं पाहत होती. पुण्याच्या नदीचें पाणी नासून महामारीचा उपद्रव सुरू झाला होता. दाक्षिणेंत सर्वत्र दुष्काळानें आपलें स्वरूप अधिकच विक्राळ केलें होते, तशांत पेशव्यांची बायको रमाबाई हिला बहुत दिवस समाधान नव्हते, तीनचार महिने ताप येत होता, पण कळूंच दिले नाहीं. पुढें नानांस कळल्यावर उपाय होऊं लागले. पण गुण न येतां माघ व. ४ रोजीं माहेरीं थत्ते यांचे घरीं देवाज्ञा झाली— सवाई माधवराव व रमाबाई या दांपत्याचे कोडकौतुक सबंध महाराष्ट्राला होतें. अनेक देवतांना महाराष्ट्रांतून नवस होऊन मोठ्या आणीबाणीच्या वेळीं सवाई माधवरावांचा जन्म झाला होता. या बालपेशव्याचे संगोपन नाना फडणिसांनीं अत्यंत दक्षतेनें केलें.

माधवराव-रमाबाई यांच्या लग्नाचा थाट अपूर्व असाच झाला. सर्व सरदार-होळकर, रास्ते, पटवर्धन, घोरपडे, आदि प्रमुख लोक लग्नास हजर होते. सवाई माधवरावांचें हे लग्न अवघ्या महाराष्ट्राला आपल्याच घरचें कार्य वाटलें. अहल्याबाई होळकर हिने मोठ्या आपुलकीनें चौकशी केली. नानांचे अगत्याचे बोलावणें असूनहि बाई लग्नास आली नाहीं. ती बोलली– "लक्ष प्रकारें आम्हीं जावें. पूर्वसूचना असती तर फौजेचा वगैरे सरंजाम केला असता. आतां तीथ समीप आली. एकलें थोड्या लोकांनिशीं जाणें वाडिलांच्या स्वरूपास योग्य कीं काय ! तेथें तुकोजी बाबा आहेत तेच आम्ही आहोंत.–" लग्नानिमित्त तिनें श्रमिंतांस उत्कृष्ट पोषाख व जवाहीर, गोपिकाबाई, सगुणाबाई, पार्वतीबाई, नाना, आदींना देकार पाठविले.

— पण हा आनंदाचा सोहळा फार दिवस टिकला नाहीं. रमाबाई बरेच दिवस जीर्णज्वराने आजारी पडली. त्यांतच तिचा अंत झाला.

— २१ जानेवारी १७९३

## माघ व. ४ ( ३ ) मोतिलाल नेहरू यांचें निधन !

शके १८५२ च्या माघ व. ४ रोजीं भारतांतील प्रसिद्ध राज्यघटनाशास्त्रज्ञ, कायदेपंडित, राजकारणी मुत्सद्दी व वादविवादपटु पंडित मोतिलाल नेहरू यांचें निधन झाले.

नेहरूंचे मूळ घराणें काश्मीरमधील, परंतु अनेक पिढ्यांपूर्वी हे अलाहबादेस येऊन दाखल झालें. मोतिलाल तीन महिन्यांचे असतांनाच त्यांचे वडील वारले. तेव्हां त्यांचें संगोपन थोरल्या बंधूनें केलें. हायकोर्ट वकिलीची परीक्षा देऊन सुवर्ण-पदक मिळविल्यावर नेहरूंनीं वकिली करण्यास प्रारंभ केला. थोड्याच अवधींत त्यांचा जम बसला आणि त्यांचें नांव सर्वत्र गाजूं लागलें. हें घराणें मूळचेंच अतिशय श्रीमंत होते. त्यामुळे खूप पैसे मिळवावे, ऐषारामांत दिवस कंठावेत आणि प्रसंगीं प्रागतिकांच्या राजकारणांत भाग घ्यावा असा ठराविक कार्यक्रम यांचा असे. परंतु, पुढे महात्मा गांधींच्या सहवासानें या घराण्यांतच आमूलाग्र बदल झाला; आणि ते गांधींच्या चढाईच्या राजकारणांत सामील झाले. गांधींच्या बरोबरीनें सर्व तऱ्हेचें राजकारण मोतिलाल खेळले तरीसुद्धां "म. गांधी आणि हे अगदीं भिन्न प्रकृतीचे लोक होत. मोतिलाल त्यांना एक थोर मनुष्य म्हणून मान देत, पण महात्मा म्हणून त्यांची टरच उडवीत. म. गांधी संन्यासी संस्कृति निर्माण करणारे तर मोतिलाल विलासी प्रकृतीचे, तथापि मूलतः भेद असूनहि दोघांची एकमेकांवर पूर्ण श्रद्धा होती. म. गांधींच्या त्यागाचा आणि व्यक्तिमत्त्वाचा गौरवहि मोतिलाल आपल्या उमद्या स्वभावानुसार मनमोकळेपणानें करीत.—" अर्थात् मोतिलाल नेहरूंच्या मृत्यूनें म गांधींना विशेष धक्का बसला. "माझी शेवटची झोप मी परतंत्र देशांत घेणार नाहीं; स्वतंत्र देशांत घेईन" असे वाक्य उच्चारून मोतिलालजींनीं माघ व. ४ रोजीं प्राण सोडला. सर्व भारताला धक्का बसला. आणि अगदीं निकटचा सहकारी गेला म्हणून महात्माजीहि विव्हळ झाले. आपल्या दुःखाचे त्यांनीं वर्णन केलें आहे : "माझी स्थिति एखाद्या विधवेपेक्षांहि करुणास्पद झाली आहे. पतीशीं निष्ठावंत राहून तिला आपल्या पतीच्या कीर्तीचा उपभोग घेतां येईल. तसें कांहींहि करण्याचें सामर्थ्य मजजवळ नाहीं."

— ६ फेब्रुवारी १९३१

## माघ व. ५ सोनोपंत डबीर यांचा मृत्यु !

शके १५८६ च्या माघ व. ५ रोजीं शिवाजीच्या पदरीं असणारे प्रसिद्ध राजनीतिज्ञ सोनाजी विश्वनाथ डबीर यांचें निधन झालें !

सोनोपंत डबीर हे प्रथमपासूनच शिवाजी व जिजाबाई यांचेजवळ होते. हे राजनीतींत फार हुषार होते. शिवराय स्वराज्याच्या मार्गावर होते. सर्वत्र इस्लामी जुलूम सुरू होता. त्यांतून देशाला मुक्त करावें म्हणून शिवाजीचे उद्योग सुरू झाले. रामचंद्रपंत अमात्य म्हणतात : "शककर्ते छत्रपति साहेब यवनाश्रय असतां त्यांपासून पुणे आदिकरून स्वल्प सत्ता स्वतंत्र मागून घेऊन पंधरा वर्षांचें वय असतां त्या दिवसापासून तितकेच स्वल्प मात्र सत्तेवर उद्योग केला." शिवरायांच्याभोंवतीं जिवास जीव देणारे अनेक संवगडी जमले. देशमुखांना आपणांकडे वळवून घेण्यास ज्या कार्यकुशल मुत्सद्यांचा शिवाजीस फार उपयोग झाला त्यांस त्यांनीं डबीर हा किताब दिला. डबीर म्हणजे युक्ति जाणणारा. तेच सोनोपंत डबीर होत. मुरार, शहाजहान, औरंगजेब, शाहिस्तेखान, जयसिंग यांकडे वकील म्हणून शिवाजीनें यांनाच पाठविलें होते. औरंगजेब दक्षिणेवर स्वारी करण्याची तयारी करीत होता तेव्हां शिवाजीने अहमदनगरच्या मुल्ताफतखान याकडे सोनोपंतांसच पाठविले होते. "आदिलशाहीचा कोंकणांतील भाग माझ्याकडे चालविण्याचे आपण वचन देत असाल तर विजापूरच्या युद्धांत मोगलांस मदत करण्यास मी तयार आहें." याचा जबाब सोनोपंतांनीं आणला कीं, "तुमचे वकिलांनीं आमची खातरी केली. तुमचे मनोगताप्रमाणें बंदर दाभोळ व त्याजखालील मुलूख व किल्ले विजापूरकरांकडील तुमचे हातीं होते, ते तुम्हांस दिल्हे असत."

सोनोपंत डबीर दिल्लीसहि गेले होते. तत्कालीन कवि परमानंद यांना 'अग्रजन्मा' म्हणजे ब्राह्मण समजतो. शके १५८६ च्या पौष व. ३० (दि. ६-१ १६६५) रोजीं महाबळेश्वरीं सूर्यग्रहणानिमित्त जिजाबाईंची व सोनोपंतांची तुला झाली असा उल्लेख सांपडतो. पुढें राज्याभिषेकप्रसंगीं त्रिंबकपंतांचे पुत्र रामचंद्रपंत हे सुमंत होते. अशा प्रकारें डबीरांचें घराणे एकनिष्ठपणें शिवाजीजवळ होतें.

—२५ जानेवारी १६६५

## माघ व. ६ — कवि दासोपंत यांची समाधि !

शके १५३७ च्या माघ व. ६ ला आंबेजोगाई येथे नृसिंहतीर्थाजवळ प्रसिद्ध साधु कवि दासोपंत यांनीं समाधि घेतली.

बिदरच्या बहामनीशाहींत नारायणपेठ गांवीं शके १४७३ मध्यें दिगंबरपंत देशपांडे याचे पोटीं दासोपंतांचा जन्म झाला. बाळपणापासून ते दत्ताचे भक्त होते. त्यांनीं कोणाचीहि ताबेदारी न करितां जन्मभर आंबेजोगाई येथेच राहून प्रचंड प्रमाणावर लेखनव्यवसाय केला. त्यांनीं शंभर ग्रंथ लिहिले आहेत. बृहद्ग्रंथप्रविरता म्हणून मराठी वाङ्मयांत ते अद्वितीय आहेत. त्यांची सर्व कविता तीनचार लाखांवर असेल ! 'गीतार्णव', हा त्यांचा प्रसिद्ध ग्रंथ. "दासोपंतीं केला गीतार्णव मानवा सवा लाख" असा यांचा उल्लेख मोरोपंतांनीं केला आहे. एवढा मोठा ग्रंथ मराठी भाषेंत नाहीं. पहिल्या अध्यायाच्या ओव्या ३१३३ असून दुसऱ्या अध्यायाच्या ओव्या ५६५५ आहेत. ग्रथ विस्ताराने अफाट असला तरी सुबोध आणि चटकदार आहे. ग्रंथकार अत्यंत विद्वान् व वेदांतवेत्ते असावेत अशी साक्ष या ग्रथावरून दिसली तरी त्यांत अवजडपणा, क्लिष्टता आलेली नाहीं. सव्वा लाख ओव्यांचा ग्रंथ लिहिण्यास जी निष्ठा, जोमदारपणा, भाषाप्रभुत्व, आत्मनिष्ठा, इ० श्रेष्ठ गुण लागतात ते दासोपंतांत निःसंशय होते. दासोपंतांच्या 'ग्रंथराज' या ग्रंथाची मोठी छाप रामदासांच्या दासबोधावर पडलेली दिसून येते. याशिवाय, पंचीकरण, गीताभाष्य, अनुगीता, दत्तात्रेयमाहात्म्य, पदार्णव, वाक्यवृत्ति, अवधूतराज, इत्यादि अनेक ग्रंथ दासोपंतांनीं लिहिले आहेत. याशिवाय दासोपंतांचीं बरींचशीं पदेंहि रसिकमान्य आहेत. आपल्या एका पदांत दासोपंत शब्दाच्या शक्तीचे वर्णन करतात —

> "शब्द जेणें पर्वत द्रवती, शशिसूर्य गति विसरती रे, ।
> शब्दें थरथरिली मेदिनी जाले तन्मय लोक तीन्ही ।
> शब्दें पावकु तोहि निवाला अकाळीं घनु वर्षिला ।
> सप्तसागर मिळे क्षिती शब्दु आइकोनि येकत्व होती !"

— २९ जानेवारी १६१६

## माघ व. ७ "संभाजी राजांस जिवंतच धरून नेलें !"

शके १६१० च्या माघ व. ७ रोजीं ' संभाजी राजे व कवि कलश खेळणाहून रायगडास जावयास संगमेश्वरास आले असतां सेक निजाम कोल्हापुरीहून दौड करून येऊन उभयेतांस जींवंतच धरून नेलें.'

शेख निजाम नांवाचा एक कुत्बशाहींतील सरदार औरंगजेबास येऊन मिळाला होता. बादशहानें त्याला सहा हजारांची मनसब व मुकर्रबखान किताब देऊन त्याचा गौरव केला. त्याला कोल्हापूर प्रांताची माहिती चांगली असल्यामुळे पन्हाळा किल्ल्यास वेढा घालून संभाजीस पकडण्याची कामगिरी बादशहानें याचेवर सोपविली. औरंगजेबानें संभाजीचा पाडाव करण्याचे फार प्रयत्न केले होते. सर्वत्र गुप्त हेर पसरलेले होते; त्यानीं येऊन शेख निजामास वर्दी दिली कीं, संभाजी संगमेश्वर येथें ऐषारामांत मग्न आहे. लागलीच मुकर्रबखानानें जय्यत तयारी केली. दोन हजार स्वार व एक हजार पायदळ एवढ्या सैन्यानिशीं तो संभाजीस पकडण्यास निघाला. अंबा घाटांत त्याच्या सैन्यास फारच त्रास सहन करावा लागला, परंतु नेटाने त्यानें संगमेश्वर गांठून संभाजीवर हल्ला केला. कवि कलशानें त्याला प्रतिकार करण्याचा प्रयत्न केला, परंतु त्याच्या हातास जखम झाल्यामुळें तो मागे फिरला; आणि लोकहि सर्व भराभर पळून गेले. खानाने संभाजीच्या राहत्या घरास वेढा दिला. दुर्व्यसनानें गोगलगाय झालेला पराक्रमी सिंह, संभाजी, कवि कलशाबरोबर तळघराच्या काळोखांत लपून बसला ! शेख निजामचा मुलगा इखलासखान याने अरुंद पायऱ्यांवरून तळघरांत प्रवेश केला; आणि संभाजी व कलशा यांना पकडून वर आणिलें. मुकर्रबखान बाहेर होताच. त्यानें त्या दोघांना हत्तीवर बांधले. घरांत इतर माणसें सांपडलीं त्यांना कैद केलें व सर्वांना घेऊन तो बादशहाकडे निघाला.

यासंबंधीं असा उल्लेख सांपडतो :- "मोगलाने कबजीसह हस्तगत करून नेलें. ते समयीं वाडा जाळिला व गांवांतील देवळें फोडिलीं. देव बाटविले. याप्रमाणें महार्णव जालें !" याच वेळी गर्दीत म्हाळोजी घोरपडे ठार झाला. आणि संताजी वगैरे त्याचे तिघे पुत्र रायगडाकडे गेले.

— १ फेब्रुवारी १६८९

## माघ व. ८ (१) मदोन्मत्त रावणाकडून सीताहरण !

माघ व. ८ या दिवशीं लंकेचा राजा रावण यानें श्रीरामचंद्राची पत्नी सीतादेवी हिला कपटाने पळवून नेलें.

आपल्या नासिकाच्छेदनाचा वृत्तांत शूर्पणखेनें रावणास सांगितला, आणि तिनें सीतेच्या सौंदर्याचेंहि भरपूर वर्णन केलें. त्यानंतर रावणास अभिलाषा निर्माण होऊन त्याने सीतेचे हरण करण्याचे ठरविले. मारीच नांवाच्या राक्षसाने रावणाच्या आग्रहावरून सुवर्णमृगाचा वेष धारण केला आणि तो सीतेच्या आश्रमाभोवतीं हिंडूं लागला. त्या सुंदर मृगाकडे पाहून सीतेला अत्यंत हर्ष होऊन तिने रामाला सांगितले, "आर्यपुत्रा, हा सुंदर मृग मला आणून द्या." यानंतर लक्ष्मणाला सीतेचे रक्षण करण्यास सांगून रामचंद्र धनुष्यबाणासहित सुवर्णमृगाच्या पाठीमागें गेले. लांब पल्ल्यावर गेल्यावर रामानें त्या मृगावर बाण सोडला, परंतु कपटाने त्यानें "हा सीते, हा लक्ष्मणा!" अशी आरोळी मारली. सीतेनें तो आर्त स्वर ऐकला आणि लक्ष्मणास तिने सांगितलें कीं, "रामाच्या साह्यास तुम्हीं जावें." लक्ष्मणाला यांत सत्य कांहीं वाटलें नाहीं. परतु सीतेने कटु बोलण्यास आरंभ केल्यावर मात्र लक्ष्मण रामाच्या साह्यार्थ निघून गेला.

रावणानें ही संधि साधली. त्रिदंडी संन्याशाचें रूप घेऊन तो रामाच्या आश्रमाच्या दारांत आला. शोकग्रस्त झालेली सीता अश्रुविमोचन करीत होती. बाहेरच्या 'संन्याशा'ने तिला सविस्तर हकीगत विचारली; आणि सांगितले, "मी लंकेचा अधिपति रावण आहें. तूं माझी भार्या हो, मी तुला पट्टराणी करीन. लंकेचें सर्व वैभव तुझ्या पायीं ओतीन." यावर सीता संतप्त होऊन बोलली," महापराक्रमी अशा रामाची मी पतिव्रता भार्या आहें. तू सिंहाच्या बायकोची इच्छा करितोस! तुला लाज नाहीं वाटत? दुष्टा, तूं वैश्रवणाचा भाऊ म्हणवतोस. आणि परस्त्रीवर अशी नजर ठेवतोस या तुझ्या दुष्ट वर्तनाने सर्व राक्षसांचा, तुझा, आणि तुझ्या लंकेच्या राज्याचा नाश होईल." यानंतर रावणास क्रोध येऊन त्याने आपलें नेहमींचे उग्र रूप धारण केलें. आणि 'उन्मत्त सीते! पहा माझा पराक्रम!' म्हणून त्या नराधमानें तिला उचलून आश्रमाबाहेर आणलें. आणि खांद्यावर टाकून मोठ्या वेगानें तो निघाला.

## माघ व. ८ (२) डॉ. बा. शि. मुंजे यांचें निधन !

शके १८६९ च्या माघ व. ८ रोजीं लो० टिळकांच्या राजकीय परंपरेंतील निष्ठावंत कार्यकर्ते, अखिल भारतीय हिंदुसभेचे माजी अध्यक्ष, आणि सरचिटणीस, नाशिक येथील भोसला लष्करी विद्यालयाचे संस्थापक डॉ. बा. शि. मुंजे यांचें निधन झालें.

बिलासपूर आणि रायपूर येथें प्राथमिक आणि दुय्यम शिक्षण झाल्यानंतर यांनीं मुंबईच्या ग्रँट मेडिकल कॉलेजमध्यें अभ्यासास प्रारंभ केला. सन १८९८ मध्यें यांनीं एल्. एम्. अँड एस्. ही पदवी आणि शस्त्रक्रियेतील नैपुण्याबद्दल 'ग्रे मेडल' मिळवलें. मुंबईंत कांहीं दिवस काम केल्यावर सन १९०० सालीं आफ्रिकेंत सुरू असलेल्या बोअर युद्धांत सर्जन म्हणून कॅप्टनच्या हुद्यावर ते दाखल झाले. अलौकिक शौर्य आणि उत्तम कामगिरी यांबद्दल त्यांना बहुमानाचें पदक प्राप्त झालें. प्रत्यक्ष युद्धक्षेत्रावर काम करीत असतांनाच दरबान येथे यांची व महात्मा गांधींची पहिली भेट झाली. आफ्रिकेतून परत मायदेशीं आल्यावर नागपूर येथे स्थायिक होऊन यांनीं डॉक्टरकीच्या धंद्यास सुरुवात केली. मोतिबिंदूच्या विकारावर शस्त्रक्रिया करण्याची एक अभिनव पद्धत शोधून काढून उत्कृष्ट नेत्रविशारद म्हणून मुंजे यांनीं कीर्ति संपादन केली. याजबरोबर त्यांचें राजकारणाकडेहि लक्ष होतेंच. देशबांधवांची सर्वतोपरि सेवा करतां यावी म्हणून यांनीं लो० टिळकांचें अनुयायित्व पत्करून हिंदी स्वराज्य संघाची चळवळ सुरू केली. कांहीं दिवस डॉ. मुंजे कॉंग्रेसमध्येहि होते. परंतु पुढें मतभेदामुळें ते हिंदुमहासभेच्या राजकारणाकडे वळले.

सन १९३३ मध्यें फ्रान्स, जर्मनी, इटली इत्यादि देशांतील लष्करी केंद्रांना यांनीं भेटी दिल्या व तेथील अभ्यासक्रमांची सूक्ष्म माहिती करून घेतली. आणि हिंदु तरुणांत क्षात्रवृत्ति निर्माण होण्यासाठीं यांनीं सन १९३७ मध्यें नाशिक येथें 'भोसला मिलिटरी स्कूल' नांवाची लष्करी शिक्षण देणारी संस्था स्थापन केली. ही यांची फार मोठी कामगिरी होय. शेवटपर्यंत याच संस्थेच्या हितासाठीं यांनीं आपलें सर्वस्व खर्च केलें.

— ३ मार्च १९४८

## माघ व. ९ (१) "गड आला पण सिंह गेला!"

शके १५९१ च्या माघ व. ९ रोजीं शिवरायांचा विश्वासू सेवक तानाजी मालुसरे हा कोंडाणा किल्ला सर करीत असतां मरण पावला.

आपला भाऊ सूर्याजी व वृद्ध शेलार मामा आणि निवडक तीनशें मावळे यांसह तानाजी माघ व. ९ रोजीं काळोख्या रात्रीं सिंहगडच्या पायथ्याशीं आला. किल्ल्यावर बंदोबस्त मोठा चोख असून उदेभान नांवाचा रजपूत राठोड तेथील अधिकारी होता. सिंहगड हस्तगत करणें मोठ्या कष्टाचेंच काम होतें. तानाजीनें आपल्या सैन्याच्या दोन टोळ्या करून स्वतः एका टोळीसह तो एका अवघड वाटेनें घोरपडीच्या साह्यानें किल्ल्यावर चढला; आणि तेथून दोर सोडून आपल्या सहकाऱ्यांना त्यानें किल्ल्यावर घेतलें. किल्ल्यावरील शत्रूला चाहूल लागून ते सावध झाले. आणि लढाईस एकदम सुरुवात झाली. युद्ध मोठ्या निकराचें झालें. थोड्याच वेळांत पन्नास मावळे आणि पांचशे रजपूत ठार झाले. आणि तानाजी व उदेभान यांची समोरासमोर गाठ पडून दोघांचें द्वंद्व सुरू झालें. एकमेकांवर वार करीत असतां दोघेहि गतप्राण झाले. तानाजी पडला तेव्हां मावळे परत फिरणार तो सूर्याजी कल्याण दरवाजानें आपली टोळी घेऊन आला. मराठ्यांना पुनः हुरूप चढला. शेलार मामाने—या ऐंशीं वर्षांच्या वृद्धानें सर्व रजपुतांची कत्तल केली. गड ताब्यांत आला. संकेतानुसार किल्ल्यावर गंजी पेटवून शिवरायांना ही विजयाची बातमी कळविण्यांत आली. शिवरायांना आनंद झाला. परतु दुसऱ्या दिवशीं तानाजीच्या पतनाची हकीकत समजली तेव्हां त्यांना अत्यंत दुःख होऊन ते उद्गारले, "गड आला पण सिंह गेला!"

तानाजी हा उमराठे गांवचा राहणारा. शिवरायांचा हा अत्यंत विश्वासू होता. उदेभानशीं लढतांना याची ढाल तुटली तेव्हां तो हाताची ढाल करून लढला.

विशेष नवलाच्या योगायोगाची गोष्ट म्हणजे ज्या माघ व. ९ रोजीं सिंहगड मराठ्यांच्या हातांत आला, त्याच माघ व. ९ रोजीं सुमारे दीडशे वर्षांनंतर सिंहगड इंग्रजांच्या ताब्यांत गेला.

— ४ फेब्रुवारी १६७०

## माघ व. ९ (२) रामदासस्वामी यांची समाधि !

शके १६०३ च्या माघ व. ९ रोजीं आपल्या अंगची भगवद्भक्ति व ईश्वरोपासनेचें तेज यांच्या जोरावर महाराष्ट्राला प्रपंचविज्ञान शिकवून चेतना देणारे विख्यात संत श्रीसमर्थ रामदास स्वामी यांनीं समाधि घेतली.

शिवाजीमहाराजांच्या मृत्यूचें वर्तमान समजतांच 'श्रीची इच्छा' म्हणून रामदास आपल्या खोलींत गेले. त्यानीं अन्न खाणें सोडून दिलें. फक्त दुधावर निर्वाह करून बाहेरचें हिंडणें–फिरणेंहि बंद केलें. संभाजीने केलेल्या अनन्वित कृत्यांची हकीगत स्वामींच्या कानांवर आली. त्यांनीं संभाजीला पत्र लिहून "शिवरायाचें आठवावें रूप। शिवरायाचा आठवावा प्रताप। शिवरायाचा आठवावा साक्षेप। भूमंडळीं॥" असा उपदेश केला. दिवसेंदिवस त्यांची प्रकृति खालावत होती. माघ व ९ ला श्रीराममूर्तीस साष्टांग नमस्कार घालून स्वामी मूर्तिसम्मुख भूमीवर बसले. शेवटची वेळ येऊन ठेपली होती. समर्थांनीं उपदेश केला—

"माझी काया गेली खरे। परि मी आहे जगदाकारें।
ऐका स्वहित उत्तरें। सांगेन तीं।
नका करूं खटपट। पहा माझा ग्रंथ नीट॥
तेणे सायुज्याची वाट। ठायीं पडे॥"

शेवटीं स्वामींनी 'हर हर' शब्द एकवीस वेळां उच्चारून 'श्रीराम' या शब्दाबरोबर अवतार समाप्त केला.

रामदासांचा जन्म शके १५३० मध्ये रामजन्माच्या दिवशीं झाला. हे जांब गांवचे कुलकर्णी सूर्याजीपंत ठोसर यांचे चिरंजीव. प्रथमपासूनच रामदास विरक्त होते. लग्नाच्या वेळीं हे घरांतून पळून गेले. नाशिकजवळील टाकळीस बारा वर्षे यांनीं खडतर अशी तपश्चर्या केली. आणि पुढील बारा वर्षे सबंध हिंदुस्थानांत भ्रमण करून देशस्थिति स्वतःच्या डोळ्यांनीं पाहिली. आणि दुःखानें विंव्हळ होऊन कृष्णातीरीं लोकजागृति व धर्मप्रसार करणाऱ्या आपल्या सांप्रदायाची उभारणी केली.

—२२ जानेवारी १६८२

## माघ व. ९ (३) सिंहगडची अद्भुत कथा !

शके १७४० च्या माघ व. ९ रोजीं सिंहगड किल्ला इंग्रजांच्या ताब्यांत गेला. सुमारें दीडशें वर्षांपूर्वी याच दिवशीं तानाजीनें आत्मार्पण करून सिंहगड आपल्या ताब्यांत आणला होता.

मराठेशाहीच्या अस्तानंतर राज्याचीं आश्रयस्थानें जे किल्ले ते एकामागून एक असे घेण्यास इंग्रजांनीं सुरुवात केली. किल्ल्याच्या भक्कम भिंती आणि अभेद्य तट प्रामाणिक होते; परंतु माणसांत मात्र फंदाफितुरी सर्वत्र माजून राहिली असल्यानें सर्वच राजकीय डोलारा भराभरा कोसळून पडत होता. पेशव्यांचें राज्य नष्ट झाल्याबरोबर इंग्रजांनीं प्रथम आपली दृष्टि सिंहगडाकडे वळवली. शिरवळ, शिवापूरच्या बाजूने इंग्रज सैन्य सिंहगडाकडे निघालें; आणि पूर्वेकडून, उत्तरेकडून सिंहगडावर तोफा डागल्या गेल्या. तोफांचा भरपूर मारा दोनतीन दिवस झाला. परंतु प्रथम इंग्रजांचा फारसा प्रभाव पडला नाहीं. कॅप्टन डेव्हिस मदतीस आल्यावर वेढ्याच्या कामाला जोराने सुरुवात झाली. तीन साडेतीन हजार सैन्याचा गराडा सिंहगड हस्तगत करण्यासाठीं प्रयत्न करीत असतां आंतील सुमारें बाराशें मराठ्यांनीं शत्रूशीं निकराने तोंड दिलें. मोठमोठ्या तोफांची योजना करूनहि किल्ला हातीं येण्याचा रंग दिसेना. किल्ल्यावरील अरब आणि गोसावी प्राणपणाने तानाजीची स्मृति कायम ठेवून लढत होते. शेवटीं माघ व. ९ रोजीं लढाई संपली आणि किल्ला इंग्रजांच्या ताब्यांत गेला !

इतिहासांतील हा योग अपूर्व खराच. ज्या दिवशीं तानाजी मालुसरे यांनीं शौर्याची शर्थ केली, आणि शेवटीं आत्मार्पण केलें, वृद्ध शेलार मामांनीं तरुणाला लाजवील असा पराक्रम करून सिंहगड जिंकून घेतला, त्याच दिवशीं दीडशें वर्षांनंतर हा सिंहगड इंग्रजांच्या हातांत गेला. 'रायगड किल्ल्याचीं दोन स्थित्यंतरें' नांवाचा एक उत्कृष्ट लेख कै. शिवरामपंत परांजपे यांनीं लिहिला आहे. सिंहगड किल्ला इंग्रजांकडे कसा गेला याचेंहि वर्णन त्यांनीं केलें आहे. 'सिंहगड किल्ल्याचीं दोन स्थित्यंतरें' हि ध्यानांत ठेवण्यासारखींच आहेत.

— १ मार्च १८१८

## माघ व. १० प. पू. गोळवलकर यांचा जन्म !

शके १८२८ च्या माघ व. १० रोजीं रामचंद्रांच्या वास्तव्यानें पुनीत झालेल्या नागपूरनजीकच्या रामटेक गांवीं राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचे सरसंघचालक श्री. माधवरावजी गोळवलकर यांचा जन्म झाला.

त्यांच्या विलक्षण प्रभावी व्यक्तिमत्त्वाची व कुशाग्र बुद्धिमत्तेची चुणूक त्यांच्या बाल्यावस्थेपासूनच येऊं लागली होती. काशी विश्वविद्यालयांत त्यांचें इंटरमिजिएटनंतरचे शिक्षण झाले. श्री. माधवरावजी शास्त्र, इतिहास, धर्म, संस्कृति नि राजकारण इत्यादींतलि कूट–समस्यांचा नि प्रमेयांचा उलगडा करून घेण्याच्या उद्योगांत रात्रंदिवस गर्क असत. वयाच्या एकविसाव्या वर्षी म्हणजे १९२७ मध्यें ते एम्. एस्सी. झाले आणि त्यानंतर संपूर्ण चार वर्षे त्यांनीं जगाच्या भौतिक व्यवहाराचा संबंध सोडला. योगाभ्यासांत त्यांनीं खर्चे केलेल्या या चार वर्षांमुळें त्यांच्या वैयक्तिक जीवनांत क्रांति घडून तर आलीच, परंतु ज्या राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचे ते पुढें घटक झाले त्यांच्या स्वयंसेवकांपुढें नवा तेजस्वी नि निःस्वार्थी आदर्श त्यामुळे निर्माण झाला. ...सन १९३१ मध्यें बनारस हिंदु विद्यापीठांत ते प्राध्यापक झाल्यापासून 'गुरुजी' या आवडत्या नांवानें विद्यार्थी त्यांना संबोधूं लागले. त्यांच्याइतका विद्यार्थीप्रिय प्राध्यापक बनारस हिंदु विद्यापीठाच्या आजपर्यंतच्या इतिहासांत सांपडणे विरळा... काशीमधील या कालात राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचा नि त्यांचा संबंध आला. संघाच्या विचारसरणीचें व आद्य सरसंघचालक डॉ. हेडगेवारांच्या कार्यपद्धतीचें त्यांनीं अत्यंत कसून परिक्षण केले व ते संघाचे घटक बनले. विद्यापीठ सोडून १९३३ मध्यें नागपूरला आल्यावर डॉक्टर हेडगेवारांच्या आग्रहानुसार ते एल्‌एल्. बी. झाले.

सन १९३६ मध्यें त्यांनीं संघाच्या अधिकारी–शिक्षण–वर्गात एक स्वयंसेवक म्हणून शिक्षण घेतलें व संघप्रचारार्थ बंगाल प्रांत गांठला. त्यानंतर ते संघाचे सरकार्यवाह झाले व पुढे १९४० च्या २१ जूनला परमपूजनीय डॉ. हेडगेवारांचें निधन झाल्यावर सरसंघचालकत्वहि त्यांच्याकडेच आलें.

— ८ फेब्रुवारी १९०७.

## माघ व. ११ — माधवराव पेशवे यांचा जन्म !

शके १६६६ च्या माघ व. ११ रोजीं पराक्रमानें, कर्तबगारीनें आणि तेजानें श्रेष्ठ असलेले पेशवे थोरले माधवराव यांचा जन्म झाला.

हे बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब पेशवे व गोपिकाबाई यांचे दुसरे पुत्र. पानिपतसारख्या भयंकर राष्ट्रीय आपत्तींतून मराठेशाहीस सावरून धरण्यासाठीं माधवरावांनीं आटोकाट प्रयत्न केले. "श्रीशिवाजीमहाराजांनीं मराठी स्वातंत्र्याचा झेंडा उभारल्यानंतर त्या राज्याचा विस्तार, वैभव व दरारा वाढवून मराठ्यांचें नांव हिंदुस्थानच्या इतिहासांत चिरस्मरणीय करून ठेवण्याकरितां ज्या थोर महाराष्ट्रीय पुरुषांनीं जिवापाड मेहनत केली व प्रसंगीं आपले प्राणहि वेंचले, त्या थोर पुरुषांच्या मालिकेंत माधवरावांचें स्थान बरेंच वरचें आहे." कर्नाटकांत झालेल्या चारहि स्वाऱ्यांत माधवराव स्वतः हजर होते. निजामचाहि बंदोबस्त करण्याची कामगिरी यांनीं केली. पानपतावर मराठ्यांची झालेली बदनामी धुऊन काढण्यासाठीं रामचंद्र गणेश कानडे आणि विसाजी कृष्ण बिनीवाले या दोन सेनानायकांना माधवरावांनीं उत्तरेंत पाठवून दिलें; आणि त्यांनींहि मोठेंच शौर्य गाजवून दिल्लीस परत मराठ्यांचें निशाण लावलें! हें ऐकून माधवरावांना एवढा हर्ष झाला कीं, त्या दोन वीरांना सोन्याचांदीचीं फुलें उधळूनच पुण्यास आणावें अशी आज्ञा त्यांनीं केली. माधवराव मोठे पराक्रमी आणि कर्तबगार होते. "यवनास जबरेंत आणून, पुरतें पारिपत्य करून देवब्राह्मणांची स्थापना करावी, संस्थानें सोडवावीं हाच भाव आहे." या वाक्यांत माधवरावांच्या जीवितांचें सार आहे.

"प्रजावात्सल्य, मनुष्यतत्त्वाची पारख, इभ्रत, शौर्य, कारस्थानीपणा वगैरे जें जें कांहीं राजाला अवश्य पाहिजे तें तें माधवरावांच्या अंगीं एकवटले होतें. त्यांच्या अंगीं बाळाजी विश्वनाथाप्रमाणें व बाळाजी बाजीरावाप्रमाणे कारस्थानपटुत्व होतें, बाजीरावाप्रमाणें शूरत्व व धाडस होतें. शिवाय मनुष्याची पारख करण्याच्या कामांत तर त्यांची कमाल होती. तसल्या अल्पवयांत जीं जीं मनुष्यें त्यांनीं निवडलीं त्यांतील एकहि टाकाऊ निघाला नाहीं!"



— १६ फेब्रुवारी १७४५

## माघ व. १२ महात्माजींच्या उपोषणाची समाप्ति!

शके १८६४ च्या माघ व. १२ रोजीं सबंध भारत देशाला चिंताग्रस्त करणारें महात्मा गांधींचें उपोषण सुटलें.

आठ ऑगस्टच्या प्रसिद्ध ठरावानंतर सर्व प्रमुख पुढाऱ्यांना अटक झाली. आणि देशांत एकप्रकारचें नवचैतन्य खेळूं लागलें. हिंदुस्थानभर सर्वत्र अत्याचार होऊं लागले. सरकार त्याची जबाबदारी महात्माजींच्यावर टाकीत होते. परंतु गांधीजी तें मान्य कसें करणार! आणि ऑगस्टचा ठराव तरी मागें कसा घेणार! सरकारच सर्वस्वीं जबाबदार आहे, असा निर्वाळा गांधींनीं दिला. परंतु पुढें प्रश्न फारच बिकट झाल्यानंतर गांधींनीं आपला उपोषणाचा बेत जाहीर केला. "तुमच्याकडून न्याय मिळत नाहीं, म्हणून सर्वश्रेष्ठ न्याय-देवतेपुढें माझें गाऱ्हाणें मांडण्यासाठीं उपोषण करणें येवढें सत्याग्रही या नात्यानें माझें कर्तव्य आहे." अशी भूमिकाहि त्यांनीं जाहीर केली. सर्व हिंदुस्थानला काळजी वाटूं लागली. कारण गांधीजी आतां चौऱ्याहत्तर वर्षांचे झालेले होते. त्यांना हें दिव्य कसें सहन होणार, याचीच चिंता ज्यांना-त्यांना होती. गांधींच्या निर्धाराचा पहिला फायदा झाला कीं, त्यांची सक्तीची कैद संपली आणि सरकारनें त्यांना येरवडा तुरुंगाशेजारीं आगाखान पॅलेसमध्यें ठेवलें. गांधींच्या उपोषणाचें दिवस जसजसे वाढत होते तसतसें देशांतील वातावरण अधिकच प्रक्षुब्ध होऊं लागलें. "स्वदेशाच्या व जगताच्या कल्याणासाठीं गांधीजींचें प्राण वांचोत, आणि त्यासाठीं ईश्वर औदार्य व शहाणपणा यांचा त्याग करणाऱ्यांना ते दोन गुण अर्पण करो. या पृथ्वीतलावर नांदणाऱ्या प्राणिमात्रांमध्यें सर्वश्रेष्ठ अशी ही विभूति ईश्वर जिवंत ठेवो." अशा आशयाच्या प्रार्थना सर्व देशभर होऊं लागल्या. 'शिकागोसन्' या अमेरिकन पत्रानें गांधींची सुटका ताबडतोब करा अशी सूचना केली. लक्षावधि लोकांचीं चित्तें गांधींच्याभोंवतीं गोळा झालीं. डॉ. बिधनचंद्र रॉय, डॉ. नायर, डॉ. गिल्डर हे महात्माजींच्याजवळ होते. प्रकृति दिवसेंदिवस खंगून अगदीं अखेरची वेळ येऊन ठेपली. परंतु सुदैवानें ती काळगात्र उलटली. सरकारनेंहि नमतें घेतलें. आणि माघ व. १२ रोजीं गांधीजींचें उपोषण सुटलें.

—३ मार्च १९४३

## माघ व. १३ योगी चांगदेव यांची समाधि!

शके १२१८ च्या माघ व. १३ रोजीं तेराव्या शतकांतील प्रसिद्ध योगी चांगदेव यांनीं पुणतांबें येथें समाधि घेतली.

ज्ञानदेवकालीं प्रसिद्ध असणारे चांगदेव चांगा वटेश्वर म्हणून प्रसिद्ध आहेत. अनुपम लावण्य, सहजप्राप्त सिद्धि, क्षमाशीलता व दिव्य अंगकांति यावरून लोकांना चांगदेव म्हणजे भूलोकावरील मरुद्गणच वाटत. शंकराची उपासना करून त्यांनीं श्रुति, न्याय, व्याकरण, ज्योतिष, रसविद्या, धनुर्विद्या, गायनकला, इत्यादि विद्या व कला यांच्यांत नैपुण्य मिळविलें! परंतु "चौदा विद्या चौसष्ठ कला। अवगत असल्या जरी सकला। परि चित्तीं नसली एक प्रेमकला। तरी त्या विकळा अवघ्याची" असा सिद्धांत असल्यामुळें त्यांचें चौदाशें वर्षांचें आयुष्य कोरडे चमत्कार करण्यांतच गेलें. ज्ञानेश्वरादि भावंडांचा लौकिक त्यांच्या कानावर आला तेव्हां चांगदेव अभिमानाने फुगून गेले. परंतु ज्ञानदेव-चांगदेव यांची भेट झाल्यानंतर त्यांचा अहंकार उतरला. 'चांगदेवपासष्टी'त ज्ञानेश्वरांनीं त्यांना 'तत्त्वमसि' या महावाक्याचा बोध उत्तम रीतीनें केला आहे. पुढें चांगदेव मुक्ताबाईचे शिष्य झाले! ज्ञानेश्वरादि भावंडांच्या सहवासाच्या परिणामानें चांगदेवांची अहंकारबाधा नाहींशी झाली. मुक्ताबाईनें आपल्या "चांगया सुताला" गाणें म्हटलें आहे,

"निर्गुणाचे डाहाळीं पाळणा लाविला।
तेथें सुत पहुडला मुक्ताबाईचा॥
निज निज बाळा न करी पै आळी।
अनाहत टाळी वाजतसे॥

ज्ञानेश्वरांनीं समाधि घेतल्यानंतर सर्व संतमंडळ निराश झालें. सोपानदेवांनीं सर्वांच्या आधीं आपला देह ठेवला. गोदावरीच्या तीरावर पुणतांबें येथें आपणहि समाधि घ्यावी असा विचार चांगदेव करूं लागले; आणि त्याप्रमाणें माघ व. ११ ला हरिजागर, व १२ चें कीर्तन आटोपल्यावर व. १३ रोजीं चांगदेवांनीं समाधि घेतली.

— २२ जानेवारी १२९७

माघ व. १४ (१) रुद्र–शिव–महादेव !

माघ व. १४ हा दिवस सर्व भारतांत शिवाप्रीत्यर्थ महाशिवरात्र म्हणून साजरा केला जातो.

विष्णु व शिव हीं हिंदूंचीं दैवतें आहेत. शिवाची उपासना वेदकालापासून या देशांत रूढ झाली आहे. ऋग्वेदांत शिवाचा उल्लेख रुद्र या संज्ञेनें आढळतो. कदाचित् मूळची ती एक भीतिदायक अशी शक्ति असावी. चित्त थरारून सोडणाऱ्या मेघगर्जना, समुद्रांत घडून येणारी प्रचंड खळबळ, महान् वृक्षांचें उन्मीलन, भयंकर भूकंप, उल्कापात, इत्यादि विलक्षण घटनांच्या बुडाशीं एक संहारक शक्ति असावी अशी कल्पना करून तीस रुद्र असें नांव प्राप्त झालें. आणि ही भयंकर शक्ति कृपावंत व्हावी म्हणून आर्यांना ती अधिकच प्रिय झाली. " जो प्रत्यक्ष पराक्रमच आहे, जो जटाभारांनीं मंडित आहे, आणि ज्याचा आश्रय अखिल वीर करीत असतात, ... त्या दैदीप्यमान, जटाधारी व त्वेषयुक्त रूप धारण करणाऱ्या रुद्रास वंदन असो! " अशा आशयाच्या प्रार्थना ऋग्वेदांत आढळून येतात. त्यानंतरच्या काळांत शिवपूजेची प्रथा चांगल्याच प्रमाणांत विस्तार पावली. अनेक नांवें त्याला प्राप्त होऊन लिंगपूजेचीहि प्रथा रूढ झाली. भारतांत शिवाचे उपासक फारच मोठ्या प्रमाणावर असून प्रत्येक गांवांत एक तरी शंकराचें देवालय असतेंच. (१) प्रभासपट्टणचा सोमनाथ, (२) श्रीशैल्य मल्लिकार्जुन, (३) उज्जयिनीचा महाकाल, (४) नर्मदेंतील ओंकारमांधाता, (५) हिमालयांतील केदार, (६) डाकिनी वनांतील भीमाशंकर, (७) काशी येथील विश्वेश्वर, (८) नाशिकजवळील त्र्यंबकेश्वर, (९) परळीजवळील वैजनाथ, (१०) दारुकावनांतील औंढ्या नागनाथ, (११) सेतुबंध रामेश्वर आणि (१२) वेरूळचा घृष्णेश्वर. हीं बारा ज्योतिर्लिंगें भारतांत अत्यंत प्रसिद्ध आहेत. शैव आणि वैष्णव यांचें भांडण आज फारसें तीव्र स्वरूपांत दिसून येत नाहीं. महाराष्ट्रांतील संतांच्या कार्यामुळें हरिहरांतील भेद संपूर्णपणें नष्ट झाला आहे. लिंगायत, वीरशैव, आदि अनेक पंथ निघाले असले तरी त्यांच्या बुडाशीं मुळांत एकच ऐक्याची भावना दिसून येते.

● ● ●

## माघ व. १४ (२) प्रतापराव गुजराचा आत्मयज्ञ !

शके १५९५ च्या माघ व. १४ रोजीं घटप्रभेच्या उत्तरेस एक मैलावरील नेसरीच्या खिंडींत बहलोलखानाशीं लढत असतां शिवाजीचा प्रसिद्ध वीर प्रतापराव गुजर मारला गेला.

सन १६७३ मध्ये पन्हाळगड शिवरायांनीं घेतल्यामुळें विजापूर दरबारांत एकच धांदल उडाली. बहलोलखान फौज घेऊन पन्हाळा हस्तगत करण्यास निघाला. लागलीच शिवाजीनें आनंदराव, विठोजी शिंदे, कृष्णाजी भास्कर, विसो बल्लाळ, इत्यादि कल्पक सरदार बरोबर देऊन या मोहिमेवर प्रतापराव गुजरास पाठविलें. बहलोलखानाचा संपूर्ण पराभव होऊन खान जिवानिशीं निसटून गेला ही गोष्ट शिवाजीस पसंत पडली नाहीं. खानाचा पाडाव पुरता झाला नाहीं असें शिवाजीचें म्हणणे पडल्यामुळें प्रतापराव त्वेषानें पुन्हा लढण्यास निघाला. त्यानें बहलोलखानास गड-हिंग्लजजवळ घटप्रभेच्या तीरावर गांठलें. खान निसटून जाऊं नये म्हणून अवघ्या सहा स्वारांनिशींच प्रतापराव अविचारानें खानावर चालून गेला ! खानाच्या मोठ्या फौजेपुढे त्यांचा टिकाव कसा लागणार ? सातहि सरदार थोड्याच वेळांत कापले गेले. स्वामींचा ठपका अंतःकरणास लागूं नये म्हणून प्रतापरावानें आत्मयज्ञ केला ! त्याबद्दल शिवरायांना अत्यंत दुःख झालें.

प्रतापराव गुजराचा हा आत्मयज्ञ मराठ्यांच्या इतिहासांत अत्यंत प्रसिद्ध आहे. उंबराणी येथें यानें बहलोलखानाशीं सामना दिला होता. लढाई सूर्योदयापासून अस्तमानापर्यंत झाली. दोहोंकडील लष्कर बहुत जाया जाले. नबाब ( बहलोलखान ) याची शिकस्त होऊन तिकोट्यास राहिले. पाण्याशिवाय खान घाबरा झाला, तेव्हां शिवाजीच्या मुलखास हात लावणार नाहीं, असें त्यानें प्रतापराव गुजरास आश्वासन दिले. परंतु पुढें खानास विजापूरचा आश्रय मिळाल्याबरोबर तो पुन्हा प्रतापरावावर चालून आला. आणि याच लढाईत नेसरी येथे प्रतापराव कामास आला. खिंडींत सहा घोडेस्वारांनिशीं हा एकटा लढत होता; अर्थातच त्याचा टिकाव लागला नाहीं. प्रतापरावास प्रथम कडतोजी असें म्हणत असत. पण यानें मोठी योग्यता मिळविली म्हणून यास प्रतापराव नांव मिळालें.

—२४ फेब्रुवारी १६७४

## माघ व. ३० औरंगजेब बादशहाचा मृत्यु !

शके १६२८ च्या माघ व. ३० रोजीं मोंगल पातशाहींतील पराक्रमी आणि जबर महत्त्वाकांक्षी बादशहा औरंगजेब याचे निधन झालें.

मोहिउद्दीन महंमद औरंगजेब हा शहाजहान बादशहास अर्जे मंदबानू मुमताजमहाल हिचे ठिकाणीं झालेलें सहावें अपत्य होय. पूर्वायुष्यांत अनेक पराक्रम केल्यावर यानें सर्व उत्तरायुष्य दक्षिणेंत खर्च केलें. मराठ्यांशीं याने केलेला नेटाचा झगडा इतिहासांत प्रसिद्ध आहे. शिवाजी, संभाजी, राजाराम यांचा नायनाट करण्याचे यानें आटोकाट प्रयत्न केले. संभाजी राजांचा भीषण वध करून यानें मराठ्यांना डिवचलें आणि त्यामुळें त्याच्याच कर्तबगारीस ओहटी लागली. शेवटीं यानें शाहूकरवीं भेदाचा प्रयत्न केला. परंतु त्यांतहि यश न आल्यामुळें हा उदास झाला. अपजयामुळें याचें दुखणे पुन्हा वाढलें, आणि अत्यंत निराशमय आणि दुःखद स्थितींत वयाच्या एकोणनव्वदाव्या वर्षी अहंमदनगर येथें औरंगजेब मृत्यु पावला. आपलें राज्य यानें आपल्या तीनहि मुलांना वांटून दिलें. मुलांनीं अंतसमयीं जवळ येण्याची परवानगी मागितली तेव्हां बादशहा म्हणाला, "शहाजहान आजारी असतांना जें निमित्त मीं योजिले होते, तें हेंच. महत्त्वाकांक्षेच्या धुराइतकी दुसरी कोणतीहि हवा रोगकारक व सर्वस्व नाशकारक नाहीं."

औरंगजेब मोठा विद्वान् होता. स्वतःच्या धर्माचा अभ्यास त्याने चांगलाच केलेला होता. त्याने 'फतवा-इ-आलमगिरी' नांवाचा मुसलमानी कायद्याचा एक उत्कृष्ट ग्रंथ लिहिला आहे. औरंगजेबास कुराण तोडपाठ येत असे, आणि त्याचा अर्थहि त्यास चांगला समजत असे. हिंदु धर्माबद्दल त्याला मोठा द्वेष वाटे. त्यानें अनेक मंदिरें उध्वस्त करून त्या ठिकाणीं मशिदी बांधल्या आहेत. कपटी आणि क्रूर म्हणून प्रसिद्ध असलेल्या या बादशहानें आपल्या मुलास केलेला उपदेश मननीय आहेः "वाईट माणसांचे तोंडीं लागूं नये. बुद्धिमान व सुशील यांची सोबत ठेवावी ... मूर्ख एकांतांत घेऊं नये. विपत्तींत धैर्य धरावें, सांप्रत चांगलीं मनुष्यें फार आहेत त्यांसी संघट्टन करावें."

— २० फेब्रुवारी १७०७




श्री. व्यं. केतकर. श्रीसंत तुकाराम. नाना फडणीस. हरिभाऊ आपटे.
ना. गो. कृ. गोखले. सरोजिनी नायडू. छत्रपति संभाजी. शरच्चंद्र बोस.

## फाल्गुन शु. १ हरिभाऊ आपटे यांचें निधन !

शके १८४० च्या फाल्गुन शु. १ या दिवशीं मराठींतील सर्वश्रेष्ठ ध्येयवादी कादंबरीकार हरि नारायण आपटे यांचें निधन झालें.

हरिभाऊंचें पालनपोषण त्यांचे चुलते महादेव चिमणाजी आपटे यांच्याकडून झाले. यांचें सुरुवातीचें शिक्षण मुंबईस झाल्यानंतर हे पुणें येथें आले व मॅट्रिक्युलेशनची परीक्षा पास झाले. कॉलेजमध्यें चारपांच वर्षे काढूनहि परीक्षा पास होणें कांहीं त्यांना जमलें नाहीं. परंतु याच वेळीं ज्ञानार्जनाचा मोठा हव्यास हरिभाऊंना लागला. इंग्रजी, संस्कृत, फ्रेंच व जर्मन या भाषांतील उत्तमोत्तम वाङ्मयकृतींचा आस्वाद त्यांनीं घेतला. हरिभाऊंची पहिली कादंबरी 'पुणें-वैभव' या पत्रांत सन १८८५ मध्यें 'आजकालच्या गोष्टी-मधली स्थिति' या नांवानें प्रसिद्ध झाली. त्यानंतर 'गणपतराव' प्रसिद्ध होऊं लागली. हरिभाऊंचें नांव या वेळीं गुप्त राखण्यांत आलें असल्यामुळे महाराष्ट्रांत एकप्रकारचें कुतूहल निर्माण झालें होते. यानंतर यांच्या कादंबऱ्यांना भरीव स्वरूप प्राप्त झालें. लोकशिक्षणाचें व बहुजनसमाजांत विचारजागृति करण्याचें कार्य करण्यासाठीं सन १८९० मध्यें यांनीं आपलें स्वतःचें 'करमणूक' पत्र काढले. 'पण लक्षांत कोण घेतो ?' ही 'करमणुकीं'त प्रारंभीं प्रसिद्ध झालेली कादंबरी होय. याच पत्रांत त्यांनीं एकूण आठ सामाजिक व दहा ऐतिहासिक कादंबऱ्या, आणि शेंकडों उत्कृष्ट गोष्टी लिहिल्या. मी, यशवंतराव खरे, भयंकर दिव्य, मायेचा बाजार, उषःकाल, सूर्योदय, सूर्यग्रहण, चंद्रगुप्त, वज्राघात, इत्यादि यांच्या कादंबऱ्या प्रसिद्ध आहेत. या कादंबऱ्या त्यांनीं जनमनरंजनार्थ लिहिल्या नाहींत. त्या पतितांच्या उद्धारासाठीं, दीनांच्या दुःखविमोचनासाठीं, मार्गभ्रष्टांना सन्मार्गदर्शनासाठीं, हताश झालेल्या हृदयांत नवचैतन्य उत्पन्न करण्यासाठीं, समाजशुद्धीसाठीं, राष्ट्रीय भावना उद्दीपित करण्यासाठीं लिहिल्या. 'संत सखूबाई' व 'सती पिंगला' हीं दोन नाटकेहि यांनीं लिहिलेलीं प्रसिद्ध आहेत. यांनीं आपल्या अंगच्या गुणांवर व बुद्धिकौशल्यावर लौकिक मिळविला. स्वतः पदवीधर नसतांहि हे विद्यापीठांत उच्च परीक्षेंत परीक्षक म्हणून असत.

— ३ मार्च १९१९

## फाल्गुन शु. २ श्रीरामकृष्ण परमहंसांचा जन्म !

शके १७५० च्या फाल्गुन शु. २ रोजीं बंगालमधील विख्यात सत्पुरुष आणि वेदान्तप्रतिपादक श्रीरामकृष्ण परमहंस यांचा जन्म झाला.

हुगळी जिल्ह्यांतील 'कामारपुकुर' नांवाच्या एका अप्रसिद्ध गांवीं धार्मिक व सनातनी वृत्तीचा ब्राह्मण राहत होता. त्यांच्या पोटीं रामकृष्णांचा जन्म झाला. परमेश्वरभक्तीची गोडी आणि भावावस्थेचा अनुभव यांना लहानपणापासूनच होता. लहानपणीं यांचे नांव गदाई—गदाधर असें होतें. हे पांचसात वर्षांचे असतांना एकदां आकाशांत काळेभोर ढग यांना दिसले.. त्यावरून पांढरा बगळा उडत होता. तें दृश्य पाहून यांची शुद्ध नाहींशी झाली. अलौकिक भावनांचा साक्षात्कार जणुं यांना झाला. असे प्रसंग वारंवार येऊं लागले. देहभान विसरून वारंवार ब्रह्मस्वरूपांत लीन होऊन स्वानंद उपभोगणे हे यांचें सुख होतें. कलकत्त्याजवळील कालीच्या दक्षिणेश्वर मंदिरात पुजारी म्हणून हे वावरत असत. कालीमातेची एकनिष्ठपणानें यांनीं उपासना केली. परमेश्वराला एकनिष्ठपणें भजतां यावे म्हणून हे स्वतःला स्त्री समजून अनन्यभावानें देवाची उपासना करीत, अर्थातच लौकिक व्यवहारांत यांचें जीवन म्हणजे एखाद्या मुलाप्रमाणें निष्पाप, भोळें व खेळकर असेंच राहिलें. रामकृष्णांच्या तत्त्वज्ञानाची छाप सर्वत्र पसरून त्यांची कीर्ति वाढूं लागली. आर्य संस्कृतीचा डंका सर्व जगभर पसरविणारे स्वामी विवेकानंद यांचेच शिष्य. त्या वेळीं समाज नास्तिक्याकडे झुकत होता. भौतिक शास्त्रांच्या साह्याने अंतिम सुख शोधण्याच्या उद्योगांत होता. आणि स्वत्व विसरून गांगरलेल्या स्थितींत, किंकर्तव्यमूढ स्थितींत अंधारांतच ठेचा खात होता. अर्थात् या वेळीं रामकृष्णांचा संदेश नवजीवन देणारा ठरला. "नुसत्या शास्त्राध्ययनानें का कोठे प्रगति होत असते ? शास्त्रें वाचून फार तर ईश्वराच्या अस्तित्वाचा बोध होईल. पण त्यानंतर स्वतः साधनें केल्यावांचून त्याचें दर्शन होणार नाहीं. हजार पोथ्या आणि पुराणें वाचा. व्याकुळ होऊन त्याचा धांवा केल्याखेरीज त्याचें दर्शन होणार नाहीं." असा प्रश्न टाकून त्यांनीं परमेश्वरभक्तीचा सुलभ मार्ग दर्शविला आहे.

— १७ फेब्रुवारी १८३६

## फाल्गुन शु. ३ ( १ ) सरोजिनी नायडू यांचें निधन !

शके १८७० च्या फाल्गुन शु. ३ रोजीं काँग्रेसच्या भूतपूर्व अध्यक्ष, ख्यातनाम कवयित्री, संयुक्त प्रांताच्या पहिल्या स्त्री गव्हर्नर सौ. सरोजिनी नायडू निधन पावल्या.

सौ. सरोजिनी नायडू याचा जन्म सन १८७९ च्या १३ फेब्रुवारीस हैद्राबाद येथे झाला. वयाच्या बाराव्या वर्षी मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर त्या इंग्लंडमध्यें शिकण्यास गेल्या. आणि तिकडून परत आल्यावर त्यांनीं सामाजिक आणि राजकीय विषयांवर व्याख्यानें देऊन आपल्या उपजत तेजाचा व कवित्व-शक्तीचा योग्य उपयोग हिन्दी जनतेच्या हितासाठीं करण्यास प्रारंभ केला. सन १९१६ च्या लखनौच्या राष्ट्रीय सभेपासून यांनीं स्वतःस त्या कार्यासच वाहून घेतलें. आणि त्यांची देशसेवा मान्य होऊन सन १९२५ मध्यें त्यांना कानपूरच्या राष्ट्रीय सभेचें अध्यक्षस्थानहि मिळाले होतें. सरोजिनी नायडू या उपजतच कवयित्री होत्या. त्यांच्या इंग्रजी काव्याची प्रशंसा इंग्रज साहित्यिक एडमंड गॉस, आर्थर, सायमन्स यांनीं केली आहे. यांच्या अमोघ भाषाप्रभुत्वानें आणि प्रतिभासामर्थ्यानें सबंध जगांत भारतास मान प्राप्त झाला आहे.

निधनापूर्वी त्या वर्षभर आजारीच होत्या. डोकेंदुखी वाढली म्हणून आदल्या रात्रीं अकरा वाजतां त्यांना झोपेचें इंजेक्शन देण्यांत आलें. रात्रीं झोंपहि चांगली लागली. परंतु फाल्गुन शु. ३ रोजीं पहांटे तीनच्या सुमारास खोकल्याची जोराची उबळ येऊन थोड्याच वेळांत त्यांचा मृत्युहि झाला. सर्व देशांत दुःखमय वातावरण पसरलें. पं. नेहरूंनीं श्रद्धांजलि वाहिली. " सरोजिनी देवी ह्या महान् कार्यासाठीं झटणाऱ्या, झगडणाऱ्या महान् देशसेविका होत्या. त्यांनीं झुंजारपणें व भरघोसपणे आपलें जीवन घालविलें." हिंद सरकारनें पत्रक काढून सौ. नायडू यांचा गौरव केला कीं, "या देशाच्या इतिहासांतील सौ. नायडू यांनीं केलेली सर्वांगीण सेवा शब्दांत नमूद करणें अशक्य आहे. वक्तृत्व, प्रतिभा, विनोदबुद्धि यांच्या बळा-वर आपलें खाजगी जीवन त्यांना सहज सुखांत घालवितां आलें असतें, पण त्यागबुद्धीने त्यांनीं स्वातंत्र्यसमरांत उडी घेतली आणि शेवटपर्यंत देशाची सेवाच केली."

— २ मार्च १९४९.

## फाल्गुन शु. ३ (२) शरच्चंद्र बोस यांचें निधन !

शके १८७१ च्या फाल्गुन शु. ३ या दिवशीं सुभाषचंद्र बोस यांचे थोरले बंधु, संयुक्त समाजवादी संघटणेचे अध्यक्ष शरच्चंद्र बोस यांचें निधन झालें.

शरच्चंद्रांचा जन्म सन १८८९ मध्यें दिनांक ७ सप्टेंबर रोजीं कटक येथें झाला. कलकत्ता येथें शिक्षण पूर्ण करून पुढील शिक्षण घेण्यास हे इंग्लंडमध्यें गेले. सन १९१३ मध्यें बॅरिस्टरीची पदवी घेऊन हे मायदेशीं परत आले. आणि यांनीं कलकत्ता येथील हायकोर्टांत वकिली सुरू केली. कै. देशबंधु चित्त-रंजन दास यांच्या देशभक्तीचा परिणाम यांच्या मनावर विशेष झाला. स्वराज्याच्या आंदोलनांत हे त्यांचे उजवे हात होते. कायदेभंगाच्या वेळीं व गेल्या महा-युद्धाच्या प्रसंगीं यांना तुरुंगवास भोगावा लागला होता. शरच्चंद्र बोस हे कांहीं काळ बंगाल प्रांतिक कॉंग्रेस कामेटीचे अध्यक्षहि होते. सन १९३७ पासून सात-आठ वर्षेंपर्यंत बंगाल विधिमंडळांत हे विरोधी पक्षाचे नेते म्हणून काम करीत होते. आपल्या पराक्रमी आणि रणझुंजार बंधूंबरोबर (सुभाषचंद्राबरोबर) बाषू शरच्चंद्रहि भारतीय स्वातंत्र्य-संग्रामाच्या आघाडीवरच नेहमीं असत. कॉंग्रेस कार्यकारिणीचे हे कित्येक वर्षें सभासद असले तरी पुढे कॉंग्रेसशीं यांचा मतभेद झाला; आणि यांनीं कॉंग्रेसविरोधी सर्व डाव्या गटांची संघटणा करण्याच्या प्रयत्नास प्रारंभ केला. संयुक्त समाजवादी संघटनेचे ते संस्थापक व अध्यक्ष होते. या संस्थेच्या प्रचारासाठीं त्यांनीं भारतांत एक दौराहि काढला होता. आपल्या युरोपच्या दौऱ्यांत यांनीं इंग्लंड, आयर्लंड, स्वित्झर्लंड इत्यादि देशांना भेटी दिल्या होत्या. शरच्चंद्र बोस यांना शेवटीं हृदयाचा विकार झाला. गेले कांहीं महिने ते आजारी असले तरी त्यांची प्रकृति सुधारण्याच्या मार्गावर होती. फाल्गुन शु. ३ रोजीं दुपारीं तीन वाजतां 'नेशन' या आपल्या वृत्तपत्रांतील लेखहि त्यांनीं तयार केला. रात्रीं अकरानंतर अंथरुणावर अंग टाकतांच त्यांना हृदयविकाराचा एक झटका आला आणि त्यांतच त्यांचें निधन झालें. बंगाल-मधील एक मुरब्बी वकील, सार्वजनिक कार्यकर्ता, जुन्या पिढींतील देशभक्त गेल्यामुळें भारतांत सर्वत्र हळहळ व्यक्त केली गेली.

— २० फेब्रुवारी १९५०

## फाल्गुन शु. ४ पुरंदर किल्ल्याकडे इंग्रज फौजा !

शके १७४० च्या फाल्गुन शु. ४ रोजीं इंग्रजांच्या फौजा पुरंदर किल्ला घेण्यासाठीं पायथ्याशीं येऊन ठेपल्या.

ख्रिस्ती शकाच्या एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभापासूनच मराठी राज्याचे दैव फिरलें होतें. खंबीरपणानें नेतृत्व स्वीकारील असा कोणीहि पराक्रमी मुत्सद्दी उरलेला नव्हता. ज्यांच्याकडे पाहून दिग्विजय गाजवावयाचे ते बाजीराव तर नालायकपणामुळे निरुपयोगीच बनले होते. आणि त्यांच्या कारकीर्दीत होणाऱ्या सामाजिक विषमतेतून एक प्रकारची कटुता सर्वत्र निर्माण झाली होती. नको हें स्वराज्य आणि ही पेशवाई, त्यापेक्षां इंग्रज बरा अशी भावना सर्वत्र व्यक्त केली जात असल्यानें आधुनिक शस्त्रास्त्रांनीं सुसज्ज असणाऱ्या इंग्रज लोकांना या देशांत पाय रोवणें सुलभ झालें. हिंदुस्थानांत शौर्य, पराक्रम, यांची कमतरता होती असें नव्हे, परंतु त्यांचा उपयोग संघटित रीत्या, व स्वार्थत्यागपूर्ण; शत्रूला तोंड देण्यांत करावा अशी राष्ट्रीय भावनाच तेव्हां उत्पन्न होणे अशक्य होतें. सर्वत्र फंदफितुरी आणि अप्रामाणिकपणा भरलेला होता. पेशवाई समाप्त झाल्यावर 'संपूर्ण राज्याचें सार जें दुर्ग' याकडे इंग्रजांची सेना वळली व तिनें एकामागून एक असे भराभरा सर्व किल्ले हस्तगत केले. प्रसिद्ध असणारा सिंहगड किल्ला हस्तगत झाल्याबरोबर इंग्रजांचा मोर्चा इतिहासप्रसिद्ध अशा पुरंदर किल्ल्याकडे वळला. उत्तर व दक्षिण या दोनहि दिशांनीं सैन्याच्या तुकड्या येऊन दाखल झाल्या. पुरंदर आणि वजीरगड हे दोनहि किल्ले हस्तगत करावेत म्हणून इंग्रजी फौजा हल्ला करण्यास निघाल्या असतांना त्यांना प्रथम प्रतिकार सासवड येथें झाला. येथील वाड्यांत सिंधी, हिंदुस्थान, अरब अशा निरनिराळ्या जातींचे सुमारें दोनशें लोक होते. त्यांनीं सासवड येथील पेशव्यांच्या भक्कम वाड्याचा आश्रय करून इंग्रजी सैन्यावर गोळीबार सुरू केला. इंग्रजांना पुढें जाणें अशक्य होतें. वाड्याच्या भिंतीवर इंग्रजांनींहि तोफांचा भडिमार करण्यास सुरुवात केली. त्यापुढे थोड्याशा असणाऱ्या मराठी सैन्याचा कितीसा टिकाव लागणार !

— ११ मार्च १८१८

## फाल्गुन शु. ५ नामदार गोखले यांचें निधन !

शके १८३६ च्या फाल्गुन शु. ५ रोजीं भारतांतील सुप्रसिद्ध राजकारणी पुढारी, इंग्रजी भाषेंतील जगप्रसिद्ध वक्ते, व सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटी या संस्थेचे संस्थापक नामदार गोपाळ कृष्ण गोखले यांचें निधन झालें.

चिपळूण तालुक्यांतील ताम्हनमळा येथें शके १७८५ मध्यें गोखले यांचा जन्म झाला. मुंबईच्या एल्फिन्स्टन कॉलेजांतून बी. ए. झाल्यानंतर सन १९०२ पर्यंत हे डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे आजीव सभासद व फर्ग्युसन कॉलेजांत गणित, इंग्रजी, अर्थशास्त्र व इतिहास या विषयांचे प्राध्यापक होते. सन १८८७ सालीं हे पुणे सार्वजनिक सभेचे चिटणीस झाले. पुढल्याच वर्षी 'सुधारक' या इंग्रजी-मराठी साताहिकाचे संपादक म्हणून गोखले काम पाहूं लागले. सन १८९७ मध्यें गोपाळराव गोखले हे पुण्याच्या डेक्कन सभेचे प्रतिनिधि म्हणून हिंदुस्थानच्या जमाखर्चाची तपासणी करण्यासाठीं म्हणून नेमलेल्या सेल्बी कमिशनपुढे साक्ष देण्यासाठीं इंग्लंडला गेले. तेथें यांनीं चांगलाच लौकिक कमाविला. सन १९०२ पासून हे वरिष्ठ कायदे मंडळांत काम पाहत असत. येथें झालेलीं अंदाजपत्रकावरील यांचीं भाषणें माहितीपूर्ण, परिणामकारक, कळकळींची व विद्वात्ताप्रचुर अशीं असत. सन १९०४ मध्यें सरकारनें यांना सी. आय्. ई. ही पदवी देऊन यांचा गौरव केला.. आदरणीय शिस्तीला धरून वागणारे नेमस्त म्हणून यांचा लौकिक असला तरी लॉर्ड कर्झन यांचें दडपशाहीचें धोरण, बंगालची फाळणी, युनिव्हर्सिटीच्या कायद्यांत सुधारणा, कलकत्ता कॉर्पोरेशनच्या हक्कावर गदा इत्यादि प्रसंगीं यांचेंहि मन प्रक्षुब्ध होऊन जाई. आणि मग हे म्हणत असत, "जनतेच्या हिताच्या दृष्टीनें नोकरशाहीशीं सहकार्य करणाऱ्या वृत्तीला रामराम ठोकावा लागेल."

यांची अत्यंत महत्त्वाची कामगिरी म्हणजे सन १९०५ सालीं यांनीं 'सर्व्हंटस् ऑफ इंडिया सोसायटी' म्हणजे भारत-सेवक समाजाची स्थापना केली ही होय. यांचें सार्वजनिक जीवन निष्ठामय व त्यागपूर्ण होतें. अत्यंत कठोर गोष्टी सौम्य शब्दांत पण आधारासहित मांडण्याचें यांचें कौशल्य अनुपम होतें.

— १९ फेब्रुवारी १९१५

## फाल्गुन शु. ६ हिंदु धर्माची विलक्षण ओढ!

शके १८४९ च्या फाल्गुन शु. ६ रोजीं गोमांतकांतील चिंबूल गांवीं एक हजार गावडे-ख्रिस्त्यांना हिंदु करून घेण्याचा फारच मोठा समारंभ झाला.

शुद्धीकरण चळवळीच्या इतिहासांत हा प्रसंग सुवर्णाक्षरांनीं लिहिण्याजोगा आहे. उत्तरेंत आर्य समाजासारख्या संस्थांनीं व पं. मालवीयांसारख्या नेत्यांनीं परधर्मांत गेलेल्या हिंदूंना पुन्हा हिंदु करून घेण्याचा सपाटा चालविला होता. गोव्याकडे व वसईकडे अंतरंगाने व संस्कृतीनें पूर्ण हिंदु असलेल्या, परंतु अपरिहार्यतेनें ख्रिश्चन राहिलेल्या हजारो लोकांना पुन्हा हिंदु धर्मांत घेण्यास कशी सुरुवात करावी हा प्रश्न त्याबाबतची चळवळ 'करणाऱ्या इकडील मंडळींना अस्वस्थ करीत होता. ख्रिश्चन राजसत्तेच्या भीतीनें या भागांतील लोक एकेकटे किंवा कुटुंबशः शुद्धीकरण करून घेण्यास भीत होते.' मोठ्या प्रमाणांत सामुदायिक शुद्धीकरणाचा मार्ग अनुसरण्यांखेरीज गत्यंतर नव्हतें. हा पहिला मोठा शुद्धिसमारंभ फाल्गुन शु. ६ ला चिंबूल येथें श्रीविनायकमहाराज मसूरकर यांचे शिष्य श्री. आनंदमूर्ति यांनीं केला. गोमांतकाच्या इतिहासांत प्रथमच पडणाऱ्या या भव्य समारंभास सर्व गोमंतकांतून हजारो हिंदु-व्यापारी, अधिकारी, जमीनदार व शास्त्री-पंडित आले होते......... त्याच दिवशीं दुपारीं कुर्के येथें चारशें ख्रिस्त्यांना हिंदु धर्मांत घेण्यांत आलें; व तेव्हांपासून गोवा-सरकारचा व तेथील कट्टर ख्रिस्त्यांचा विरोध होत असतांनाहि त्या भागांतील बाटले ख्रिस्ती आईला पाहून मुलानें झेंप घ्यावी त्याप्रमाणें पुन्हां हिंदु धर्मास कवटाळण्यास आनंदानें सिद्ध झाले.

हिंदुस्थानावर परधर्मीयांचे जे हल्ले झाले, त्यांत हिंदूंना अति त्रास सहन करावा लागला. मुसलमानी राजवटींत तर हिंदु धर्मच नष्ट होतो कीं काय असा प्रसंग येऊन ठेपला. मुसलमान सत्ताधारी हिंदूंना सक्तीनें बाटवीत असतच. परंतु इंग्रज मिशनरीहि गोड गोड बोलून आपले अनुयायी वाढवीत होते. गोमांतकांतील हिंदूंचा धार्मिक छळ विख्यातच आहे.

— २६ फेब्रुवारी १९२८

## फाल्गुन शु. ७ जिंजीच्या वेढ्याची समाप्ति !

शके १६२० च्या फाल्गुन शु. ७ रोजीं सात वर्षेपर्यंत रेंगाळत राहिलेला जिंजीचा वेढा संपून झुल्पिकारखानास जिजी हस्तगत झाली !

राजाराम जिंजीस गेला आहे असें पाहून २९-८-१६९० रोजीं झुल्पिकारखानानें जिंजीस वेढा घातला. सातआठ वर्षेपर्यंत अनेक प्रकारचे संग्राम झाले. महाराष्ट्र व जिंजी या दोनहि ठिकाणीं लक्ष पुरवितांना बादशहास नकोसें झालें. आपला मुलगा कामबक्ष व झुल्पिकारखानाचा बाप आसदखान या दोघांना आणखी फौज देऊन बादशहाने जिजीस पाठविले. यामुळे फायदा न होतां झुल्पिकारखानास राग येऊन वेढ्याच्या कामांत ढिलाईच निर्माण झाली. इकडे रामचंद्रपंतांनीं संताजी व धनाजी यांचेबरोबर तीस हजार फौज दिली व त्यांना कर्नाटकांत पाठविलें. त्या दोघांनीं मोंगली फौजेचा पराभव केला. बादशहाच्या सैन्यांत फारच अनवस्था माजली., त्यांना दाणावैरणहि मिळण्याची मारामार पडली. कर्नाटकांत सर्वत्र बादशाही फौजेची नाचक्की होऊन मराठ्यांचा अमल सुरू झाला. तरी मोंगल मधून मधून डोकें वर काढीतच.

सन १६९७ च्या सुमारास झुल्पिकारखानानें पुनः उचल खाऊन वेढ्याच्या कामास जोमानें प्रारंभ केला. जिजीस राजाराम अडकला गेला. त्याची सुटका आतां होणें जरूरीचें होते. खंडोबल्लाळानें शिर्के यांना विश्वासांत घेतलें. त्यांची समजूत काढली कीं, "तुमचें शिरकाण केलें तसेच आमचे तीन पुरुष हत्तीच्या पायाखालीं मेले; परंतु हिंदूंच्या दौलतीकरितां आम्ही झटतच आहोंत." दाभोळचें वतन मिळतांच शिर्के राजारामादि मंडळींना मदत करण्यास तयार झाले. मोहितेहि त्यांच्या साह्यास आले व त्यांनीं राजारामास बुरख्याच्या पालखींत बसवून आपल्या आप्तांच्या बायका असें सांगून स्वतःच्या गोटांत आणलें ! त्यानंतर राजाराम वेलोरास आला. तेथून धनाजीनें त्यास महाराष्ट्रात आणले. इकडे फाल्गुन शु. ७ रोजीं जिंजी झुल्पिकारखानाच्या हातीं आली. पण एवढ्या प्रचंड लढ्याचा काय उपयोग ? राजाराम आधींच निघून गेला होता.

— ७ फेब्रुवारी १६९८

## फाल्गुन शु. ८ देवगिरीच्या रामदेवरावाचें दैव!

शके १२१६ च्या फाल्गुन शु. ८ रोजीं अल्लाउद्दीन खिलजी यानें देवगिरीचा वैभवशाली सम्राट् रामदेवराव यादव याचा पराभव केला.

अल्लाउद्दीन शके १२१५ मध्यें आठ हजार फौज घेऊन कुराहून निघाला आणि बुंदेलखंडाच्या जंगली प्रदेशांतून तो थेट दक्षिणेंत आला. "चुलत्याशीं भांडून मी नोकरी करण्यासाठीं तेलंगणाच्या राजाकडे राजमहेंद्रीस चाललो आहें" असें तो सांगत असे. विंध्याद्रि उतरून तो एकदम देवगिरीपाशीं येऊन धडकला. रामदेवरावास कल्पना सुद्धां नव्हती. तो शहराबाहेर देवदर्शनास गेला होता. तेथें त्याला ही बातमी समजली! त्याला मोठी चिंता वाटली. लढाईची तयारी नाहीं; फौज बाहेरगांवीं गेलेली. अशा अवस्थेत नागरिकांतूनच कांहीं सैन्य तयार करून त्यानें अल्लाउद्दीनास तोंड दिले. परंतु त्याचा काय प्रभाव पडणार? रामदेवरावाचा पराभव झाला. देवगिरीची लुटालूट सुरू झाली. 'बादशहाची फौज मागाहून येत आहे' असें अल्लाउद्दीनानें उठवलें. रामदेवरावानें आतां धडगत नाहींसे ओळखले. किल्ल्यांत धान्याऐवजीं मिठाचीं पोतीं भरलीं गेल्याचें पाहून त्याचा धीर सुटला व त्यानें अल्लाउद्दीनाशीं तह केला. इतक्यांत रामदेवरावाचा मुलगा शंकरदेव हा मोठी फौज घेऊन आला व तह अमान्य करून त्यानें अल्लाउद्दीनावर निकराचा हल्ला केला. "तुम्हांला जिवाची आशा असेल तर येथें लुटलेली सर्व चीजवस्तु परत द्या आणि जीव वांचला म्हणून सुखानें निघून जा" असा निरोप शंकरदेवानें अल्लाउद्दीनास पाठविला. अर्थातच मुसलमान खवळले. त्यांनींहि जोराचा सामना दिला. परंतु शंकरदेवाच्या विलक्षण धैर्यापुढे त्यांचा टिकाव लागला नाहीं. मराठ्यांना विजय मिळणार तों दैव पालटलें, मुलाच्या मदतीस रामदेवराव फौज घेऊन येत होता. शंकरदेवाच्या लोकांना वाटलें, "येणार, येणार, म्हणून गाजत होती ती बादशहाची फौज आली." सर्वच रंग पालटला आणि शंकरदेवाचाहि पराभव झाला. अशा प्रकारें केवळ दैवानें पाठ फिरविली म्हणूनच देवगिरीचा पाडाव झाला.

 —५ फेब्रुवारी १२९४

## फाल्गुन शु. ९ शिवरायांचें आग्र्यास प्रयाण !

शके १५८७ च्या फाल्गुन शु. ९ ला श्रीछत्रपति शिवाजीमहाराजांनीं रायगडावरील सर्व निवडक मंडळींचा निरोप घेऊन पुत्र संभाजी, कांहीं सोबती व चार हजार स्वार यांच्यासह औरंगजेबाच्या भेटीसाठीं उत्तरेस आग्र्याकडे प्रयाण केलें.

जयसिंहाच्या मध्यस्थीने शिवाजी-औरंगजेब यांच्या भेटीचा योग घडून येणार होता. औरंगजेबाच्या बेइमानीपणाचा लौकिक सर्वत्र पसरला असल्यामुळें शिवाजी सावधच होता. मातुःश्री, गुरु व साधुसंत यांच्या सहवासांत त्यांच्या अंगांत स्वधर्माचें वारें सारखें संचारत असल्यामुळें बादशहाची सेवा करणें ही गोष्ट शिवाजीस अत्यंत तिरस्करणीय वाटत असे. परंतु, जयसिंहाची चिकाटी मोठीच होती. 'बादशहाची मोठी इच्छा आहे कीं, तुम्हांस भेटावें, तुमचा गौरव करावा, तुम्हांस दक्षिणची सुभेदारी द्यावी....' इत्यादि वचनें तो शिवाजीस देत होता. शिवाजीनेंहि आपल्या निकटच्या मंडळींत याविषयीं खूप चर्चा केली. 'सिंहाच्या गुहेंत आपण होऊन जाणें योग्य नाहीं' असें पुष्कळांचें मत पडलें, पण, देवी आणि ज्योतिषी यांनीं 'अवश्य जावें' असें सांगितले. आणि 'तुमचे जिवास कोणताहि अपाय होणार नाहीं याबद्दल मी व माझा पुत्र रामसिंह जामीन आहों' असा करार जयसिंहाने लिहून दिला. अखेर बादशहाच्या भेटीस जाण्याचें शिवरायांनीं ठरविले.

अत्यंत चातुर्यानें आणि दूरदृष्टीनें शिवाजीनें राज्याची व्यवस्था ठरवून दिली. मुख्य कारभार जिजाबाईवर सोंपविण्यांत आला. मोरोपंत प्रधान, मुजुमदार निळो सोनदेव व सेनापति प्रतापराव गुजर यांनीं जिजाबाईचे आज्ञेनें वागावें असें ठरलें. आपले किल्ले व मुलूख स्वतः एकवार नजरेंत घालून त्यांची जपणूक करण्यास परोपरीनें शिवाजीनें किल्लेदारांना विनविलें. आणि फाल्गुन शु. ९ रोजीं शिवरायानीं आग्र्यास जाण्यासाठीं प्रयाण केलें. तानाजी मालुसरे, येसाजी कंक, सर्जेराव जेधे, हिरोजी फर्जंद, बाळाजी आवजी, निराजी आवजी, रघुनाथ कोरडे, त्र्यंबकराव डबीर, इत्यादि मंडळी बरोबर होती.

— ५ मार्च १६६६

## फाल्गुन शु. १० सर ग्रियर्सन यांचें निधन !

शके १८६२ च्या फाल्गुन शु. १० रोजीं भारतांतील भाषाशास्त्राच्या अभ्यासाचे जनक, पुरातत्त्ववेत्ते सर जॉर्ज आब्राहम ग्रियर्सन यांचें निधन झालें.

वयाच्या तेविसाव्या वर्षी सिव्हिल सर्व्हंट म्हणून हे नोकरींत रुजू झाले. तेव्हांपासून ग्रियर्सन आपला वेळ भारतातील भाषा आणि लिप्या यांच्या संशोधनांत घालवूं लागले. दांडगा व्यासंग व भरपूर मेहनत हें यांच्या कामगिरीचें वैशिष्टय होतें. सन १८७७ मध्यें यांनीं कालिदासावरील आपला पहिला निबंध प्रसिद्ध केला. साठ वर्षेपर्यंत अत्यंत मेहनत घेऊन त्यांनीं भाषाशास्त्राचा अभ्यास केला. यांच्या पंचायशींव्या वाढदिवशीं 'व्हॉल्यूम ऑफ इंडियन अँड इराणियन स्टडीज्' हा ग्रंथ त्यांना अर्पण करण्यांत आला. त्यांत त्यांच्या कार्याचा गौरव केलेला आहे. या ग्रंथांतील वीस पृष्ठें यांच्या लिखाणांच्या सूचीनें व्यापिलीं आहेत. भारतांतील दोनशेंपेक्षां अधिक लिप्यांशीं यांचा चांगला परिचय होता. अनेक भाषाहि यांनीं अवगत केल्या होत्या. कित्येक ज्ञात आणि अज्ञात भाषांचीं व्याकरणें यांनीं लिहिलीं आहेत. यांची सर्वांत मोठी कामगिरी म्हणजे 'लिंग्विस्टिक सर्व्हे ऑफ इंडिया' या ग्रंथाच्या वीस खंडांची निर्मिति ही होय. "यामुळें हिंदुस्थानांतील भाषांच्या अभ्यासकांना पूर्वपरंपरा तर प्रगट करून दाखविलीच, शिवाय त्या त्या भाषेंतील अनेक उतारे देऊन नवीन अभ्यासकांना सांगाडा निर्माण करून देऊन त्यांच्या घटनेचा अभ्यास करून त्यांची वर्गवारी करण्याचा प्रयत्न केला. यांच्या या कार्यामुळें हिन्दी विश्वविद्यालयांचें भाषाशास्त्राच्या शास्त्रीय अभ्यासाकडे लक्ष ओढलें गेलें." ग्रियर्सन यांच्या या प्रचंड प्रयत्नामुळें भाषाशास्त्रांत नवीन नवीन शोध लागण्यास बरेंच साह्य झालें. जगांतील सर्व भागांतून पदव्या आणि मानसन्मान यांचा वर्षाव यांच्यावर यांच्या उत्तरायुष्यांत झाला. बंगाल व मुंबई येथील रॉयल एशियाटिक सोसायटीच्या शाखेचे हे ऑनररी फेलो होते. नागरी प्रचारिणी सभा ( काशी ), बिहार अ‍ॅण्ड ओरिसा रीसर्च सोसायटी, दि मॉडर्न लँग्वेज असोसिएशन, लिंग्विस्टिक सोसायटी ऑफ इंडिया व वंगीय साहित्य परिषद, आदि संस्थांचे हे सभासदहि होते.

—८ मार्च १९४१

## फाल्गुन शु. ११ (१) दादोजी कोंडदेव यांचें निधन!

शके १५६८ च्या फाल्गुन शु. ११ रोजीं छत्रपति शिवाजीमहाराज राजे यांचे लहानपणींचे शिक्षक दादोजी कोंडदेव यांचें निधन झालें.

शिवाजीला शिक्षण देण्यांत दादोजी कोंडदेवाने जिजाबाईला फारच साह्य केलें होतें. "मुसलमानी अमलांतील परिस्थिति चांगली ओळखणारा धोरणी व चतुर असा हा पुरुष होता." हा मलठणचा कुलकर्णी असून भोसल्यांच्या कुटुंबाचा व याचा ऋणानुबंध बराच होता. शहाजी कर्नाटकाचे कामगिरीवर गेले असतां शिवाजी व जिजाई यांचा सांभाळ करण्याचें काम शहाजीनें यालाच सांगितलें होतें. दादोजीनें कसब्यांत रंगमहाल नांवाचा वाडा बांधून जवळच हत्ती, घोडे, वगैरेंची पागा तयार केली. कोंडाण्यास लागून असलेले शिवापूर गांव त्यानें शिवाजीच्या नांवानें वसविलें. तेथें उंची फळांचे बाग तयार केले. दादोजी कोंडदेव राजकारण जाणणारा. चतुर, मुत्सद्दी व करडा प्रधान होता. त्याची शिस्त मोठी कडक होती. राज्यव्यवस्था व न्यायपद्धति यांची प्रसिद्धि दादाजीमुळेंच झाली. हा मोठा करारी व पापभीरु होता. हातून कांहीं आगळीक घडल्यामुळें स्वतःस शिक्षा करण्याकरतां यानें आपल्या हाताची एक बाही आमरण आंखूड ठेवली अशी आख्यायिका आहे. मावळे लोकांचा विश्वास संपादन करून यानें त्यांची एक बिनकवायती पायदळ पलटण तयार केली, प्रांतांत होणारा लांडग्यांचा उपद्रव नाहींसा करून मावळ प्रांत वस्तीस लायक केला, जागजागीं चौक्या, पहारे बसवून चोरांची भीति नष्ट केली. शेतीची मोजणी, तिचा वसूल यां संबंधींहि कांहीं ठराव यानेच केले. असा हा वृद्ध दादोजी फाल्गुन शु. ११ रोजीं मरण पावला. लागलीच त्याची बायको निश्चेष्ट पडली, ती परत उठली नाहीं असें सांगतात.

दादोजीच्या मृत्यूमुळें शिवाजी व जिजाबाई यांना फारच दुःख झालें. मरणापूर्वी दादोजीनें शिवाजीस पुढीलप्रमाणें उपदेश केला होता, "गोब्राह्मणांचें प्रतिपालन करण्याचा जो उद्योग तुम्हीं आरंभिला आहे तो तसाच चालवून धर्मसंस्थापना करा, यांत देव तुम्हांला यश देईल.—"

— ७ मार्च १६४७

## फाल्गुन शु. ११(२) इंग्रज-मराठे यांच्यांतील पुरंदरचा तह!

शके १६९७ च्या फाल्गुन शु. ११ रोजीं इंग्रज आणि मराठे यांच्यामधील प्रसिद्ध असा पुरंदरचा तह झाला.

सुवर्णमय असणाऱ्या भारतांत गोवें आणि उत्तर कोंकण येथें पोर्तुगीझांनीं आपलें बस्तान स्थिर केले आणि मद्रास व बंगाल इकडे इंग्रजांचा उत्कर्ष होत राहिला. मराठी राज्य कांहीं काळपर्यंत तरी का होईना खंबीर असल्यामुळें मुंबइकडे इंग्रजांचा शिरकाव होणें दुरापास्त झालें. पुढे पेशव्यांच्या दरबारांत गृहकलह आहे कीं काय याचा तपास मॉस्टिन नांवाचा इंग्रज वकील करूं लागला. त्याच्या सुदैवानें राघोबादादा त्याला मित्र भेटले. नारायणरावांच्या खुनानंतर राघोबाविरुद्ध बारभाईचे कारस्थान उभारले गेले व रघुनाथराव उत्तरेकडे पळूं लागले. हरिपंततात्या त्यांचा पाठलाग करीत होते. ही संधि इंग्रजांनीं साधिली. इंग्रजांनीं पूर्वीचा सर्व तह विसरून साष्टी घेतली. राघोबा सुरतेस इंग्रजांच्या आश्रयास आले; आणि घरभेदेपणा पत्करून त्यांनीं इंग्रजांशीं तह केला. आणि कर्नल कीटिंग यांच्याबरोबर अडीच हजार इंग्रजी फौज राघोबास मदत करण्यास सिद्ध झाली. शिंदे, होळकर व हरिपंत रघुनाथरावांचा पाठलाग करीतच होते, परंतु राघोबास इंग्रजांचा आश्रय मिळाल्याचें पाहून शिंदे–होळकर स्वस्थ राहिले. एकट्या हरिपंतानें इंग्रजी फौजेशीं सामना दिला. दोनहि पक्षांकडील बरेच नुकसान झाले. मध्यंतरीं नवीन प्रकरण निर्माण झालें. कलकत्त्याच्या हेस्टिंग्जने मुंबईकर इंग्रजांना कळविले, “राघोबाचा पक्ष घेऊन तुम्हीं आपल्या अधिकाराबाहेर वर्तन केलें. युद्ध ताबडतोब बंद करा.” आणि सखाराम बापूसहि लिहिलें कीं, “मुंबईकरांनीं चालविलेले युद्ध आम्हांस मान्य नाहीं. तुम्हांकडे बोलणें करण्यास वकील पाठवतो. तहाची योजना करा.” कर्नल अॅप्टन हा इंग्रज वकील कलकत्त्याहून तहाचें बोलणें करण्यास आला. बऱ्याच वाटाघाटी झाल्या, पण साष्टी वगैरे मुलूख मिळाल्यामुळें जो फायदा झाला होता तो सोडण्यास इंग्रज तयार नव्हते. परंतु मराठ्यांचीहि स्थिति ठीक नव्हती. तेव्हां दोघांच्यांत फाल्गुन शु. ११ रोजीं तह ठरला. इंग्रजांच्या फौजा परत जाव्या, राघोबानें कोपरगांवीं रहावें; पेशव्यांच्या विरुद्ध इंग्रजांनीं इतर कोणालाहि मदत करूं नये.

—२९ फेब्रुवारी १७७६

## फाल्गुन शु. १२ दांडी-यात्रेचा प्रारंभ !

शके १८५१ च्या फाल्गुन शु. १२ रोजीं महात्मा गांधींच्या प्रसिद्ध दांडी-यात्रेला प्रारंभ झाला.

भारताच्या विस्तृत किनाऱ्यावर अपरंपार मीठ तयार होत असूनहि या रोज लागणाऱ्या वस्तूवर सरकारला कर द्यावा लागत असे. त्याविरुद्ध गांधींजींनीं लढा पुकारला. सरकार दाद देत नाहींसें पाहून सत्याग्रह करण्याचें त्यांनीं ठरविलें. गुजराथमधील दांडी हें क्षेत्र निवडण्यांत आले. फाल्गुन शु. १२ रोजीं सकाळीं साडेसहा वाजतां या अभूतपूर्व यात्रेस प्रारंभ झाला. त्यांच्या कपाळावर कुंकुम-तिलक शोभत होता. हातांत आधारासाठीं एक काठी होती. अंगावर दोनच खादीचीं वस्त्रें आणि कमरेला घड्याळ ! "वल्कलें परिधान करून पित्याच्या प्रतिज्ञापालनासाठीं कर्तव्यबुद्धीनें वनवासास निघालेल्या श्रीरामचंद्रांचे तेज गांधीजींच्या मुखावर खेळत होते." सुवासिनींनीं पंचारती घेऊन ओवाळल्या-नंतर यात्रेतील पहिलें पाऊल पडले. या तुकडींत एकूण बहात्तर सत्याग्रही वीर होते. वाटेनें प्रत्येक खेडेगांवांत या महात्म्याचें अपूर्व स्वागत झाले. सुरत, नडियाद, आदि शहरांत हजारों रुपयांच्या राशी गांधीजींच्या पायावर अर्पण करण्यांत आल्या. "मला पैसा नको. खादी, दारूबंदी व ऐक्य या कार्यांवर शक्ति खर्च करा" असा उपदेश ते देत असत.

"मलयगिरीवरील शीतल, सुगंधी व संजीवक अशा वाऱ्याप्रमाणें गांधीजी आपल्या सेनेसह या गांवाहून त्या गांवास चालले. खेडेगांवांतील गरीब व अडाणी पण साध्याभोळ्या व प्रेमळ शेतकऱ्यांनीं त्यांच्या रस्त्यावर पाणी शिंपून व लतापल्लवांचीं तोरणे उभारून व कोठें कोठें वाजंत्रीं वाजवून त्यांचें उत्साहानें स्वागत केलें." सत्यासाठीं, न्यायासाठीं गांधींचा हा लढा होता. "राज्य-कर्त्यांचा नाश करणें हा आमचा हेतु नव्हे, पण राज्यपद्धतीचा मात्र उच्छेद झाला पाहिजे." "आतां मला स्पष्ट असे वाटते कीं, इंग्रजी राज्याचा नाश करण्यासाठीं माझा जन्म झाला आहे...मला घाण्यांत पिळून काढलें तरी मी या राज्याचा नाश करावा असेंच सांगत राहीन." असा त्यांचा संदेश होता.

— १२ मार्च १९३०

## फाल्गुन शु. १३ शिवरायांची वाढती सत्ता !

शके १५९६ च्या फाल्गुन शु. १३ रोजीं मराठ्यांच्या सैन्यानें दंडाराजपुरीस वेढा घातला.

शिवरायांनीं स्वराज्याचा उपक्रम केला, त्याचा जाच बऱ्याच लोकांना झाला. औरंगजेब तर जळफळून गेला. पश्चिम किनाऱ्यावर पोर्तुगीझ लोक व्यापार करीत, त्यांनाहि शिवाजीच्या वाढत्या प्रतापापासून त्रासच होऊं लागला. पाश्चात्य लोक ज्या शस्त्रविद्येंत निपुण होते ती विद्या हस्तगत करण्याची योजना शिवाजीची होती. पोर्तुगीझ, इंग्रज, वगैरे व्यापारी शिवाजीच्या शत्रूला दारूगोळा, हत्यारें, वगैरे साहित्य पुरवून मदत देत असत. याशिवाय लूट, जाळपोळ, इत्यादि प्रकार होऊन धार्मिक जुलूमहि फार होत असे. यामुळे त्यांना धाकांत ठेवणें हें शिवाजीचें कर्तव्यच होऊन बसलें होतें. याच भागांत राहणारा पीतांबर शेणवी याचा उपयोग करून घेऊन शिवाजीने पोर्तुगीझांची विद्या आत्मसात् केली. पश्चिम किनाऱ्यावर वावरणाऱ्या इंग्रज, सिद्दी व पोर्तुगीझ यांना धाकांत ठेवून आपला विजय कायम राखण्यासाठीं शिवाजीनें कुलाबा, सुवर्णदुर्ग, विजयदुर्ग, सिंधुदुर्ग, इत्यादि नवीन दर्यावर्दी ठाणीं निर्माण केलीं.

सन १६७४ च्या ऑगस्ट महिन्यांत गोव्याच्या हद्दीला लागून असलेला विजापूरचा फोंडा घेण्यासाठीं शिवाजीनें अण्णाजी दत्तो यास फौजेसह पाठविलें. परंतु त्याचें फारसे चालले नाहीं. तेव्हां स्वतः शिवाजी राजापुरास येऊन दाखल झाला. त्यानें फोंड्यास वेढा दिला. किल्ल्यावरील विजापूरचा अधिकारी महंमुदखान जीव बचावण्यासाठीं पळून गेला! त्यानंतर अंकोला, शिवेश्वर, काद्रा, वगैरे ठाणींहि काबीज झालीं. पुढे कारवार, सदाशिवगड, सोंधे हे प्रदेशहि हस्तगत झाले. त्यांवर चौथाईचा हक्क सुरू होऊन धर्माजी नागनाथ नांवाचा अधिकारी नेमून सर्व व्यवस्था शिवाजीनें त्याकडे सोपविली. येणेप्रमाणें मराठ्यांचा दरारा सर्वत्र वाढल्यामुळे पोर्तुगीझांना चागलीच दहशत बसली. शिवाजी राजाचा सर्वत्र दरारा निर्माण होऊन अनाथांच्या रक्षणास कोणी वाली आहे, असें सिद्ध झाले.

— २७ फेब्रुवारी १६७५

## फाल्गुन शु. १४ इंद्रजिताचा मायावी पराक्रम !

फाल्गुन शु. १४ रोजीं रावणाकडील खराचा पुत्र मकराक्ष याचा रामानें वध केल्यावर इंद्रजित युद्धास सरसावला.

कुंभकर्णाचा वध झाल्यावर त्याचे पुत्र कुंभ व निकुंभ वानर सैन्यावर चालून आले. त्या सर्वांनीं रणांगणावर आपली आहुति दिली. नंतर खराचा पुत्र मकराक्ष यास रावणानें रामावर पाठविलें. शेवटीं त्याचाहि नाश झाल्यावर रावण त्वेषानें इंद्रजितास बोलला, " इंद्रजिता, तूं इंद्रालाहि जिकलें आहेस. रामलक्ष्मणांचा तुझ्यापुढे टिकाव लागणार नाहीं. तूं स्वतः जाऊन त्या दोघांचा नायनाट कर." याप्रमाणें प्रोत्साहित झालेला इंद्रजित रणांगणावर आला व वानर सैन्यावर एकसारखी बाणवृष्टि करण्यास त्याने प्रारंभ केला. अदृश्य असणाऱ्या रथांतून बाण येत असल्यामुळें बिचाऱ्या वानरांची अत्यंत त्रेधा उडाली. लाखों वानर मरून पडले. कित्येक जण भ्रमिष्ट होऊन सैरावैरा पळूं लागले. रामलक्ष्मणांवरहि बाण येऊं लागल्यावर त्यांनीं आपल्या अस्त्रविद्येनें त्यांचा प्रतिकार केला. परंतु बाणांची वृष्टि करणारा इंद्रजित दिसेना तेव्हां लक्ष्मण क्रोधानें बोलला, " राक्षसमात्रांचा निःपात करण्यासाठीं ब्रह्मास्त्र सोडतों म्हणजे इंद्रजित असेल तेथें मरण पावेल." यावर रामानें इशारा दिला, " अपराधी व निरपराधी यांची सरसहा कत्तल करूं नकोस." त्यामुळें लक्ष्मण स्वस्थ राहिला.

दुसऱ्या दिवशीं मायावी असें सीतेचें शरीर निर्माण करून मारुतीच्या देखत तिचा वध केला. रामाला ही बातमी समजल्यावर त्यास अतिशय दुःख झालें. शेवटीं बिभीषणानें रामलक्ष्मणांचे सांत्वन केलें : " महाराज, तुम्ही बिलकुल शोक करूं नका. रावण सीतेचा कधींहि घात करणार नाहीं. इंद्रजितानें मारली ती मायावी सीता असली पाहिजे. उठा. शोक करण्याची ही वेळ नाहीं. इंद्रजित निकुंभिलेस यज्ञ करण्यास जात आहे. यज्ञ समाप्त करून तो रथावर चढला कीं देवांनांहि त्याला जिंकणें अशक्य होईल. त्याच्या आंत इंद्रजिताचा समाचार घेतला पाहिजे."



## फाल्गुन शु. १५ (१) होळी पौर्णिमेचें रहस्य !

फाल्गुनी पौर्णिमेचा दिवस होळी पौर्णिमा म्हणून भारतांत प्रसिद्ध असला तरी स्थानपरत्वें त्याला शिमगा, होलिका, हुताशनीमहोत्सव, दोलायात्रा, कामदहन अशीं नांवे आहेत.

या सणाच्या उत्पत्तीसंबंधीं एकवाक्यता नाहीं. वसंतऋतूच्या आगमनासाठीं हा वसंतोत्सव चालू असतो असाही एक समज आहे. उत्तरेंतील लोक हा उत्सव कृष्णासंबंधीं मानतात. बालकृष्णाला विषमय दुग्ध पाजणारी पूतना हिचें होळीच्या रात्रींच दहन करण्यांत आलें असा एक विश्वास आहे. महाराष्ट्रांतील लोक मानतात कीं, पूर्वी ढुंढानामक राक्षसीण लहान बालकांना फार पीडा देत असे, तेव्हां तिला हांकून लावण्यासाठीं बीभत्स शिव्या देऊन जिकडे तिकडे अग्नि निर्माण करण्याची वहिवाट पडली आहे. हा सण साजरा करण्याचे प्रकारहि निरनिराळे आहेत. या सणांत प्रकट होणारी अनीति व बीभत्सपणा हळूहळू नष्ट होऊन राष्ट्रवर्धक असें स्वरूप येण्यास सुरुवात झाली आहे. या दिवशीं मैदानी व मदोनी खेळांच्या चढाओढी ठेवून एकमेकांत सामाजिक हितसंबंध निर्माण करण्याची प्रवृत्ति आजकाल वाढली आहे.

होळीसणांत अश्लीलता कां शिरली असावी या प्रश्नाचे उत्तर शोधतांना श्री. काका कालेलकर मार्मिकपणें विचार करतातः—

"होळी म्हणजे कामदहन. वैराग्याची साधना. विषयाला काव्याचें मोहक स्वरूप दिल्यानें तो वाढतो. त्यालाच बीभत्स रूप देऊन त्याला उघडा नागडा करून त्याचें खरें स्वरूप समाजास दाखवून त्याविषयीं शिसारी उत्पन्न करण्याचा उद्देश तर नसेल? सबंध हिंवाळाभर ज्याच्या मोहांत आपण सांपडलों त्याची फजिती करून, त्याला जाळून टाकून पश्चात्तापाची विभूति शरीराला चर्चून वैराग्य धारण करण्याचा उद्देश यांत असेल काय ?"

आणि कामदहनाच्या कल्पनेवर आधारलेल्या या कल्पनेस पुराणांत आधार सांपडतो. मदनदहनानंतर शंकरांनीं आपल्या गणांना सांगितलें कीं, "फाल्गुन शु. १५ स मीं मदनास जाळलें आहे. तेव्हां त्याच दिवशीं सर्वांनीं होळी करावी."

● ● ●

## फाल्गुन शु. १५ (२) श्रीगौरांगप्रभूंचा जन्मदिवस !

शके १४०७ च्या फाल्गुन शु. १५ रोजीं बंगाल्यांतील विख्यात संत श्रीगौरांग ऊर्फ श्रीचैतन्यप्रभु यांचा जन्म झाला.

आसाममधील श्रीहट्ट (सिल्हट) येथील प्रसिद्ध मिश्र घराण्यांत श्रीगौरांगांचा जन्म झाला. विद्याभ्यास करण्यासाठीं जगन्नाथ मिश्र सिल्हटहून नवद्वीप येथे आले. यांचा विवाह नीलांबर चक्रवर्ती यांची मुलगी 'शचीदेवी' हिच्याशीं झाला होता. या दांपत्यास लागोपाठ आठ मुली झाल्या. आणि त्या मरूनहि गेल्या. नववा मुलगा झाला त्याचें नांव विश्वरूप. आणि शके १४०७ च्या फाल्गुन शु. १५ रोजीं त्यांना दुसरा मुलगा झाला त्याचें नांव निमाई. हेच पुढें श्रीगौरांग, चैतन्यदेव, महाप्रभु अथवा निमाईभगवान् म्हणून प्रसिद्धीस आले असे सांगतात. निमाई आईच्या गर्भांत तेरा महिने असल्यामुळे चांगला धष्टपुष्ट होता. 'हरि हरि बोल, बोल हरि बोल। मुकुन्द माधव गोविंद बोल' या पदाच्या तालावर निमाई वाढूं लागला. लहानपणापासून निमाईला भगवद्भक्तीचे अतोनात वेड होते. पुढे निमाईचे थोरले बंधु विश्वरूप वैराग्य प्राप्त झाल्यामुळे घरांतून निघून गेले. वडिलांचाहि मृत्यु झाला. नंतर मात्र निमाई नेमाने विद्याभ्यास करूं लागले. बालसुलभ खोड्यांना एकदम आळा बसला. न्यायशास्त्र, व्याकरणशास्त्र यांत निमाई लौकरच मोठे पंडित झाले. त्यांचा विवाह लक्ष्मीदेवी हिच्याशीं झाला. वैष्णवांच्या कट्टरपणावर निमाई पंडित टीका करीत. त्यांच्या दुसऱ्या स्त्रीचे नांव विष्णुप्रिया असे होतें. निमाईनीं केशव भारतींकडून संन्यासदीक्षा घेतल्यानंतर ते जगन्नाथपुरीस जाण्यास निघाले. जगन्नाथाला पाहतांच त्यांच्यांत भावावेश निर्माण झाला. जगन्नाथाच्या मूर्तीला त्यांनीं मिठीच मारली. त्यानंतर त्यांनीं तीर्थयात्रा केली आणि सन १५२१ पासून राधाभावाच्या उपासनेस त्यांनीं प्रारंभ केला. स्वतःस राधा समजून अत्यंत उत्कटपणें परमेश्वराची भक्ति ते करू लागले. राधेच्या प्रेमाच्या सर्व अवस्था त्यांनी अनुभविल्या. मधुराभक्तीचा मूर्तिमंत अवतार म्हणजे गौरांगप्रभु. त्यानंतर शके १४५५ मध्यें श्रीचैतन्यांना श्रीकृष्णाच्या कालिंदी नदींतील विरहाची भावना झाली; आणि श्यामल कृष्णाशीं क्रीडा करण्यासाठीं त्यांनीं समुद्रांत उडी टाकली!

—१८ फेब्रुवारी १४८६

## फाल्गुन शु. १५ (३) मराठ्यांना बाणकोट हस्तगत !

शके १६५५ च्या फाल्गुन शु. १५ रोजीं जंजिऱ्याच्या मोहिमेंतील प्रसिद्ध ठाणें बाणकोट हें मराठ्यांनीं हस्तगत केलें.

जंजिऱ्याचा हबशी हा मोगल बादशहाचा हस्तक समजला जात असल्यामुळें त्याचा उच्छेद करणें हें शिवाजीमहाराजांच्या काळापासून मराठ्यांचे मुख्य कर्तव्य होऊन बसले होतें. बाळाजी विश्वनाथ पेशवा झाल्यावर, त्यानें आपली जन्मभूमि कोंकण प्रांत ही आपल्या ताब्यांत असावी या हेतूने 'प्रयत्न चालू केलेच होते. स्वारीच्या उपक्रमास ब्रह्मेंद्रस्वामी कारण झाले.

सन १७२७ त शिवरात्रीच्या दिवशीं जंजिऱ्याच्या सिद्दीनें परशुराम येथील देवालयावर हल्ला करून त्या पवित्र स्थानाचा विध्वंस केला. देवालयाची, ब्राह्मणांची सर्व दौलत लुटून नेली. हें पाहून स्वामींना परमदुःख झालें. त्यांनीं सिद्दीसातांस शाप दिला, "देव ब्राह्मणांचा तूं उच्छेद केलास, अतःपर तुझाहि उच्छेद लौकरच होईल." त्यानंतर स्वामींचें वास्तव्य साताऱ्यानजीक धावडशी येथें होऊं लागले. त्यांनीं कांहीं मराठे सरदार व शाहू यांना भरीस घालून जंजिऱ्याची मोहीम स्वीकारण्यास प्रवृत्त केलें. वारंवार पत्रें लिहून बाजीरावासहि या गोष्टीचें महत्त्व स्वामींनीं पटवून दिलें. आणि याचाच परिणाम म्हणून सन १७३३ त जंजिऱ्याची मुख्य मोहीम सुरू झाली.

बाणकोटच्या खाडीपासून उत्तरेस थेट रेवदंड्यापर्यंतचा सह्याद्रीच्या पायथ्याचा मुलूख सिद्दीच्या ताब्यांत होता. किनाऱ्यालगतच्या मराठी मुलखावर हल्ले करून हिंदु प्रजेस छळण्याचा उपक्रम कित्येक वर्षे सिद्दी करीत होता. तेव्हां या कामगिरीवर उदाजी पवार, बाजी भीमराव, वगैरे सरदार शाहूच्या आज्ञेनें पराक्रम करूं लागले. फाल्गुन शु. १५ रोजीं त्यांनीं बाणकोटचें प्रसिद्ध ठाणें हस्तगत केले आणि यानंतर जंजिरा व अंजनवेल याखेरीज सर्व मुलूख मराठ्यांच्या ताब्यांत आला. शेवटीं जंजिऱ्यावरहि तोफांचा मारा सुरू झाला आणि सिद्दी, अंबर, संबूल, वगैरे सरदार अंजनवेलकडे पळून गेले.

**— ८ मार्च १७३४**

## फाल्गुन व. १  ( १ ) बुक्कराय यांचें निधन !

शके १२९९ च्या फाल्गुन व. १ रोजीं सर्व हिंदुस्थानांत मुसलमानांचा धुमाकूळ सुरू असतांना दक्षिणेस तुंगभद्रेच्या तीरावर माधवाचार्यांच्या साह्यानें विजयनगरच्या वैभवशाली हिंदुसाम्राज्याची स्थापना करणाऱ्या हरिहर आणि बुक्क या बंधूंपैकीं बुक्कराय यांचें निधन झाले.

चौदाव्या शतकाच्या सुरुवातीस इस्लामी संस्कृतीच्या टोळधाडी दक्षिणेंत धुमाकूळ घालूं लागल्या होत्या. शके १२४० मध्यें देवगिरीच्या यादवांचें राज्य बुडाल्यावर थोड्याच दिवसांत तेलंगणांतील वरंगळचे राज्यहि कायमचे नष्ट झालें सर्व दक्षिण भारतांत हिंदूंचा पाडाव होऊन मोठी बिकट परिस्थिति निर्माण झाली. याच सुमारास तुंगभद्रेच्या उत्तर तीरावर अनागोंदी नांवाचें एक छोटें राज्य होतें. शके १२४० वरंगळचें राज्य बुडाल्यावर त्याच्या पदरीं असलेले हरिहर आणि बुक्क हे बंधु अनागोंदीच्या आश्रयास आले. एकास अनागोंदीची दिवाणगिरी व दुसऱ्यास खजिनदारी मिळून दोघां बंधूंची लौकरच भरभराट झाली. परंतु पुढें सात-आठ वर्षांतच सुलतान महंमुद तघलक याने अनागोंदीचें राज्य बुडविले. आणि सर्व दक्षिण देश मुसलमानांना मोकळा झाला. धर्म बुडाला, स्वातंत्र्य गेलें, पुरातन राज्यें गेलीं, मंदिरें जमीनदोस्त झालीं, दैन्य, दारिद्य, दुष्काळ यांनीं सारा दाक्षिण देश व्यापला ! अशा बिकट प्रसंगीं हरिहर–बुक्क या बंधूंनीं शके १२५७ मध्ये विजयनगरीं हिंदुसाम्राज्याची मुहूर्तमेढ रोविली. विजयनगरचें साम्राज्य त्या वेळीं अत्यंत भरभराटीस आलेलें असून त्याच्याएवढें संपन्न राज्य दुसरे नव्हतें.

“ बुक्क मोठा पराक्रमी असून हिंदु धर्माचा मोठा अभिमानी व पुरस्कर्ता होता. पांच पांडवांत जसा अर्जुन तसा संगमाच्या पांच पुत्रांत बुक्क असे म्हणण्यांत येई. याची तरवार रणांगणावर नाचूं लागली म्हणजे मुसलमानांचीं तोंडें वाळून निस्तेज होत असत. ... शत्रु राजांना हा वज्राच्या तडाख्याप्रमाणें भासे ... याची सर्वांत महत्त्वाची कामगिरी म्हणजे यानें वेदभाष्य लिहिलें. ‘ वैदिक मार्गप्रवर्तक ’ म्हणून जुन्या लेखांत याचा उल्लेख आढळतो. ”

—१४ फेब्रुवारी १३७८

## फाल्गुन व. १ (२) " बोध करून माघारीं फिरविलें ! "

शके १६८२ च्या फाल्गुन व. १ रोजीं पराक्रमी बंधु भाऊसाहेब व सुपुत्र विश्वासराव यांच्या निधनाची बातमी ऐकून नानासाहेब पेशवे पानपतच्या मार्गावरून परत येण्यास निघाले.

उत्तर हिंदुस्थानांत पानपतचा भयंकर संग्राम होत असतां नानासाहेब पेशवे निजामावर लक्ष ठेवण्यासाठीं नगरच्या बाजूस राहिले होते. दोनही फौजांची समीपता झाल्याची वार्ता तेवढी नानासाहेबांस समजली होती. पण पुढें कांहींच बातमी लागेना. महादोबा पुरंदरे यांच्या आग्रहानें पेशवे उत्तरेस जाण्यास निघाले. बरोबर जानोजी व मुधोजी भोसले, बाबूजी नाईक, गोपाळराव पटवर्धन, यमाजी शिवदेव, आदि मंडळी होती. भेलसा येथें बातमी समजलीः—" दोन मोती गलत, दसवीस अश्राफत, रुपयोंकी गणति नहीं–" मागाहून हळूहळू हृदयद्रावक बातमी पेशव्यांचे कानीं आली. परंतु बातमींत मेळ नव्हता. एकदां समजावें भाऊसाहेबांची फत्ते झाली, पुनः ऐकावें मोड झाला. त्यामुळें एकंदर मंडळींची स्थिति फारच शोचनीय झाली. नानासाहेबांचे हृदय विदीर्ण होऊन गेलें होतें.

शेवटीं–" होळकर, विठ्ठल शिवदेव, नारोशंकर, वगैरे मंडळी भेटली. सर्व वृत्तांत निवेदन केला. श्रीमंतांनीं ऐकोन बहुत खेद केला. त्यांचा निश्चय कीं, दिल्लीस जाऊन गिलच्यांचें पारिपत्य करावें. अशी विचारणा करून बंदोबस्त करीत असतां गोपिकाबाईनीं बहुत बोध करून माघारें फिरविलें. " शेवटीं दुःखद मनस्थितींत नानासाहेब फाल्गुन व. १ रोजीं परत निघाले. " जावयाचा निदिध्यास प्रधान पंत यांनीं धरिला. श्रीप्रयागीं जावें, तेथें नावेमध्यें बसून नांव बुडवावी ऐसें चित्तभ्रमें-करून बोलों लागले. तेव्हां सर्वांनीं चिन्हें ठीक दिसत नाहीं, ऐसा निश्चय करून पुढें कूच झालें. "

नानासाहेबांच्या मनावर या विपत्तीचा मोठाच आघात झाला. त्यांचें वजन १७८ पौंडांवरून ११४ पौंडांवर आलें. आणि ' भाऊ भाऊ ' असा शोक करीतच स्वारी पुण्यास येऊन पोंचली. आणि त्यांतच त्यांचा अंत झाला.

— २१ मार्च १७६१.

## फाल्गुन व. २ "आतां मज जाणें प्राणेश्वरासवें!"

शके १५७१ च्या फाल्गुन व. २ रोजीं महाराष्ट्रांतील विख्यात सत्पुरुष तुकारामबोवा यांचें निर्याण झालें.

संसारांत संकटपरंपरा निर्माण झाल्यावर मूळचेच परमार्थप्रवण असलेले तुकाराम परमेश्वराकडे संपूर्ण वळले. कीर्तनकारांच्या पाठीमागें ध्रुपद धरून तुकोबांनीं "कांहीं पाठ केलीं संतांचीं उत्तरें." भंडाऱ्याच्या डोंगरावर जाऊन ज्ञानदेव–एकनाथांच्या वाङ्मयाचें वाचन सुरू केल्यावर त्यांचें चित्त निर्मळ झालें. थोड्याच दिवसांत गुरुकृपा होऊन बोवांना कवित्वाची स्फूर्ति झाली. आणि त्यांच्या तोंडून पाझरणाऱ्या काव्यगंगेंत महाराष्ट्रीय जनता सुखावली. तीन-चार शतकांपूर्वी ज्ञानदेवांनीं संस्कृतांतील तत्त्वज्ञान मराठींत आणून मोठी कामगिरी केली. पण ते तत्त्वज्ञान अंतराळीं होतें. त्याला आपल्या अभंगवाणीनें भूमितलावर तुकोबांनीं आणलें. स्वतः परमेश्वराची प्राप्ति करून घेतल्यावर तुकोबा 'उपकारापुरते उरले' होते. आपण स्वतः जेवून तृप्त झाल्यावर इतरांना संतर्पण करण्यासाठीं ह्यांचें जीवित होते. तत्कालीन समाजांतील अनिष्ट चाली, ढोंगें, बुवाबाजी, नवससायास, यांवर तीव्र प्रहार करून समाजसुधारकाचें काम त्यांनीं चोखपणे बजाविलें. केवळ स्वतःचाच मोक्ष साधणारे तुकोबा नव्हते. सर्वांना त्यांनीं वैराग्याचा बोधहि दिला नाहीं. तर प्रपंच हाच हरिरूप मानून निरहंकार वृत्तीनें रहावें हा भागवत धर्माचा श्रेष्ठ संदेश त्यांनीं थेट सामान्य जनतेपर्यंत पोंचविला.

शेवटीं शके १५७१ च्या सुमारास आपलें कार्य संपल्याची जाणीव त्यांना झाल्यावर त्यांनीं आवराआवरीस सुरुवात केली. फाल्गुन व. २ च्या कीर्तनांत तुकोबा बोलूं लागले—

> "सकळांहि माझी बोळवण करा। परतोनी घरां जावें तुम्हीं।
> आतां मज जाणे प्राणेश्वरा सवें। मी माझिया भावें अनुसरलों॥
> वाढवितां लोभ होईल उशीर। अवघींच स्थिर करा ठायीं॥"

सर्व लोक भजनप्रेमांत तल्लीन झाले होते. 'विठ्ठल विठ्ठल' म्हणत तुकोबा भावावेशात येऊन पांडुरंगाशीं एकरूप झाले!

—९ मार्च १६५०

## फाल्गुन व. ३ (१) " श्रीशिवाजी राजे शिवनेरीस उपजले ! "

शके १५५१ च्या फाल्गुन व. ३ रोजीं शिवनेरी येथें स्वराज्यसंस्थापक श्रीशिवाजीमहाराज यांचा जन्म झाला.

निजामशाहींत मराठ्यांचीं दोन घराणीं प्रसिद्धीस आलीं : एक भोसल्यांचें व दुसरे जाधवांचें. पैकीं शहाजी भोसले आपल्या पराक्रमाने सर्वत्र तळपत राहिले. त्यांचें जीवित युद्धमय स्थितींतच असल्यानें गरोदर असणारी स्त्री जिजाबाई शिवनेरी किल्ल्यावर होती. भोवतालची परिस्थिति पाहून जिजाबाईस धाक उत्पन्न होई. तिने शिवाईस नवस केला कीं, " मला मुलगा होऊं दे, मी त्याला तुझें नांव ठेवीन. " त्याप्रमाणें मुलगा झाल्यावर तिनें त्याचें शिवाजी असें नांव ठेविलें. जिजाबाई ही शिवाजीचा पहिला गुरु होय. तिचे शहाजीशीं विशेष सख्य नव्हतें, माहेरचाहि आधार तुटलेला, तेव्हां तिनें आपलें सारें लक्ष शिवाजीकडेच केंद्रित करून त्याची उत्कृष्टपणें जोपासना केली. रामायण-महाभारतांतील कथा सांगून तिनें त्याच्या मनांत स्वाभिमान आणि शौर्याविषयी आवड निर्माण केली. शिवाजीचा दुसरा गुरु म्हणजे दादोजी कोंडदेव मलठणकर. घोड्यावर बसणें तिरंदाजी करणें, भाला मारणें, तलवार चालवणें, इत्यादि मर्दानी शिक्षण त्यानेंच शिवाजीला दिलें.

शिवाजी लहान असतांनाच शहाजीने त्यांना विजापूरला नेले. तेथील सर्व प्रकार पाहून शिवरायांच्या अंगचा स्वाभिमान उफाळून वर आला. यवनांचीं दुष्ट कृत्यें त्यांच्या नजरेंत भरलीं, गोवध करणाऱ्यांविषयीं त्यांना संताप आला. विजापूर दरबारांत शहाजीबरोबर शिवाजी गेला परंतु मुजरा न करतां तसाच उभा राहिला, तेव्हां ' लेकरूं आहे, दरबार पाहून घाबरले, अशी सारवणी शहाजीस करावी लागली. शिवाजीनें डोळयांनीं सर्व परिस्थिति पाहिली आणि यवनांच्या मगरमिठींतून देश, धर्म, लोक यांना सोडवावे अशा विचारानें लहान वयांतच जिवास जीव देणारे अनेक सौंगडी जमवून त्याने कार्यास सुरुवात केली. आणि थोड्याच अवधींत हिंदवी स्वराज्याची निर्मिति या थोर पुरुषानें केली !

—१९ फेब्रुवारी १६३०

**फाल्गुन व. ३** **( २ ) नाना फडणीस यांचें निधन !**

शके १७२१ च्या फाल्गुन व. ३ रोजीं मराठेशाहींतील प्रसिद्ध मुत्सद्दी व राजकारणी पुरुष नाना फडणीस यांचें निधन झालें.

मृत्यूपूर्वी दोन-तीन वर्षे नाना कैदेंत होते. अटकेंतील हालअपेष्टा टाळण्यासाठीं त्यांनीं केलेले सर्व प्रयत्न फोल ठरले आणि थोडे दिवस का होईना नानांना कैद भोगावी लागल्यामुळें त्यांच्या मनास जबरदस्त धक्का बसला. त्यांची प्रकृति बिघडून दिवसेंदिवस ती खालावत गेली. माघ वद्यांत त्यांना ज्वर येऊं लागला, आणि त्यातच फाल्गुन व. ३ रोजीं मध्यरात्रींस त्यांचा अंत झाला.

"नारायणरावांच्या वधानंतर रघुनाथरावाविरुद्ध कारस्थान रचून त्या प्रकरणीं इंग्रजांशीं युद्ध सुरू झाले, त्यांत नानाने शिकस्तीचे प्रयत्न करून केवळ बुद्धीच्या जोरावर इंग्रजांचा पाडाव केला हीच त्याची महनीय राष्ट्रीय कामगिरी होय.... बारभाईचें कारस्थान, मोरोबाचा पाडाव, चौकडीची जूट सालबाईचा तह व सवाई माधवरावांचे लग्न, हे मुख्य प्रसंग नानाच्या कर्तबगारीचे होत.... नाना फडणिसाने मुखत्यारीनें काम चालविले. त्याची काम करण्याची मेहनत, अक्कल, स्मरण, लिहिणें, बंदोबस्त व अप्रमाण बोलण्याविषयीं मनांत भय हे गुण चांगले होते." जयपूरच्या राजाने त्यांच्याविषयीं अभिप्राय व्यक्त केला आहे : "राज्यांतील, सरदारांच्या चित्तांतील शुद्धता व ऐक्यता करून त्यांस लावून घेणें व प्रजेचें पालन उत्तम करणें हें काम त्यांचेंच आहे. दक्षिण हिंदुस्थानांत दुसरे कोणी नाहींत."

१७९५ मध्यें खर्ड्याच्या लढाईंत निजामाविरुद्ध मराठ्यांनीं प्रचंड विजय मिळविला, त्यानंतर मात्र नानांचें तेज फिकें झाले. महादजी शिंदे व हरिपंत फडके हे नानांचे डावे-उजवे हात मृत्यूच्या तडाख्यांत सांपडले. सवाई माधवरावांचा अंत झाला आणि नानांचा वीस वर्षांचा उद्योग नष्ट होऊन गेला. त्यांच्याबरोबर मराठेशाहीचें शहाणपणच लयास गेलें ! मराठेशाही पोरकी होऊन तिच्यांतील त्राण नाहींसें झालें !

— १३ मार्च १८००

## फाल्गुन व. ४ वि. ना. मंडलीक यांचा जन्म !

शके १७५४ च्या फाल्गुन व. ४ या दिवशीं अव्वल इंग्रजींतील सुप्रसिद्ध सार्वजनिक कार्यकर्ते विश्वनाथ नारायण मंडलीक यांचा जन्म झाला.

यांचें जन्मस्थान मुरूड. मुंबईच्या एल्फिन्स्टन इन्स्टिटयूटमध्यें चार वर्षे शिक्षण घेतल्यावर कांहीं वर्षे यांनीं सरकारी नोकरी केली. परंतु पुढे हे वकिली करूं लागले. 'नेटिव्ह ओपिनियन' नांवाच्या इंग्रजी-मराठी साप्ताहिकाचे मंडलीक सात वर्षें संपादक होते. मंडलीक यांनीं आपल्या जीवितांत अनेक प्रकारचीं लोकोपयोगी व शिक्षणोपयोगी कामें केलीं. रॉयल एशियाटिक सोसायटीचे उपाध्यक्ष, बेंगाल एशियाटिक सोसायटीचे सभासद, रॉयल जिऑग्रिफिकल सोसायटीचे फेलो, मुंबई विद्यापीठाचे फेलो, मुंबई व कलकत्ता कायदे कौन्सिलचे सभासद, सरकारी वकील, इत्यादि अनेक भूमिकांवरून यांनीं केलेली कामगिरी महनीय अशीच आहे. हिंदी आणि इंग्रज या दोनहि लोकांत रावसाहेब मंडलीक प्रिय होते. "रावसाहेबांनीं सत्याशिवाय कोणाची पर्वा केली नाहीं. मनोदेवतेशिवाय कोणाची पायधरणी केली नाहीं. लोकहिताशिवाय कांहीं इच्छिले नाहीं किंवा न्यायरूप कुलदेवतेशिवाय कोणाचा प्रसाद त्यांना रुचला नाहीं." मंडलीक यांचा मोठा गुण म्हणजे त्याचा सत्यशीलतेविषयीं दरारा. मोठमोठे अमलदार सुद्धां मंडलीकांच्यापुढे वचकून असत.

"मोठे डोकें, रुंद कपाळ, अत्यंत तेजस्वी डोळे, तरतरीत नाक, दृढनिश्चयदर्शक भिंवया, गंभीर वृत्ति, गौरवर्ण, व मुखावर असलेली निरामयसूचक लाली यांनीं रावसाहेबांचा चेहरा फार रुबाबदार दिसे. त्यावर विद्वत्तेचें तेज चढलें होतें. विचारीपणा हा जो त्यांचा विशेष गुण त्याचा ठसा चिन्हित झाला होता.... त्यांची वाणी खणखणीत होती. सत्यमार्गानें जाण्याचा त्यांचा जो निश्चय होता त्याप्रमाणें त्यांचें आचरण असल्यामुळें कोणाला केव्हाहि भिण्याचे त्यांना कारण नसे. त्यामुळें त्यांचा चेहरा निर्भय दिसे." बोधसार, लक्ष्मीशास्त्र, मराठी हिंदुधर्मशास्त्र, सिंधी भाषेचें लघुव्याकरण, व्यवहारमयूख, इत्यादि यांचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत.



— ८ मार्च १८३३

## फाल्गुन व. ५ — खड्यांचा प्रसिद्ध संग्राम !

शके १७१६ च्या फाल्गुन व. ५ रोजीं म्हणजे रंगपंचमीला मराठे आणि निजाम यांचा खर्डे येथें इतिहासप्रसिद्ध सामना होऊन निजामाचा संपूर्ण पराभव झाला.

मराठ्यांच्या इतिहासांतील अत्यंत अभिमानाचा हा प्रसंग आहे. खर्ड्यांचा विजय अजूनहि मराठ्यांच्या बाहूंना स्फुरण चढवीत असतो. या लढयांत मराठयांचा पराभव झाला असता तर त्यांचे सार्वभौमत्व संपून निराळयाच मनूस सुरुवात होण्यासारखी परिस्थिति होती. राक्षसभुवनच्या लढाईंत निजामाचा पूर्वी एकदां पराभव झाला होता, परंतु तहांत ठरलेला मुलूख मराठयांना मिळाला नाहीं. नाना फडणिसांनीं निजामाकडे काय येणें आहे याची यादी पाठविली, परंतु नानांना बेपर्वाईचें उत्तर मिळालें. — " पुण्यावर स्वारी करून तें जाळून पेशव्यांच्या हातीं भिक्षापात्र देऊन त्यांस देशोधडीस पाठवूं —" ही निजामाची भाषा नानांना कळल्याबरोबर युद्धाची तयारी झपाट्यानें सुरू झाली. नुकतेच महादजी शिंदे आणि हरिपंत फडके वारले असल्यामुळें मराठ्यांना आपण सहज जिंकूं अशी निजामाची कल्पना होती. इंग्रज आपणांस मदत करतील हीहि खात्री निजामास होतीच. या लढ्यांत दौलतराव शिंदे, तुकोजी होळकर, गायकवाड, जिवबादादा बक्षी, भोसले, आदि सरदार सामील झाले होते ; हें पाहून सर जॉन शोअरनें आयत्या वेळीं निजामास मदत दिली नाहीं. एकंदर मराठ्यांची फौज ऐशीं हजार-पर्यंत तयार झाली. परशुरामभाऊ मुख्य सेनापति होते. प्रथम परिंडे या गांवीं दोनही सैन्यांच्या चकमकी झाल्या, आणि नंतर खर्डे या गांवीं निजामची फौज कोंडली गेली. — " सकाळच्या दहा घटकांपासून अस्तमानपर्यंत लढाई झाली. संध्याकाळचे सुमारास त्यांचा मोड होऊन त्यांनीं पळ काढला. खर्ड्यांचा किल्ला गांठला, आम्ही पाठीमागें लागलों, त्यांचेमागें कोसाचे अंतरानें उतरलों, पूर्वेस घाटाचे बाजूस आमचें पेंढार उतरलें, शत्रूस निघून जावयास मार्ग नाहीं. पाणी नाहीं, हैराण गत झाली ", नंतर तह होऊन मराठयांना परिंड्यापासून उत्तरेस तापी नदीपर्यंतचा मुलूख व युद्धखर्चाबद्दल तीन कोटी रुपये मिळाले.

— १० मार्च १७९५

## फाल्गुन व. ६ संतवर्य एकनाथांचें निर्याण !

शके १५२१ विकारी नाम संवत्सरी फाल्गुन व. ६ रविवारीं अविंधमय होऊं पाहणाऱ्या महाराष्ट्राला शांति, औदार्य, समता, भूतदया, इत्यादि दैवी गुणांनीं प्रसिद्ध होऊन सर्वाभूतीं भगवद्भावाची शिकवण देणारे श्रेष्ठ पुरुष एकनाथ यांचें निधन दक्षिणच्या काशीस म्हणजे पैठणास झालें.

याच फाल्गुन व. ६ ला एकनाथचरित्रांत फार महत्त्व आहे. कारण एकनाथांचे गुरु जनार्दनस्वामी यांचा जन्म, जनार्दनस्वामीस दत्तदर्शन, जनार्दनस्वामींचा नाथांवर अनुग्रह, जनार्दनस्वामींचा देहत्याग, आणि नाथांचे निर्याण या सर्व गोष्टी या एकाच तिथीला झाल्या असल्यामुळें ही तिथि भाविक लोकांत विख्यात होऊन बसली आहे. एकनाथस्वामींच्या भागवत, भावार्थ-रामायण, इत्यादि ग्रंथांवर महाराष्ट्रीय जनतेचे अलोट प्रेम आहे. त्यांचीं भजनी भारुडें आजहि लोक आवडीनें गातात. ज्ञानेश्वरी लुप्त होण्याच्या मार्गाला लागली होती ती ज्ञानदेवांच्याच प्रेरणेनें संशोधून तिचा प्रसार नाथांनीं महाराष्ट्र-देशभर केला. समाजसुधारक म्हणूनहि एकनाथांची ख्याति आहे. भक्तीच्या प्रांतांतच नव्हे तर एरवींहि स्पृश्यास्पृश्य भेद उरतां कामा नये हें तत्त्व त्यांनीं अनेकांचा–विशेषतः स्वतःच्या पुत्राचा–रोष पत्करून आपल्या आचरणांत उतरवून दाखविलें.

आणि—" तो नाथांचा वाडा, ती पूजेंतलि कृष्णमूर्ति, तो नाथद्वारींचा रांजण, अखंड अन्नदान व ज्ञानदान यांनीं पावन झालेला तो सभामंडप, नाथांच्या अद्‌भुत शांतीनें शरण येणाऱ्या यवनाची ती देवडी, नाथांच्या कीर्तनश्रवणानें सन्मार्गाला लागणाऱ्या 'पिंगला वेश्येची' ती माडी, पितरांसाठीं केलेल्या श्राद्धान्नानें तृप्त केलेला तो महारांचा महारवाडा, कर्मठांच्या संतोषासाठीं नाथांनीं घेतलेलीं प्रायश्चित्तें, शास्त्रीपंडितांपासून तों महारांमांगांपर्यंत सर्वांच्या उद्धारार्थ अहर्निश केलेले उद्योग या नाथांच्या अलौकिक भूताराधनयज्ञामुळें दीड सहस्र वर्षें विद्यापीठ म्हणून गाजलेल्या पैठणास नाथांनीं स्वगुणांनीं धर्मपीठाच्या योग्यतेस चढविलें.–"

— २५ फेब्रुवारी १६००

## फाल्गुन व. ७ "त्यांस ईश्वरें यश दिलें !"

शके १६९२ च्या फाल्गुन व. ७ रोजीं हैदर आणि मराठे यांच्यांत प्रसिद्ध मोतितलावाची लढाई होऊन हैदराचा प्रचंड पराभव झाला.

माधवराव पेशव्यांचें सर्व लक्ष दक्षिणेकडील कर्नाटक प्रांतीं असे. कर्नाटकांत त्यांनीं एकंदर पांच स्वाऱ्या केल्या ; पैकीं पहिल्या चार स्वारींतून ते स्वतः हजर होते. पानिपतचें संकट कोसळल्यावर मराठ्यांच्या सर्वच शत्रूंनीं उचल खाल्ली. त्यांत हैदरअल्ली प्रमुख होता. त्यानें एकामागून एक असे मराठ्यांचे प्रांत घेण्यास प्रारंभ केला. तेव्हां त्याचा बंदोबस्त करणें माधवरावांना क्रमप्राप्तच होतें. शके १६९२ च्या सुमारास त्रिंबकराव मामानें बिदनूर प्रांतावर स्वारी करण्याचा विचार केला. मोठ्या सैन्यानिशीं हैदरहि तयार होताच. त्रिंबकरावांनीं सखाराम हरि गुप्तेकरवीं सर्व बारीकसारीक माहिती मिळवली; आणि मराठ्यांनीं बिदनूर व श्रीरंगपट्टणच्या दरम्यान हैदरास कोंडलें. परंतु कसें तरी करून हैदर मेल-कोट्याहून श्रीरंगपट्टणास निघाला, त्याच वेळीं त्याला मराठ्यांनीं गांठलें आणि तुंबळ युद्ध केलें. हैदर उजवीकडच्या डोंगराकडे पळून गेला. टिपू फकि-राचा वेष घेऊन निसटला. या लढाईस ' मोतितलावाची लढाई ' असें नांव आहे. या लढाईचें वर्णन असें सांपडतें.

" मराठ्यांनीं थेट हैदराच्या तोफावर चालून जाऊन त्या बंद पाडिल्या, तेव्हां तोफा सोडून आराव्यांत शिरतांच त्याचा मोड झाला., हत्ती, तोफा वगैरे सलतनत लुटली गेली. पंचवीस हजार माणूस, गाडदी बारा हजार, व पन्नास तोफा येणें-प्रमाणें एक घटकेंत सत्यानाश झाला. मात्र या लढाईंत नीळकंठराव त्रिंबक पटवर्धन व त्याचे दुसरे आठ इसम गोळी लागून ठार पडले. अनुचित गोष्ट झाली. नीळकंठराव मोठें रत्न होतें ! त्रिंबकराव मामा फारच श्रमी झाले. हैदर नायकाचें झुंज असें कधीं झालें नाहीं. पंचवीस हजार गाड्यांची एक शिलग होई तेव्हां गगन गर्जत असे. नीळकंठराव, परशुरामभाऊ, वामनराव बाबा या तिघांनीं व लहानांपासून थोरांपर्यंत सर्वांनीं मोठी शर्थ केली. नीळकंठरावामुळें हर्षभंग झाला. श्रीमंत थोर पुण्यवंत, त्यांस ईश्वरें यश दिलें."

— ७ मार्च १७७१

## फाल्गुन व. ८ इंद्रजिताशीं युद्ध सुरू !

फाल्गुन व. ८ रोजीं लक्ष्मणाचें आणि इंद्राजिताचें युद्ध सुरू होऊन इंद्रजिताचा वध झाला.

निकुंभिलेकडे इंद्राजित यज्ञ करीत होता. इकडे रामाची आज्ञा घेऊन लक्ष्मण, बिभीषण, हनुमान व जांबवान हे सर्व निकुंभिलेस आले. हनुमान आणि जांबवान यांनीं इंद्रजिताच्या सैन्यावर निकराचा हल्ला केला. इंद्रजितानें आपलें यज्ञकर्म सोडलें व रथावर आरूढ होऊन त्यानें मारुतीवर बाणाचा वर्षाव सुरू केला. लक्ष्मणानें जोराची आरोळी मारून इंद्रजिताला द्वंद्वयुद्धासाठीं पाचारण केलें. तेव्हां मारुतीस सोडून देऊन इंद्राजित लक्ष्मणाकडे धांवला. प्रथम त्यानें बिभीषणास कठोर शब्दांनीं धिःकारल्यावर बिभीषण बोलला, "धर्मापासून परावृत्त झालेल्या पापी मनुष्यास–मग तो स्वजन असला तरी सोडलाच पाहिजे. परद्रव्याचें हरण करणारा व परस्त्रीचा अभिलाष धरणारा या दोघां पाप्यांस जळत्या घराप्रमाणें टाकून जावें असें शास्त्र सांगतें.—"

इंद्रजितानें रागाने लाल होऊन लक्ष्मणावर चाल केली. दोघांचें द्वंद्वयुद्ध सुरू झालें. तीन दिवसपर्यंत एकसारखें युद्ध होऊन शेवटीं लक्ष्मणानें इंद्रजिताचें डोकें उडाविलें ! "तेव्हां देवांनीं आकाशात दुंदुभि वाजविल्या व लक्ष्मणावर पुष्पवृष्टि केली. इंद्रजितासारख्या महान् पराक्रमी व मायावी राक्षसाचा लक्ष्मणानें नाश केल्यामुळें सर्व पृथ्वीचा भार हलका झाला. आणि तीनहि लोकांना आनंद झाला." बिभीषणानें लक्ष्मणाचा मोठा गौरव केला. सर्व जण विजयी होऊन रामापाशीं आले. श्रीरामांनीं लक्ष्मणास पोटाशीं धरून मोठ्या ममतेनें कुरवाळलें आणि म्हटलें, "लक्ष्मणा, तूं आज एक दुष्कर कर्म केलेंस, आतां रावण मेलाच असें मी समजतों. त्याचे कुंभकर्ण व इंद्राजित हे दोनहि हात तुटले."

इंद्रजित हा लंकेचा राजा रावण व मंदोदरी यांचा ज्येष्ठ पुत्र. याचें मेघनाथ असेंहि नांव होतें. यानें इंद्राला जिंकिलें म्हणून याला इंद्रजित हे नांव प्राप्त झालें. 'जर श्रीराम धर्मात्मा आणि सत्यनिष्ठ असेल तर इंद्रजित मरेल' असें म्हणून लक्ष्मणानें ऐंद्रास्त्र सोडलें व त्याचा वध केला.

● ● ●

## फाल्गुन व. ९ छत्रपति राजाराममहाराजांचें निधन !

शके १६२१ च्या फाल्गुन व. ९ रोजीं शिवाजीमहाराजांचे धाकटे चिरंजीव श्रीराजाराममहाराज यांचें निधन झालें.

राजारामाचा जन्म शके १६६२ मध्यें सोयराबाईच्या पोटीं झाला. शिवाजी-नंतर अठराव्या दिवशींच याला गादीवर बसविलें होतें; परंतु पुढे दोन महिन्यांनीं संभाजीनें याला कैदेंत टाकून सर्व कारभार स्वतःकडे घेतला. पुढे संभाजीच्या वधानंतर येसूबाईच्या सल्ल्यानें शाहू वयांत येईपर्यंत राजारामानेंच कारभार पाहावा असें ठरून दि. ९।२।१६८९ रोजीं राजारामाचें दुसरें मंचका-रोहण झालें. या वेळीं परिस्थिति मोठी बिकट होती. खजिना रिकामा असून सैन्यांत शिस्त नव्हती. तेव्हां रायगडावर स्थिर राहणें इष्ट नसल्यामुळे राजा-रामास सर्वत्र हिंडावे लागले. रायगडास झुल्फिकारखानाचा वेढा पडल्याबरोबर राजाराम तेथून बाहेर पडला व प्रल्हाद निराजी, धनाजी जाधव, संताजी घोरपडे आदि मंडळींसह वेषांतर करून तो जिंजीकडे जाण्यास निघाला. पुढें मोंगलांनीं जिंजीसहि वेढा दिला. सात वर्षेंपर्यंत खटपट करूनहि मोंगलांस यश आलें नाहीं. शत्रूच्या हातावर तुरी देऊन राजाराम वेलाराहून विशाळ-गडास गेला. नंतर सैन्य जमवून वऱ्हाड–खानदेशामध्यें चौथाई व सर-देशमुखी जमविण्यास यानें सुरुवात केली. परंतु झुल्फिकारखानानें पाठलाग केल्यावर मोठ्या कष्टानें हा सिंहगडीं येऊन पोंचला.

" शिवाजी–संभाजीचा आवेश त्याच्या अंगीं कधींच प्रगट झाला नाहीं. प्रवासांत थकवा आल्यानें त्यास उचलून घेऊन जाण्याचे प्रसंग वारंवार आले.... साताऱ्या-पासून नगरपर्यंतच्या प्रवासांत राजारामास थकवा वाटे.... त्यास छातीचा विकार असावा. बरोबरचे सरदार साताऱ्याचे बचावास धावले, तेव्हां राजाराम आश्रयार्थ स्वारीहून सिंहगडीं आला. आणि तेथें अल्प काळ ज्वर येऊन आणि छातीच्या विकारानें रक्ताच्या गुळण्या होऊन त्याच आजारांत तो फाल्गुन व. ९ रोजीं मरण पावला. स्त्री अंबिकाबाई सती गेली."

— २ मार्च १७००

## फाल्गुन व. १० वासोटा किल्ल्यावर हल्ला !

शके १७४० च्या फाल्गुन व. १० रोजीं इंग्रजांच्या फौजेने प्रसिद्ध अशा वासोटा किल्ल्यावर हल्ला केला.

वासोटा किल्ला पूर्वींपासूनच प्रसिद्ध होता. शिवाजीनें यास वज्रगड असें नाव दिलें होतें. ताई तेलीण आणि बापू गोखले यांच्या पराक्रमानें या किल्ल्याचें नांव अजरामर झालें आहे. हा वासोटा किल्ला उंचावर असून फार मजबूत होता. कर्नल ह्यूएट याच्या हाताखालील फौजेनें या किल्ल्यास वेढा दिला. एकंदर तीन ठिकाणीं इंग्रजी सैन्याचे तळ होते. थोड्याच अवधींत वासोट्यावर तोफांचा भडिमार सुरू झाला. याच किल्ल्यांत सातारच्या महाराजांच्या कुटुंबांतील कांहीं माणसें अटकेंत होतीं. शिवाय कॉर्नेट हंटर आणि कॉर्नेट मॉरिसन या दोन इंग्रज अधिकाऱ्यांना पेशव्यांच्या सैन्यानें पकडून याच किल्ल्यावर ठेविलें असल्यामुळें या वेढ्यास विशेष प्रकारचें महत्त्व प्राप्त झालें होतें. प्रथम किल्ला स्वाधीन करण्याविषयींचें पत्र किल्लेदाराला पाठविण्यांत आलें. तें त्याने धुडकावून लावलें. आणि बाणेदारपणाने किल्ला लढविण्याचें ठरविलें. किल्ल्यावरूनच मराठ्यांच्या सैन्यानें शत्रूला तोंड दिलें. परंतु इंग्रजाची युद्धसामग्री अति प्रभावी असल्यामुळें मराठ्यांना पड खावी लागली. दि. ५ एप्रिल रोजीं किल्ल्यावर भराभर तोफांचे गोळे येऊन पडले आणि मुख्य इमारतीस आग लागली, तरी किल्लेदार दाद देईना. दुसऱ्या दिवशीं फिरून तोफांचा भडिमार सुरू झाला ; अत्यंत नेटाने तोंड देत असतांहि किल्लेदाराचा नाइलाज झाला आणि वासोटा इंग्रजांच्या ताब्यांत आला.

या वासोटा किल्ल्याबद्दल कै. शिवरामपंत परांजपे लिहितात, " सृष्टिदेवता सह्याद्रीच्या उंच शिखरावर जोंपर्यंत वासोट्याच्या किल्ल्याचे बुरूज धारण करून राहील तोंपर्यंत त्याची स्मृति महाराष्ट्रीयांच्या अंतःकरणांतून केव्हांहि नाहींशी होणार नाहीं. गरीब शेतकऱ्यांच्या निरुपद्रवी स्वतंत्रतेला शांततेनें रहातां यावें यासाठींच सृष्टिदेवतेनें आपल्या स्वतंत्रतारूपी प्रिय कन्येला हे माहेरघर बांधून दिलें असावें."

— ३१ मार्च १८१८

## फाल्गुन व. ११ "बाई ! मला उन्हाळ करित्येस ?"

शके १६७९ फाल्गुन व. ११ रोजीं मल्हारराव होळकरांचे एकुलते एक पुत्र, प्रसिद्ध अहल्यादेवीचे पति खंडेराव होळकर यांचें निधन झालें.

खंडेराव याचा जन्म शके १६४५ च्या विजयादशमीस झाला. खंडोबा हें होळकरांचें दैवत असल्यामुळें मल्हाररावांनीं मुलाचें नांव खंडेराव असें ठेविलें. शके १६५५ मध्यें यांचें देवी अहल्येशीं लग्न झालें. अहल्याबाई व खंडेराव यांच्यांत दुर्दैवानें असावें तेवढें सख्य नव्हते. खंडेराव व्यसनी असल्यामुळें सत्त्वशील अहल्येला जीवित कष्टमय स्थितींत काढावें लागलें. पतिसुख तिच्या नशिबांत एकंदर नव्हतेंच. शके १६७५ मध्यें मराठयांनीं डीगजवळील कुंभेरीच्या किल्ल्यास वेढा घातला. खंडेराव होळकर या वेळीं लढाईत होते. तरी व्यसनामुळें त्यांच्या हातून नीट काम होत नसे. वेढा चालू असतांनाच "भोजन करून खंडेराव मोर्चियांत निशाणापाशीं आला. तों एकाएकीं प्रळय-वीज पडते तैसें होऊन जेजालेची गोळी अकस्मात् लागून मोर्च्यांत ठार झाला. शुभ्रवर्ण चक्षु होऊन गतप्राण पडला !" मल्हाररावांच्या एकुलत्या एक पोराच्या निधनानें ते तर वेडेच झाले. त्यांतून अहल्या सती जाण्याच्या तयारीस लागली. त्या वेळीं सुभेदार बोलले, "बाई, मला उन्हाळ करित्येस कीं काय? तूं माझे पाठीवर आहेस, तर अहल्या मेली व खंडू आहे हा मला भरंवसा." आणि अहल्याबाईनेंहि सहगमनाचा विचार दूर केला. पतिनिधनानंतर अहल्याबाईनें आपलें जीवित धर्मकृत्यें करून पुण्याईने राज्यकारभार करण्यांत घालविलें !

खंडेरावांच्या मृत्यूमुळें मल्हाररावांना अतिशय वेदना झाल्या. त्यांतच त्यांनीं प्रतिज्ञा केली कीं, "सुरजमल जाटाचा शिरच्छेद करीन व कुंभेरीची माती यमुनेंत टाकीन तरच जन्मास आल्याचें सार्थक !" यावर जाट घाबरून गेला. जयाप्पा शिंदे यांना शरण जाण्याचा विचार करून जयाप्पांना निरोप, पाठविला, "आजचे समयीं तुम्ही वडील बंधु व मी धाकटा बंधु आहें, कळेल त्या रीतीनें बचाव करावा." यानंतर जाटास अभयदान मिळालें.

—१९ मार्च १७५४

## फाल्गुन व. १२ पालखेडला निजामाचा कोंडमारा !

शके १६५० च्या फाल्गुन व. १२ रोजीं पहिल्या बाजीरावानें पालखेड येथें निजामाचा संपूर्ण मोड केला.

या वेळीं निजामुल्मुल्कानें दक्षिणेंत आपलें बस्तान नीटपणे बसविलें होतें. दिल्लीच्या बादशहापासून दक्षिणच्या सहाहि सुभ्यांतून खंडणी घेण्याचा हक्क बाळाजीनें मिळविला होता. त्याप्रमाणें मराठे वसूल करीतहि असत, परंतु आतां त्याना धुडकावून लावावें व आपण पूर्ण स्वतंत्र व्हावें असा प्रयत्न निजामानें सुरू केला. कोल्हापूरकर संभाजी निजामास जाऊन मिळाला. चंद्रसेन जाधव, रावरंभा निंबाळकर हेहि आपल्या बाजूस आहेत असें पाहून वसूल करणाऱ्या लोकांना निजामानें दरडावून विचारलें, "खरा वारसदार कोण ? कोल्हापूरकर कीं सातारकर, तें अगोदर ठरवा. मग खंडणीची बात बोला." या प्रकारें निजामाचा उद्धटपणा पाहून शाहूस संताप आला. त्यानें निजामाचें पारिपत्य करण्यासाठीं बाजीरावास आज्ञा केली. बाजीरावानें स्वारीची तयारी करून निजामाचे साह्यकर्ते संभाजी व चंद्रसेन एकत्र होण्यापूर्वींच जालना प्रांत हस्तगत केला व तेथील खंडणी वसूल केली. बाजीरावाचा पाठलाग निजामनें मोठ्या कष्टानें केला, पण त्यात त्याला यश मिळालें नाहीं. मोंगल व मराठे यांच्यांत वारंवार चकमकी होऊं लागल्या. शेवटीं पैठणशेजारीं पालखेड येथें निजामाचा कोंडमारा केला, फाल्गुन व. १२ रोजीं त्यानें पालखेडनजकि आकास्मिकपणें निजामास गांठून त्याला कोंडून धरलें. निजामाचा तोफखाना दूर राहिल्यामुळें त्याचें कांहीं चालेनासें झालें. बाहेरचें दळणवळण तुटल्यामुळें कठीण अवस्था निर्माण झाली. दाणावैरण व अन्नपाणी बंद होऊन सैन्याचे हाल होऊं लागले. निजाम अगदीं त्रस्त होऊन गेला. त्याचे साह्यकर्ते त्याला मदत करीनात. तेव्हां बाजीरावाशीं समेट करण्याशिवाय दुसरा मार्ग नव्हता. ऐवजखानाच्या मध्यस्थीनें कराराचीं बोलणीं सुरू झालीं. संभाजीस आपल्या स्वाधीन करण्याविषयीं बाजीरावानें आग्रह धरला. चौथाई व सरदेशमुखीचे हक्क निजामानें मान्य केले. कांहीं किल्ल्यांचीहि प्राप्ति मराठ्यांना झाली. याप्रमाणें मराठ्यांना अनुकूल असा तह झाला.

—२५ फेब्रुवारी १७२८

## फाल्गुन व. १३ (१) चितोडचें सौभाग्य गेलें !

शके १४९० च्या फाल्गुन वद्य १३ रोजीं सम्राट् अकबर बादशहा याने रजपुतांचा प्रचंड पराभव करून चितोडगड आपल्या ताब्यांत आणला.

त्या वेळीं चित्तोडच्या राज्यावर उदयसिंह राणा होता. अकबर बादशहानें वयांत आल्यावर साम्राज्य-विस्तारास सुरुवात केली होती. आपल्या बापास संकटकाळीं ज्यांनीं मदत केली नाहीं त्यांना अकबरानें वठणीवर आणलें. अनेक रजपूत राजे त्याचे मांडलिक बनले. पण चितोडगडावर जोपर्यंत केशरी आदित्यध्वज फडकत आहे तोंपर्यंत अकबराला समाधान नव्हतें. मेवाडचा राणा उदयसिंह अकबराचे स्वामित्व कबूल करीत नव्हता. तेव्हां अकबरानें शके १४८९ मध्यें तीस हजार सेना व मोठा तोफखाना यांच्यासह चितोडवर स्वारी केली. गडाचे दरवाजे फोडण्यास शेंकडों हत्ती आणले होते. अकबराच्या सैन्याचा विस्तार पांच कोसपर्यंत होता. रजपुतांचें सैन्य आठ हजारांपर्यंत असून जयमल्ल हा कुशल सेनापति होता. अकबर आणि जयमल्ल यांची घनघोर लढाई झाली. त्या वेळीं रजपूत स्त्रियांनींहि मोठा पराक्रम केला. चितोड किल्ल्यावरील सूर्यदरवाजावर सोळा वर्षांचा कोवळा पोर वीर पठ्ठा अभिमन्यूच्या शौर्यानें लढला. हातांत तरवार घेऊन त्याची आई त्यास धीर देत होती. "बाळा, चितोडच्या बचावासाठीं आपला निर्वंश झाला तरी चालेल; पण माघार मात्र नको." परंतु शत्रूचें सामर्थ्य अफाट होतें. सहा महिनेपर्यंत रजपुतांनीं तग धरला. शेवटीं दाणागोटा व मनुष्यबळ संपलें. पराजय पावण्यापेक्षां रणांगणावर प्राणार्पण करण्याचा निर्धार रजपूत वीरांनीं केला. शीलरक्षणार्थ शेंकडो स्त्रियांचा जोहार झाल्यावर केशरी पोषाख करून सर्व वीर मोठ्या गर्जनेंत मोगल सैन्यावर तुटून पडले. पाय तुटला असतांहि जयमल्ल लढत होता. वीर पठ्ठा व पराक्रमी जयमल्ल यांचे शौर्य पाहून अकबर विस्मित झाला. जयमल्लाला तो 'संग्राम' म्हणे आणि ज्या तोफेनें तो मारला गेला तिचें नांवहि पातशहानें 'संग्राम तोफ' असे ठेविलें. शेवटीं रजपुतांचा मोड झाला. तीस हजार लोकांची अकबरानें कत्तल केली.

— २५ फेब्रुवारी १५६८

## फाल्गुन व. १३ (२) "तैसा शिवाजी नृप जिंकवेना!"

शके १५९४ च्या फाल्गुन व १३ रोजीं शिवछत्रपतींनीं अनाजी पंडित व कोंडोजी खळेकर यांच्या साह्यानें पन्हाळगड काबीज केला!

सिंहगड घेतल्यानंतर पन्हाळ्याकडे शिवाजीने लक्ष दिलें. आपल्या दोघां साथीदारांना फौज जमवण्यास सांगून गुप्तपणें त्यानें मसलतीस सुरुवात केली. शेंदोनशें लोक अंधाऱ्या रात्रींच पन्हाळगडाखालीं जमले. खालचीं माणसे फितवून घेऊन कोंडोजी साठ माणसांनिशीं दोरांच्या मदतीनें किल्ल्यावर चढला. कर्णे वाजवून त्यानें सर्वत्र गोंधळ उडविल्यामुळे कोणास कांहीं सुचेनासें झालें. किल्लेदार ठार झाल्यावर इतर लोक पळून गेले. किल्ला मराठ्यांचे हातांत अनायासेंच आला. शिवाजी महाराजांना हें वर्तमान रायगडावर समजलें तेव्हां ते आनंदित झाले. पन्हाळगड हातींचा गेला, त्यामुळें विजापूर दरबारची फारच गाळण उडाली; त्याचें चित्र तत्कालीन लौकिक पद्यांत दिसून येते —

"सरित्पतीचें जल मोजवेना। माध्यान्हिचा भास्कर पाहवेना।
मुष्टींत वैश्वानर बांधवेना। तैसा शिवाजी नृप जिंकवेना॥"

या पन्हाळगडासंबंधींचें सविस्तर वर्णन जयराम पिंडे यांनीं 'पर्णाल-पर्वत-ग्रहणाख्यान' नामक संस्कृत काव्यांत केलें आहे.

अण्णाजी दत्तो हे एक शिवाजीच्या अष्टप्रधानातील अधिकारी होते. 'तुम्ही राज्याचे आधारस्तंभ' असा शिवाजीनें यांचा गौरव केला आहे. त्याचप्रमाणें राज्याभिषेकाच्या वेळीं हे अन्तर्गत व्यवस्थेचे अधिकारी असून छत्र धरण्याचा मान यांच्याकडे होता. त्या वेळीं यांना वस्त्रें, पोषाख, तलवार, कंठी, चौकडा, तुरा, शिरपेच, शिक्के-कट्यार, ढाल, तलवार, हत्ती, घोडा असें देऊन यांचा सत्कार करण्यांत आलेला होता. सालीना दहा हजार होनांची नेमणूक यांना असे. परंतु दुर्दैवाची गोष्ट अशी कीं, अशा या राष्ट्रसेवकाला संभाजीच्या क्रोधाला बळी पडून सन १६८१ मध्यें हत्तीच्या पायाखालीं तुडवून मरण आलें.

— ६ मार्च १६७३

## फाल्गुन व. १३ (३) विष्णुशास्त्री चिपळुणकर यांचें निधन!

शके १८०३ च्या फाल्गुन व. १३ रोजीं अर्वाचीन मराठी वाङ्मयांतील प्रसिद्ध निबंधलेखक व टीकाकार विष्णुशास्त्री चिपळुणकर यांचे निधन झालें.

अव्वल इंग्रजींतील प्रसिद्ध पंडित कृष्णशास्त्री चिपळुणकर यांचे हे जेष्ठ चिरंजीव. कॉलेजमध्यें असतांनाच यांना विद्याव्यासंगाचा नाद लागला. वडिलांनीं सुरू केलेल्या रासेलसच्या भाषांतराचें काम पूर्ण करून विष्णुशास्त्री यांनीं आत्मविश्वास संपादन केला. हे शिक्षण संपल्यावर 'पूना हायस्कूल' मध्यें शिक्षकाचें काम पाहूं लागले. पुढें यांची बदली रत्नागिरी हायस्कूलमध्यें झाली. विद्यार्थ्यांच्या मनांत स्वाभिमान निर्माण करून त्यांना देशभक्तीचे धडे देण्याची महनीय कामगिरी विष्णुशास्त्री करीत होते.

सन १८७४ मध्यें त्यांनीं आपली प्रसिद्ध अशी निबंधमाला सुरू केली. मराठी भाषेत एक नवीनच युग सुरू झालें. "यांनीं ओजस्वी लिखाण करून मराठी भाषा व महाराष्ट्रीय लोक यांच्यांत आत्मविश्वास निर्माण केला. इंग्रजांनीं राजकीय परतंत्रतेबरोबर मानसिक गुलामगिरीहि पराकाष्ठेची निर्माण केली होती. तिचा प्रतिकार करण्यास तितकाच कठोर हल्ला करणारा पुरुष निर्माण व्हावयास पाहिजे होता. तो चिपळुणकरांच्या रूपानें अवतरला. धर्म, चालीरीति वाङ्मय वगैरेंची जितक्या उत्कटतेनें पायमल्ली चालली होती तितक्याच उत्कटतेनें प्रतिहल्ला करणारे चिपळुणकर होते. यांनीं देशांतील विचाराची दिशाच बदलण्याचें काम केलें." स्वत्वापासून भ्रष्ट झालेल्या महाराष्ट्रांत विचारजागृति करून आत्मनाशापासून परावृत्त करण्याची श्रेष्ठ कामगिरी चिपळुणकर यांनीं केली.

निबंधमालेचे आठ वर्षांत एकूण चौऱ्याऐशीं अंक बाहेर पडले. त्यांत मुख्यत्वेंकरून भाषाविषय, सामाजिक, राजकीय, वाङ्मयीन असेच निबंध असून त्यांच्या वाचनानें पुढें मराठी साहित्यांत एक खंबीर पिढी निर्माण झाली. चित्रशाळा, किताबखाना, केसरी-मराठा, न्यू. इं. स्कूल वगैरे संस्थांना जन्म देऊन विष्णुशास्त्री अवघ्या बत्तिसाव्या वर्षी निधन पावले.

— १७ मार्च १८८२

## फाल्गुन व. १४ ज्ञानकोशकार केतकर यांचें निधन !

शके १८१८ च्या फाल्गुन व. १४ रोजीं महाराष्ट्रीय ज्ञानकोशकर्ते, समाजशास्त्रज्ञ, संशोधक आणि नवविचारप्रवर्तक पंडित डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर यांचें निधन झालें.

हायस्कूलमध्यें असल्यापासूनच यांच्या बहुश्रुतपणामुळे शिक्षक यांना 'एन्सायक्लोपीडिया' असें म्हणत. येथील शिक्षणक्रम अपुरा असतांनाच ते १९०६ मध्यें अमेरिकेस गेले. आणि तेथील कार्नेल विद्यापीठांत समाजशास्त्राचा अभ्यास त्यांनीं सुरू केला. आणि थोड्याच अवधींत बी. ए., एम्. ए., पीएच्. डी. या पदव्या त्यांनीं मिळविल्या. History of Castes in India आणि Hinduism, its formation and Future या त्यांच्या ग्रंथांमुळें इंग्लंड–अमेरिकेंत त्यांना चागलीच कीर्ति मिळाली. सन १९१२ मध्यें हिंदुस्थानांत आल्यावर प्रथम कलकत्ता विद्यापीठांत थोडे दिवस काम करून देशभर 'राष्ट्रधर्मप्रचारकसंघा' च्या निमित्तानें त्यांनीं प्रवास केला. आणि शेवटीं सन १९१६ सालापासून ज्ञानकोशाचें काम अंगावर घेतले. या कार्यास लागणारी बुद्धिमत्ता, उद्योगप्रियता, चिकाटी हे गुण त्यांच्या अंगीं असल्यामुळेंच त्यांना हे प्रचंड काम करणें शक्य झालें. ज्ञानकोशाच्या प्रस्तावना–खंडांतून त्यांची शोधक बुद्धि आणि स्वतंत्र प्रज्ञा दिसून येते. हें काम चालू असतानांच त्यांनीं 'विद्यासेवक' नांवाचें मासिक सुरू केलें आणि त्यांतून आपल्या 'परागंदा', 'गोंडवनांतील प्रियंवदा', 'आशावादी' या कादंबऱ्या प्रसिद्ध केल्या. याशिवाय 'गांवसासू', 'ब्राह्मणकन्या', 'विचक्षणा' या त्यांच्या कादंबऱ्या प्रसिद्ध आहेत. या कादंबरी–वाङ्मयांतून त्यांनीं महाराष्ट्राला एक नवें दर्शन घडवून दिलें. आजपर्यंत मराठी कादंबरीचें क्षेत्र केवळ सदाशिव पेठ हेंच होतें. डॉक्टर साहेबांनीं तें क्षेत्र अत्यंत विस्तीर्ण करून त्याला जागतिक स्वरूप दिलें. 'एकच जगाच्या' कल्पनेचा पुरस्कार केतकरांनींच प्रथम केला. त्यांची दृष्टिच व्यापक होती. संकलनापेक्षां संशोधनाकडे अधिक कल असल्यामुळे 'प्राचीन महाराष्ट्र' नामक ग्रंथ लिहिण्यास सुरुवात केली. त्यापैकीं पहिला खंड प्रसिद्धहि आहे.

— १० एप्रिल १९३७

## फाल्गुन व. ३० संभाजी राजांचा वध !

शके १६१० च्या फाल्गुन व. ३० रोजीं छत्रपति संभाजी राजे यांचा वध वढू (बुद्रुक) येथें औरंगजेब यानें अत्यंत अमानुषपणें केला !

सुमारे सव्वा महिन्यापूर्वी म्हणजे माघ व. ७ रोजीं मुकर्बखानानें औरंगजेब बादशहाच्या सांगण्यावरून संभाजी व कलुशा या दोघांना संगमेश्वर येथें कैद केलें होतें. ही बातमी बादशहास कळल्यावर त्यानें विजयोत्सव सुरू केला. चार दिवसांची त्यांची मनीषा पूर्ण होणार होती. लागलीच त्यानें आनंदाप्रीत्यर्थ गुलबर्गा येथील साधूस दहा हजार रुपयांची भेट पाठविली. बादशहा या वेळीं बहादुरगडास होता. संभाजी व कवि कलश येत आहेत असें कळतांच त्याने हुकूम पाठविला, "संभाजीची धिंड काढीत घेऊन या." आणि हुकुमाप्रमाणे मराठ्यांच्या या राजाला चित्रविचित्र पोषाख चढविण्यांत आला, डोक्यावर विदुषकी टोपी घालून तीस घुंगुरू लावले, आणि संभाजीला उंटावरून मिरवीत वाद्ये वाजवीत हमीदुद्दीखानाने बादशहासमोर आणले. संभाजीचा निकाल कसा लावावा याची सल्लामसलत झाली. "मुसलमानी धर्म स्वीकारून बादशहाची सेवा कराल तर जीवदान मिळेल" या औरंगजेबाच्या विचारण्याला संभाजींत उसळत राहणाऱ्या हिंदु धर्माच्या अभिमानानें उत्तर दिले. "मृत्यु किंवा हालअपेष्टा यांना भिऊन हा शिवाजीचा पुत्र जिवाची पर्वा करणार नाहीं.... बादशहा मला आपली कन्या देऊन जांवई करून घेत असेल तर मी विचार करीन."

याचा परिणाम अपेक्षेप्रमाणे झाला. त्याच रात्रीं संभाजीचे डोळे काढण्यांत आले. कलुशाची जीभ कापण्यांत आली ! आणि दोघांनाहि ठार करण्याचा हुकूम बादशहानें फर्माविला ! शेवटीं फाल्गुन व. ३० रोजीं संभाजीचे व कलुशाचे एक एक अवयव तलवारीनें तोडून आणि त्यांचे मांस कुत्र्यास देऊन दोघांचा शिरच्छेद करण्यांत आला ! उभयतांचीं शिरें पेंढा भरून कैक दिवस निरनिराळ्या गांवांतून वाद्यें वाजवून मिरवण्यांत आलीं; पुढें तीं फेंकून दिल्यानंतर मराठ्यांनीं तुळापूर येथें आणून भीमा-इंद्रायणीच्या संगमावर अग्निसात् केलीं !

— ११ मार्च १६८९

# सूची



# परिशिष्ट

(इंग्रजी कालगणनेचा परिचय ज्यांना विशेष आहे अशांच्यासाठी ग्रंथांतील सर्व दिनविशेषांची रचना येथें संक्षेपानें तारीखवार दिली आहे.)

## जानेवारी

| दि. | सन | पृष्ठ |
|---|---|---|
| १ | १३९९ | ३८६ |
| | १६८३ | ३७४ |
| | १७९८ | ३७५ |
| | १८१७ | ३४८ |
| २ | १९४४ | ३६६ |
| ४ | १९०८ | ३५९ |
| ६ | १६६४ | ३८० |
| | १७९६ | ३५२ |
| ७ | १०२६ | ३७७ |
| | १३१९ | ४१५ |
| ८ | १८८४ | ३७१ |
| ९ | १२८८ | ४०० |
| | १६३३ | ४०८ |
| १० | १७३० | ३९८ |
| | १७६० | ३८५ |
| १२ | १८६३ | ३८४ |
| | १९४४ | ३७८ |
| १३ | १७७९ | ३८९ |
| | १७६१ | ३६७ |
| | १९०१ | ३८८ |
| १४ | १८५१ | ३७३ |
| | १७६१ | ३६७ |
| १५ | १७६१ | ३६९ |
| १६ | १९३८ | ३७६ |
| | १९०१ | ३८८ |
| १७ | १७७१ | ३९६ |
| १८ | १८४२ | ३६४ |
| १९ | १५९७ | ४०९ |
| २० | १९१८ | ३६८ |
| २१ | १८०५ | ३८३ |
| | १६६२ | ४१२ |
| | १२९७ | ४३५ |
| २२ | १६६६ | ३९० |
| | १६८२ | ४३० |
| २३ | १५६५ | ४०१ |
| | १६६४ | ४०२ |
| | १८९७ | ३८१ |
| २५ | १६६५ | ४२४ |
| २६ | १७३० | ४२० |
| | १९४१ | ३९१ |
| | १९५० | ४०६ |
| २९ | १२७४ | ४१६ |
| | १६१६ | ४२५ |
| ३० | १५२८ | ४०७ |
| | १९११ | ३९२ |
| | १९४८ | ३८२ |
| ३१ | १७९३ | ४२२ |

## फेब्रुवारी

| दि. | सन | पृष्ठ |
|---|---|---|
| १ | १६८९ | ४२६ |
| २ | १३१४ | ४१७ |
| | १९१७ | ४११ |
| ३ | १७६० | ४१८ |
| | १८३२ | ३९७ |
| ४ | १६७० | ४२९ |
| ५ | १२९४ | ४४९ |
| ६ | १९३१ | ४२३ |
| | १९३९ | ४१९ |

| दि. | सन | पृष्ठ |
|---|---|---|
| ७ | १२७३ | ४२१ |
| | १६९८ | ४४८ |
| ८ | १९०७ | ४३२ |
| ११ | १८१८ | ४०३ |
| १२ | १७९४ | ४१३ |
| १४ | १३७८ | ४६० |
| १६ | १७४५ | ४३३ |
| १७ | १८३६ | ४४२ |
| | १८८३ | ४१० |
| १८ | १४८६ | ४५८ |
| १९ | १६३० | ४६३ |
| | १९१५ | ४४६ |
| २० | १८१८ | ४१४ |
| | १७०७ | ४३८ |
| | १८५० | ४४४ |
| २४ | १६७४ | ४३७ |
| २५ | १५६८ | ४७४ |
| | १६०० | ४६७ |
| | १७२८ | ४७३ |
| २६ | १९२८ | ४४७ |
| २७ | १६७५ | ४५५ |
| २९ | १७७६ | ४५३ |

## मार्च

| दि. | सन | पृष्ठ |
|---|---|---|
| १ | १८१८ | ४३१ |
| | १७०० | ४७० |
| २ | १९४९ | ४४३ |
| ३ | ७८ | ३ |
| | १९१९ | ४४१ |
| | १९४३ | ४३४ |
| | १९४८ | ४२८ |
| ५ | १६६६ | ४५० |
| ६ | १६७३ | ४७५ |
| ७ | १६४७ | ४५२ |
| | १७६१ | ४६८ |
| ८ | १७३४ | ४५९ |
| | १८३३ | ४६५ |
| | १९४१ | ४५१ |
| ९ | १६५० | ४६२ |
| १० | १७९५ | ४६६ |
| ११ | १६८९ | ४७८ |
| | १८८८ | ४४५ |
| १२ | १९३० | ४५४ |
| १३ | १८०० | ४६४ |
| १६ | १५२८ | २१ |
| १७ | १२१० | ३० |
| | १८८२ | ४७६ |
| १८ | १५९४ | ८ |
| १९ | १७५४ | ४७२ |
| २१ | १७६१ | ४६१ |
| | १८५८ | ११ |
| | १८९० | ४ |
| २२ | १७३७ | ५ |
| २३ | १९३१ | ७ |
| २४ | १३०७ | २९ |
| २८ | १७३७ | १३ |
| ३० | १७२९ | १८ |
| | १३६५ | ३५ |
| ३१ | १८१८ | ४७१ |

## एप्रिल

| दि. | सन | पृष्ठ |
|---|---|---|
| २ | १७२० | १० |
| ४ | १६८० | २४ |
| ५ | १६६३ | १२ |
| | १६७९ | ३६ |
| ६ | १६५६ | ३२ |
| | १९३० | १४ |
| ८ | १८५७ | २२ |
| ९ | १६९५ | ५५ |
| १० | १३१७ | ४० |
| | १६७८ | ४२ |
| | १८७५ | ९ |
| | १९३७ | ४३७ |
| ११ | १६८९ | ४७८ |
| १२ | १३८२ | ३४ |
| १३ | १७३१ | २७ |
| | १९१९ | २० |
| १४ | १७३६ | ७२ |
| १५ | १४६९ | ५१ |
| | १७९४ | २५ |
| १८ | १७२० | ३३ |

| दि. | सन | पृष्ठ |
|---|---|---|
| | १९३८ | १२९ |
| ३ | १३५० | १५८ |
| ४ | १७२९ | १४९ |
| | १७४३ | १५४ |
| | १९०२ | ११० |
| ५ | १९४३ | १२८ |
| ६ | १८८१ | १३५ |
| ८ | १९१० | १२६ |
| ११ | १६६७ | १६० |
| १२ | १२९५ | १५९ |
| | १९४९ | १४३ |
| | १७७७ | १३२ |
| १३ | १६६० | १४२ |
| | १९०८ | १४० |
| १६ | १८५७ | १५५ |
| १९ | १३०९ | १७७ |
| | १७४५ | १६५ |
| २० | १५३१ | १७३ |
| | १७६१ | १४५ |
| २१ | १८१० | १५० |
| | १८७९ | १६६ |
| २२ | १७४२ | १६४ |
| २३ | १८५६ | १५१ |
| २५ | १६४८ | १८५ |
| | १७६९ | १५२ |
| | १८८० | १४७ |
| २६ | १७४५ | १७५ |
| २८ | १६८२ | १६९ |
| २९ | १९०१ | १८० |
| ३० | १६२२ | १४४ |
| ३१ | १८४९ | १७९ |
| | १८६५ | १७४ |

**ऑगस्ट**

| दि. | सन | पृष्ठ |
|---|---|---|
| १ | १७३४ | १६८ |
| | १७६० | १९० |
| | १९२० | १४१ |
| | १९२६ | १५३ |
| २ | १७८१ | १८१ |
| | १८६१ | १५६ |
| ३ | १७३० | २०७ |
| ६ | १८०३ | १८८ |
| | १९२५ | १८७ |
| ७ | १९४१ | १८४ |
| ८ | १९४२ | १५७ |
| ९ | १९२५ | १९१ |
| १० | १७६३ | १६३ |
| ११ | १८०३ | १९५ |
| | १९०८ | १८२ |
| १३ | १७९५ | २०२ |
| १४ | १६७८ | २१५ |
| | १९४७ | २०१ |
| १५ | १८६६ | १७२ |
| | १८७२ | १७८ |
| | १९४७ | २०३ |
| १६ | १२७५ | १९४ |
| | १७८३ | १८९ |
| | १७८९ | १९६ |
| १७ | १६६६ | १९९ |
| | १९०९ | १६७ |
| १८ | १७०० | २२५ |
| | १९४५ | १७६ |
| २० | १२२१ | २०८ |
| | १७६७ | १९७ |
| २२ | १६३२ | २२७ |
| २४ | १९२५ | २१३ |
| २५ | १९३६ | २१७ |
| २६ | १३०३ | २२२ |
| २७ | १९४८ | १९३ |
| २९ | १६९० | २१४ |
| | १७९७ | २१६ |
| | १९३१ | १८६ |
| ३० | १७७३ | २२१ |

**सप्टेंबर**

| दि. | सन | पृष्ठ |
|---|---|---|
| ४ | १६५६ | २३६ |
| | १७८९ | २२४ |
| ५ | १८३९ | २०० |
| ८ | १७५७ | २२९ |
| १० | १८०० | २३१ |
| १२ | १८३९ | २११ |

**ऑक्टोबर**



**नोव्हेंबर**

| दि. | सन | पृष्ठ |
|---|---|---|
| १३ | १६८१ | ३०१ |
| | १९१३ | ३०४ |
| १४ | १८८९ | ३१० |
| १५ | १६८९ | ३३५ |
| | १९१५ | २९७ |
| १६ | १८१७ | २९५ |
| १७ | १५२५ | ३२५ |
| | १८१७ | २९६ |
| | १९२८ | २९२ |
| १८ | १७७२ | ३१३ |
| २० | १९०८ | ३१७ |
| २१ | १८५३ | ३०९ |
| २५ | १६६४ | ३४० |
| २७ | १००१ | ३३१ |
| | १८९० | ३०५ |
| २९ | १५७५ | ३५१ |
| ३० | १८५८ | ३१५ |
| | १९०९ | ३०७ |

**डिसेंबर**

| दि. | सन | पृष्ठ |
|---|---|---|
| ४ | १८२९ | ३३० |
| ७ | १७६० | ३२० |
| ८ | १६५४ | ३४४ |
| | १९४७ | ३१६ |
| १२ | १७८० | ३३९ |
| १४ | १७३३ | ३४३ |
| | १३४८ | ३६३ |
| १५ | १७४९ | ३४१ |
| १७ | १७४० | ३७० |
| २२ | १७६० | ३३८ |
| २३ | १९२६ | ३४२ |
| २५ | १८६१ | ३४७ |
| २८ | १६५९ | ३८७ |
| २९ | १७६१ | ३६१ |
| ३१ | १८०२ | ३६५ |
| | १९२६ | ३५३ |

## शुद्धिपत्र

( सहज ध्यानांत येणाऱ्या चुंका येथें सुधारून दाखविल्या नाहींत. )

| पृष्ठ | ओळ | शब्द | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|---|
| १७ | दुसरी | दहावा | याच | याचा |
| १९ | दुसरी | सातवा | जैनांचा | जैनांचे |
| ६७ | चौदावी | पहिला | वैशाख व. ८ | वैशाख शु. ८ |

२३० पृष्ठावर शेवटच्या तारखेशेजारचा सन १८५४ ऐवजीं १५८४ पाहिजे.

२०४ पृष्ठावर सेखोजी आंग्रे यांची निधनतारीख २८ ऑगस्ट १७३३ अशी पाहिजे.

२४३ पृष्ठावर बहिणाबाईची समाधि-तारीख २० सप्टेंबर १७५०.

१९२ पृष्ठावर कृष्णजयंती श्रावण व. ७ दिली आहे. परंतु व. ८ गोकुळ-अष्टमी म्हणून सर्वत्र साजरी होत असते.

३५१ पृष्ठावर मार्गशीर्ष व. १२ रोजीं जनार्दन स्वामींची समाधि दिली आहे. परंतु फाल्गुन व. ६ ला जनार्दनस्वामींनीं देहत्याग केला अशी माहिती नंतर मिळाली आहे.

## प्रमुख आधारभूत ग्रंथ

(अनेक वृत्तपत्रें, मासिकें आणि स्फुट लेख यांचा उपयोग झालाच आहे. त्याशिवाय खालील प्रमुख ग्रंथ मला उपयोगी पडले. या सर्व ग्रंथकर्त्यांचा मी अत्यंत आभारी आहें)


| | | |
|---|---|---|
| (१) | आजकालचा महाराष्ट्र | पाध्ये-टिकेकर |
| (२) | शमीपूजन | का. न. केळकर |
| (३) | सत्तावनचें स्वातंत्र्यसमर | स्वा. वीर सावरकर |
| (४) | तेजस्वी तारे | स्वा. वीर सावरकर |
| (५) | गांधी-चरित्र | दा. न. शिखरे |
| (६) | श्रीराम-चरित्र | चिं. वि. वैद्य |
| (७) | श्रीकृष्ण-चरित्र | चिं. वि. वैद्य |
| (८) | भारतीय युद्ध | द. गो. लिमये |
| (९) | भारतीय तत्त्वज्ञान | न. चिं. केळकर |
| (१०) | टिळक-चरित्र | न. चिं. केळकर |
| (११) | टिळक-भारत | शि. ल. करंदीकर |
| (१२) | सावरकर-चरित्र | शि. ल. करंदीकर |
| (१३) | मराठी वाङ्मयाचा इतिहास, खंड १, २, ३ | ल. रा. पांगारकर |
| (१४) | ज्ञानेश्वर, तुकाराम, एकनाथ यांचीं चरित्रें | ल. रा. पांगारकर |
| (१५) | महाराष्ट्र सारस्वत भाग १, २ | वि. ल. भावे |
| (१६) | महाराष्ट्र कवि-चरित्र | ज. र. अजगांवकर |
| (१७) | राजधानी रायगड | कृ. वा. पुरंदरे |
| (१८) | शिखांचा स्फूर्तिदायक इतिहास | शं. पु. जोशी |
| (१९) | मराठ्यांच्या लढायांचा इतिहास | शि. म. परांजपे |
| (२०) | मेवाडचे वीर, | उपासनी |
| (२१) | काळकर्ते परांजपे | वा. कृ. ,परांजपे |
| (२२) | सुभाषचंद्र बोस | भा. कृ. केळकर |
| (२३) | कुलाबकर आंग्रे | ढबू |

